ऐतिहासिक कादंबरी नंबर ८

# सूर्यग्रहण.



रचणार
**हरि नारायण आपटे.**



पुणें येथें
आर्यभूषण छापखान्यांत रा. अनंत विनायक पटवर्धन
यांनीं छापून प्रसिद्ध केलें.

१९१९.

# प्रकाशकाचे दोन शब्द



हें पुस्तक रचणाराचे प्रास्ताविक **दोन शब्द** या पुस्तकांस लाभले नाहीं ही कष्टाची गोष्ट होय. कै० हरिभाऊ हे या **दोन शब्दांत** वाचकांस थोड क्यात पुष्कळ सांगत, परंतु त्यांच्यावर काळाची झडप पडल्यानें अल्पावकाशानें सुटणारें **ग्रहण** महाराष्ट्रसूर्यास न लागतां त्याचा अस्तच झाला. तथापि दैवाविलासित म्हणून पुढील मार्ग आक्रमणें भाग आहे. कै० हरिभाऊंनीं हें पुस्तक कोणास अर्पण करणें हें निश्चित केलेलें नव्हतें म्हणून आम्हीं तें अर्पणपत्रिकेशिवायच प्रसिद्ध करण्याचें ठरविलें आहे. हरिभाऊंच्या हातच्या नवीन कादंबऱ्या वाचण्यास मिळणें आतां जरी अशक्य झालें आहे तरी त्यांच्या पूर्ण व अपूर्ण कादंबऱ्या, गोष्टी आणि लेख हीं महाराष्ट्र वाचकांच्या वाचनाभिरुचीस योग्य वळण लावण्यास चांगलीच सामुग्री आहे. हरिभाऊंचा स्थूल देह इहलोकांतून जरी आज नाहींसा झाला तरी या सामग्रीनें मराठी वाचकवर्गास त्यांचें स्मरण सदैव राहील. हरिभाऊंची ही ग्रंथसामुग्री कोणत्याही वाङ्मयास ललामभूत अशीच आहे. त्यांच्या लेखणीनें महाराष्ट्र वाङ्मयास उपकृत करून ठेविलें आहे. मराठी वाङ्मयांत प्राचीन कवींचा जसा अमोघ ठेवा आहे त्याच तोडीचा ठेवा हरिभाऊंनीं गद्य ग्रंथांच्या द्वारें महाराष्ट्रास उपलब्ध करून देऊन आपणच आपलें **चिरकालीन स्मारक** करून ठेविलें आहे.

**आर्यभूषण** व **ज्ञानप्रकाश** छापखान्यांशीं हरिभाऊंचा किती निकट संबंध होता हें महाराष्ट्रास आज तीस वर्षांत प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या ग्रंथप्रकाशनावरून माहित आहेच आणि हरिभाऊंनीं आपल्या विलक्षण लेखनशैलीनें व रचनाचातुर्यानें सर्व महाराष्ट्राचें प्रेम संपादन केलेलें आहे. ह्मणून त्यांचे मागें त्यांनीं केलेल्या ग्रंथांच्या प्रकाशनाचें काम चालू ठेवून **प्रेमळ मित्राच्या ऋणाची अंशतः फेड** करण्याची आमची मनीषा आहे. त्यांचीं कांहीं पुस्तकें दुर्दैवानें अपूर्ण राहिलीं आहेत; तीं आहेत त्या स्थितींतच प्रसिद्ध करणें आह्मांस इष्ट वाटतें. हा आमचा यत्न सिद्धीस जाणें महाराष्ट्र वाचकवृंदांच्या सहायावर अवलंबून आहे ही गोष्ट त्यांचे पुढें मांडण्याची परवानगी घेऊन हे **दोन शब्द** पुरे करितों.

पुणें, ता. २४ जून १९१९ — प्रकाशक.

# ' अनुक्रमणिका.




| विषय. | पृष्ठ. |
|---|---|
| १. पुरश्चरणाचें पवित्र स्थान. | १ |
| २. तीन प्रवासी ... ... | ८ |
| ३. विचार ... ... | १५ |
| ४. प्रयाण ... ... ... | २४ |
| ५. जोशी ... ... ... | ३४ |
| ६. जयसिंग ... ... | ४२ |
| ७. दक्षिणेंत आल्यावर ... | ५२ |
| ८. कोंडाणा व पुरंदर ... | ५५ |
| ९. कोंगाडी ... ... | ६३ |
| १०. पुरंदरकडे ... ... | ७४ |
| ११. किरातसिंग ... ... | ८१ |
| १२. औरंगाबाद ... ... | ९५ |
| १३. प्रातःकाळची वेळ ... | १०३ |
| १४. औरंगाबादेकडे ... | १०७ |
| १५. ठकास महा ठक ... | ११९ |
| १६. हल्ला ... ... | १३० |
| १७. नूरल हुदा ... ... | १३४ |
| १८. पुरंदरकडे ... ... | १४० |
| १९. किल्ल्यावर ... ... | १४८ |
| २०. शुभप्रभातीं ... ... | १५९ |
| २१. माता रणदेवीचें चरित्र. | १६६ |
| २२. किरातसिंग जातो ... | १७३ |
| २३. मुरार बाजी... ... | १८१ |
| २४. स्वप्न... ... ... | १८७ |
| २५. स्वप्न व त्यानंतर ... | १९४ |
| २६. समर्थ ... ... ... | २०१ |
| २७. दिलेरखान ... ... | २०७ |
| २८. दोघांची भेट ... ... | २१५ |
| २९. तहाचें बोलणें... ... | २२१ |
| ३०. एक मधला प्रसंग ... | २२७ |
| ३१. काम झालें ... ... | २३३ |
| ३२. तहाचा दिवस ... | २३८ |
| ३३. नजराणा ... ... | २४४ |
| ३४. तह झाल्यानंतर ... | २५५ |
| ३५. भोळा बिचारा दिलेरखान. | २६९ |
| ३६. मार्गांतील एक प्रसंग-सूर्यास्तीं ... ... | २७७ |
| ३७. [illegible] झालें ! | २८४ |
| ३८. गोसावणींच्या गोष्टी ... | २९३ |
| ३९. जखमी झालेला शिपाई. | २९८ |
| ४०. शिपायाची पुढली हकीकत ... ... ... | ३०६ |
| ४१. आग्र्यास गेल्यानंतर. | ३१३ |
| ४२. स्वागत ... ... | ३१९ |
| ४३. हा कोण ? ... ... | ३२७ |
| ४४. मथुरा-वृंदावनास ... | ३३७ |
| ४५. खरकसिंग ... ... | ३४१ |
| ४६. बादशहाची थैली ... | ३५० |
| ४७. दरबारीं गेल्यावर ... | ३५५ |
| ४८. ठिकाणीं परत आल्यावर | ३६१ |




# सूर्यग्रहण.

## प्रकरण १ लें.

### पुरश्चरणाचें पवित्र स्थान.

परळीच्या डोंगरावरील एक खबदडीचा फार बिकट असा भाग. सर्वां
अशी कीं, त्या भागाकडे गेल्यास समर्थांच्या नाराजीस आपण का
त्या बाजूस कधींहि कोणी जात नसे. समर्थ एकटे जात. ते तिक
च्या अत्यंत एकनिष्ठ शिष्यांपैकीं दोघांचौघांस कांहीं कारणपर
जरूर पडली, तर त्यांस जाण्याची मुभा असे. ना
बाजूस जाण्याच्या भानगडींतच पडत नसे. समर्थांच
अशा कित्येक गृहस्थांनीं एक दोन वेळां तिकडे ज
खटाटोप केला होता; परंतु ते थोडीशी वाट चाल
विंचू, इंगळ्या, साप असे भयंकर प्राणी त्यांस
मुकाट्यानें मागल्या पावलींच घरची वाट ध
आपण समर्थांच्या दर्शनाच्या निश्च
कांहीं उपद्रव करणार
लागले; प
दोन

बाजूस व कशी आहे याची माहिती एकाही व्यक्तीस नव्हती. हजारों लोकांनीं ती गुहा पहाण्याचे प्रयत्न केले, परंतु त्या प्रयत्नांत अमक्याला सिद्धि आली असें कोणीही कधीं सांगूं शकत नसे. आपण अमूक जागेपर्यंत गेलों आणि तेथें अमूक एक भयंकर स्वरूप किंवा संकट पाहून परतलों, पुढें जाण्याची आपली छाती होईना असें जो तो ह्मणे. समर्थ पुरश्चरणास बसले असले ह्मणजेच हे मार्गांत असले प्रकार दिसतात, नाहीं तर दिसत नाहींत असें कित्येकांचें म्हणणें होतें; परंतु तेंही पुढें खोटें ठरलें. समर्थ त्यां स्थळीं खास नाहींत अशाही वेळीं कित्येकांनीं तें पवित्र स्थान पहावें म्हणून प्रयत्न केले, परंतु त्या स्थानाच्या परिघांत दर दोन चारशें गवलांवर कांहीं तरी भयंकर प्रकार असे दिसावे, कीं या मजलेला नाहीं त्या, ... तेथें जाण्यासाठीं साहस करूं इच्छिणारांचा धीर आणि शरीर हीं दोनही ... ीकडेच लटपटावीं. कित्येक असेंही सांगत कीं, शिवाजीमहाराजांचे गुरु ... त्याजवळ चंद्ररावाच्या मृत्यूची हकीकत सांगण्याचा निश्चय करून ... ा एक भाऊ त्या स्थानाकडे चालला. त्यानें वाटेंतल्या संक- ... नाहीं असा निश्चय केला होता. त्याप्रमाणें त्यानें सुमारें ... चवदाशें पावलें मोठ्या कष्टानें रेटलीं. वाटेंत कित्येक ... ीर टाकले आणि काय वाटेल तें होवो आपण पुढें ... श्चय केला. परंतु वाटेंत त्यास जिकडे तिकडे कां- ... आपल्या फरशीनें तें कुंपण तोडण्याचा सपाटा ... न पुढें जावें तों पुनः कुंपण आहेच. सरासरी ... ालें सुद्धां स्वारी गेली नाहीं. तेव्हां काय ... च्चीं एकदम धीर गंभीर अशा वाणीनें ... नको, पुढें येऊं नको. ... आधींच ... च

वाणी समर्थांची असावी. आपण काय कारणानें एवढ्या निश्चयानें त्यांच्याकडे जातों आहोंत हें त्यांनीं अंतर्ज्ञानानें जाणून आपणास उत्तर दिलें आहे. इतकें मनांत आल्यानंतर त्यास आतां आपण पुढें जावें कीं नाहीं याचा घोंटाळा पडला. असा अंतर्ज्ञानी पुरुष आपण दृष्टीनें पाहिला नाहीं, त्याचें पवित्र दर्शन आपण घेतलें नाहीं, तर आपला जन्म व्यर्थ. तेव्हां आपण मागें येऊंच नये, पुढें जावेंच. असा त्यानें निश्चय केला. आणि पुनः आपल्या फरशीनें, तरवारीनें व तीरांनीं मार्गांतील अडचणी व संकटें दूर करीत पुढें पावलें टाकण्याचा त्यानें उपक्रम सुरू केला. आणखी सुमारें पन्नास पावलें पुढें जातो तों पुनः एकदां तीच गंभीर वाणी " बाबारे पुढें येऊं नको " असें ह्मणते आहे असा त्यास स्पष्ट अनुभव आला. तरी तो माघारा वळेना. तेव्हां एकाएकीं त्याच्यासभोंवतालचें कांट्यांचें कुंपण एकदम भडकलें आणि आपण आतां होरपळून मरतों अशी त्याची स्थिति झाली. त्याला मूर्च्छा आली. सुमारें अर्ध्या घटकेनें तो आपोआप शुद्धीवर आला आणि पहातो तों आपण जेथें मूर्च्छित पडलों तेथून कोठें तरी दुसरीकडे येऊन पडलों आहों. आसपास पहातां त्याला असें वाटलें कीं, आपल्यासभोंवतालचा प्रांत आपल्या अगदीं ओळखीचाच आहे. आणखी निरखून पहातां त्याची खात्री झाली कीं हा जावळीच्या रानाचाच भाग. त्याबरोबर तो फार चकित झाला, आणि त्यानें आपला अनुभव अनेक मंडळीस सांगितला. हां हां ह्मणतां ती बातमी सगळीकडे पसरली. तेव्हांपासून समर्थांचें दर्शन घेण्यासाठीं उत्सुक अशा लोकांना असें कळलें कीं, स्वामी आपल्या पुरश्चरणाच्या पवित्र स्थळीं जाऊन बसले ह्मणजे प्रत्यक्ष दर्शनाची उत्सुकता दाबून ठेवून केवळ पादुकांचें दर्शन घेऊनच आपण आपल्या चित्ताचें समाधान करून घ्यावें.

जावळीकर चंद्ररावाच्या बंधूंपैकीं एकाची ही गोष्ट दिगंत झाल्यापासून समर्थांची कीर्तिही दिगंत झाली; अर्थात् लोकांची त्यांच्या दर्शनाविषयींची उत्सुकत
ाढली. पहिल्यापेक्षां जास्त लोक त्यांच्या दर्शनाकरितां येऊं लागले.
ाच्या पवित्र स्थानापर्यंत चार पांच व्यक्तींखेरीज कधींच कोण
ाहींत. वर्षांतून कधीं अकरा दिवस, कधीं एकवीस दिवस
देवस परंतु एकंदरीत चार महिने तरी समर्थ त्या
ळच्या क्रमाप्रमाणें उग्र तपश्चर्या करीत अस
णून मानलेल्या शिष्यांनासुद्धां—अशी सक्त त
याखेरीज आमचा तपोभंग करण्यास कोणी
ीधरस्वामी व वेणूबाई ही मंडळीसुद्धां फा
ामी बसले असले ह्मणजे त्यांस आहाराचं
र्थात् अमुक कारणाकरितां कोणी जाणें

मुष्किलीचें होतें. फक्त पुरश्चरण संपण्याच्या दिवशीं सकाळींच कल्याणस्वामी, श्रीधर-स्वामी व वेणूबाई तेथें जात.

आमची ही नवी कथा ज्या दिवशीं सुरू होते, तो दिवस अशा कांहीं विशेष कारणाचा होता! समर्थांना आपल्या त्या पवित्र स्थानीं बसून पुरश्चरण सुरू केल्यास आज बरोबर एकविसावा दिवस होता. आज सायंकाळीं स्वामींचें पुरश्चरण समाप्त होऊन त्यांनीं थोडासा आहार घेण्याचा संभव. तेव्हां वर सांगितलेली तीन मंडळी कांहीं आहारसामग्री घेऊन तेथें जाण्यास निघाली होती. त्यांस अर्थातच वाटेंत विंचू, साप, वाघ किंवा लांडगे यांच्यापासून कांहीं त्रास झाला नाहीं. ती मंडळी सरळ चालली होती.

तें स्थान अतिशय रम्य—झाडी दाट, एका बाजूस उंच सुळक्यासारखा वर गेलेला डोंगर, दुसऱ्या बाजूस सुंदर छायेच्या वृक्षाची राई, नानाप्रकारचे सुस्वर काढणारे पक्षी खुशाल इकडून तिकडे हिंडतांना दिसायचे. जणूं काय आपण या स्थानांतल्या वृक्षांवर आहों हें आपलें महाभाग्य आहे याची त्यांसही जाणीव होती! त्या स्थानास एक तर नैसर्गिक सौंदर्य होतेंच, परंतु त्याशिवाय स्वामींच्या तपस्तेजाचाही प्रभाव त्याच्या सौंदर्यास विशेष दर्शनीयता आणीत असला पाहिजे. वरील मंडळी त्या छायामय मार्गानें पुढें गेल्यानंतर कांहीं अंतरावर एकदम सर्व अशा जागीं आले कीं, तेथें डोंगराच्या वरच्या बाजूस एका खबदडींत हिरवीगार करवंदीची जाळी होती तिच्याखेरीज वृक्षाचें किंवा वेलीचें नांव नाहीं! त्या खबदडीच्या आजूबाजूला सुमारें दोनदोनशें पावलांच्या परिघावर ती जाळी पसरलेली; परंतु त्याच्या सभोंवर पलीकडे अगदीं रुक्ष असा सुमार दोनशें पावलांचा परिघ. जणूं काय तेवढ्या त्या दोनशें पावलांच्या परिघांत वृक्षवेलींना 'तुह्मी वाढूं नका, उगवूं सुद्धां नका,' अशी सक्त ताकीद दिलेली होती! जाळींत शिरलें कीं कांहीं अंतरावर एक लहानसें विवर लागे.
[illegible]च्या तोंडावर सुद्धां जाळीचें एकप्रकारचें आच्छादनच बनलें आहे असें
[illegible]वळ गेलें कीं विवरद्वार दिसे. आंत डोकावून पाहिलें असतां प्रथम
[illegible]कुट्ट अंधार, परंतु अंधारांत शिरावयाचें असा निश्चय करून
[illegible]पुढें गेलें कीं ती तपस्तेजानें देदीप्यमान् दिसणारी समर्थ-
[illegible]ीं, आपल्या अंतःकरणांतील अंधकार गेला,
[illegible] रहात नसे. त्या विवराच्या भोंवतीं जाळी
[illegible]रंतु चमत्कार असा कीं त्या जाळींत एकही
[illegible]कचित् सुद्धां शब्द ह्मणून होत नसे. शांतता
[illegible]ह्मटलें असतांही शोभेल.

[illegible]ा एक कोस तर काय परंतु पांच पावलें
[illegible] कीं जेथें शब्द होत नाहीं. परंतु तें स्थान

अगदीं निःशब्द होतें असें ह्मटलें तर त्यांत यत्किंचितही अतिशयोक्ति होणार नाहीं. प्राचीनकाळच्या ऋषींच्या तपोवनांचें वर्णन करतांना संस्कृत कवि प्रशांत रमणीय असें त्यांस विशेषण लावीत असतात. तेंच विशेषण समर्थांच्या या सर्व लोकांच्या उपसर्गापासून अगदीं अलिप्त अशा तपश्चरणस्थानाला अगदीं यथार्थपणें लावितां येईल. त्या प्रशांत रमणीयस्थानीं पाऊल घालून त्या कालीं तेथील ऐश्वर्य ज्यानें पाहिलें, त्याची धन्यता काय वर्णन करावी ! एवढेंच कीं तेथें पाऊल घालण्याचें व तें स्थान पहाण्यास मिळण्याचें भाग्य फारच थोड्यांना असे. समर्थ पृथ्वीवर होते तेव्हां सुद्धां या स्थानाचें दर्शन फार थोड्यांस प्राप्त होई हें आतांपर्यंतच्या एकंदर वर्णनावरून वाचकांस दिसून आलेंच असेल. परंतु या स्थानाच्या पुण्य दर्शनापासूनच आमच्या नव्या कथेचें उद्घाटन होत आहे. आणि न जाणों या स्थानाच्या पुनर्दर्शनानेंच कथेचा समारोपही होईल.

वर सांगितलेली तीन मंडळी त्या जाळीजवळ जाऊन पोंचलीं, आणि त्यांनीं हळूच आधीं कानोसा घेतला कीं स्वामींचें पुरश्चरण चालूच आहे कीं संपून ते उठण्याच्या बेतांत आहेत. स्वामींचें पुरश्चरण चालूच होतें. त्यांची पूर्ण समाधि लागली होती. आणि ती लवकर उतरेल असा रंगही दिसत नव्हता. तथापि तो शेवटला दिवस असल्यामुळें त्यांना तेथें थांबणें अवश्यच होतें. ह्मणून तीं तीनही मंडळी त्या विवरापासून कांहीं अंतरावर बसलीं.

दोन तीन मनुष्यें एकत्र जमलीं आणि त्यांना कांहीं काळ कसा तरी कंठावयाचा आहे, तर एकमेकांशीं कांहींतरी बोलत बसल्याखेरीज राहणार नाहींत हें उघडच आहे. तोच नियम आमच्या या समर्थभक्तांनाही अर्थातच लागू होता. समर्थांची समाधि उतरेपर्यंत त्यांना बाहेरच्या बाजूस बसणें भाग होतें. त्याप्रमाणें ते बसल्यानंतर श्रीधरस्वामी कल्याणस्वामींस ह्मणालेः– " महाराज आज बरेच दिवसांत इकडे आले नाहींत, मलाही त्यांच्याकडे जाण्याला झालें नाहीं. तिकडली एकंदर हालहवाल कशी काय आहे कोण जाणे ! बाकी समर्थांना कांहीं तरी पत्र यायचें. आलें नाहीं तेव्हां कांहीं तरी मोठ्या कारस्थानांत गुंतले असले पाहिजेत महाराज. "

" विलक्षण पुरुष आहे बोआ तो ! समर्थांना जसा शिष्य पाहिजे असा आहे यांत कांहीं शंका नाहीं. नाहीं तर आह्मी ! त्यांची पुरती सेवासुद्धां आमच्याच्यानें होईना. लोक मात्र समजतात कीं, आह्मी समर्थांचे पट्टशिष्य, आणखी छत्रपति शिवाजी खरा शिष्य असून कोणाला माहितीसुद्धां नाहीं. आमचा डांगोरा पिटला जातो आहे ! समर्थांना तरी त्याची केवढी काळजी ! काय असेल तें असो, इतके लोक दर्शनासाठीं येतात, परंतु समर्थांचें दर्शनसुद्धां होत नाहीं, आणखी महाराजांना ? महाराजांचा उलटा निदिध्यास यांना लागलेला आहे ! असा कांहीं चमत्कार आहे ! "

त्यावर वेणूबाई मध्येंच ह्मणाल्या, " बाबांनो, त्याचं कारणच तसं आहे. जसं

नरनारायणाचं नातं तसंच हें महाराजांचं आणखी समर्थांचं नातं आहे. त्यांची बरोबरी आपण करण्याचं मनांत तरी आणावं कशाला ? महाराजांच्या चरित्रावर यांची फार सूक्ष्म दृष्टि असते. नेहमीं ज्ञानदृष्टीनं ते त्यांचं चरित्र पहातच असतात. याचा अनुभव कांहीं आजकालचा का आपल्याला आहे ? पहिल्यापासून हा अनुभव आहे. आपण आपलीं साधीं माणसं. महाराजांच्या हातून जगाच्या कल्याणाची अशीं कितीक तरी कार्यं करावयाचीं असा त्यांचा संकल्प. तेव्हां त्यांची गोष्ट आपल्याला कशाला पाहिजे ! ''

" त्यांचीन् आपली बरोबरी करायची या उद्देशानं कोणीं त्यांची गोष्ट काढली ! महाराज म्हणजे एक मोठी थोरली विभूतिच आहे, यांत काय शंका आहे ! अशी विभूति ह्मणून तर लहानपणापासून समर्थांनीं त्यांच्यावर कृपादृष्टि ठेवली. आज बरेच दिवसांत स्वारी इकडे आली नाहीं ह्मणून सहज स्मरण झालं. ''

" दिल्लीच्या बादशहाच्या मुलाची आणखी त्यांची कांहीं तरी नुकतीच कुरबुर झाली असावी असं दिसतं. तो कायसा महाराजांची कुमक मागत होता, आणखी महाराजांनीं कुमक देण्याची टाळाटाळी केली. मग काय त्यांचा हेतु असेल तो असो.''

" त्यांचा हेतु काय असायचा ! '' श्रीधरस्वामी एकदम ह्मणाले. " हा मुलगा, आणखी औरंगजेब बाप. दोघांचा बेबनाव हा का बाहेरून दाखवायपुरता आहे का आंतून खरोखरीच आहे याचा कांहीं पत्ता ? आज महाराजांचं सगळं सैन्य आपल्या कुमकेला म्हणून अडकवून ठेवून दुसरीकडून महाराजांच्या मुलखावर स्वाऱ्या करण्याचा विचार त्याचा नाहीं म्हणून तरी कशावरून ? असा संशय येऊन महाराजांनीं त्या भानगडींत पडायचं नाहीं असा विचार केला आहे यांत शंका नाहीं ! ते ह्मणजे केवढे चतुर आहेत. मी त्यांना सोळाव्या सतराव्या वर्षापासून पहातों आहें ! बापलेक केव्हांच एक होतील आणखी आपला सगळा व्यूह ढासळून जाईल, ही भीति मनांत बाळगून त्यांनीं शहाजाद्याला कोणच्याही तऱ्हेनं उत्तेजन दिलं नाहीं ! बाकी शहाजादा तरी काय आपल्या बापाचाच मुलगा ! त्याच्या मनांत आपल्या बापाचा कित्ता वळवण्याचंही आलं असलं, तर त्यांत नवल नाहीं. किंवा त्याच्यासारखं कांहींतरी कपट करायचं त्याच्या मनांत आलं असलं तरी त्यांत नवल नाहीं. ''

" पण तो फार सरळ आहे, कपटी नाहीं, असं आह्मी ऐकत होतों ! '' कल्याणस्वामींनीं विचारलें.

" खरी गोष्ट आहे. तो गरीब आहे खरा. कपटी नाहीं अशीही त्याची ख्याति आहे, पण औरंगजेबाचा मुलगा तो; त्याचा भरंवसा धरूं नये हेंच चांगलं. बापाची मर्जी संपादन करण्यासाठीं त्यानं बापाच्या एखाद्या कपटनाटकांत जर प्रवेश केला, तर मला कांहीं नवल वाटायचं नाहीं. ''

" तूं सुद्धां खरोखर राजकारणांतच पडायचा बाबा, पण इथें समर्थांच्या गुंत्यांत

कसा शिरलास कोण जाणे ! जसे मोरोपंत पिंगळे आहेत, तसाच तूंही त्यांत शिरायला पाहिजेस. तिकडेच तुझी गति चांगली आहे, इकडे या अध्यात्मांत शिरण्यापेक्षां ! " कल्याणस्वामी हंसून श्रीधरस्वामीस ह्मणाले.

" मला नकोच तें ह्मणून तर मी शिरत नाहीं. महाराजांना नुसतं सुचवलं पुरे, तर ते मला कोठेंतरी कांहीं अधिकार देतील; पण नको आपल्याला ती इच्छाच नाहीं समर्थांची सेवा करायची, आणखी त्यांची आज्ञा अनुसरायची इतकाच आपला अधिकार. याहून जास्ती कसली इच्छा नाहीं आणखी आशाही नाहीं. कुठें तरी जाऊन मठ स्थापन कर ह्मटलं तर तो कारभारसुद्धां नको; मग आणखी तर काय सांगूं ! पहिल्या पहिल्यानं पुष्कळ गोष्टी केल्या, पण आतां समर्थांनीं कुठें दूर जायला सांगितलं तरी सुद्धां इच्छा होत नाहीं. असं वाटतं कीं त्यांचे चरण सोडून कुठें जाऊं नये. आतां त्यांनीं एखादी आज्ञा केलीच तर माझा इलाज नाहीं. पण इथें राहून तुमची संगति आणखी त्यांची सेवा घडावी एवढीच आतां खरी खरी इच्छा आहे. उद्यां त्यांनीं कुठें आज्ञाच केली जा ह्मणून तर काय मी नाहीं जाणार ? पण आपली खरी इच्छा काय आहे ती सांगितली, दुसरं कांहीं नाहीं. "

अशा त्या तिघांच्या शिळोप्याच्या गोष्टी चालल्या असतां आंतून बुभुक्कार ऐकूं आला. त्याबरोबर ही तीनही मंडळी त्या विवराकडे गेली तों श्रीस्वामी रामनामाचा मोठमोठ्यानें जयजयकार करीत आहेत असें दिसलें ! नंतर हळूं हळूं त्यांचा स्वर कमी कमी होत आला व त्यांनीं पुनः एकदां बुभुक्कार केला. हीं तिघेंही त्यांच्या समीप गेलीं. वेणूबाई पाठीशीं उभ्या राहिल्या. श्रीधरस्वामी डावे बाजूस आणि कल्याणस्वामी उजवे बाजूस. अशी मंडळी उभी राहिली व त्यांनीं आपली दृष्टि एकसारखी स्वामींकडे लाविली होती. स्वामी मुखानें केव्हां रामनामाचा जयजयकार केव्हां बलभीमाचा जयजयकार करीत होते. परंतु अद्यापि त्यांचें मन त्या रंगांतच होतें, पृथ्वीतलाकडे आलेलें नव्हतें असें स्पष्ट दिसलें. नंतर हळूं हळूं त्यांनीं डोळे उघडले आणि चमत्कार हा कीं, त्यांची पहिली दृष्टि श्रीधरस्वामींकडे गेली. त्याबरोबर त्यास ते म्हणालेः " काय श्रीधरस्वामी, सूर्यग्रहणाचा योग आहे हें कळलं आहे का आपल्याला ? कांहीं काळपर्यंत अगदीं खग्रास सूर्यग्रहणाचा योग आहे ! " स्वामींच्या या बोलण्याचा त्या तिघांसही अर्थ समजला नाहीं. स्वामी आपलें इतके दिवसाचें पुरश्चरण संपवून उठल्याबरोबर पहिल्या प्रथम बाहेरल्या बाजूस वरून खळखळ वहात येणाऱ्या झऱ्याजवळ जाऊन आचमन वगैरे करावयाचे, तोंपर्यंत एक अक्षरसुद्धां बोलावयाचे नाहींत. परंतु आज एकदम त्यांच्या तोंडून वर सांगितल्या प्रकारचे उद्गार निघाले ! समाधि उतरल्याबरोबर " सूर्यग्रहणाचा योग आहे, खग्रास सूर्यग्रहणाचा योग आहे " असें कां—ह्मणूं लागले ? श्रीधरस्वामींनीं अनेक प्रकारें तर्क केले, स्वामींच्या तोंडचे शब्द त्यांच्या कानीं पडतांच त्यांच्या

तर्कास अर्थातच सुरुवात झाली, परंतु एकही तर्क बरोबर जुळेना हें उघडच आहे. समर्थ तर एकसारखे वारंवार ह्मणतः "एकूण, सूर्यग्रहणाचा—कांहीं काळपर्यंत खग्रास सूर्यग्रहणाचा योग आहे! केतू ग्रास करण्याला कांहीं सोडीत नाहीं. पण...पण कांहीं हरकत नाहीं. ग्रासांतून मोक्ष होईल, आणि सूर्य विशेषच तेजःपुंज दिसूं लागेल. त्याबद्दल काळजी करण्याचें विशेष कारण नाहीं."

समर्थांचें हें भाषण कोणाला उद्देशून असें नव्हतें. पहिल्यानें जरी ते श्रीधर-स्वामीला उद्देशून बोलले, तरी हें पाठीमागलें बोलणें स्वगतच होतें असें दिसलें.

---

# प्रकरण २ रें.

## तीन प्रवासी.

समर्थांच्या पुरश्चरणास बसण्याच्या विवरांत वरील प्रकार चालला होता त्याच दिवशीं प्रातःकाळीं तेथून सुमारें चार कोसांवर तीन प्रवासी—घोडेस्वार— सावकाशपणें आपल्या सभोंवतालची सृष्टिशोभा पहात स्वामींच्या मठाकडेच येत होते. त्यांपैकीं एक मोठ्या थोरल्या काळ्या घोडीवर बसला होता. त्याचा बांधा अगदीं ठेंगणा, चेहरा किंचित् लांबट, नाक पोपटाच्या चोंचीसारखें, पण मोठें आणि लांब, डोळे अत्यंत पाणीदार, इतके पाणीदार कीं, त्यांच्यायोगानें हा पुरुष अगदीं असामान्य असावा असें तेव्हांच कोणाच्याही लक्षांत आलें असतें! त्याचप्रमाणें दृष्टि इतकी तीक्ष्ण कीं, ती कोणाच्या चेहऱ्याकडे लागली असल्यास, त्याला आपल्या अंतःकरणांत एखाद्या तिराचें टोंकच बोंचत आहे असें वाटून त्यानें अगदीं अस्वस्थ व्हावें. ज्याच्या मनांत कांहीं तरी गुप्त गोष्ट असेल, त्याला असें वाटावें कीं, याच्या दृष्टी-आड आपण केव्हां होतों! परंतु विशेष मजा ही कीं, हा गृहस्थ ज्याच्याकडे आपली कृपादृष्टि फिरवील तो त्याच्या त्या कृपादृष्टीनें आपणावर मोठें छत्र उभारलें आहे असें समजेल; असा कांहीं तींत प्रभाव होता. त्याचा चेहरा मोठा गंभीर व उदात्त आणि नेहमीं मन विचारमग्न आहेअसें दाखवीत असे. त्याची घोड्यावरील बैठक व त्याचीं शस्त्रास्त्रें असें दाखवीत कीं, हा पुरुष घोड्यावर बसण्यासाठीं व शस्त्रास्त्रें बाळगून पीडितांचें रक्षण करण्यासाठींच जन्माला आला आहे.

दुसरा त्याच्या बरोबरीचा गृहस्थ या पहिल्या गृहस्थापेक्षां थोडा उंच होता. त्याचा चेहरा फार आनंदी व विनोदी दिसे. संकट आलें कीं ज्यांच्या विनोदाला व आनंदालाही विशेष स्फुरण चढतें अशीं कांहीं माणसें असतात त्याच कोटींपैकीं हे गृहस्थ असावे, असें या गृहस्थाच्या चेहऱ्याकडे पहाण्याबरोबर कोणासही वाटलें

असतें. तिसरा माणूस या दोघांचा नोकर असावा. तो त्यांच्यापासून सुमारें पंचवीस पावलें मागून चालला होता.

त्या दोघांपैकीं विनोदी गृहस्थ मध्येंच ह्मणाला, " हं ! जसवंतसिंग आणखी शहाजादे झाले, आतां काय हे जयसिंग आणखी दिलेरखां आले काय ? बरं आहे ह्मणावं; जी गत शास्तेखांची आणखी अफूजलखांची झाली, तीच आपलीही करून टाकायला बसलोंच आहों आह्मी ! खांची खां खां झाली, ह्मणजे सिंगांचीं शिंगं मोडायला किती वेळ लागणार आहे! या रजपुतांचा मला खरोखर चमत्कार वाटतो, कीं त्यांच्या मनांत या औरंगजेबाची नोकरी,–आणखी तीं आमच्यासारख्यांना दडपून टाकण्याच्या संबंधांत–करावी असं येतं तरी कसं ? "

" कसं येतं नू काय येतं ? आमच्या वाडवडिलांच्या मनांत कसं येत होतं ? त्यांतून त्यांची तर नोकरी आज पिढ्यान् पिढ्या चालली आहे. एकदां माणसांच्या अंगवळणीं एखादी गोष्ट पडली, कीं तीनें त्याला तसंच कांहीं विशेष कारण झाल्याखेरीज वावगेपणा वाटत नाहीं. "

" मी ह्मणतों अकबर बादशहाच्या वेळीं एक कांहीं तरी कारण बरोबर होतं. तो अगदीं सारखेपणा ठेवी, धर्माच्या बाबतींत जुलूम करीत नसे, पण हा औरंगजेब–हा सगळ्या मुलुखाचा कपटी, जुलमी, संशयी, हेवेखोर, हेकेखोर आणखी त्याच्या नोकरींत राहण्याची नू त्याचं राज्य वाढविण्याची यांनीं इच्छा धरावी याला काय ह्मणावं ? या जयसिंगानं जर सांगितलं असतं कीं, नाहीं बोआ आतां मी या मोहिमेवर जात, तर काय झालं असतं ? "

" पण तो आला, तर त्यांत तरी काय वावगं होणार आहे ? जसा जसवंतसिंग आपल्याला अनुकूल झाला, तसाच हाही अनुकूल होऊन आपला कार्यभाग चांगला सुधारणार नाहीं ह्मणून कशावरून ! "

" त्यांत आणखी त्या औरंग्याची मजा कशी आहे पहा कीं एकट्या रजपुताला पाठवित नाहीं. त्याच्याबरोबर दुसरा कोणी तरी एक आपला जातभाई जोडून देतो. एकटा रजपूत आला तर तो मथवला जाईल! फार दुष्ट बादशहा! फार दुष्ट. त्याचीं त्या राजसिंहानं फार चांगली खोडकी मोडली, पण त्याला बाकी कोणाचं साहाय्य नाहीं, त्याला त्यानं काय करावं ? त्याला जर साहाय्य मिळतं तर खरोखर दक्षिणेंत जसं आपण केलं आहे तसंच त्यानं केलं असतं."

" खरं आहे तुझं ह्मणणं, अगदीं खरं आहे! तसं कांहीं तरी त्या प्रांतांत जर झालं, तर दोघांनाही फायदा होईल. बादशहाच्या पाठीमागें तिकडे कांहीं तरी ससेमिरा लागला तर एवढालीं मोठीं सैन्यं नू मोठाले सरदार इकडे पाठवणं त्याला शक्यच व्हायचं नाहीं. तसा कोणी तरी तिकडे भुंगा लावला पाहिजे. राजसिंह एक तसा भुंगा लावूं शकेल असा माणूस आहे. दुसरा हा जसवंतसिंग आणखी हे मिर्झा

राजे. हीं माणसें लहानसान का आहेत ? परंतु त्यांना औरंगजेबाची सेवा करण्यापलीकडे कांहींच दिसत नाहीं. आपल्या धर्माचा किती छळ चालला आहे, गोहत्या किती होते आहे, याची कांहींच दाद त्यांना नाहीं—अशासारखं आपलं त्यांचं वर्तन दिसतं "

" चैन. बादशाहाची नोकरी करून त्याच्या रुपेच्या सावलींत खुशाल ऐषआराम भोगीत बसावं हेंच त्यांना आवडायला लागलं—संवय पडली दुसरं कांहीं नाहीं. त्यांच्याचसारख्या पांच पांच चार चार बायका कराव्या आणखी जनाना वाढवावा, हुक्के प्यावे यांतच खरी मजा आहे ही त्यांची बुद्धि झाली. खरं जर पुसाल तर माझ्या मनांत मधून मधून येतं कीं, बैराग्या गोसाव्याचा वेष घेऊन एकदां त्या प्रांतांत हिंडून पहावं बरं, बादशाही दरबारांतल्या या बड्या बड्या दरकदारांच्या शरीरांत कांहीं जीव आहे, कीं ते ह्मणजे नुसतीं बादशहाला खडी ताजीम देणारीं बाहुलीं आहेत—आहे तरी काय ? तें प्रकरण पाहून यावं एकदां. गोसाव्या बैराग्याच्या वेषांत गेलं कीं, खुशाल वाटेल त्याच्यापर्यंत जाऊन खरा प्रकार काय आहे तो समजून घेतां येतो ! "

" तुझा विचार तर फार चांगला आहे. आणखी वेष घेऊन लोकांना फसवण्यांत तर तुझा अगदीं हातखंडा आहे. पण तिकडे जाऊन पाहून येऊन उपयोग काय ? आपल्याला काय उपयोग त्याचा ? तिकडचीं माणसं काय किमतीचीं आहेत हें आपल्याला जसवंतसिंगासारख्यावरून नाहीं का दिसत ? यांना कांहीं चेव आला पाहिजे. तो कांहीं येईल, आणखी त्यांच्या हातून कांहीं होईल असं नाहीं मला वाटत. माझ्या मनांत हा विचार पुष्कळ वेळां आला कीं तिकडच्या तिकडे जर कोणी बादशहाच्या मागें ससेमिरा लावील, तर फार चांगलं होईल. त्याला इकडे नजर फेंकायला वावच मिळूं नये. आमच्या समर्थांसारखे तिकडे कोणी साधु पुरुष आतां उरले नाहींत. अबूच्या पहाडावर वैकुंठयोगी होते, परंतु ते आतां अंतर्धान पावले असें कळलें. त्यांनीं राजसिंहाला फार उत्तम गुरूपदेश करून तशी फलप्राप्तीही करून दिली. तो योगिराज फारच मोठा अधिकारी होता असें ह्मणतात. समर्थसुद्धां ह्मणत होते कीं, त्याच्यासारखा अधिकारी तोच. वसिष्ठ विश्वामित्रासारख्या ऋषींपैकींच तो या काळीं पुनः अवतार घेऊन आला होता ! "

" खरंच. समर्थ तरी केवढे महात्मे ! त्यांचं दर्शन झालं कीं एक प्रकारचं विलक्षण स्फुरणच चढतं. नेहमीं असं वाटतं कीं यांनीं आपल्याला कांहीं तरी सेवा सांगावी आणखी आपण ती करावी. पण ते स्वतःची सेवा एक वेळ सांगतील तर शपथ. आज अमूक प्रांतावर स्वारी करा, उद्यां तमूक किल्ला काबीज करा हे यांचे सेवेचे हुकूम ! त्यांचा निरपेक्षपणा कांहीं विलक्षण आहे. आपण होऊन द्रव्य पाठवावें, तर त्यांनीं दानधर्म करून टाकावा. कांहीं एक घेऊं नये. शिष्यांनीं भिक्षा

मागून आणलेलं असेल, त्यावरच आपलं योगक्षेम चालवायचं असा विलक्षण निश्चय ! "

"त्यांची गोष्ट कशाला पाहिजे ! त्यांच्यासारख्यांच्या कृपादृष्टीनं तर साऱ्या आपल्या गोष्टी चालल्या आहेत. बाबारे, असे महात्मे जिथें जिथें आहेत, तिथें तिथेंच कांहीं तरी डोकं वर उचललं जातं आहे, नाहीं तिथें सगळा अंधार ! "

अशा प्रकारें या दोघांचें भाषण चाललें आहे, तों रानाच्या एका गर्द भागांतून अत्यंत आर्त असा स्वर त्यांच्या कानीं पडला. आर्त स्वर कानीं पडल्याबरोबर हे दोघे एकदम जिकडून तो स्वर आलासें वाटलें त्या बाजूला पाहूं लागले. आर्त स्वर ऐकल्याबरोबर त्याचें कारण शोधून आर्त माणसास ताबडतोब दुःखमुक्त करणें हें ज्यांचें ब्रीद असतें, त्यांस तसा स्वर ऐकल्याबरोबर एक प्रकारचें स्फुरणच चढतें. तसें स्फुरण या दोघांस चढलें, आणि त्यांनीं लागलींच आपले घोडे त्या बाजूला वळविले. घोडे जोरानें दवडून ते त्या रानांत घुसले व पुढें जातात तों त्यांच्या दृष्टीस पुढील प्रकार पडला.

एक तरुण मराठा तीन मुसलमानांशीं झगडतो आहे. आणि पलीकडे एका हांकेच्या अंतरावर एक मेणा खालीं पडला असून त्याच्याजवळ दोघे मुसलमान त्या मेण्याच्या भोयांशीं दंगामस्ती करीत आहेत. एक मुसलमान त्या मेण्याचें दार उघडून एका तरुण स्त्रीस बाहेर ओढीत आहे व ती स्त्री आर्त स्वरानें "धांवा धांवा" ह्मणत आहे.

हा एकंदर प्रकार पहाण्याबरोबर आमच्या या दोघां मराठ्या घोडेस्वारांच्या तळपायांची आग मस्तकाला गेली. त्यांच्यापैकीं जो ठेंगणा होता, तो वेगानें पुढें झाला व त्यानें आधीं त्या मेण्यांतील तरुण स्त्रीच्या अंगाशीं झगडणाऱ्या इसमाच्या हातावर जोरानें वार केला. त्याबरोबर त्याचा हात शिथिल होऊन तो मागें पाहूं लागला; परंतु तो मागें पहातो न पाहतो, तों त्याच्या अंगावर दुसरा तडाखा बसला. तिसरा बसला आणि तो निपचीत खालींच पडला. त्या स्त्रीनें आपल्यास सोडवणाराकडे एक कटाक्ष फेंकून एकवार पाहिलें. त्या एका कटाक्षांत किती कृतज्ञता भरली होती, हें सांगणें मोठें कठिण आहे. तेवढा एक कटाक्ष फेंकून लागलीच तिनें आपला पदर तोंडावर ओढून घेऊन ती मेण्यांत जाऊन बसली. तिला सोडविणारा स्वार आतां त्या भोयांच्या मदतीस गेला. व त्या भोयांवर हल्ला करणाऱ्या दोघां इसमांसही त्यानें लंबे केलें. त्याचा दुसरा सोबती केव्हांच त्या तरुण मराठ्याच्या मदतीस गेला होता. तेथें मात्र आतां जरा जोडीचा सामना सुरू झाला. एकटा तरुण मराठा तीन मुसलमान योद्ध्यांशीं लढण्याची धडपड करीत होता; यामुळें त्यास आतांपर्यंत फार अडचण पडत होती, हें उघडच आहे. परंतु हा आमचा दुसरा वीर त्याच्या मदतीला धांवतांच त्यालाही फार उमेद आली आणि त्यानें नेट धरला. दोघांचें

तुमुल युद्ध झालें. तितक्यांत आमचा तो ठेंगण्या बांध्याचा वीरही पुढें आला, त्याबरोबर त्या मुसलमानांचें धैर्य गळून गेलें, आणि त्यांनीं पोबारा करण्याचा विचार केला. परंतु त्यांचा विचार अंमलांत आणण्यास त्यांस त्यांच्या प्रतिपक्ष्यांनीं वाव दिला नाहीं. त्यांना वार करून जमिनीवर पाडलें.

शत्रूचा पुरा धुव्वा उडाला असें पहातांच तो मराठा वीर आमच्या या दोघांच्या-जवळ येऊन त्यांचेपुढें हात जोडून नम्रपणानें ह्मणालाः–" संकटांत पडलेल्या लोकांच्या सोडवणुकीस धांवणारे हे महात्मे कोण मला माहिती नाहीं; परंतु ते शिवाजीमहाराजांच्या सैन्यापैकींच असले पाहिजेत हें खास. कोणीही असोत, मी आपला दास आहें. माझा जीव आपण बचावला आहे. हा जीव आतां माझा नाहीं, आपला आहे. आपण त्याचें काय वाटेल तें करावें. "

हें बोलणारा तरुण मराठा फार देखणा, उंच, फार बांधेसूद होता. त्याचा चेहरा मोठा उमदा, डोळे पाणीदार आणि एकंदर झोंक मोठा ऐटीचा होता. त्याचें युद्ध करण्याचें कौशल्यही फार चांगलें असल्याबद्दल त्या दोघांची नुकतीच खात्री झाली होती. तेव्हां त्याचें तें विनयाचें बोलणें ऐकण्याबरोबर त्यांना असें स्पष्ट समजून चुकलें कीं, हा कोणी तरी विजापूरदरबारांत वागलेला माणूस आहे. त्याच्याकडे पाहून आमच्या दोघांस एक प्रकारचें समाधानही झालें. तें त्यांच्या चर्येवर दिसूं लागलें. आमच्या पहिल्या दोन स्वारांपैकीं उंचेला स्वार त्यास ह्मणालाः "होय. तुमचा तर्क खरा आहे. आम्ही शिवाजीमहाराजांच्या लोकांपैकींच आहोंत. रस्त्यानें चाललों होतों तेव्हां कोणाचा तरी रडण्याचा स्वर ऐकलासा आह्मांला भास झाला ह्मणून आम्ही इकडे वळलों, तों हा सर्व प्रकार आमच्या दृष्टीस पडला ह्मणून गर्दींत शिरलों. आमच्या येण्याचा आपल्याला उपयोग झाला हें पाहून आह्मांलाही फार संतोष झाला. आपली मंडळी मेण्यांत आहे, तिकडे आपण जाऊन समाचार घ्यावा, आश्वासन द्यावें, आणखी आपल्याला कोणच्या वाटेनें जायचें आहे तें कळलें, तर आम्ही आपल्याला ठिकाणापर्यंत पोंचवायला येऊं. "

" आम्ही परळीजवळ कोणी रामदासस्वामी ह्मणून महासाधु पुरुष आहेत त्यांच्या दर्शनासाठीं जातों आहोंत. थोडे दिवसांपूर्वीं मी फार आजारी होतों तेव्हां माझ्या मातुःश्रींनीं असा नवस केला कीं हा बरा झाला ह्मणजे जोड्यानें स्वामींच्या दर्शनास पाठवीन. तो नवस फेडण्यासाठीं मी आलों आहें. मातुःश्री येणार होत्या परंतु त्यांच्या वृद्धापकाळामुळें त्यांना येववेना; नवस फार दिवस ठेवणें रास्त नाहीं ह्मणून आह्मांला त्यांनीं पाठवून दिलें; आह्मी विजापुराहून निघालों तों वाटेंत हे लोक आमच्या मागोमाग मागोमाग येताहेत असें मला दिसून आलें; परंतु आह्मी पुष्कळशा सोबत्यांबरोबर बराच वेळ होतों यामुळें त्यांनीं केव्हांही आमच्यावर हल्ला करण्याचें धाडस केलें नाहीं. थोड्या वेळापूर्वीं परळीच्या बाजूला जाण्यास हा

जवळचा रस्ता आहे असें कळून आह्मी या बाजूस वळलों; दुसरी मंडळी पुण्याकडे जाणारी दुसऱ्या मार्गानें गेली; अशी संधि पाहून यांनीं या आडरानांत आमच्यावर हल्ला केला; मी या गोष्टीला तयार असल्यासारखाच होतों; यामुळें केवळ गैर-सावधपणा झाला नाहीं; परंतु एकटा पडलों, याच्याशीं किती टिकाव धरणार ? काय होणार हें मला दिसत होतें; परंतु प्राण जाईपर्यंत झगडावयाचें असा निश्चय होता, इतक्यांत परमेश्वरानें ह्मणा किंवा ज्या साधु पुरुषाच्या दर्शनाला आह्माला जायचें होतें त्याच्या पुण्याईनें ह्मणा, आमच्या मदतीस आपण धांवलां; त्यांचें दर्शन घेण्याची उत्कंठा फार ह्मणूनच आह्मी लवकर पोंचण्याच्या आशेनें या आड-रानांत शिरलों; त्यानें संरक्षण केलें ! "

स्वामींचें नांव काढतांच या दोघांसही विशेष कौतुक वाटलें व यांच्यापैकीं उंचेला गृहस्थ त्यास ह्मणालाः—" आह्मीही स्वामींच्याच दर्शनाला चाललों आहों; आतां आपण बरोबर जाऊं; आह्मी अनेक वेळां स्वामींच्या दर्शनाला जात असतों तेव्हां, नेमकें तुह्मांस तेथेंच घेऊन जाऊं; परंतु विजापुराहून तुह्मी निघाल्यापासून तुमच्या पाठीमागें लागणारे हे कोण, काय याची एकदां चौकशी करून ठेव-लेली बरी. "

त्याबरोबर तो तरुण मराठा त्यास ह्मणालाः—" चौकशी करूं, परंतु मला त्याच्याबद्दल तर्क झाला आहे. विजापुरांत हल्लीं जी स्थिति झाली आहे, ती कांहीं विचारूं नका. विजापुरांत अब्रूदार घरण्यांतील माणसांनीं आतां राहूं नये हेंच चांगलें अशी स्थिति आहे. बादशहा स्वतः कांहीं पहात नाहीं. जो सरदार ज्या वेळीं पुढें असेल, त्यानें खुष होण्याजोगें कांहीं कृत्य केलें कीं, त्याच्यावर बहाल मर्जी ! मग त्यानें काय वाटेल तें करावें. असा एकंदर प्रकार आहे. त्या सरदारां-पैकीं कोणाची तरी ही मंडळी आहे. काय उद्देशानें आमच्यापाठीमागें आली तो नीच उद्देश बोलून दाखविण्याचें कांहीं कारणच नाहीं ! आपल्यास त्याचा सहज तर्क करतां येईल. "

हें त्याचें बोलणें चाललें असतां तो ठेंगण्या बांध्याचा गृहस्थ आपला ओंठ चावीत त्याच्याकडे पहात होता. त्याची दृष्टि त्याच्याकडे होती, परंतु त्याचें मन निराळ्याच विचारांत गुंतलें होतें हें उघड दिसत होतें. मधून मधून त्याची मान हालत होती, परंतु ती त्या बोलणाराच्या बोलण्याला अनुलक्षून हलत नसावी. स्वतांच्या मनांतील विचारासंबंधानें कांहीं तरी मनांत येऊन त्याला अनुलक्षून हलत असावी असें कोणासही त्या वेळीं त्याच्याकडे पाहिलें असतां वाटलें असतें. तो तरुण मनुष्य आणि आपला सोबती हे परस्परांशीं काय बोलताहेत याचें त्यास भानही नाहीं. त्याचें लक्ष्य तिकडे नाहीं हें अगदीं स्पष्टच होतें. बराच वेळ असा तो आपल्याशीं विचार करीत राहिल्यानंतर

तो आपल्या सोबत्यास ह्मणालाः–"एकूण जी स्थिति आज कित्येक वर्षे आहे तीच कायम आहे आं ? काय करावें ! असें कांहीं ऐकलें ह्मणजे मला फार त्वेष येतो. एकदां निकराचा निश्चय करून सोक्ष कीं मोक्ष करून टाकावा असें वाटतें. परंतु पुनः वाटतें डोंगर पाडण्याची इच्छा धरणारानें त्याच्यावर कपाळ आदळून कांहीं उपयोग नाहीं; त्याच्या तळाशींच पोंखरायला सुरुवात केली पाहिजे ह्मणजे तो आपोआप एक दिवस खालीं येईल. असो; देवी भवानीच्या मनांत येईल ते दिवशीं तीच आपल्याला यश देईल. आपण समर्थांचे आशीर्वाद घेऊन उद्योग करीत रहावें; एवढाच आपला अधिकार; आणखी त्या अधिकाराप्रमाणें आपण करीत रहावें; चला; आपल्याला तेथें पोंचायला उशीर होईल; आपल्यालाही तेथेंच जायचें आहे. तर चला आपण आमच्याबरोबरच. परस्परांची परस्परांना सोबत होईल. "

तो तरुण मराठा विजापूरकर आपल्या जनान्याकडे गेला; त्यानें आपले भोई जमा केले; कोणाला कांहीं लागलें बिगलें होतें त्याची त्यानें चौकशी केली आणि मेणा उचलणें त्यांना शक्य आहे कीं नाहीं तें त्यानें पाहिलें; परंतु त्या भोयांनाही आतां थोडा दम आला असल्यामुळें त्यांनीं आपण कसा तरी जवळच्या एखाद्या गांवापर्यंत मेणा वाहून नेऊं असें आश्वासन दिलें आणि त्याप्रमाणें त्यांनीं मेणा उचललाही.

इकडे त्या मंडळीवर हल्ला करणारे मुसलमान लोक प्रथम विव्हळत खितपत पडले होते; मध्यंतरीं त्यांच्याकडे नजर देण्याची सुद्धां आमच्या या मंडळीस इच्छा झाली नव्हती. आतां तें स्थळ सोडतांना आमच्या त्या ठेंगण्या गृहस्थानें एकवार सर्वांकडे पाहिलें, त्यांत कोणी जिवंत आहे कीं काय ? असल्यास त्याचा प्राण वांचवावयाचा असा त्याचा विचार होता. परंतु सर्वांच्याजवळ जाऊन नीट तपासणी करतां सर्वजण इहलोक सोडून गेले आहेत असेंच दिसून आलें; अर्थात् आतां तेथें थांबण्याचें कांहींच प्रयोजन नाहीं असें पाहून ती मंडळी निघाली. ती येतां येतां एका खेड्याजवळ आली. तेथें येतांच आमच्या त्या ठेंगू गृहस्थानें त्या खेड्यांत कोणी मुसलमान आहे काय, म्हणून शोध केला. तों दोन मुसलमान आहेत असें कळल्याबरोबर त्यांना बोलावून आणून त्यांनीं सांगितलें, " आम्ही आलों त्या वाटेवर जरा आड बाजूला पांच सहा मुसलमान आपल्या कर्मानें मरून पडले आहेत त्यांना मूठमाती दिलीत तर पहा. आजूबाजूच्या गांवांत कोठून तुमचे जातभाई बोलावलेत तर कफनाला मजुरीला लागतील ते पैसे यांतून घ्या." असें ह्मणून त्यानें एक मोहोर त्यांच्या अंगावर झुगारून दिली. हें त्याचें करणें पाहून त्या तरुण मराठ्यास थोडें आश्चर्य वाटलें व तो हलकेंच त्या दुसऱ्या गृहस्थास ह्मणालाः–" हें काय हें ? कोल्ह्यांकुत्र्यांना मेजवानी आज मिळाली असती, ती या तुमच्या करण्यानें बिचाऱ्यांची

बुडेल ! बरे पडले होते लेंकाचे ! त्यांना काय द्यायची आहे मूठमाती ? कोल्ह्यांकु-त्र्यांनीं कावळ्याघारींनीं व गिधाडांनीं खाऊन टाकले, तर त्यांचीं पोटं तरी भरतील."

" छे. छे. छे. बाबा, असं मोठ्यानं बोलला नाहींस हें बरं केलंस. महाराजांनीं आपल्या लोकांस शिस्त लावून ठेवली आहे, त्यांत एक असं सांगून ठेवलं आहे कीं जोंपर्यंत समोरासमोर सामना चालू असेल, तोंपर्यंत काय जें करायचं तें शत्रुत्व. एकदां का माणूस मरून पडला, किंवा शरण आला कीं मग शत्रूपणा संपला. मग त्याच्याबद्दल आपणच काळजी वाहिली पाहिजे. तो आपल्यापैकींच असं समजून त्याच्या मूठमातीची अगर संरक्षणाची तजवीज केली पाहिजे. महाराजांच्या इच्छेप्रमाणंच त्यांनीं आतां केलं आहे. तेव्हां तें बरोबरच आहे."

तें ऐकून त्या तरुण मराठ्याला फार आश्चर्य वाटलें असें दिसलें. पुढें त्यानें दुसरे भोई त्या खेड्यांत मिळतील कीं काय त्याबद्दल चौकशी केली. आपल्या जखमी झालेल्या भोयांची राहण्याची वगैरे सोय केली. आणि मंडळी तेथून समर्थांच्या मठाकडे जाण्यास निघाली, ती बऱ्याच अवकाशांत तेथें जाऊन पोंचली.

---

# प्रकरण ३ रें.

## विचार.

मंडळी परळीजवळ जाऊन पोंचली. त्या पुण्य प्रदेशाच्या दर्शनानेंच सर्वांस अत्यंत आनंद झाला. इतके दिवस आपण ज्या पुण्यभूमीच्या व पुण्य-पुरुषाच्या दर्शनाकरितां उत्सुक होतों, व वाटेंत अशा संकटांतून सुटून पुढें आलों, त्या पुण्य प्रदेशास आपले पाय एकदांचे लागले, आपल्या नेत्रांचें साफल्य झालें, असें त्यांस वाटून परमानंद झाला. तेथें असणारीं झाडें झुडुपें किंवा तो पुढें उभा असलेला डोंगर यांत कांहीं विशेष होतें असें मुळींच नाहीं; परंतु पहा-णारांच्या मनांत त्या सर्व वस्तूंविषयीं अतोनात भक्ति असल्या कारणानें त्या सर्वांचें ठिकाणीं कांहींना कांहीं तरी विशेष आहे असेंच त्यांस वाटूं लागलें. आतां आपण परत जाऊंच नये असेंही त्या तरुण गृहस्थाच्या मनास वाटूं लागलें. त्या पुण्य प्रदेशांत पुण्यपुरुषाच्या दर्शनाकरितां येऊन तें दर्शन झाल्यानंतर पुनः त्या अविंधा-च्या सेवेला जावें, यासारखें महत्पातक कोणचेंही नाहीं, असा विचारसुद्धां त्याच्या मनांत येऊं लागला. त्याच्या थोड्या वेळापूर्वींच्या भाषणानें विजापुराला तो कंटाळला होता, तेथील बेबंदशाहीचा त्याला तिरस्कार आला होता, हें वाचकांस दि-सून आलेंच असेल. तेव्हां तसल्या बेबंदनगरींत आपल्याच धर्माचा सदोदित छल

करूं इच्छिणारांची सेवा करण्यापेक्षां असल्या पुण्यपुरुषाच्या सेवेंत आपलें आयुष्य कंठिलेलें काय वाईट ? हा विचार राहून राहून त्याच्या मनांत आला. आणि त्या-प्रमाणें करावयाचें असा हळू हळू त्याचा निश्चयही होत चालला. अपल्याला रानांत संकटकाळीं मदत करणारी ही मंडळी शिवाजीमहाराजांच्या अत्यंत हृद्गतांतली असली पाहिजे असेंही त्यास स्पष्ट दिसून आलें. आणि असेच जर महाराजांचे सर्व सेवक असले तर महाराजांना ज्या त्या कार्यांत बहुतकरून यश येतें यांत नवल कसचें ? माझ्यासारखा यःकश्चित् मनुष्य– तोही विजापुराकडील असून, त्याच्या-करितां आपला रस्ता सोडून त्याच्या सोडवणुकीला धांवावयाचें ह्मणजे कांहीं अशी तशी गोष्ट नव्हे. परंतु जो कोणी आर्त–जेथें कोठें दिसेल तेथें त्याचें रक्षण करा-वयाचें हें जें महाराजांचें ब्रीद आजपर्यंत आपण ऐकत होतों, तें ब्रीद त्यांच्या पद-रच्या सर्व माणसांत सारखें जागत असलें पाहिजे हें उघड आहे. तर आपण तरी आतां परत जाऊन काय करायचें ? येथेंच साधुपुरुषाच्या सेवेंत रहावें– अथवा महाराजांची सेवा करण्यांत आपली मर्दुमकी उपयोगाला लावावी, असेही विचार त्याच्या मनाला व्यापूं लागले.

मंडळी परळीस येऊन पोंहचली आणि स्वामीमहाराज कोठें आहेत हा प्रश्न अर्थात् प्रत्येकाच्या डोक्यांत असल्या कारणानें मठांतला जो माणूस प्रथम भेटला, त्यास त्यांनीं तो प्रश्नही केला पण त्याचें उत्तर त्यांस जेव्हां मिळालें, तेव्हां मन फारच खट्टू झालें. कारण सर्वांची–त्यांतून विजापुराहून आलेल्या त्या माणसाची–फार आशा होती कीं मठांत प्रवेश होतांच स्वामींचें दर्शन होईल. आणि आपणास एकदां कृतकृत्यता लाभेल. परंतु स्वामी पुरश्चरणास बसले आहेत तें ऐकतांच एका प्रकारें त्यांस खिन्नता आली. त्यांस रानांत संकटांतून सोडविणाऱ्या गृहस्थांस त्यांची ती खिन्नता स्पष्ट दिसली, व त्यांपैकीं ठेंगण्या गृहस्थानें त्याच्याकडे पाहून ह्मटलें, " आपल्याला खिन्नता येण्याचें कारण नाहीं. आपल्या मनाप्रमाणें–स्वामींचें दर्शन होईल. मात्र तें त्यांचें दर्शन निरुपयोगी होऊं न देण्याची योजना मनांत बाळगली पाहिजे. "

हें शेवटलें वाक्य ऐकून आमचा तरुण विजापुरकर त्या गृहस्थाकडे पाहून किंचित् हंसला. आपल्या मनांतील विचारांचें ज्ञान झाल्याप्रमाणेंच यांचें हें भाषण आहे. बरें आहे, आपली मनीषा स्पष्टपणें यांस कळविण्यास आपल्याला तरी काय हरकत आहे. समर्थांची आज्ञा झाल्यास महाराजांची सेवा आपण करण्यास जाऊं; ते अर्थातच यांच्यामार्फत जाऊं. असा विचार करून तो त्यांस कांहीं उत्तर देणार तोंच मठांतील एक माणूस ठेंगण्या गृहस्थाजवळ येऊन त्यांस मोठ्या आदरानें ह्मणाला:–"समर्थ पुरश्चरणाचे स्थानीं जाऊन बसल्याला आज बरोबर एकविसावा दिवस आहे. कल्याणस्वामी, श्रीधरस्वामी आणखी वेणूबाई निकडे नित्य परिपाठाप्रमाणें आतां नुकत्याच गेल्या आहेत. कदाचित् पुरश्चरण संपलें असेल; महाराजांनीं ...... "

परंतु तितक्यांत त्या ठेंगण्या गृहस्थानें त्या बोलणारास कांहीं खूण केली व त्या खुणेमुळें त्यानें आपलें बोलणें अर्धवटच ठेविलें. नंतर तो ठेंगणा गृहस्थ त्या बोलणारास ह्मणालाः–" कांहीं हरकत नाहीं. परंतु या आमच्या पाहुण्यांची उतरण्याची तरतूद करा. समर्थांच्या दर्शनासाठीं ही मंडळी आली आहे."

इतकें बोलून तो त्या विजापुरकरांकडे वळला आणि त्यांस ह्मणालाः–" आपली येथें चांगली व्यवस्था होईल. काळजी नको. आणखी समर्थांचें पुरश्चरणही आतां बहुतकरून आटपलें असेल, तर ते इकडेच येतील. आपण आपली व्यवस्था लावतां सवरतां तों त्यांची मूर्ति येथें आपल्या दृष्टीस पडेल. त्यांच्या त्या तपोवनांत–तपोगुहेकडे कोणी आलेलें त्यांस आवडत नाहीं." असें ह्मणून त्या विजापुरकरांस तेथें मठांतील लोकांच्या स्वाधीन करून तो व त्याचा सोबती दोघेच पुढें गेले. समर्थांच्या त्या दुसऱ्या शिष्यांप्रमाणेंच हेही दोघे त्या तपःस्थानाकडे जाऊं लागले. थोड्याच वेळांत पोंचलेही. तेव्हां पहिल्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें स्वामी नुकतेंच पुरश्चरण संपवून अर्धवट आपल्याशींच, अर्धवट त्या तीन मंडळींशीं भाषण करीत होते. श्रीधरस्वामी व कल्याणस्वामी यांनीं या दोघांस पहातांच त्यांस विलक्षण आनंद झाल्याप्रमाणें दिसलें. श्रीधरस्वामी त्यांस एकदम ह्मणालेः– "वा! आपलें नुकतेंच स्मरण झालें होतें. तोंच आपण येथें येऊन दाखल झालां. मनोमय साक्ष ह्मणतात ती अशी असते! समर्थांचें पुरश्चरण संपून ते समाधि उतरवीत आहेत असें वाटतें. प्रथम कांहीं गूढ असें मध्येंच बोलले. आह्मांला त्याचा उकला झाला नाहीं. आपण तेव्हांच करून घ्याल. माझी समजूत आहे कीं ते काय गूढ भाषण करीत होते, त्याचा आपल्याशींच संबंध असावा."

आमचे दोघे प्रवासी विवराजवळ येऊन पोंचले तेव्हां पहिल्या प्रकरणाच्या शेवटीं सांगितलेलें समर्थांचें भाषण होऊन ते पुनः स्तब्ध बसले होते. त्यांची पुनः समाधि लागली होती. अद्यापि त्यांनीं नेत्र उघडले नव्हते. मधून मधून ते आपलें जटाविभूषित मस्तक हालवीत व मधेंच बुभुःकार करून "श्रीरघुवीर समर्थ!" असें ह्मणत. त्याप्रमाणें प्रकार चांगला दोन तीन घटका चालला. श्रीधरस्वामी, कल्याणस्वामी व वेणूबाई प्रथम ज्या स्थितींत स्वामींच्या आजूबाजूस व मागें उभे राहिले होते, त्याचप्रमाणें एकसारखे उभे राहिले. स्वामी पुनः कांहीं दिवस पुरश्चरण करण्यास बसतात कीं काय? असें त्यांस वाटूं लागलें. आणि आपण येथेंच उभें रहावें कीं पुनः मठाकडे जावें, याबद्दल त्यांच्या मनांत विचार चालला होता. चारचार पांचपांच घटकांपर्यंत अशा प्रकारें उभें राहण्याचा त्यांचा ह्या पहिलाच प्रसंग नव्हता, यामुळें तसें उभें राहण्यांत त्यांस त्रास वाटला नाहीं. उलट असें उभें राहणें आपलें सेवाकर्तव्य आहे, असें त्यांस वाटून ते तसे उभे होते. चार घटका झाल्या, तरी स्वामी जे एकदां बोलले त्यावर पुनः त्यांच्या तोंडून मधून

मधून "श्रीरघुवीर समर्थ !" या अष्टाक्षरी मंत्राखेरीज दुसऱ्या कोणत्याही अक्षरांचा उच्चार झाला नाहीं. हा अष्टाक्षरी मंत्र ते मधून मधून मोठ्यानें उच्चारीत ह्मणून त्या शिष्यमंडळीस असें वाटे कीं, पुनः एक सप्तक किंवा दोन तीन सप्तकें पुरश्चरणास बसण्याचा स्वामींचा विचार दिसत नाहीं. आणि असें जर आहे तर आपण अगदींसुद्धां येथून हलतां कामा नये. असेंच–असेंच उभें राहिलें पाहिजे. अशा विचारांत ती मंडळी असतां व वरील प्रकार चालला असतां आमचे दोघे प्रवासी तेथें येऊन ठेपले व वर सांगितल्याप्रमाणें त्यांचें व श्रीधरस्वामींचें भाषण झालें.

"गूढ भाषण काय केलें ?" त्या ठेंगण्या गृहस्थानें विचारलें.

"आज एकविसावा दिवस ह्मणून आह्मी नेहमींच्या परिपाठाप्रमाणें आलों व बाहेर बसलों. कांहीं वेळानें नेहमींप्रमाणें बुभुःकार झाला तो ऐकतांच आह्मी जवळ आलों तों थोड्या वेळांत मला उद्देशून समर्थ ह्मणालेः– "काय श्रीधरस्वामी, सूर्यग्रहणाचा योग आहे, हें कळलं आहे का तुला ? कांहीं काळपर्यंत अगदीं खग्रास सूर्यग्रहणाचा योग आहे !" नंतर कांहीं वेळपर्यंत पुनः समाधि लावून बसल्याप्रमाणें बसले. ते अजून तसेच आहेत. मधून मधून "सूर्यग्रहणाचा योग आहे" "खग्रास सूर्यग्रहणाचा योग आहे" असें आणखी एकदोनदां बोलले. नित्य परिपाठाप्रमाणें समाधि उतरल्याबरोबर झऱ्यावर जाऊन आचमनविधि करावयाचा तसें कांहीं आज झालें नाहीं. पुढें कांहीं वेळ एकसारखे आपल्याशींच "एकूण सूर्यग्रहणाचा–कांहीं काळपर्यंत खग्रास सूर्यग्रहणाचा योग आहे. केतू ग्रास करण्याला कांहीं सोडीत नाहीं. पण–पण कांहीं हरकत नाहीं. ग्रासांतून मोक्ष होईल. आणि सूर्य विशेषच तेजःपुंज दिसूं लागेल. त्याबद्दल काळजी करण्याचें विशेष कारण दिसत नाहीं." असेंही ते कांहीं वेळ ह्मणत राहिले. आणखी मग कांहीं वेळानें पुनः समाधि लावून बसल्याप्रमाणें बसले. मधून मधून "श्रीरघुवीर समर्थ !" या मंत्राचा घोष मात्र करीत आहेत. जी झाली ती हकीकत आपल्याला सांगितली. मीं त्यांच्या त्या सूर्यग्रहणाबद्दलचा पुष्कळ विचार केला, परंतु मला त्याचा कांहीं उकला होत नाहीं. आपल्याला पाहिल्यावर आतां मला वाटायला लागलं आहे कीं, आपल्यासंबंधाचा कांहीं तरी उल्लेख त्यांत असावा. आपल्यावर–आपण चालविलेल्या उद्योगांत कांहीं तरी विघ्न येणार, त्यालाच उद्देशून त्यांचे ते उद्गार असावेत. नाहींतर सूर्य कोण आणखी ग्रहण कसलें ? ते त्रिकालज्ञच आहेत, तेव्हां पुरश्चरण चाललें असतां कांहीं तरी त्यांच्या दिव्य दृष्टीस दिसलें असलें पाहिजे. त्याखेरीज कांहीं तरी व्यर्थ असे उद्गार त्यांच्या मुखावाटें कधींच निघावयाचे नाहींत. जे काय उद्गार आह्मीं ऐकले ते आपल्याला सांगितले."

श्रीधरस्वामींचें हें भाषण चाललें असतां ते दोघेही अगदीं स्वस्थ चित्तानें ऐकत होते. त्यांपैकीं उंचेला एकदम दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहून किंचित् विस्मययुक्त

हंसला व तो त्याचा सोबती मुकाट्यानें श्रीधरस्वामींचें सांगणें ऐकून घेऊन मान हलवीत होता. इतक्यांत त्याचा सोबती त्यास ह्मणतोः–" समर्थ त्रिकालज्ञ आहेत ह्मणतात तें काय उगीच ? आपल्याला पत्रानें आलेली बातमी स्वामी समर्थांनीं आपल्या अंतर्ज्ञानसामर्थ्यानें जाणली आणखी त्या बातमीला उद्देशूनच हे उद्गार असावेत ! "

त्या आपल्या सोबत्याच्या भाषणाला त्या दुसऱ्या वीरानें मान डोलवून आपली संमति दर्शविली. पण तोंडानें एक अक्षरसुद्धां उच्चारलें नाहीं. असा प्रकार बराच वेळ चालला होता. " आतां येथून आपल्याला जावें लागेल. स्वामी आज कांहीं उठत नाहींत. पुनः एखादें सत्तक पुरश्चरण करणार असें दिसतें, " असें श्रीधरस्वामी व कल्याणस्वामी यांना वाटलें. वेणूबाई मात्र ह्मणाल्याः– " नाहीं. नाहीं. समर्थांनीं पुनः समाधि लावण्याचा हेतु इतकाच कीं, सूर्यग्रहणाचा योग येणार–खग्रास सूर्यग्रहणाचा योग येणार–असा जो काय त्यांना दृष्टांत झाला, त्या दृष्टांताचा पुरता निकाल करून घ्यायचा; ह्मणूनच पुनः महाराज समाधि लावून बसले आहेत. लवकरच समाधि उतरेल असें वाटतें. तेव्हां आपण इथून हलूं नये. बहुतकरून आणखी थोड्या वेळानें समाधि उतरून ते आपल्या नित्य परिपाठाप्रमाणें बाहेर येतील. "

असें बोलणें चाललें आहे तों वेणूबाईच्या ह्मणण्याप्रमाणें समर्थ खरोखरीच एक दीर्घ उच्छ्वास टाकून मोठ्यानें बुभुःकार करून डोळे उघडून सभोंवार पाहूं लागले आणि एकदम उठून बाहेर आले. अर्थातच सर्व मंडळींनीं त्यांच्या पायांचें वंदन केलें. तेव्हां त्या ठेंगण्या गृहस्थाच्या डोक्यावर समर्थांनीं हात ठेवून त्यास आशीर्वाद दिल्याप्रमाणें केलें. नंतर सरळ पलीकडे असणाऱ्या झरीकडे स्वारी तडक गेली. तेथें आचमन करून नंतर त्या सर्व मंडळीस जवळ बोलाविलें. ती मंडळी येण्याबरोबर मग समर्थ आपल्या धीर गंभीर वाणीनें ह्मणतातः–"काळजी करूं नको, आतां आमच्या सांगण्यांत कांहीं अर्थ नाहीं. काळजी करण्यासारखे दिवस आले आहेत परंतु निभणार. त्यांतून राम निभावून नेणार अशी श्रद्धा बाळगा. या वेळच्या आमच्या पुरश्चरणांत आह्मांला नेहमीं जितका निर्विघ्नपणा लाभतो तितका लाभला नाहीं. सूर्यग्रहणाचा योग आला आहे. सूर्याचें तेज अगदीं ग्रासून टाकण्याची केतूनें अटोकाट तयारी केली आहे, असा तर प्रकार दिसला. पुढें सूर्याचा त्यानें पूर्ण ग्रास करून त्याला आपल्या उदरांत सांठवून ठेवण्याची तजवीज चालविली आहे असेंही दिसलें. पुढें खग्रास ग्रहण होऊन सूर्य अगदीं तेजहीन झाला असाही अनिष्ट प्रकार दिसला, परंतु तो प्रकार फार वेळ टिकला नाहीं. थोड्या वेळांत ग्रासांतून मोक्ष होऊन सूर्य पुनः तेजस्वी होऊन आपला प्रताप दाखवूं लागला. असाच प्रकार या खेपेच्या या पुरश्चरणसत्रांत दिसला. एकदां नाहीं दोनदां नाहीं एकंदर एकवीस दिवसांत तीन वेळां हा चमत्कार पाहिला ! तेव्हां आतां काय

आहे तें पहाण्यासाठीं पुनः समाधि लावून तूं कोठें आहेस, काय आहे, याचा तपास लाविला तों वाटेनें येतांनाच दिसलास. तूं त्या आर्ताला सोडवण्यासाठीं आडवाटेला गेलास तेथेंच तुला पाहिला ! चांगलं केलंस—फार चांगलं केलंस ! ”

समर्थांचें हें भाषण चाललें असतां कल्याणस्वामी, श्रीधरस्वामी आणि वेणूबाई आश्चर्यचकित मुद्रेनें त्यांच्या मुखाकडे पहात होते व त्यांचें बोलणें ऐकत होते. त्यांस त्याचा पूर्ण बोध होत नव्हता हें उघडच दिसत होतें. परंतु ज्याचें त्यास तें सर्व कळत होतेंच. ते दोघे जे बाहेरून आले होते त्यांस तें सर्व समजलें होतेंच. ते दोघेही एकमेकांकडे सार्थ दृष्टीनें परंतु चकित मुद्रा करून पहात होते. कांहीं एक बोलले नाहींत. नंतर समर्थच त्यांस ह्मणालेः—“ आतां येथेंच बसून अधिक बोलण्यापेक्षां तिकडे जाऊं. आतां मी आहार घेत नाहीं. सर्वांबरोबर पाहूं. आपल्याबरोबर मंडळी आली आहेत त्यांचा मोक्षकार्यांत तुह्मांलां उपयोग होणार आहे. आणखी ह्मणूनच हा योगायोग आला आहे. चला. ”

इतकें ह्मणून समर्थ खबदडींतून उतरूं लागले. जाळीच्या बाहेर आले. बाकी मंडळी पुढें झाली. तो ठेंगणा गृहस्थ व समर्थ दोघेच थोडे मागें राहिले. वास्तविक अंधकार चांगलाच पडला होता, परंतु त्याची या मंडळीपैकीं कोणालाही जणुं काय मुळींच क्षिति नव्हती. तितक्यांत समोरून मशाली वगैरे घेऊन पांच सात लोक येतांना दृष्टीस पडले. हे मठांतले लोक होते. अंधकार पडला तरी अद्यापि स्वामींचा अगर इतर मंडळींचा कांहींच पत्ता नाहीं हें काय ? असें मनांत येऊन मठांतील मंडळींनीं मशाली वगैरे नेण्याची तजवीज केली. इकडे समर्थ व त्या दोन प्रवाशांपैकीं त्यांचेजवळ राहिलेला प्रवासी या दोघांचें भाषण चाललें तें असें होतेंः—

**प्रवासीः**—रामसिंगाकडून आजच गुप्त पत्र आलें. तिकडील हकीकत त्यानें लिहिली आहे. ती कानीं घालण्यासाठीं मुद्दाम आलों. अलमगिरानें निश्चय केला आहे कीं आमचा नायनाट करायचा. आतां फार जबरदस्त स्वारी पाठविण्याचा बेत झाला आहे. हुकूमही सुटले आहेत !

**स्वामीः**—जबरदस्त स्वारी ह्मणजे काय एक स्वतः आला तर किंवा रामसिंगाच्या बापाला पाठवला तर ! बाकी तिकडल्या दरबारांत तसा जबरदस्त कोण आहे !

**प्रवासीः**—होय. रामसिंगाचे वडील मिर्झाराजे यांनाच इकडे रवाना करण्याचा निश्चय अलमगिरानें आपल्या वाढदिवसाच्या दिवशीं केला. त्याच्या हाताखालीं दिलेरखान, दाउदखान, राजा रायसिंग शिसोदिआ, इनूतीहानूखान शेखजादा, कुबादखान, राजा सुजनसिंग बुंदेला, किरातसिंग, ( रामसिंगाचा एक भाऊच आहे; मिर्झाराजांचा मुलगा ) मुल्ला यहीआ, राजा नरसिंग गौर, पूरणमल्ल बुंदेला, जबर्दस्तखान, बादलबख्त्यार, बर्कन्दाजखान इतकी मंडळी बरोबर देऊन त्यांना आतां रवाना केलें आहे. जसवंतसिंगाला इकडे तिकडे करून शहाजाद्यालासुद्धां समजा-

वून घेवून स्थिरस्थावर होतं आहे तों हा नवा लोंढा आला. काय करावं या अलम-गिराच्या जुलुमाला त्रासून तिकडे कोणी डोकं वर करून धडपड करीत नाहीं ह्मणून हें दक्षिणेंत वारंवार सैन्य येतं. तिकडच्या तिकडे जर माझ्यासारखा कोणी धडपड करूं लागेल, तर इकडे लक्ष्यच त्यांना देतां यायचं नाहीं. पण हा रामसिंग लिहितो आहे आणखी आपल्यालाही समजतं आहे कीं जो तो खुशाल चैनींत ऐष-आराम्यांत पडलेला. कशाला कोणाला काय सुचतं आहे ! विनाकारण संकट अंगावर ओढून कोण घेतो ? इकडे येऊन आमचं शासन केलं तर आणखी कांहींतरी जहा-गिरी मिळावयाचीच ती कां गमवा ?

**समर्थः**—खरं आहे, खरं आहे. त्या लोकांच्या तें आतां रक्तांत भिनलं. बाद-शहाची चाकरी करायची, तुझ्यासारख्याला दाबून टाकायचा, यांतच आतां खरं शौर्य, खरं कर्तव्य आहे, असं ज्याला त्याला वाटतं. त्यांचं बाळकडूच मुळीं तें पडून गेलं. पण कांहीं हरकत नाहीं. आपला जो काय उपाय आहे तो कांहीं केल्याखेरीज ठेवा-यचा नाहीं. मिर्झाराजा तरी हिंदूच आहेना ? वैदिकधर्माचा त्याला तरी पक्षा-भिमान आहेच कीं नाहीं ? पहावं आपलं बोलणं त्याच्याकडे लावून. रामसिंगाचा आणखी तुझा परिचय आहे किंवा पत्रव्यवहार आहे हें मिर्झाराजाला माहिती नाहीं. माहिती झालं तर त्याला मला वाटतं फारच संताप येईल.

**प्रवासीः**—येईल कदाचित्, काय सांगावं; पण रामसिंगावर त्याचं फार प्रेम आहे, त्याच्यावर त्याची सारी मदार आहे. त्याला पुष्कळ अपत्यं आहेत, परंतु त्याच्या ठिकाणीं त्याची खरी भक्ति आहे असं आतांपर्यंतच्या एकंदर आपल्याला कळलेल्या हकीकतीवरून वाटतं, आणखी त्याच्याही लिहिण्यावरून तसाच प्रकार दिसतो. पण त्याच्या आणखी बापाच्या मनांत इतकं अंतर आहे याचं स्वप्न-सुद्धां बापाला नसेल. त्याची फार इच्छा कीं आपल्या बापानं अलमगीरच्या विरुद्ध उठावं आणखी जें दक्षिणेंत आपण केलं आहे तें मिर्झाराजांनीं तिकडे करावं. त्यानं कित्येक पत्रांत मला असं लिहिलं आहे कीं, आमच्या वडिलांनीं जर असा उद्योग केला, तर तो सर्वथा सिद्ध होईल. त्यांना बहुतेक रजपूत राजे अनुकूल आहेत. माझ्या मनांत एक वेळां असंसुद्धां आलं होतं कीं, इकडून कोणीतरी तिकडे क हलहवाल आहे तें पाहण्याला पाठवावं; परंतु इकडे थोडी स्वस्थता मिळती त्याचा उपयोग.

**स्वामीः**—हालहवाल काय असायची ? जी विजापुरास हालहवाल अ तिकडे असायची. जसे शेणांतले किडे शेणांतच सौख्य मानतात, त लोक. त्यांचं दुःख त्यांतच, त्यांचं सुख त्यांतच. त्यांचा नरक णखी त्यांचा स्वर्गही त्यांतच. खऱ्या स्वर्गाची कल्पना त्यांना येई वर करतील.

**प्रवासीः**—आणखी आपलं डोकं वर करून पहातील, तर त्यांना स्वर्ग ह्मणून कांहीं दुसरीकडे आहे असं त्यांना दिसेल!

**समर्थः**—रामसिंग या स्वारीबरोबर येण्याचा कांहीं रंग दिसत नाहीं तुझ्या सांगण्यावरून ?

**प्रवासीः**—नाहीं. तसा कांहीं मजकूर त्याच्या लिहिण्यांत नाहीं. आणखी तो मला वाटतं अशा स्वारीवर येणारही नाहीं. त्याचे विचार किती निराळे आहेत. त्याला त्याच्या बापाचं करणं बिलकुल आवडत नाहीं हें तर आपल्याला मीं त्याचीं अनेक पत्रं दाखविलीं त्यावरून सिद्धच आहे. अर्थात् जो मोगलांच्या जुलुमापासून सुटायला आणखी इतरांना सोडवायला पहातो आहे, अशा माणसाच्या विरुद्ध लढाई करायला तो होतां होईतों यायचाच नाहीं.

**समर्थः**—तो आला तर बरा. पुष्कळ गोष्टी अशा असतात—विशेषतः लढाईच्या वेळीं अशा असतात कीं, त्या आगाऊ कळल्या तर त्यांचं निवारण तेव्हांच करायला येतं. त्या बातम्यांचा फायदा घेतां येतो. तेव्हां........

**प्रवासीः**—तें खरं. पण रामसिंग इथें आला आणखी त्याला या स्वारींत बापानं एखादी कामगिरी दिली, तर त्यानं काय करायचं ? किंवा इथें आल्यावर त्यानं बातम्या वगैरे पाठविण्याचं काम चालविलं तर तें उघडकीस येण्याचा संभव फार. तसं उघडकीस आलं तर फायदा काय ? पाहूं, आपणच मिर्झाराजाची मुलाखत घेऊन काय होतं तें पाहूं. रामसिंग आहे तिथेंच बरा आहे. मिर्झाराजाचा आणखी आपला योग जमतो असं जर दिसलं तर त्याला आणण्याबद्दलसुद्धां आपल्याला तजवीज करतां येणं शक्य आहे. त्याचं चित्त आपल्या ठिकाणीं पूर्ण आहे !

**समर्थः**—आपल्या ठिकाणीं नुसतं असून काय उपयोग ! त्यानं तिकडे कांहीं उपद्व्याप केला पाहिजे होता. मिर्झाराजा नाहीं अनुकूल झाला ह्मणून काय झालं, तुला तुझे वडील कुठें अनुकूल होते ! पण त्याला तें उपजतच पाहिजे !

**प्रवासीः**—छे. छे. छे. तसं नाहीं. तिकडली गोष्ट फार निराळी आहे. कुठें औरंगजेब, आणखी कुठें हें डबघाईला आलेलं विजापूर ! तिकडे उपद्व्याप करणारा ..स पाहिजे मिर्झाराजांसारखाच. तरच कांहीं धामधूम व्हायची. नाहीं तर राम..सारख्यानं धडपड करून काय उपयोग ?

..र्थः—ठीक, तेंही ठीकच आहे तुझं ह्मणणं. पण तें उपजतच पाहिजे. एवढी .. अति विचार करून या गोष्टी होत नसतात.

..षण होतें तों मंडळी मठाजवळ आली. विजापुराहून आलेल्या त्या ..चा असा निश्चयच झालेला होता कीं समर्थांचें दर्शन झाल्याखेरीज ..चें नाहीं. जलपानसुद्धां करावयाचें नाहीं. समर्थ येण्याबरोबर त्या .. पायांवर लोटांगण घातलें. तेव्हां समर्थांनीं त्यांस आशीर्वाद देऊन .. असा त्रागा करून बसण्यांत काय अर्थ होता ? अशा त्राग्यानं

दुसऱ्याचा व आपला दोघांचाही व्रतभंग होण्याचा केव्हां केव्हां प्रसंग येतो. मीं आणखी एक सप्तक पुरश्चरण चालविलं असतं, तर तुह्मीं काय केलं असतं? सात दिवस अन्नपाण्यावांचून राहून प्राण दिला असता? तेव्हां मला पुरश्चरण मध्येंच ठेवून यावं लागलं. असो. आतां आलां आहांत तर इथेंच रहा. तुझ्या मातुःश्रीला इकडे आणण्याची तजवीज कर. तिला सुखरूपपणें येण्याला सामर्थ्य येईल. काळजी नको. अगदीं काळजी नको. पण आतां पुनः त्या पादशहातींत जाऊं नको. देह कांहीं तरी कारणीं लाव. कांहीं तरी सत्कार्य हातून घडूं दे. जाऊं दे जहागीर गेली तरी. बादशहाच्या सेवेनं वडिलांनीं मिळविलेल्या जहागिरीपेक्षां स्वकष्टानं मोगलांच्या जुलुमापासून लोकांना सोडवून मिळविलेली जहागीर फार मौल्यवान्. तुझ्या मनांत हे विचार आतांपर्यंत आले नाहींत असं नाहीं, पण तुझ्या मनांत पक्कं बिंबलं नाहीं. आतां बरा आयता निघाला आहेस त्यांतून तो पुनः गुंतूं नको."

जसा एखादा तहानेनें फार पीडलेला माणूस पाणी पुढें आल्याबरोबर एकसारखा पाणी पिण्याचा सपाटा चालवितो, त्याप्रमाणेंच त्या तरुण गृहस्थानें क्रम सुरू केला होता. समर्थांस पहाण्याबरोबर तो आपल्या नेत्रांच्या द्वारें जणूं काय त्यांचें प्राशनच करीत होता. आणि पुढें ते बोलूं लागले तेव्हां तर त्याला इतका हर्ष झाला कीं, कांहीं विचारूंच नये. जणूं काय अमृतवृष्टि होते आहे आणि ती आपण या वेळीं लाभेल तेवढी घेऊन अमृतपान करावें असेंच त्याला होऊन गेलें होतें. समर्थांचें भाषण संपतांच त्यानें पुनः एकदां समर्थांपुढें लोटांगण घातलें, आणि त्यांस ह्मटलें:—"महाराज, मला व माझ्या कुटुंबाला मोठ्या संकटांतून सोडवून ज्यांनीं मला आपलें दर्शन घडविलें, त्यांचाच हा जीव आहे. आतां याच्यावर माझा हक्क नाहीं असें मीं केव्हांच यांना सांगितलें आहे. तेव्हां आतां परत विजापुराला जाण्याची गोष्टसुद्धां माझ्या मनांत यायची नाहीं. मी आतां एक आपली तरी सेवा करीत बसणार—किंवा आपण जी कामगिरी सांगाल ती करणार. याबद्दल आपल्याला मुळींसुद्धां संशय नको. मलाही त्या विजापुरच्या पादशहातीचा अगदीं कंटाळा आला आहे. वीट आला आहे. तिटकारा आला आहे. त्यांत आणखी आतां आपली आज्ञा झाली, आणखी काय पाहिजे? आतां आपण जें सांगाल तें करायला मी अगदीं एका पायावर उभा आहें! आपल्यासारख्यांचें दर्शन झालें, आपली सेवा करण्याला संधि मिळाली आहे, आणखी काय पाहिजे? याहून आणखी तें काय पाहिजे? हा आपला दासानुदास आहे!

"ठीक आहे, ठीक आहे. आतां पाहूं कसं काय आहे तें. सध्यां तूं इथें रहा मग तुला देतों महाराजांच्या दिमतीला ह्मणजे समजेल. महाराजांना काय? जितके तुझ्यासारखे मदत करणारे असतील तेवढे पाहिजेतच. ते तुझें चांगलें चीज करतील. कौतुक करतील. जा आतां स्नानाच्या वगैरे कामाला लाग. मग आपण बोलूं. काय हेतूनें आला आहेस तो सर्व हेतु जाणून तुझी चांगली व्यवस्था करून

देऊं." इतकें बोलून समर्थांनीं त्याला स्नानपान करण्यास लावून दिलें. आणि ते आपल्या एका बाजूच्या जागेंत आहारार्थ बसले. त्या दोघां प्रवाशांनाही त्यांनीं आग्रह करून कांहीं आहार करावा ह्मणून त्यांस सांगितलें. समर्थांच्या मठांत आहार करणें ह्मणजे प्रसाद घेणेंच होय. त्याला नाहीं ह्मणेल कोण ! तेही आहाराला बसून थोड्या वेळांत उठले. नंतर समर्थ व ते दोघे प्रवासी आणि श्रीधरस्वामी असे एका बाजूला कांहीं विचार करण्यासाठीं बसले. ते तसे बसून थोडा वेळ झाला नाहीं तोंच " पुण्याहून एक सांडणीस्वार आला आहे. दिल्लीहून महाराजांच्या नांवाचा आणखी एक लखोटा आला, तो घेऊन तो आला आहे " असें सांगत एक मठवासी शिष्य आला.

त्या दोन प्रवाशांपैकीं एक गृहस्थ शिवाजीमहाराज होते हें वाचकांनीं केव्हांच ताडलें असेल. तेव्हां आतां त्याबद्दल अधिक गूढ न ठेवतां असें सांगतों कीं, सांडणीस्वार दिल्लीचा लखोटा घेऊन आला आहे असें ऐकतांच महाराजांनीं त्यास समक्ष बोलावून आणून त्याच्यापासून ती थैली घेऊन आंतून लखोटा काढला व स्वामींपुढें टाकला. स्वामींनीं तो उचलून पाहिला. तो रामसिंगाकडूनच आलेला होता व आंत मजकूर येणेंप्रमाणें होता.

---

# प्रकरण ४ थें.

## प्रयाण.

त्या पत्रांत रामसिंगानें आपल्या बापाच्या प्रयाणाची हकीकत लिहिलेली होती. तें पत्र येणेंप्रमाणें होतें:—

" माझें मागलें पत्र पोंचलें असेल नसेल, तोंच मी हें पत्र पुनः नवीन हरकाऱ्याबरोबर पाठवीत आहें याचें कारण आपणास नीट सावध ठेवावें असें आहे. बादशहाच्या मनांत आपला पुरा फडशा उडवावा असें आहे. आतांपर्यंत विजापुरचे व आपले इतके सरदार आपला नाश करण्यासाठीं झटले असतां आपण त्यांपैकीं कोणाचेंही कांहीं चालूं दिलें नाहीं, यामुळें बादशहाच्या अंगाची लाही लाही झाली आहे. त्याच्या कपटी स्वभावाला अनुसरून त्याची अशी समजूत झाली आहे कीं, जो कोणी येथून पाठवावा तो आपण अनुकूल करून घेतां, आणि त्यामुळें आपला पूर्ण पाडाव करण्याचा योग्य उद्योग कोणीच मनापासून करीत नाहीं. एकवार तर त्याचा स्वतःचाच तिकडे येण्याचा विचार चालला होता. परंतु इकडे अद्यापि पक्का धर बसला असें त्यास खात्रीनें वाटत नाहीं. जोंपर्यंत शहाजहान जिवंत आहे

तोंपर्यंत औरंगजेब आग्रा सोडून कोठें जात नाहीं. त्यानें अत्यंत निंद्य अशा मार्गाचा अवलंब करून गादी बळकावली आहे, तेव्हां ही आपल्या हातून कोण केव्हां हिसकावून घेईल याचा नेम नाहीं अशी धास्ती त्यास अहोरात्र वाटत असते. आपण दक्षिणेंत गेलों, आणि इकडे कोणी बंड करून बापाला कैदेंतून सोडवून त्यास पुनः गादीवर बसविलें तर ? असें त्याच्या मनांत वारंवार येतें. आणि त्यामुळें तो होतां होई तों आग्रा शहराच्या बाहेर जाऊं इच्छित नाहीं. त्यानें शहाजहान बादशहास आग्र्याच्या किल्ल्यांत अशा ठिकाणीं ठेविलें आहे कीं, जेथून त्यास ताजमहाल—त्यानें स्वतः आपल्या प्रिय पत्नीचें स्मारक ह्मणून बांधलेला ताजमहाल—अहोरात्र डोळ्यापुढें दिसतो ! एकवार शहाजहान बादशहाची अवस्था काय आहे ती पहाण्याची मला फारच विलक्षण तऱ्हेनें संधि मिळाली. तेव्हां ती त्या बादशहाची—ज्यानें आपल्या पणांत हवे तेवढे पैसे खर्च करून एवढी थोरली प्रचंड संगमरवरी इमारत बांधली, त्या बादशहाची—आजामितीला अशी दीनावस्था व्हावी, याबद्दल मला अतोनात—अतोनात वाईट वाटलें. डोळ्यांस पाणी सुद्धां आलें. बादशहास पुरतें खायला मिळत नाहीं, आजारी पडल्यास औषध नाहीं, अंगांत एक लांब असा फकिरासारखा झगा असतो, डोक्याला एक टोपी असते, आणखी पिंजऱ्यांत घालून ठेवलेल्या एखाद्या जनावराप्रमाणें आपली काठी टेंकीत टेंकीत स्वारी आपल्या त्या पिंजऱ्यांत इकडून तिकडे हिंडत असते. बादशहास स्नान करावयाचें झालें ह्मणजे त्याच्या त्या कोठडींतून एक पाट काढून दिला आहे त्यांत ऊन पाणी अगर गार पाणी यायचें. त्यानें आपलें मुखमार्जनादि त्या पाण्यानें आटपावें. त्यास फार जाडेंभरडें अन्न दिलें जातें. त्याचें जिव्हाळ्याचें असें कोणी नाहींच. आणि यदाकदाचित् कोणाच्या मनांत—त्याच्या नातवंडांच्या— विशेषतः नातींच्या मनांत त्याच्याकडे जाऊन कांहीं बोलावें, अगर त्याची शुश्रूषा करावी असें आलें, तर तें शक्य नाहीं; कारण त्या कोणासही त्याच्याकडे जाऊं देत नाहींत ! अलमगीरच्या मनांत रात्रंदिवस दुसरी कोणचीही धास्ती नाहीं. आपण आपल्या बापाला तुरुंगांत टाकून गादी बळकावली आहे ही सोडून आपण चार दिवस कोठें गेलों, तर आपल्या पश्चात् काय होईल, आणि आपल्याला कोण दूर सारील याचा नेम नाहीं. आपल्यावर आपली बहीण व आपलीं एक दोन अपत्यें यांखेरीज दुसऱ्या कोणाचेंही प्रेम नाहीं हें त्यास फार उत्तमपणें समजत आहे. असो. परंतु हें उगीच दुसऱ्याच विषयावर कांहीं तरी लिहिलें. एवढें सगळें लिहिलें याचा हेतु इतकाच कीं औरंगजेब स्वतः तिकडे येण्याचा संभव नाहीं हें आपल्यास पक्केपणें कळवावयाचें. तसें जर शक्य असतें तर तो इतके दिवस थांबताना. आपली राज्यप्रतिष्ठा अगदीं पक्की झाली असें त्याला एकदां वाटेपर्यंत तो या इकडल्या प्रांतांतून कधीं हलणार नाहीं ! यामुळेंच तो एकामागून एक कोणी तरी बलाढ्य सरदार आपल्या पारिपत्याकरितां ह्मणून

पाठवीत असतो. आतांपर्यंत जे जे लोक आपल्याला दंडण्यासाठीं गेले, त्यांची त्यांची आपण कांहींना कांहीं तरी करून वाट लाविली, एकाचीही डाळ शिजूं दिली नाहीं, यामुळें त्याच्या अंगाचा अगदीं संताप झाला आहे. त्यांतही शास्ताखानाची जी आपण स्थिति केली, ती ऐकून बादशहापेक्षां घरांतील सर्व मंडळीस—विशेषतः शास्ताखानाच्या बायकोस—फारच वाईट वाटलें आहे. त्याबद्दल आपल्यावर चांगला सूड घ्यावा अशी सर्वांची इच्छा—अत्यंत उत्कट इच्छा—परंतु ती सफल होत नाहीं. जो आपल्यावर पाठवावा, तो आपला हात हलवीत परत येतो! याचें कारण आपलें शौर्य किंवा चातुर्य असेल असें त्यास मुळींच वाटत नाहीं. त्यांना वाटतें आपण जे लोक लढाई करण्यासाठीं ह्मणून दक्षिणेंत पाठवितों, ते आपल्याला फितनात आणि कांहीं न करतां परत येतात! आमचे वडील तसे कधीं फितावयाचे नाहींत असा त्याचा भरंवसा आहे, परंतु तो तरी पक्का कोठें आहे. हिंदूला हिंदू मिळाला तर काय होईल कोण जाणे! दक्षिणेंत जितका आपला मुलूख आहे, तितका सगळा पार आपल्या हातून जाईल. तेव्हां हेंही लक्ष्यांत घेऊन काय करावयाचें, कोणाला पाठवावयाचें त्याचा खल विचार करून त्यानें माझ्या वडिलांकडे ही कामगिरी सोंपविली. पण पक्का भरंवसा कोठला! पक्का भरंवसा नाहीं ह्मणून बरोबर दिलेरखान दिला. दिलेरखानास आंतून असें सांगून ठेविलें आहे कीं, जर तुला कांहीं चलबिचल दिसली, तर जयसिंगाचे हुकूम यत्किंचितही मानूं नको. बेलाशक तुला वाटेल तशी व्यवस्था कर. मग जयसिंगाचें पुढें पहातां येईल. त्यानें कित्येक खान त्यांजबरोबर दिले आहेत याचें मुख्य कारण हें आहे! ही एक मुख्य गोष्ट आपण बिलकुल मनाआड होऊं देऊं नये. आपल्याबद्दल महाराजा जयसिंगाचें मन फार चांगलें आहे. आपल्याशीं लढाई करण्यासाठीं त्यांस येथून रवाना केलें आहे, परंतु आपल्याला ज्यायोगानें भयंकर त्रास होईल असलें कृत्य त्यांच्या हातून कधीं होणार नाहीं. इतरांप्रमाणें त्यांना फसवून घोंटाळ्यांत आणण्याच्या नादीं मात्र पडूं नका. कां कीं ते फारच धोरणी आहेत. बादशहानें त्यांस आपणास शासन करण्यास पाठविलें आहे, तेव्हां तें कार्य आपण केलें असें त्यांस स्वतःस वाटेल व बादशहाची खात्री होईल, तेव्हांच ते उगीच रहातील. ते केव्हांही फसले जाणार नाहींत. त्यांची तयारी जय्यत आहे. त्यांचा सगळा बेत—कोणच्या धोरणानें कोणचें कार्य कसें करावयाचें याबद्दलचा बेत—पक्का ठरला आहे. आपल्याला सर्व गोष्टी नीटपणें समजाव्या ह्मणून मी हें पत्र मुद्दाम लिहीत आहें. आपण आपल्या मागल्या पत्रीं लिहिलें होतें कीं ज्याप्रमाणें आपण दक्षिणेंत राज्यसंस्थापनेसाठीं धडपड करीत आहां, त्याप्रमाणें उत्तरहिंदुस्थानांत कां खटपट होत नाहीं? या आपल्या प्रश्नाचें उत्तर देणें फार सोपें आहे. इकडे खटपट होत नाहीं याला कारण एक तर इकडे असलेले हिंदू राजे आपआपसांत फार द्वेष करितात. एक उठल्यास त्याला पालथा घालण्यास दुसरा तयार असतो. बादशहाची मर्जी संपादण्याकरितां कोण कोणाचें काय

नुकसान करील याचा नेम सांगवत नाहीं. आमचे वडील, जोधपुरचे जसवंतसिंग आणि उदेपुरचे राजसिंग एवढी मंडळी कायती वर डोकें काढण्याला समर्थ; परंतु या परस्परांत कोणत्याही प्रकारचें प्रेम किंवा आदर नाहीं. आमच्या वडिलांस व जसवंतसिंगास बादशाहत बुडविणें, किंवा तिच्याविरुद्ध खटपट करण्यास उठणें ह्मणजे एखाद्या डोंगराच्या गुहेंत जाऊन बसून त्या गुहेच्या वरचा भाग फोडून काढण्यास प्रयत्न करण्यासारखें मूर्खपणाचें काम वाटतें. डोंगर आपल्या डोक्यावर कोसळून आपण मात्र त्याच्याखालीं चिरडून जाऊं, आणखी तर कांहीं होणें नाहीं असा त्यांचा समज आहे. आमच्या लोकांची हल्लींची स्थिति पाहिली, तर इकडे तरी निदान त्यांच्या समजुतीप्रमाणें स्थिति आहे हें खरें. जे लहानसहान राजे आहेत, ते आपणांस अधिक दर्ज्याच्या नोकऱ्या व अधिकार केव्हां मिळतील या भानगडींत असतात. अर्थातच आपण औरंगजेबाच्या जुलुमाचें निराकरण करावें असें त्यांच्या स्वप्नांतही कधीं येत नसेल !

आमचे वडील येथून निघाले, कीं मजल दरमजल करीत तेथें येऊन दाखल होतील. त्यांनीं एकदां एखादें कार्य आरंभलें, कीं मग कांहीं विचारूं नका. मग विश्रांति किंवा टंगळमंगळ हीं त्यांस स्वप्नांतसुद्धां कधीं सुचायचीं नाहींत. मग अहोरात्र निदिध्यास तो. ते येथून पौषांत निघणार, आणि होतां होई तों चैत्री पौर्णिमेच्या पूर्वी औरंगाबादेस दाखल होतील. कदाचित् फाल्गुनी पौर्णिमेलासुद्धां औरंगाबादेस जातील. त्यांचा नेम नाहीं. या धोरणानें त्यांनीं पुढें सर्व तयारी करून ठेवण्याचे हुकूम पाठविले आहेत. संक्रांतीच्यापूर्वी किंवा संक्रांतीला ते नर्मदापार उतरतील. बहुतकरून मकरसंक्रांत नर्मदातीरीं करतील. बऱ्हाणपुरास थोडा मुक्काम होईल. तेथें ते सैन्याची सगळी व्यवस्था करणार आहेत. औरंगाबादेस फार अवकाश राहणार नाहींत. शहाजादा मुआझीम तेथें आहे, त्याची मुलाखत घेऊन आपल्या पुढल्या कामाबद्दल काय व्यवस्था करणें तें त्यास सांगून व जसवंतसिंगास परत लावून देऊन ते आपला मोर्चा पुण्याकडे वळवितील. चैत्री पौर्णिमेच्या आंत पुण्यास जाऊन बसावें अशी त्यांची फार उत्कट इच्छा दिसते. ती पूर्ण करण्यास ते कोणच्याही अडचणींना भीक घालणार नाहींत, किंवा कोणीं कांहीं सांगितलें, तरी ते माघार घेणार नाहींत. असा त्यांचा मोठा निश्चयी स्वभाव आहे. आपणांस त्यांचें आजपर्यंतचें चरित्र विदित आहेच. एकदां एक गोष्ट अशी करावयाची असें ठरलें ह्मणजे कसलींही विघ्नें, कसलींही संकटें, आपल्या मार्गांत येवोत, ते आपल्या रेखलेल्या मार्गाचें अतिक्रमण ह्मणून होऊं द्यायचे नाहींच. जों जों अडचणी येतील तों तों त्या दूर सारण्यास लागणाऱ्या धैर्याची व प्रयत्नांची जणूं काय दुपटी, तिपटी आपोआपच त्यांच्या अंगांत होत असते ! यामुळें शहाजहानाच्या कारकीर्दींत आणि याही कारकीर्दींत यांना मोठमोठाल्या कामगिऱ्या देण्यांत आल्या, त्या त्यांनीं उत्तम रीतीनें बजावल्या. त्यांच्या भाषणांत सौजन्य व मार्दव फार. त्यांचें सर्वांशीं

वर्तन फार अदबीचें, यामुळें कोणीही त्यांजवर नाखुष नसतो. ज्यास त्यांचा फार तिरस्कार, ते सुद्धां त्यांच्यापुढें अगदीं अबोल होतात ! त्यांस मनुष्याची परीक्षा फार विलक्षण आहे. कोण कोणच्या धोरणानें वागतो, तें जाणण्याची तर त्यांची शिताफी फारच विलक्षण आहे. मनांत एक धरीन आणि भासवीन निराळेंच असा बेत करून त्यांच्यापुढें गेलेला माणूस तेव्हांच आपला खरा हेतु ओकून टाकतो अशीं उदाहरणें आजपर्यंत कितीक तरी झालीं.

आपल्याच तीर्थरूपांचें मी आपणच इतकें वर्णन करून लिहितों याबद्दल मला आपण हंसाल, दोष द्याल, पण कोणच्या दर्जाच्या व किंमतीच्या मनुष्याशीं आतां आपला संबंध येणार आहे, हें आपणास पूर्वी पूर्णपणें समजलेलें असावें असें वाटून हा स्वतःच्या पित्याची स्तुति स्वतःच केल्याचा दोष मीं आपल्या अंगावर घेतला आहे. आपण त्यांच्या धोरणानें वागाल, तर ते आपल्याला साहाय्यच करतील, त्रास देणार नाहींत, आणि सोयीच्या गोष्टी कोणच्या, गैरसोयीच्या कोणच्या याबद्दल आपल्याला फार चांगली सल्लामसलत देतील. आपण आजपर्यंत केव्हां युक्त्यांनीं, केव्हां शत्रूस तोंड देऊन, शौर्यानें आपल्या शत्रूंचा पाडाव केला आहे. दक्षिणेंत जाऊन मी शिवाजीला जिंकून कैद करून आणतों, अशा प्रतिज्ञा करून इकडून व विजापुराकडून गेलेल्या शूर शिपायांस आपण खडे चारले व खालीं पहाण्यास लाविलें, त्याच आपणावर बादशहानें त्यांना पाठविलें आहे; तेव्हां आपण इतरांप्रमाणें पराभूत होऊन किंवा नष्ट होऊन परत जाणें हें सर्वथैव लज्जास्पद आहे ! त्यानें आपल्या इतक्या दिवसांच्या यशाला काळिमा लागेल असें त्यांस वाटत आहे. त्यांचें वय साठीला आलें आहे, परंतु त्यांची लढाईची उमेद आहे तशी आहे असें ह्मटलें, तर यत्किंचितही अतिशयोक्ति होणार नाहीं. आपल्यास या माझ्या लिहिण्याचा प्रत्यक्ष अनुभव लवकरच येईल. आपण सामोपचारांनीं घ्याल, तर आपल्याला त्यांच्यापासून एकंदरीत साहाय्यच होईल. परंतु दंडनीतीचा किंवा भेदाचा उपयोग करूं जाल, तर आपल्याला ते हार जाणार नाहींत. आजपर्यंत आपण रचीत आणलेली सुंदर इमारत केव्हांच पाडून टाकतील. एकदां मीं आपणांस सांगितलेंच आहे, कीं आपल्यासंबंधानें त्यांचें मन फार चांगलें आहे. आपला हेतु फार उत्तम परंतु तो साध्य होण्याचा हा काळ नव्हे. आपण सध्यांच्या काळीं पडतेंच घेतलें पाहिजे अशी त्यांची समजूत झाली आहे.

वडिलांचेबरोबर आपण यावें असा माझा कालपर्यंत बेत होता. आपला व माझा स्नेह पत्रोपत्रीं आहे तो प्रत्यक्ष दर्शनानें दृढ होईल ही आशा मला तसें करण्याला उद्युक्त करीत होती; परंतु येथें राहून जें काय मला आपल्याला साहाय्य करावयाचें तें सहज करतां येईल. परंतु तेथें आल्यावर वडिलांच्या बरोबर वावरत असतांना गुप्तपणें आपल्याशीं पत्रव्यवहार ठेवणें फारच दुष्कर व अनिष्ट. त्यांच्या

दृष्टींतून कांहींसुद्ध सुटावयाचें नाहीं. ते त्या प्रांतीं पोंचल्यापासून एक प्रहराचीही विश्रांति घेणार नाहींत. यांत आपण काय तें समजा. या माझ्या लिहिण्यानें आपणांस सर्व गोष्टींचें बरोबर धोरण कळलें पाहिजे. याहून सध्यां अधिक कांहीं लिहीत नाहीं. मार्गांत जर कांहीं तुह्मांस कळविण्याजोगें घडलें, तर तुह्मांला कळविलें जाईल अशी तजवीज मीं केली आहे. माझा एक फार मोठा मित्र राजा रायसिंग शिसोदिआ यांचा पुत्र कीर्तिसिंग याला सांगून ठेविलें आहे. तो आपणास गुप्तपणें पत्रें पाठवून जरूर त्या गोष्टी कळवील व पुढेंही आपणास हरएक बाबतींत साहाय्य करील. परंतु अशा साहाय्याचा तादृश उपयोग होईल असें मला वाटत नाहीं."

रामसिंगाचें तें खुलासेवार व अगदीं अंतःकरणपूर्वक लिहिलेलें पत्र वाचून त्या चारही मंडळीस फार समाधान झालें. अमुक एक गोष्ट ह्मणजे त्यांत लिहावयाची ठेवली होती असें नाहीं, हें अगदीं उघड दिसलें. पत्र लिहिणाराचें अंतःकरण ज्यास तें पत्र लिहिलें होतें त्याच्याबद्दल किती प्रेमपूर्ण व आदरयुक्त होतें, हें शब्दाशब्दांत स्पष्ट दिसत होतें. आपल्याकडून जी काय मदत होईल ती शिवाजीमहाराजांस करावयाची असा पत्र लिहिणाराचा पूर्ण निर्धार प्रत्येक वाक्यावरून दिसत होता. त्याच्या अंतःकरणांतील कळकळीनें प्रत्येक ओळ जणूं काय भरलेली होती. जर आपल्या हातीं असतें, तर आपण आपल्या वडिलांना या स्वारीपासून पराङ्मुख केलें असतें असे प्रत्यक्ष शब्द जरी कोठें नव्हते, तरी तशा प्रकारचा अर्थध्वनि पत्रांत उमटत होता याबद्दल कोणालाच शंका उरली नव्हती. पत्राच्या वाचनानें चौघेही विस्मय पावले. वास्तविक रामसिंगानें हें पत्र पहिल्यानेंच लिहिलें होतें असें नाहीं. त्याचीं आजपर्यंत अनेक पत्रें आलीं होतीं. त्या सर्वांत शिवाजीमहाराजांनीं चालविलेल्या कृत्याबद्दल आदर व प्रेम हीं उत्कृष्टपणें व्यक्त केलेलीं दिसतच होतीं. परंतु या पत्रांत त्याची परमावधि झालेली होती.

पत्र वाचल्यानंतर समर्थ ह्मणाले: "वा! असा पुत्र व्हावा हें तरी त्या जयसिंगाच्या थोर भाग्यांपैकींच एक भाग्य होय. यांत काय शंका आहे! आपल्यासाठीं याचें अंतःकरण खरोखरी तिळतिळ तुटत असावें असें स्पष्ट दिसतें. तो बापाबरोबर येता, तर फार चांगलें झालें असतें; परंतु इकडे आलों तर आपल्यावर कदाचित् युद्ध करण्याचा प्रसंग येईल, तो प्रसंग अर्थातच त्यास नको ह्मणून त्यानें आपला बेत रहित केला असावा! वा! किती दूरवर विचार करणारा हा मुलगा! मोठा धोरणी दिसतो! ठीक आहे, त्याच्या लिहिण्याचा खचित उपयोग होईल—"

"उपयोग होईल ह्मणजे!" तानाजी मध्येंच ह्मणाला, "त्यांत त्यानें सगळ्या गोष्टींचा असाच खुलासा केला आहे कीं, त्याचा उपयोग झालाच पाहिजे! त्यानें आपल्या या पत्रांत लिहिल्याप्रमाणें कीर्तिसिंग जर दर मुक्कामावरून काय विशेष घडेल त्याचें असेंच पत्र पाठवील तर काय बहार होईल! बातम्या कळलेल्या असाव्या.

मला आपण जर आज्ञा कराल, तर मी वाटेल तो बहाणा करून शत्रूच्या गोटांत शिरून जिथें शक्य तिथें भोंक पाडून बातम्या काढीन. आणखी आपल्याला कळवीन. त्यांच्या दर पावलागणिक जर बातम्या कळल्या, तर त्यापासून कांहीं तरी हितच होणार यांत कांहीं शंका नाहीं. ”

दुसऱ्या प्रकरणांत वर्णिलेल्या दोन प्रवाशांपैकीं एक शिवाजीमहाराज स्वतः व दुसरा तानाजी होता हें सांगावयास नकोच.

तानाजीचें वरील बोलणें ऐकून महाराज किंचित् हंसले व ह्मणतातः “ केव्हांही काम निघूं द्या. सोंगें घेऊन बातम्या आणण्यास जाण्याला ही आमची स्वारी अगदीं एका पायावर तयार ! परक्याच्या सैन्यांत आपण हेर ह्मणून गेलों, आणखी कांहीं चूक होऊन आपली वतावणी दुसऱ्याला उमगून आपलें खरें स्वरूप त्यांनीं ओळखलें, तर आपलें काय होईल याचा विचारसुद्धां गृहस्थाच्या मनांत येत नाहीं ! त्या धाडसाला आपण पुढें होऊं त्यांत माघार ह्मणून घ्यायची नाहीं, आणखी कच्चेपणा होऊन कधीं आपलें फिसकटावयाचें नाहीं अशी याच्या मनाची पक्की खात्री ! तेव्हां याला काय ह्मणावें ? ”

**तानाजीः—** काय ह्मणायचें आहे ! ' जा. जें साधेल तें कर ' असें ह्मणून आज्ञा द्यावी. मेलों तर आपल्या सेवेला अंतरलों, पण दुनिया कांहीं ओस पडत नाहीं. याच्यासारखे छप्पन नौकर आपल्याला मिळतील. कांहीं कामगिरी करून आलों तर आपल्या चरणाची सेवा करायला पुनः तय्यारच !

**महाराजः—** बरं. बरं. आज्ञेसाठीं वाट पहातां एवढी तरी कृपाच म्हणायची.

यांचें हें बोलणें चाललें असतां समर्थ आपल्याशींच कांहीं विचार करीत होते. त्यांचें लक्ष्य या दोघांच्या बोलण्याकडे मुळींच नव्हतें असें दिसलें. त्याचप्रमाणें श्रीधरस्वामी तर आतांपर्यंत मुळींच कांहीं बोलले नव्हते. त्यांचेंही लक्ष्य दुसऱ्याच कांहीं विषयाकडे गुंतलेलें असावें असें दिसलें. बराच वेळ समर्थ याप्रमाणें स्तब्ध बसल्यानंतर एकदम ह्मणालेः “ शिवबा, या रामसिंगाचा तुला फार चांगला उपयोग होईल. रघुवीर जें कांहीं घडवून आणतो, तें आपल्या बऱ्यासाठींच आणतो. हें 'बरें' काय आणखी कसें होतें, हें कधीं आपल्याला समजतें, कधीं समजत नाहीं. तशाच-पैकीं हा प्रसंग आहे. यापासून कांहीं काळपर्यंत जरी त्रास झाला—जरी निराशा उत्पन्न झाली तरी ती निराशा अगदीं तात्पुरती, तो त्रास तितक्या पुरताच, यांत बिलकुल शंका नाहीं. सर्व ठीक होईल. पुरश्चरण चालू असतां जो तीन वेळां मला दृष्टांत झाला तो कांहीं निरर्थक नव्हे. संकट येणार, हें तर त्यानें कळविलेंच. संकट भयंकर येणार असें सुचविलें ह्मटलें तरी चालेल, परंतु तसें सुचविलें ह्मणून निराश होऊं नये, हतवीर्य, हतधैर्य होऊं नये असेंही त्याच्याच बरोबर सुचविलें आहे याचा विचार करावा. ”

" आपल्यासारख्यांनीं असलें आश्वासन दिल्यावर हतवीर्य आणखी हतधैर्य हे शब्दसुद्धां आह्मांला आठवायचे नाहींत मग आणखी तर काय ? "

" ठीक. ठीक. वृत्ति पाहिजे ती अशीच पाहिजे. सध्यां आपल्याला जास्त विचार कांहींच करायला येत नाहीं. पुढें प्रसंग कसे येतात त्याबद्दल बातम्या ठेवून तसतसा वर्तनाचा विचार करावयाचा. आमचा तुला उपयोग केवळ आशीर्वादापुरता. आह्मी कांहीं मुत्सद्दी नाहीं, किंवा योद्धेही नाहीं. पण तुझ्या कृतीला, यश यावं याकरितां तपश्चर्या करणारे एक प्राणी आहों. त्या तपश्चर्येमुळं जर कांहीं परमेश्वरी कृपा झाली तर ती तुला सिद्धि मिळण्यासाठीं मिळवावयाची. याहून आणखी काय सांगूं ? तूं आपला मधून मधून येऊन आम्हांला सर्व गोष्टी सांगतोस, सल्ला विचारतोस ह्यांत आम्हांला फार समाधान आहे. परंतु वास्तविक कृति करण्याची वेळ आली कीं तुझा तुलाच साऱ्या गोष्टींचा विचार करावा लागतो....... "

" परंतु तो विचार आपल्याच कृपेनें होतो. " शिवाजमिहाराज मध्येंच किंचित् स्मित करून ह्मणाले.

वर सांगितल्याप्रमाणें आणखी कित्येक भाषणें होतां होतां रात्र केव्हांच निघून गेली. आपण जागरण करीत आहों असें सुद्धां कोणाच्या मनांत आलें नाहीं. अरुणोदय होऊन पूर्व दिशेला तांबडें फुटलेलें दिसूं लागलें, तेव्हां 'आपण उठलें पाहिजे. स्नान, पूजा वगैरे कर्में करण्याचा वेळ झाला' असें श्रीधरस्वामींच्या नजरेस आलें, आणि ते ह्मणाले: " बोलतां बोलतां काय जलद वेळ गेला ! आतां स्नानाची वेळ झाली. मी इतका वेळ आपल्या गोष्टी, तटस्थपणें ऐकत होतों; परंतु आतां एकच विनंति करतों कीं आपल्या सर्वांची अनुमति असली, तर मी जयसिंगाच्या गोटांत शिरून आंत राहून काय प्रसंग केव्हां होतात, काय धोरणानें काय होणार आहे याचा तलास ठेवून आपणास कळविण्याची तजवीज करीन. तानाजीसारखा मी कांहीं लढवय्या नाहीं किंवा मुत्सद्दीही नाहीं. पण ही कामगिरी अगदीं बेमालूम बजावीन. आपली सर्वांची व समर्थांची अनुज्ञा पाहिजे. जयसिंग आतां निघून कोठें आला असेल तें आपल्याला या पत्रावरून चांगलें समजतें. तो कितीही तांतडीनें आणि धांवत जरी प्रवास करूं लागला, तरी तो प्रचंड लष्कर घेऊन प्रवास करणार, आणखी मी एक कमंडलू घेऊन प्रवास करणार ! तेव्हां त्याला मी बऱ्हाणपुराजवळ किंवा तिकडून औरंगाबादेला जाण्याच्या रस्त्यावर कोठें तरी खचित गांठीन. माझी अशी समजूत आहे कीं, त्याच्या हालचालीची पावलोंपावलीं बातमी लागली, तर त्यापासून फायदा होईल. बातमी आपल्याला पोंचविण्याची तजवीज मी खात्रीनें करीन. काय वाटेल तो बहाणा करून मी त्या लष्करांत आपल्याला गुरफटवून घेईन. आणखी मग कशा बातम्या पाठवीन तें आतांच कांहीं सांगत नाहीं. या उपर आपली आज्ञा आणखी कृपा होईल ती खरी. "

श्रीधरस्वामी अत्यंत मनःपूर्वक बोलत होते हें तर त्यांच्या प्रत्येक शब्दाच्या

उच्चारावरून व चर्येवरून समजत होतें. परंतु समर्थ तें सर्व ऐकून हंसले आणि ह्मणाले: "मूळ स्वभाव जाईना ह्मणतात तें कांहीं खोटें नाहीं. अरे तूं सगळं कांहीं सोडून देऊन आतां गायित्रीपुरश्चरण करण्याच्या हेतूनंना इथें आलास? मग इतक्यांनच तुझ्या मनाला त्याचा वीट आला! छे. छे. छे. बरं झालं मीं तुला आल्याबरोबर पुरश्चरणाला बसण्याला अनुज्ञा दिली नाहीं, नाहीं तर तुझी इच्छा या असल्या गोष्टींत धडपड करायची. तेव्हां मन एकाग्र व्हावं कसं? तें चंचलच रहाणार. आणखी तें चंचल राहिलं ह्मणजे मग पुरश्चरण कसलं? बरं झालं आज हें मला कळलं. शिवबा, ठीक आहे, ह्या स्वारीला तूं आपल्याबरोबर घेऊन जा. एकदां या राजकीय गोष्टींत धडपड करायची याची इच्छा पूर्ण होऊं दे. त्या गोष्टींचा वीट आला, ह्मणजे मग याला इथें मठांत घेईन. तोंपर्यंत याला नुसता इथें राहूं देतांसुद्धां उपयोगी नाहीं. हा दुसऱ्याच्या मनाला चंचलपणा आणायचा! काय श्रीधरस्वामी, मी ह्मणतों हें खरं का खोटं?"

समर्थ हें सर्व हंसत हंसतच बोलत होते. परंतु तें ऐकून श्रीधरस्वामीस लाजल्याप्रमाणें झालें. तो अगदीं गप्प बसला. खालीं पाहूं लागला. त्यांच्याकडे पाहून महाराज व तानाजी हेही गालांतल्या गालांत हंसूं लागले! सर्व प्रकार मौजेचाच होता.

श्रीधरस्वामी खालीं मान घालून अगदीं स्तब्ध बसला आहे असें पाहून समर्थ त्यास पुनः ह्मणतातः "हा वेड्या, तुझ्या इतकं का ध्यानांत येत नाहीं कीं तुझ्या हातून अजून इकडली कामगिरी व्हायची आहे, ह्मणूनच मीं तुला पुरश्चरणाला बसण्याला आज्ञा द्यायला अवकाश लावला. तुझ्या मनांत जो विचार आला आहे तो अगदीं बरोबर आहे. जा, आणखी तुझं काय चातुर्य आहे तें योजून जयसिंगाच्या लष्करांत मिसळ. जें काय तुला कळेल, तें शिवबाला कळव. एवढा प्रसंग निवटला, ह्मणजे तुझी इच्छा अगदीं नाहींशी होईल. मग तूं पुरश्चरण करून त्या मार्गाला लागायला योग्य होशील. समजलास?"

समर्थ हें बोलत आहेत हें खरोखर बोलत आहेत कीं आपला उपहास करण्याच्या हेतूनें बोलत आहेत याबद्दल श्रीधरस्वामीची खात्री होईना. ह्मणून त्यानें हलकेंच वर डोळे करून चोरदृष्टीनें त्यांच्या मुखाकडे पाहिलें. समर्थांचें लक्ष्य तिकडे होतेंच. त्याचा हेतु त्यांनीं तेव्हांच ताडला आणि लागलीच त्यास ह्मटलें:–"हा वेड्या, तुझा मी उपहास का करीन? अजून कच्चा आहेस ह्मणतों, तो उगीच नाहीं. उपहास नाहीं, कांहीं नाहीं. तुझ्या हातून थोडीबहुत कामगिरी व्हायची आहे, म्हणूनच तुला ही बुद्धि झाली आहे. तेव्हां तूं सुचवलं आहेस त्याप्रमाणें जरूर कर. मजल दरमजल करून जेथें कोठें जयसिंगाच्या लष्करांत मिळशील तेथें मीळ. आणखी काय करतोस तें तरी मला समजूं दे."

या बोलण्यानें श्रीधरस्वामीची खात्री झाली व तो वर पाहूं लागला. महाराजांनींही त्यास "आपण गेलांत तर फारच चांगलें होईल. आपल्यासारखा चतुरस्त्र

हेर आह्मांला लाभल्यावर आणखी काय पाहिजे ? त्यांत आणखी रामसिंगानें आपल्या पत्रांत ज्याचा उल्लेख केला आहे, त्या कीर्तिसिंहाची तुमची गांठ पडून एकचित्त झालें तर फारच चांगलें होईल. त्याला पुष्कळ गोष्टी करण्याला अवघड त्या तुमच्या तेथें जाण्यानें व त्यास भेटण्यानें फार सवघड होतील. आमचे तानाजीराव आमच्या इतर कार्यांना उपयोगी पडतील. नाहीं तर त्यांनीं केव्हांच आह्मांला आपला विचार कळविला होता. "

असें बोलणें झालें, आणि मंडळी एकांतांतून उठली. पुढें सर्वांचीं स्नानें वगैरे उरकलीं. ज्याचीं जीं नित्य कर्में तीं सर्व झालीं. नंतर भोजनरूपानें प्रसादग्रहण झालें. विजापुराहून आलेल्या मराठ्या सरदारानें समर्थांपुढें दंडवत घालून विनंति केली, " मला आपल्या पदरांत घ्यावें. आपल्या कृपेच्या सावलीला आलों आहें. आतां परत जाण्याची इच्छा नाहीं. आपण सांगाल ती सेवा करण्याला आह्मी दोघेंही तयार आहों. आपल्याला मी हें सांगायला नको. आपण जाणतच आहां. मातुःश्री वृद्ध आहेत. त्यांना इकडे घेऊन येण्याची आज्ञा आपण केलीच आहे. पुढें आणखी जशा आज्ञा होतील तशा पाळण्याला मी तयार आहें."

समर्थांनीं त्यास उठविलें व आपल्याजवळ घेतलें, आणि सांगितलें, " तूं ह्मणतोस तें बरोबर आहे. आतां तूं परत जाऊं नको. मातुःश्रीस इकडे आणण्याची तजवीज करूं. तुझ्या हातून आतां कांहीं तरी स्वराज्यसेवा घडायची आहे. शिवबा तुझा उपयोग करून घेईल. तुझ्या हातून काय घडेल, काय नाहीं याची बरोबर परीक्षा शिवबाला होईल. तूं त्याच्या आज्ञेंत वाग. कांहींसुद्धां त्याच्या मर्जीच्या विरुद्ध करूं नकोस किंवा जें करणें तें त्याला विचारल्याशिवाय करूं नकोस. शिवबा याला तूं जिवावरल्या संकटांतून सोडवलेंस. त्यानें तुझ्या स्वाधीन आपला जीव केला आहे. त्याला हातीं धर आणखी त्याचा उपयोग करून घे. "

" गोब्राह्मणांच्या संरक्षणाकरितां आणखी हिंदुधर्माच्या प्रतिपालनाकरितां झटण्याची ज्याला इच्छा असेल, त्याचा त्याचा संग्रह करावा अशी आपली मला आज्ञा आहेच तेव्हां यांना हातीं धरावें असें सांगायलाच नको. बादशाही अंमलानें होणाऱ्या नानाप्रकारच्या विटंबनांचा जर यांना कंटाळा आला आहे, तर तो अंमल दूर करण्याचा प्रयत्न करण्याला आह्मांला साहाय्य पाहिजेच आहे. विजापुरकरांनीं आजपर्यंत आमच्या धर्माची, ब्राह्मणांची आणखी कुलस्त्रियांची विटंबना किती केली याचा विचार ज्याचा त्याला होतोच आहे. केवळ बादशहा असा ऐषआरामी, ह्मणून त्याचे जातभाईसुद्धां पहा कसे विजापुरापासून तुम्ही निघाल्यापासून पाळथ राखून मागोमाग येऊन आपल्या कुटुंबाची विटंबना करण्याकरितां धडपड करीत होते ! तेव्हां तुम्ही विचार करतां आहां तोच बरोबर आहे. या आमच्याबरोबर. आह्मी दुःख भोगूं तें तुह्मी भोगा. आतां लढाया होतील त्यांत आपला जय झाला तर औरंगजेब कांहीं तरी गप्प

बसल, आणखी विजापुर वर डोकें करणार नाहीं. आपला पराभव झाला, तर देवाच्या मनांत कांहीं निराळा विचार आहे असें म्हणून आपला क्रम चालूच ठेवूं. यत्न करणें काम आपल्या हातचें. सिद्धि देणें परमेश्वराच्या हातचें. निराशा म्हणून अगदीं उपयोगी नाहीं. तिचा स्पर्शसुद्धां आपल्याला उपयोगी नाहीं. हा उपदेश मला समर्थांनीं केला, तोच उपदेश मी आपल्या लोकांना करतों. जेव्हां एखादे वेळीं निराशा पछाडतेसें वाटूं लागतें, तेव्हां उठतों आणखी मुकाट्यानें इकडे येतों. येथें आलों कीं या स्थानाचें दर्शन होतांच निराशा पार मावळते."

इतकें बोलून महाराज उठून उभे राहिले. श्रीधरस्वामींनींही आपली तयारी केली. तानाजी घोडे तयार करण्यास पुढें गेला. विजापुरकर तरुण गृहस्थानें समर्थांस " मी आतांच यांच्याबरोबर जाऊं काय ? " म्हणून विचारलें. समर्थांनीं 'नको' म्हणून त्यास उत्तर दिलें. तेव्हां तो तेथेंच राहिला. महाराज, तानाजी, श्रीधरस्वामी व महाराजांच्या बरोबरचा नोकर इतकी मंडळी तेथून निघाली.

---

# प्रकरण ५ वें.

## जोशी.

मोगलसैन्याचा तळ म्हणजे ऐषआरामाचें एक आगरच होय. या सैन्याचे अधिपति किंवा दुय्यम तिय्यम अधिकारी जेव्हां आग्र्यास किंवा दिल्लीस आपल्या ठाण्यावर असतील, तेव्हां त्यांचा ऐषआराम व्यक्तिशः आपापल्या घरोघर होत असेल तेवढाच. परंतु ते सैन्य बरोबर घेऊन कोठें तरी स्वारीला निघाले म्हणजे त्यांच्या चैनबाजीला व ऐषआरामीला ताळतंत्रच नाहींसा होत असे. मार्गानें जातांना जें लुटावयाला सांपडेल तें लुटावें, जें नासावेंसें वाटेल तें नासावें. कोणत्याही बाबतींत कोणी आळा घालावयाला नाहीं. जें काय करावें तें करण्याचा जणूं काय हक्कच, अशी त्यांची व्यवस्था असे. वाटेनें कोठें पीक चांगलेंसें पाहिलें, तें खुशाल तुडवावें. त्याचा उपभोग घेण्याजोगें तें असेल तर उपभोग घ्यावा. कोणी विचारता ना पुसता. मालकानें फिर्याद द्यावी कोणाकडे, आणि फिर्याद लावणाराची दाद तरी कशाला कोण लागू देतो आहे ? सैन्याच्या बरोबर अमूक एक षौकाचा प्रकार नाहीं असें नसेच. एकपट सैन्य, तर दसपट बाजारबुणगें ! या बाजारबुणग्यांत अमूक एका प्रकारचीं माणसें नाहींत असेंही नसावयाचें. जेथें तळ पडेल तेथें गाणें, बजावणें, नाचबैठक, तमाशे, कोल्हाट्यांचे खेळ, सर्व कांहीं जय्यत तयारी ! चैनबाजीच्या परमावधीला गेलेलें हें एक फिरतें शहरच आहे असें

कोणाही पहाणारास वाटावयाचें असें सर्वांचें वर्तन. शहरांत असतांना मंडळींच्या मनावर कांहीं तरी आळा—लोकमताचा आळा—असण्याचा संभव; परंतु 'धारातीर्थी पतन पावण्या'च्या दृढ निश्चयानें घराबाहेर पडलेल्या या वीरांच्या वर्तनावर कसलाच आळा असण्याचा संभव नाहींसा होतो! साधारणतः जुन्या काळीं कोणच्याही सैन्याच्या वर्तणुकीसंबंधानें असा प्रकार असे; परंतु मोगलांच्या सैन्याचा या बाबतींत फारच विलक्षण प्रकार होता. कोण जगतो, कोण वांचतो, आणखी कोण परत येतो! आहे तोंपर्यंत भोगून घ्यावें हा काय तो ज्याच्या त्याच्या मनांतला विचार असे.

जी स्थिति सामान्यतः सर्व मोगलसैन्याची तीच बहुतेकांशीं जयसिंगानें आपल्याबरोबर आणलेल्या या लष्कराची होती. इ. स. १६६५ च्या जानेवारी महिन्याची ९ तारीख झाली नाहीं तों जयसिंग नर्मदा उतरून खालीं आला; आणि तेथें त्यानें थोडा मुक्काम केला. या मुक्कामाचे वेळीं तो स्वस्थ बसला होता असें नाहींच. त्या प्रांतीं पिकें कशीं काय आहेत, एकंदर प्रांतांची स्थिति कशी काय आहे हें पाहून बादशहा औरंगजेब याला त्यानें सर्व हकीकत लिहून हकीकतनामे पाठविले. जयसिंग स्वतः असा उद्योग करीत असे, परंतु लष्कराला काय? त्यांची रोजची चैन असावयाची तशी असे. आजूबाजूच्या गांवांत जाऊन लुटालूट करावी आणि लष्करांत येऊन सालसूदपणानें बसावें, अशी कित्येकांची तऱ्हा होती. कित्येक डेरे कनाती देऊन गाणें बजावणें करीत असावयाचे. या चैनी लोकांच्या चैनी पुरविणारे लोक—यांच्या चैनबाजीवर पोट भरणारे लोक असावयाचे, ते अर्थातच आपल्याकडून यांची मनधरणी करण्याकरितां जें जें काय करावयाचें तें करीतच असत. वर सांगितलेंच आहे कीं, जानेवारी महिन्याच्या ९ तारखेच्या सुमारास जयसिंगानें नर्मदा ओलांडली. पुढें सुमारें वीस एकवीस दिवसांनीं स्वारीचा तळ बऱ्हाणपुरानजीक झाला. इतका वेळ जें कूच चाललें होतें तें जरा झपाट्यानें चाललें असल्यामुळें आणि बऱ्हाणपुरासारख्या भरभराटलेल्या शहराजवळ आतां तळ आल्याकारणानें सैन्याची अशी इच्छा दिसली कीं, येथें थोडा मोठा मुक्काम व्हावा.

बऱ्हाणपूर ह्मणजे त्या वेळीं मोठ्या नामांकित व फारच भरभराटलेल्या शहरांपैकीं शहर होतें. किंबहुना विजापुर खेरीजकरून दुसरें इतकें भरभराटलेलें शहरच त्या काळीं नर्मदेच्या दक्षिण बाजूला नव्हतें असें ह्मटलें असतां चालेल. आतांपर्यंत बरीच मजल मारल्याकारणानें व सैन्याच्या सरबराईची थोडीबहुत व्यवस्था करावयास फुरसत पाहिजे होती, यामुळें जयसिंगासही असें वाटलें कीं बऱ्हाणपुरास आठ दहा दिवस मुक्काम करावा. आपल्या इच्छेप्रमाणें कांहीं दिवस येथें मुक्काम होतो आहे, असें एकवार लष्करास कळतांच मग काय विचारतां? जिकडे तिकडे आनंदी आनंद झाला आणि चैन करण्याच्या सर्व प्रकारांचा जणूं काय धुमाकूळ उडाला.

बऱ्हाणपुरास जयसिंगाच्या सैन्याचा तळ पडून सुमारें एक दिवस झाला होता. सैन्यांतील लोकांची चैन करण्याची धुमश्चक्री सुरू झाली. सैन्यांतील शिपायांच्या झुंडीच्या झुंडी बऱ्हाणपुर शहराच्या मोहोल्यांतून व चांदणीचौकांतून हिंडत फिरत होत्या. ठिकठिकाणीं घोळकेच्या घोळके उभे राहून मजा उडवीत होते. कोठें कोठें रस्त्यावर कोल्हाटणींच्या बैठका चालू असून त्यांच्याभोंवतीं लोक जमा होऊन गंमत करीत होते. कोठें कोणी कोणी दुसऱ्या कांहीं करमणुकीच्या मार्गाला लागले होते. कोठें गुडाखू, चंडोल, चरस वगैरेंच्या दुकानांत बसून त्यांचें सेवन करीत होते.

हे व्यसनाचे प्रकार झाले. परंतु याखेरीज आणखीही कांहीं मौजा त्या शहराच्या बाजारांत होत्या. त्यांपैकीं एक येथें सांगतों. एका चवाठ्यावर एका बाजूस एक हिंदू जोशी एक पंचांग व तीन फांसे घेऊन येणाराजाणाराला आपल्याला वाटेल तो प्रश्न पहाण्यास बोलावीत असे. तेथें त्याच्या सभोंवताली हळूहळू बरीच मंडळी जमत चालली होती.

अनेक मनुष्याला अनेक प्रकारचे नाद असतात, ते त्याच्या स्वभावानुसार व परिस्थित्यनुरूप असतात; परंतु आपलें पुढें काय होणार किंवा आपली अमूक एक वांछा आहे ती तृप्त होईल कीं नाहीं हें समजल्यास समजून घेण्याचा नाद प्रत्येक इसमास असतो ह्मटलें तरी कांहीं खोटें होणार नाहीं. मनुष्याचा सामुद्रिकावर व ज्योतिषावर भरंवसा असो वा नसो, 'तुमच्या मागल्या गोष्टी सांगतों, तुमच्या मनांतील वांछा परिपूर्ण होईल कीं नाहीं हें सांगतों,' असें ह्मणून कोणी हात अगर पंचांग पाहण्यास सिद्ध झाला, कीं त्याला कांहीं 'नको बोआ' असें म्हणण्याची कोणाला इच्छा होत नाहीं. काय सांगतो तें पहावें तर खरें, असें मनांत येतें आणि त्याच्यापुढें हात पसरावासें वाटतें. मग तो कांहीं अनुमानधपक्यानें, कांहीं त्याच्या कुडबुड्या शास्त्राचे ठोकताळे त्याला ठाऊक असतात त्यांच्या जोरावर, किंवा कांहीं वाटेल तो अर्थ निघेल अशा भाषेनें बोलूं लागला म्हणजे बऱ्याच भोळ्या व अर्धवट ऐकणारासही असें वाटूं लागतें कीं, आपल्याला या गोष्टी पटतात. एकदां गोष्टी पटतात असें वाटूं लागलें म्हणजे जोशीबोआनीं कांहीं जरी सांगितलें तरी तें पटल्याप्रमाणेंच भासूं लागतें. "आपल्यास मातृसौख्य फारसें नाहीं," असें त्यानें ह्मटलें म्हणजे "आपली आई वारली आहे" या अर्थापासून तों "आपल्या ठिकाणीं तिचें विशेष प्रेम नाहीं" या अर्थापर्यंत वाटेल तो अर्थ होऊं शकतो. ऐकणारानें जरी यदाकदाचित् असें म्हटलें कीं, "छे हो, माझ्या आईचें मजवर फार प्रेम आहे" तरी जोशीबोआ "आपल्या इतर भावंडांपेक्षां कमीच" असें म्हणण्याला कमी करीत नाहींत. इतकेंच नव्हे तर पृच्छकानें जरी असें म्हटलें कीं "मला भावंडेंच नाहींत" तरी जोशीबोआ हें म्हणावयाला तयारच कीं "अहो प्रत्यक्ष तुमचींच भावंडें नकोत, घरांत कोणी लहान मुलें असतील कीं नाहीं, तीं त्यांतच धरायचीं."

सारांश काय कीं, कोणालाही नादीं लावण्याच्या ज्या काय थोड्याशा विद्या

जगांत कुटिल लोकांजवळ असतात, त्यांपैकीं फार मोहक अशी ज्योतिष-विद्या आहे. या विद्येनें युक्त असणारे इसम चांगले हुशार, व्यवहारचतुर, चाणाक्ष असले, तर ते आपल्या नादीं लाखों लोकांना तेव्हांच लावूं शकतात. एकदां त्यांची ख्याति मात्र व्हावयाला पाहिजे कीं ' या जोशीबोआंनीं सांगितलेले ठोकताळे तेव्हांच पटतात. यांचे प्रश्न कधीं चुकत नाहींत. ' मग पृच्छकांना कांहीं तोटाच नाहींसा होतो, आणि त्यांच्या प्रश्नांतही कांहीं ताळतंत्र राहत नाहीं. त्यांतही बाजाराच्या मध्यावर किंवा चवाठ्यावर पंचांग व फांसे घेऊन होरागणित करणारे जोशी तर अशी गंमत करितात व लोकांस फांशांत पकडतात कीं विचारूंच नये. त्यांचीं जीं विनोदी भाषणें चालतात तीं तर येथें सांगतांच येत नाहींत. ते कोणास अनेक स्त्रीसुखोपभोग सांगतात. कोणास स्त्रीलाभ व त्यामुळेंच द्रव्यलाभ आहे म्हणून सांगतात. कोणास संततिलाभ सांगतात, आणि मुलें नाहींत असें त्यांनीं उत्तर दिलें, तर घरीं नसतील, पण बाहेर खास झालीं असलीं पाहिजेत असें हात सांगतो असें ह्मणतात. अर्थातच हलक्या प्रतीचा पृच्छक आपल्या पौरुषाबद्दल अभिमान वाटून खुष होतो. असो. वर सांगितल्याप्रमाणें अशा जोशांपैकीं एक जोशी बऱ्हाणपुरच्या बाजारांत एका चव्हाट्याच्या जागीं बसून येणारा जाणारास आपलें नशीब पहाण्यास आव्हान करीत होता. इतर गोष्टींबरोबर तो मृत्युवेळासुद्धां सांगत असे. लढाईवर जाणाऱ्या लोकांना तर आपल्याला मृत्यु येणार कीं काय हें अगदीं अवश्य कळलें पाहिजे असें त्याचें म्हणणें असे. पहिल्यानें तो त्या चव्हाट्यावर बसला, तेव्हां सुमारें दहा पांच लोक त्याच्या सभोंवताली जमले असतील नसतील; परंतु पहिल्या एक दोघांच्या प्रश्नांचीं त्यानें उत्तरें देतांक्षणींच हां हां म्हणतां त्याच्याभोंवतीं लोक जमूं लागले आणि आपले हात पहाण्यासाठीं व प्रश्न पहाण्यासाठीं त्याच्यापुढें हात करणारांत मारामारी सुरू होते कीं काय असें वाटूं लागलें. तो मोठ्यानें ओरडून सांगूं लागला कीं "तुम्ही धीरानें घ्याल तर मी प्रत्येकाचा हात पाहून त्याचा प्रश्न सांगेन; परंतु एकदम पन्नास हात तुम्ही मजपुढें करून किंवा फांसे टाकून सांगा म्हणायला लागलां, तर मला येथून उठूनच जाण्याची पाळी येणार. " परंतु ऐकतो कोण ! कांहीं लष्करमिश्र होते ते पुढें होऊन त्यांनीं आपले हात त्याच्यापुढें केलेच. त्यानेंही पाहिलें कीं येथें आतां भराभर तोंडाला येईल तें बकल्याखेरीज कांहींच दुसरा मार्ग नाहीं. मग प्रत्येकाच्या हाताकडे पहावें. त्यावरील शंख चक्रें मोजून कांहीं हिंदुस्थानी, कांहीं संस्कृत, कांहीं उर्दू अशीं पद्यें ह्मणावीं आणि कोणाला फार भाग्यवान्, कोणाला सुखी, कोणाला दीर्घायुषी असें सांगावें असा त्यानें सपाटा चालविला. कोणाच्या तोंडाकडे पाहून त्याला ह्मणावें तुझ्या अठ्ठेचाळिसाव्या वर्षी फार मोठा भाग्योदय होणार आहे. कोणाच्या कुटुंबसौख्याबद्दल स्तुति करावी, कोणाच्या पौरुषाचें वर्णन करावें, कोणाला सांगावें तूं स्त्रीसुखाच्या संबंधांत फार सुखी.

असा क्रम सुरू होऊन भराभर हात पाहून व्हायला लागले, तेव्हां अर्थातच लोकांची गर्दीही वाढूं लागली. जो तो ह्मणे कीं जोशीबोआंनीं सांगितलेलें माझें मला पटलें. मग काय विचारतां ? जोशीबोआंच्या पुढें पैशांचा ढीग पडला. त्यांच्या फांशांस एका क्षणाचीही विश्रांति नाहींशी झाली. शेवटीं एका गृहस्थानें त्यांस ह्मटलें:– "जोशीबोआ, या बाजारांत कांहीं धरबंध बसायचा नाहीं. आपली हरकत नसली तर आपल्याला मी बरोबर घेऊन जातों. आपण माझ्या तंबूंत येऊन बसा. मी जातीचा रजपूत आहें तेव्हां आपल्याला संकोच वाटायला नको. तेथें अशी गर्दी होणार नाहीं. गडबड होणार नाहीं. जी मंडळी येतील ती चांगली येतील. निदान आपल्याला त्रास होणार नाहीं आणि आपले प्रश्न बरोबर उतरले, तर आपल्याला प्राप्तिही होईल. आपल्याजवळ कांहीं तरी विद्या आहे यांत बिलकुल शंका नाहीं. मला आपण जें काय सांगितलें त्यावरून मला अनुभव आला. तेव्हां पहा, मी तुमची चांगली व्यवस्था ठेवीन. खाण्यापिण्याची चांगली तजवीज ठेवीन. आपल्याला गिऱ्हाइकीही फार चांगली मिळेल. येथें बाजारांत असे किती वेळ तुम्हीं बसणार ? चला."

हें बोलणाऱ्या गृहस्थाकडे जोशीबोआंनीं नीट न्याहाळून पाहिलें. जणूं काय आपण याच्याबरोबर गेलों तर आपला कार्यभाग होईल कीं नाहीं, ह्या प्रश्नाचें उत्तरच जोशीबोआ त्याच्या तोंडाकडे पाहून काढीत होते. शेवटीं त्यांना अनुकूळ असें उत्तर आलें असावें असें दिसलें; कारण ते एकदम त्यास म्हणाले:–"ठीक आहे. आपण आश्रय देऊन नेत असाल, तर आणखी काय पाहिजे ! मी एका पायावर तयार आहें यायला. पण आपल्याला माझ्यापासून त्रास होईल, एवढ्याकरितां जरा संकोच करावासें वाटतें. आम्ही काय बोलून चालून धंद्याचीं माणसें. अहोरात्र आमच्याकडे प्रश्न विचारण्यासाठीं पृच्छक आले, तरी आम्ही त्यांच्याशीं आपली टकळी चालवीत बसणार."

"छे ! छे ! तसा मला कांहीं त्रास होणार नाहीं. तुह्मांला मी आपली एक निराळी राहुटी देईन. तींत बसा आणि आपलें काय कोणाला सांगायसंवरायचें तें सांगा. तुह्मांला कांहीं त्रास पोंचणार नाहीं एवढी मी तजवीज ठेवीन. मी तरी आपल्याला एवढा आग्रह करतों यांतला हेतु इतकाच कीं, आपला गुण बाजारांत मांडण्याजोगा नाहीं. जास्ती मोलवान् आहे अशी माझ्या मनाची खात्री झाली आहे. याउपर आपली मर्जी. माझी अशी समजूत आहे कीं, आपण जर आमच्या छावणींत आलां, तर आपल्याला खात्रीनें मिळकतही जास्त होईल, आणि आपल्या गुणाचेंही चीज होईल."

त्या गृहस्थाचें तें बोलणें ऐकून जोशीबोआ हंसले व त्यांनीं आपल्या बैठकीखालून एक कागद काढून तो त्या गृहस्थाच्या हातीं दिला. त्या कागदावर "आपण मला मनोभावानें आग्रह करून आपल्या छावणींत नेणार" अशीं अक्षरें लिहिलेलीं

होतीं. तीं अक्षरें वाचण्याबरोबर तो गृहस्थ फारच चकित झाल्याप्रमाणें त्याच्याकडे पाहूं लागला. तेव्हां जोशीबोआ त्यास ह्मणतात: " कां ? आपल्या देखत तर मीं हीं अक्षरें लिहिलीं नाहींत. किती वेळ तरी आधीं लिहून ठेविलीं होतीं. आपण माझ्या विद्येचे चाहते आहां ह्मणून आपल्याला दाखविण्यासाठीं आपण येण्याच्या पूर्वीं किती वेळ तरी लिहून ठेविलीं होतीं. आतां आपण न्याल तिकडे मी येतों. " आपण मला आग्रह करून आपल्या छावणींत नेणार " असें लिहिलें आहे तेव्हां त्याप्रमाणें घडलेंच पाहिजे आणि तें तसें घडणार. " असें ह्मणून लागलीच जोशीबोआंनीं आपलें गवाळें आटपण्यास सुरुवात केली. लोक एकीकडे हात पुढें करून जोशीबोवांस प्रश्न विचारीतच होते, आणि जोशीबोआ जें तोंडाला येईल तें बडबडून काय वाटेल तें सांगत होते. ज्याला पटेल त्यानें तें उत्तर आपल्यालाच आहे असें समजून त्या उत्तराच्या अनुकूलतेप्रमाणें किंवा प्रतिकूलतेप्रमाणें हर्षित किंवा खिन्न होऊन तेथून जावें असें चाललें होतें. जोशीबोआंस पैशाची फारशी हांव दिसली नाहीं. जमले होते तेवढे घेऊन ते तेथून निघाले व त्या रजपुताबरोबर त्याच्या छावणींत गेले.

त्या रजपुतास जोशीबोआंनीं सांगितलेल्या कांहीं गोष्टी फारच उत्तम प्रकारानें पटल्या असाव्या. त्याची त्यांच्या ठिकाणीं पूर्ण भक्ति बसली असें दिसलें. त्यानें त्यांस आपल्या तंबूंत नेल्यानंतर पलीकडल्या बाजूस एक राहुटी मारून दिली आणि त्यांची जेवणाखाणाचीही व्यवस्था करून दिली. जोशीबोआंनीं सांगितलें कीं, आपण स्वतःच आपलें अन्न शिजवून खातों. दुसऱ्या कोणी शिजविलेलें खात नाहीं. यामुळें त्यांचा तो आश्रयदाता रजपूत त्यांस रोज शिधा देऊं लागला. उत्कृष्ट प्रकारचा शिधा त्यांस तो देई, त्यांतून जितका आपल्या पोटाला पाहिजे तितका ते शिजवीत, आणि बाकीचा गरिबांगुरिबांस देऊन टाकीत.

बऱ्हाणपुरच्या बाजारांत ज्यांनीं नुसते हाताकडे पाहून कित्येकांस मागल्या पुढल्या गोष्टी बरोबर सांगितल्या, ते जोशीबोआ आतां आपल्या छावणींत येऊन राहिले आहेत असें कळतांच सर्वांना—लहानांपासून थोरांपर्यंत—इच्छा झाली कीं, जोशीबोआंना भेटून आपले कांहीं प्रश्न विचारावे. आपला हात दाखवून आपलें नशीब कधीं उघडेल हें विचारावें किंवा आतां आपण ज्या मोहिमेवर जातों आहों, त्या मोहिमेवर आपलें बरें वाईट होणार, कीं आपण सुखरूपपणें परत येणार हें विचारून घ्यावें. अशा हेतूनें लोकांच्या झुंडींच्या झुंडी त्यांच्या राहुटीकडे येऊं लागल्या. परंतु त्यांच्या त्या आश्रयदात्या रजपुतानें त्यांचा मोठा बंदोबस्त ठेविला. जोशीबोआ ज्या राहुटींत होते, तेथें एका वेळीं तीन माणसांपेक्षां जास्त माणसांना जाऊं द्यावयाचें नाहीं असा धरबंध घातला. त्या तिघींतला एक बाहेर आला, ह्मणजे आणखी एकानें जावें. त्या आश्रयदात्या गृहस्थाची तर त्यांच्या जागीं फारच मोठी श्रद्धा बसली. जोशीबोआंनीं त्याच्या संबंधानें ज्या ज्या गोष्टी सांगितल्या

त्या त्या सर्व त्यास पटल्या. त्याशिवाय जोशीबोआ रोज घटका अर्धी घटका तरी, त्याच्या पत्रिकेचा विचार करून त्यास कांहींना कांहीं तरी सांगतच. तेंही त्यास बरोबर पटे. लोकांतही जोशीबोआंची फार ख्याति झाली. आपल्यास जोशीबोआंचें एकही सांगणें पटलें नाहीं असें ह्मणणारा हजारांत एकही निघेना. जोशीबोआंस हात अगर कुंडली दाखवून जो कोणी बाहेर येई तो असें ह्मणे कीं, जोशीबोआला कांहीं तरी कर्णपिशाच वश आहे. केवळ ज्योतिषशास्त्राच्या जोरावर हे इतकें सांगूं शकतील असें संभवनीयच नाहीं. कोणाकोणास काय काय सांगितलें हें पुष्कळ वेळां ज्याचें त्यासच माहिती. इतरांस त्याची कांहींसुद्धां माहिती होणें शक्य नाहीं हें उघडच होय. कारण कित्येकांनीं जें काय विचारलें व त्यांस जोशीबोआंनीं जें काय सांगितलें तें बाहेर बोलण्याजोगेंही नव्हतें.

लहान मंडळींच्या मनांत अशा प्रकारची श्रद्धा उत्पन्न होऊन जोशीबोआंचें स्तोम माजत जातांच त्यांची वर्दी वरच्या मंडळीपर्यंतही गेली. ती मंडळी एका सामान्य रजपूत शिपायाच्या आश्रयानें एका राहुटींत राहिलेल्या जोशीबोआंकडे आपला हात दाखविण्यास थोडीच येणार ! जोशीबोआंना त्यांच्यापैकीं कित्येकांनीं आपल्या तंबूवर येण्यास बोलावणें पाठविलें.गरीबगुरीब शिपायांपैकीं पन्नासांचे हात पाहून जी प्राप्ति व्हावयाची त्याच्या पांचपट प्राप्ति एखाद्या अशा बड्या सरदाराचा हात पाहिल्यानें होणार हें उघडच होतें. जोशीबोआंना वर सांगितल्या प्रकारचीं तीन चार आमंत्रणें आलीं, परंतु ' मी आपली जागा सोडून येण्यास हरकत नाहीं पण तशा माझ्या करण्यानें येथें प्रश्न विचारण्यास येणाऱ्या गरिबांगुरिबांची फार निराशा होते, तेव्हां आपण आपला प्रश्न लिहून पाठविल्यास त्याचें उत्तर मीही लिहून पाठवीन, अगर आपला कोणी विश्वासू माणूस आल्यास त्याजजवळ सांगेन. आपल्याकडे आल्यानें सहज दोन प्रहर जातील, तितक्या वेळांत येथें पांचशें माणूस खोळंबून बसेल. बाकी आग्रह असल्यास मी केव्हांही आपल्या सेवेस तयार आहेंच. ' अशा प्रकारचें उत्तर त्यांनीं त्या आमंत्रण करणारांस पाठविलें. पण अशीं उत्तरें कशीं खपणार ! त्यांस आग्रहाचीं ऊर्फ सक्तीचीं आमंत्रणें येऊं लागलीं व तीं त्यांस स्वीकारणेंही भाग पडलें. कित्येकांस—नाहीं बहुतेकांस—त्यांच्या त्या उत्तरांचा पहिल्या प्रथम रागही आला, परंतु जोशीबोआ त्यांच्याकडे गेल्यानंतर त्यांच्या मोहक भाषणांनीं व त्याहीपेक्षां चित्ताकर्षक अशीं प्रश्नोत्तरें सांगितल्यानें त्यांचे ते राग पार निघून गेले. थोड्याच वेळांत जोशीबोआंचें वरच्या मंडळींतही बस्तान बसलें. आतां जोशीबोआंचा उपयोग गरीबांगुरीबांस फारच थोडा होऊं लागला ! त्यांचा सर्व वेळ बड्या लोकांचे घरीं जाऊन त्यांचे व त्यांच्या लव्याजम्यांतील लोकांचे हात पहाण्यांत जाऊं लागला. होतां होतां या सर्व सैन्याचे मुख्य अधिपति जे जयसिंग त्यांचेपर्यंत व त्यांचे दुय्यम दिलेरखान यांचेपर्यंत जोशीबोआंची ख्याति गेली ! कित्येक मुसलमान व रजपूत मनसबदारांनीं त्यांस जोशीबोआंच्या ज्योतिषज्ञानाबद्दल शिफारस

केली आणि मिर्झाराजांसही या माणसास आपलेपुढें आणून कांहीं प्रश्न विचारावे असें वाटलें. परंतु त्यांजवळ शिफारस करणारांपैकीं एकानें मी त्यांना आपल्याकडे घेऊन येतों अशी विनंति केली. तेव्हां मला सध्यां वेळ नाहीं, मला थोडा वेळ झाला म्हणजे मी आपल्याला कळवीन, असें मिर्झाराजांनीं त्यास उत्तर दिलें. सैन्याच्या व्यवस्थे-खेरीज किंवा बादशहास पत्रें लिहिण्याखेरीज या ह्यातान्यास दुसरें कांहींसुद्धां सुचत नाहीं असें त्या वेळीं त्यांचेजवळ असलेली मंडळी आपापसांत ह्मणाली आणि तें प्रकरण तितकेंच राहिलें. जोशीबोआंच्या ज्ञानापासून इतर मंडळी मात्र होईल तितका उपयोग करून घेत होती.

याप्रमाणें बऱ्हाणपुरास जयसिंगाच्या फौजेचा तळ आल्या दिवसापासून चार सहा दिवसांच्या आंत जोशीबोआंचें बस्तान बसलें. गाणेंबजावणें, चित्रें काढणें, नाटक करणें, या सगळ्या कला मोठ्या मोहक खऱ्या. पुष्कळ लोकांना गाण्या-बजावण्याचा नाद लागून त्यांच्या पैशाचा चुराडा होतो व ते दुर्मार्गाला लागतात, हा अनुभव पुष्कळांना आहे. असा नाश होतो ह्मणून त्या कलेच्या मोहकप-णाची ख्याति अधिक आहे. परंतु खरें जर पाहिलें, तर आपलें पढचें आयुष्य कोणत्या सुखांनीं किंवा दुःखांनीं भरलेलें आहे हें पहाण्यासाठीं उत्सुक होऊन जितकीं माणसें जोशांच्या नादीं लागतात, तितकीं वर सांगितलेल्या मोहक कलांच्या नादीं लागत नसावींत. प्रत्येक मनुष्य आपल्या भावि आयुष्यांतील भाग्यो-दयाचा काल समजावून घेण्यास फार उत्सुक असतो. तो काल सांगेल असा कोणी जोशी त्याच्या मार्गांत आला, कीं तो त्याच्याकडे हेलपाटे घालावयाला लागलाच असें समजावें. अशा मनुष्यस्वभाव असल्यामुळेंच भविष्य सांगणाऱ्या जोशांचा धंदा बऱ्या तऱ्हेनें चालतो. त्यांस मानही मिळतो. आमच्या जोशीबोआंचें सांगणें मोठें खुबीदार असें, आणि तें फार लवकर पटे, हें वर आह्मीं सांगितलेंच आहे.

बऱ्हाणपुराहून तळ उठविण्याचा हुकूम झाला, तेव्हां जोशीबोआ आपल्या आश्रयदात्यापाशीं रजा मागूं लागले. "आपल्या आश्रयानं मला चार दोन पैसे मिळाले, माझा लौकिकही वाढला, तेव्हां आपले उपकार इतके झाले आहेत, कीं मीं आपल्या कातड्याचे जोडे करून आपल्याला घालायला दिले. तरीही ते फिटायचे नाहींत. परंतु आतां मला उत्तरेकडे काशीप्रयागास जाणें आहे मी आपल्याबरोबर कशाला येऊं ? मला आज्ञा यावी." अशी त्यांनीं फार नम्रतेनें विनंति केली. ही विनंति केली तेव्हां तेथें इतर बरीच मंडळी बसली होती. त्यांच्या कानीं ती विनंति पडतांच "छे. छे. जोशीबोआ आपण आह्मांला टाकून इतक्या लव-कर मुळींच जातां कामा नये. काशीप्रयागची यात्रा पुढें करतां येईल. आह्मी मोहीम संपवून येऊं तेव्हां तुह्मांला काशीपर्यंत नेऊन पोंचवूं" असें एकदम कितीकांनीं तरी त्यांस विनविलें. "आपण आमच्या लष्कराबरोबर दक्षिणेंत आलां तर आपल्याला रगड प्राप्ति होईल. प्राप्तीबद्दल आपल्याला काळजी नको" असेंही त्यांनीं ह्मटलें.

त्यांस जोशीबोआ ह्मणाले: "प्राप्तीबद्दल मीं कधींच काळजी केली नाहीं. देवानं जो माझ्या अंगीं गुण ठेवला आहे, तो लोकांच्या उपयोगी पडावा एवढ्याचकरितां ठेवला आहे. आणखी माझ्या गुरूनं मला असं बजावून सांगितलं आहे, कीं या गुणापासून लोकांना जितका उपयोग होईल तितका करून देत जा. द्रव्याची किंवा अन्नाची अपेक्षा धरून श्रीमंतांपुढें लाळ घोटायची आणखी दरिद्र्यांना परत लावायचं, असें कधीं करीत जाऊं नको. मीही त्यांच्या आज्ञेप्रमाणें होतां होईतों अक्षरशः वागतों. कधीं कोणास पैशाकरितां अडवीत नाहीं. पैसा असेल अशांच्यापासून पैसा घेतों ! काय करावं आमचंही पोट आहेच कीं नाहीं; परंतु आपणच पहा किती आपल्यासारख्यांना त्रास होतो तो. याउपर आपण ह्मणाल तर मी आपल्या बरोबर येतों."

आणि हें सांगावयास नकोच, कीं जोशीबोआ छावणीबरोबर गेले.

---

# प्रकरण ६ वें.

## जयसिंग.

औरंगाबादेपासून सुमारें चार दिवसांच्या वाटेवर अलीकडे जयसिंगाचें सैन्य येऊन तळ देऊन राहिलें होतें. बऱ्हाणपुर सोडून सैन्य दक्षिणेकडे येऊं लागल्यानंतर त्या सैन्यास विश्रांति ह्मणून जयसिंगानें दिलीच नाहीं. जेमतेम चारसहा तास विश्रांति मिळाली ना मिळाली तों पुनः पुढें जाण्याची हुटहूट. जयसिंगाला स्वतःला झोंप कशी ती माहीतच नाहीं, यामुळें त्यास कित्येक त्रासलेले शिपाई सैतानसिंग ह्मणत असत. त्याचा डोळा मोठा विलक्षण असे. तो आपल्या शम्यान्यांत बसलेला राहत नसे. घोड्यावर स्वार होऊन सगळ्या छावणीभर हिंडावयाचा. करमणुकींत गुंतावयाच्या वेळीं त्यानें आपल्या शिपायांस कधीं त्रास दिला नाहीं, परंतु एकदां तळ उठविण्याचा हुकूम झाला ह्मणजे मग यत्किंचितही टंगळमंगळ केलेली त्यास खपावयाची नाहीं. मागें एकदां सांगितलेंच आहे, कीं व्यसनी लोकांचीं व्यसनें चालू राहण्याला लागणारीं सर्व साधनें या सैन्याबरोबर असत. परंतु त्यामुळें कधीं सैन्याच्या हालचालीला अडथळा झाल्याचें त्याच्या नजरेस आलें, तर त्यानें कधींही क्षमा केली नाहीं. तावडतोब अतिशय कडक शिक्षा झालीच ह्मणून समजावें. जयसिंग स्वतः अशी टेहळणी करीत असे, यामुळें त्याच्याबरोबर आलेले मनसबदारही तसेच स्वकर्मदक्ष असत व तेही आपापल्या घोड्यावर स्वार होऊन आपापल्या लोकांची व्यवस्था पहात असत. तळ पडला ह्मणजे कोणी कितीही अव्यवस्थितपणें राहिला, तरी तळ उठावावयाचा असा हुकूम आला, कीं मग अव्यवस्थितपणा चटसारा गुंडाळून ठेवून ज्याला त्याला तयार व्हावें

लागे. मग माझी रोटी तयार झाली नाहीं, किंवा मला अमूक करावयाचें आहे, ह्या सबबी कोणाच्या ओंठावर सुद्धां येणें शक्य नव्हतें. आपल्या आपल्या मनांत काय चरफड होत असेल ती ज्याची त्याला ठाऊक; फार झालें तर त्याच्याजवळ जो कोणी असेल त्यालाच माहीत. अशा तऱ्हेनें मजल दरमजल होतां होतां या प्रकरणाच्या प्रारंभीं सांगितल्याप्रमाणें जयसिंगाचें लष्कर औरंगाबादेपासून चार दिवसांच्या वाटेवर येऊन पोंचलें. येथें दोन दिवस विश्रांति घेण्याचा हुकूम सुटला होता, यामुळें लोकांस थोडासा आनंद झाला होता. तळ सुमारें तिसरा प्रहरीं येऊन पडला. ज्यानें त्यानें आपल्या पथाऱ्या पसरून किंचित् काळपर्यंत हातपाय पसरण्याची तयारी चालविली होती. थोड्याच वेळांत राहुट्या, कनाती, पालें वगैरे लागून कित्येकांनीं आपली रसोयी बनविण्यालाही प्रारंभ केला. ठिकठिकाणीं तीन दगड बसून त्यांच्या मध्यें सर्पण जळूं लागलें व वर भांडीं चढलीं. धूर निघूं लागला. होतां होतां सूर्य अस्तास गेला.

इतक्यांत दोन माणसें पायींच त्या तळाच्या एका बाजूनें बाहेर पडलीं. यापैकीं एकाच्या अंगांत फकीर लोकांच्या कफनीसारखी पायघोळ कफनी होती. कमरेस एक कमरबंद बांधलेला होता. त्याचे डोक्यास एक पंजाबी तऱ्हेचा उंच असा फेंटा—उंच व मोठा असा फेंटा—होता. त्याच्या दाढीमिशा भल्या मोठ्या होत्या व त्या वरच्या बाजूस वळविलेल्या होत्या. हातांत हत्यार वगैरे कांहीं नव्हतें. कफनीच्या आंत कांहीं हत्यारें असलीं तर तीं बाहेर दिसत नव्हतीं. तो माणूस अगदीं साधारण जवळच कोठें तरी जात असावा असा त्याचा नूर दिसला. त्याच्या एका हातांत एक उंच अशी काठी व दुसऱ्या हातांत एक मोठी थोरली तपेली होती. दुसऱ्या माणसाचा पोषाख कांहीं निराळ्या प्रकारचा होता. त्याच्या डोक्यास एक उंच अशी टोपी होती. त्याची दाढी लांब होती. त्याच्या अंगांत एक कमरेइतक्याच लांबीचा व मध्यें बंद बांधलेला असा कुडतेंवजा अंगारखा होता. पायांत इजार—खालीं अगदीं निमुळती व वर पोंकळ अशी इजार—होती. त्याच्या हातीं शस्त्र दिसलें नाहीं. ते दोघेही बाहेर पडले, तेव्हां त्यांनीं आपल्या सभोंवर बिलकुल पाहिलें नाहीं आणि त्यांच्याकडे दुसऱ्या कोणाचें लक्ष्यही गेलें नसावें असें दिसलें. जो तो आपल्या पोटाच्या उद्योगांत होता, यामुळें असें झालें असावें. शिवाय त्या दोघांपैकीं एकाच्या हातांत मोठें भांडें असल्यामुळें हे पलीकडे नदीच्या काठीं पाणी आणण्यास अगर झाड्यास वगैरे जात असावे असें कित्येकांस वाटून त्यांनीं दुर्लक्ष्य केलें असावें. कारण ती वेळ अशीच होती, कीं जें ज्याला वाटेल तें त्यानें करावें व आसपास वाटेल तेथें जावें. दुसऱ्याही कित्येक बाजूंनीं अशीं दोनदोन चारचार माणसें वाटेल तिकडे जातच होतीं. परंतु आपला संबंध फक्त वर सांगितलेल्या दोन माणसांशींच असल्यामुळें आपणांस इतरांकडे पहाण्याचें कांहीं कारण नाहीं.

वरील दोन माणसें सहज कोठें तरी जवळच जाण्याच्या इराद्यांत असल्याप्रमाणें

बाहेर पडलीं आणि आपआपसांत कांहीं तरी बोलत पुढें चाललीं. जिकडे विशेष गर्दी असेल तिकडच्या बाजूस ते गेले नाहींत. जोंपर्यंत कोणी ना कोणी तरी आप-ल्याकडे दृष्टि देईल असें त्यांस वाटलें, तोंपर्यंत त्यांचें भाषण इतक्या हलक्या आवाजानें चाललें होतें, कीं त्यांचें त्यांसच काय ऐकूं जात असेल तें असेल. परंतु छावणीपासून बऱ्याच अंतरावर गेल्यानंतर त्यांचें भाषण तितक्या दाबल्या आवाजानें चालू राहिलें नाहीं. जरा मोठ्यानें सुरू झालें. परंतु एकंदरीत आपलें भाषण कोणा-स ऐकूं जाऊं नये असें असलें, ह्मणजे मनुष्य जशा प्रकारें दाबल्या आवाजानें बोलतो, तशाच प्रकारें ते बोलत होते. छावणीपासून खूप अंतरावर दोघेही आले, तेव्हां त्यांच्यापैकीं एक दुसऱ्यास ह्मणतोः "इतके दिवस अशा प्रकारें राहिल्याचं ह्मणण्याजोगं चीज झालं नाहीं. परंतु कांहींना कांहीं तरी बातमी पाठवितां आली खरी. निदान महाराजांनीं आतां आजपर्यंत वागणूक केली तशी करून चालायचं नाहीं हें तरी त्यांच्या लक्ष्यांत येईल. एकंदर जो प्रकार पाहिला, आणखी अनुभव-ला त्यावरून पक्की खात्री झाली, कीं जयसिंग महाराज कांहीं कच्च्या गुरूचे चेले नाहींत. ते फार धोरणी, फार निश्चयी. रामसिंगानं महाराजांना पत्र लिहून त्यांत त्यांचं वर्णन करून सांगितलं, तें अगदीं यथार्थ ! अहाहा ! असा पुरुष जर आ-म्हांला अनुकूल झाला, तर आणखी काय पाहिजे ! पण यांच्या मनांत कोठली अशी सद्बुद्धि व्हायला ! ते आपला सारा पराक्रम, सारा निश्चय, सारा मुत्सद्दी-पणा, सारा चतुरपणा महाराजांना रसातळाला पोंचविण्याकरितांच योजणार. त्यांनीं दुर्लक्ष्य केलं, तर मग महाराजांची इच्छा हां हां म्हणतां परिपूर्ण होणार. आजपर्यंत त्यांनीं किती संकटं, किती त्रास भोगले, पण आपला निश्चय आणखी उद्योग अणुमात्र ढळूं दिला नाहीं. कां ? तर आपल्या धर्माचा आणखी गरिबागुरिबांचा छल होतो ह्मणून. त्यांचा त्यांना स्वार्थ कांहींच साधायचा नाहीं. स्वार्थ साधायचा अस-ता, तर विजापूरची पादशाहत त्यांनीं आपल्या मुठींत तेव्हांच आणली असती. त्यांना तें किती सोपं होतं ! परंतु धर्माचा छळ होतो, गोब्राह्मणांचा घात होतो, पति-व्रता भ्रष्ट होतात आणि एकंदरींत वैदिक धर्माची विटंबना होते ती बंद करावी, एवढाच त्यांचा हेतु. त्यांना साहाय्य कोणाचं–कोणा थोरांमोठ्यांचं–नाहीं. गरीब-गुरीब मावळे, आणखी आमच्यासारखे गोसावी हे त्यांचे मदतनीस. जसवंत सिंग, जयसिंग यांच्यासारखे एक दोघे मिळाले, तर काम फत्ते. इकडला कार्यभाग इकडे महाराज उरकतील. तिकडचा भाग तिकडे कोणी तरी या दोघां-सारख्यांनीं–किंवा दोघांनीं एकमतानं उचलला, तर होणार आहे."

दुसरा माणूस याचें हें बोलणें स्वस्थपणें ऐकून घेत होता. त्यानें अनुमोदन दिलें नाहीं किंवा प्रतिकूल उद्गारही काढले नाहींत, यामुळें पुढें तो पहिला गृहस्थ त्यास म्हणतोः "असो चला; त्याबद्दल आतां आपल्याला विशेष कांहीं बोला-यचं नाहीं. परंतु आपण माझी एवढी कामगिरी करण्याचं पतकरिलं आहे, तेवढी

आतां करा. आपल्यासारखीं कांहीं माणसं अशा प्रकारें तरी मदत करायला आम्हांला मिळतात हें काय थोडं आहे? आज नाहीं उद्यां कांहीं तरी आतां होणारच. तें गाडं थांबत नाहीं. आह्मी ह्मणतों तशीं माणसं तिकडे हिंदुस्थानांतही निघतील आणि आमच्याचप्रमाणें सर्व कार्यभाग होईल. त्याची आह्मी आजच कशाला काळजी करा. हें पत्र तुह्मी आतां कबूल केल्याप्रमाणें नेऊन द्या. मागोमाग मीही येईन किंवा औरंगाबादेस गेल्यावर दुसरा कोणी तरी दुसरं पत्र न्यायला पाहीन. आतां आह्मी आपल्या देशांत आलों आहों, तेव्हां आह्मांला माणसं मिळायला पंचाईत पडणार नाहीं. आपण एवढं काम केलं तर मी आपला फार ऋणी होईन. आपण रजपूत आहां, तेव्हां आपल्यालाही ही अभिमान वाटण्याचीच गोष्ट आहे."

इतकें त्या पहिल्या गृहस्थाचें बोलणें ऐकून तो दुसरा गृहस्थ एकदम मोठ्यानें हंसूं लागला. हा एकाएकीं हंसूं कां लागला, याचें कारण त्या पहिल्या गृहस्थाच्या कांहींच लक्ष्यांत येईना. शेवटीं त्या हंसण्यानें त्यास राग आला व तो त्यास म्हणतो: "अहो, आज सात आठ दिवस तुह्मांला मी सांगून बोलून माझं पत्र नेऊन पोंचविण्यास तुह्मी तयार झालां. कबूल केल्याप्रमाणें पोषाखही करून बेमालूम सोंग घेऊन आलां. इतकं बेमालूम सोंग झालं, कीं तुह्मांला मीं पहिल्या सपाट्यास ओळखिलं नाहीं. तुमच्याजवळ मीं थैलींत घालून पत्र दिलं, तुह्मी निघालां, आणखी आतां मी इतकं बोलतों आहें, तरी तें नुसतं मुकाट्यानं ऐकून घेऊन कांहीं उत्तरं न देतां नुसतं मोठमोठ्यानं हंसतां याला काय म्हणावं?"

"आपल्या भोळेपणाकडे पाहून मोठमोठ्यानं हंसूं येणार नाहीं, तर काय होईल? सांगा पाहूं!"

"माझा भोळेपणा! माझा भोळेपणा तो काय तुमच्या दृष्टीस पडला?"

"जो तुमचा भोळेपणा—अर्धवटपणा ह्मणा पाहिजे तर—तुमच्या अंगीं आहे, तो दृष्टीस पडला. दुसरा कुठला पडायचा? तुम्हांला छावणींत शिरल्याला आज किती दिवस झाले? तुह्मीं छावणींत शिरून आमच्याशीं तुमची ओळख—स्नेह—झाल्याला किती दिवस झाले? बोला. इतके दिवसांत तुह्मीं कोणाबद्दल काय कयास काढले, आणखी तुमच्याबद्दल कोणीं काय कयास काढले याची कांहीं तरी कल्पना तुम्हांला आली का? या आमच्या छावणींतले सगळे लोक भोळवट अशी तुह्मीं कल्पना केली! कां? तर तुम्हांला ओळखणारा कोणी इथें नाहीं अशी तुमच्या मनाची खात्री झाली! पण न जाणों, आपण इतक्या धीटाईनं वागतों आहोंत तर आपल्यालाही एकाद्या हरीचा लाल ओळखीत असेल, असं कां नाहीं तुमच्या मनांत आलं? अजून तुमची समजूत अशीं दिसते आहे, कीं तुह्मांला कोणीं ओळखलं नाहीं. आपल्याला कोणी ओळखणार नाहीं. असं मनांत पक्कं समजून तुह्मी इतके आमच्या गोटांत आलां, यांत तुमच्या छातीची तारीफ करावी तितकी थोडीच आहे; पण असा थोडा आपल्या स्वतःच्या ठिकाणचा

फाजील विश्वास एखादे वेळीं आपल्या घाताला कारण होणार नाहीं का? असा प्रश्न तुमच्या मनांत उपस्थित झाला असता तर इतकी छाती तुम्हीं केली नसती. मी जो हंसलों, तो या विचारांनीं हंसलों. तुम्हीं आपल्या सोंगानं आह्मांला फसवूं पाहिलं, पण आह्मीं आपल्या बनावट बावळटपणानं तुम्हांला फसवलं कीं नाहीं? तुह्मांला आम्हीं आपल्यावर विश्वास ठेवायला लावून तुमच्यापासून पत्र घेतलं कीं नाहीं? तुम्हाला ओळखून, तुम्हीं काय मिषानं आमच्या गोटांत घुसलां हें जाणून तुमच्या पोटांत शिरून तुमच्यापासून थैली घेण्यासाठीं मला जयसिंगांनीं योजिलं नाहीं ह्मणून कशावरून? असा संशय तुह्मांला कां आला नाहीं? ............."

तो गृहस्थ असें बोलत असतां आमचे पहिले गृहस्थ अगदीं चकित होऊन वटारलेल्या डोळ्यांनीं अंधारांत पाहूं लागले. त्या त्यांच्या बरोबरीच्या शब्दांपैकीं प्रत्येक शब्द अगदीं खरा आहे असें त्यांस दिसून आलें. त्यांचे तोंडून एकही शब्द निघेना. काय उत्तर द्यावें तें सुचेना. तें पाहून त्या दुसऱ्या गृहस्थास फारच हंसूं कोसळलें व नंतर जास्त बोलण्यास जणूं काय स्फुरण चढलें. तो त्यांस पुढें म्हणतोः "काय हो, अगदींच स्तब्ध बसलां? कांहींच बोलत नाहीं? आपण इतके आंधळे कसे झालों, याचं तुमचं तुह्मालाच नवल वाटूं लागलं आहेना? आपण इतकी चतुराई करून सोंगाची बतावणी केली, आणि आपल्याला कोणीं ओळखलं नाहीं हें आपलं भुरळ दूर झालं म्हणून आपल्याला आश्चर्य वाटतें आहे, कीं आपल्या पोटांत शिरून माझ्यासारख्या परक्या मनुष्यानं आपला विश्वास बसवून घेऊन आपण आपल्या महाराजांना लिहिलेलं पत्र हातीं येईपर्यंत—नव्हे अजूनसुद्धां मी कोण हें आपल्याला कळूं दिलं नाहीं याच्याबद्दल आपल्याला आश्चर्य वाटतं? काय वाटतं काय? आज या घटकेला ज्या आश्चर्यानं तुम्ही चकित होऊन अगदीं स्तब्ध झालां आहां, तें आश्चर्य तरी कशाबद्दलचं आहे?"

एखाद्यानें दुःखावर डागण्या द्याव्या, त्याप्रमाणेंच हें त्या गृहस्थाचें या वेळचें भाषण त्या दुसऱ्या गृहस्थास वाटलें. कांहीं केल्या त्याच्या तोंडून शब्द निघेना. जशी एखाद्या यक्षानें किंवा असुरानें एखाद्या मानवी प्राण्यावर मोहनी टाकावी, तशीच त्या गृहस्थावर या वेळीं टाकली गेली असावी असें दिसलें. कदाचित् आतां पुढें आपण काय करावें, याबद्दल त्याला पंचाईत पडली असावी. आपल्याशीं बोलणारा गृहस्थ कोण याबद्दल त्याला खरोखरीच आतां मोठें गूढ पडलें. याच्याशीं आतां दांडगाईचें वर्तन करूं ह्मटलें, तर तेंही शक्य नव्हतें. कारण तो गृहस्थ चांगला संयाजवान होता, आणि शस्त्रास्त्रांत निपुण असलाच पाहिजे, हें आजपर्यंतच्या त्याच्या परिचयावरून स्पष्टपणें कळलें होतें.

हा गृहस्थ बोलत नाहीं, अगदीं स्तब्ध बसला आहे, असें पाहून तो लांब फकिरी कफनी घातलेला गृहस्थ त्यास पुढें ह्मणतोः "जयसिंगराजांना आपल्या ज्योतिषज्ञानाची कीर्ति कळली, तेव्हांपासूनच त्यांना

संशय आला. त्यांना ज्योतिषाचा स्वतः फार नाद आहे, यामुळें त्यांनीं आपली प्रत्यक्ष भेट घ्यायला वेळ नाहीं असं जरी कळवलं, तरी तुमची विद्या पाहण्यासाठीं त्यांनीं वेष पालटून तुमच्या सभोंवतालीं जमणाऱ्या लोकांत मिसळून मुकाट्यानं तुमचं चरित्र पाहिलं. पहिल्याच खेपेला त्यांना त्याबद्दल शंका आली. आपण कांहीं खरे खरे जोशी नव्हे, आपण कोणाकडून तरी आमच्या छावणींत बातमी काढण्याकरितां आलां आहां, अशी त्यांची खात्री झाली. परंतु आपण फसवायला आलां त्या आपल्यालाच फसवावं असा त्यांनीं विचार करून मला आज्ञा केली, कीं तूं यांच्या पोटांत शिरून हे कोण, कुठले, तें काढ. तुमच्यापाशीं मी विशेष लगट करून तुमच्या प्रसादाची अपेक्षा दाखवूं लागल्या दिवसापासून रोज मी एकवार त्यांच्याकडे जाऊन झाल्या गोष्टीची वर्दी देत असें! मी सांगे त्याबद्दल त्यांना हंसूं येई. ते ह्मणतः ' तूं जसा कांहीं अगदीं फुटला आहेस, जी काय कामगिरी ते सांगतील ती कर; परंतु हा जोशीपणाचा बहाणा करून बातमी फोडायला आणखी माहिती गोळा करायला आलेला छातीचा पुरुष शेवटपर्यंत करतो काय हें पहा. त्यानं तुला पत्र घेऊन जायला सांगितलं, होय ह्मण. जायला निघ. पत्र हातीं घे आणखी मग त्याला आपलं खरं स्वरूप दाखव—आपलं खरं स्वरूप त्याला दाखव ह्मणण्यापेक्षां त्याचं खरं स्वरूप आपण त्याला दाखवूं.' बोला आतां आणखी कांहीं पाहिजे का सगळा खुलासा नीटपणें व्हायला ? आपण आतां दिलेलं पत्र महाराजांच्या हातीं खचित जाणार. पण तें तुमच्या महाराजांच्या हातीं जाणार कीं आमच्या महाराजांच्या हातीं जाणार एवढीच काय ती शंका!"

वाचकांनीं आतां ताडलेंच असेल, कीं या दोन गृहस्थांपैकीं एक ज्यांनीं जयसिंगाच्या छावणींत शिरून जिकडे तिकडे आपल्या विद्येनें मंडळींना भुरळ घातली ते जोशीबोआ होत. त्यांचें बस्तान चांगलें बसलेंसें त्यांस वाटल्याबरोबर त्यांनीं आपल्या कार्याला उपयोगी पडेल असा कोणी तरी एक माणूस गांठून त्याच्याबरोबर कांहीं पत्रें देऊन त्यास दक्षिणेस पाठवावें असा विचार केला. नंतर ते निवडक रजपूत पाहून त्यांजवळ, " काय पहा, आपलेच लोक, ज्यांना आपल्या वैदिक धर्माचा अभिमान असावा आणि आहे, ते मोगलांची चाकरी पतकरून वैदिक धर्माच्या रक्षणाकरितां प्रयत्न करणारांच्या शासनाला जातात, तेव्हां याला काय ह्मणावं ?" असें एखादें दुसरें वाक्य उच्चारून खडा टाकून पाहूं लागले. त्यांत एक माणूस त्यांना होस हो देऊन त्यांच्या बरोबरीनें कळकळ दाखविणारा मिळाला. तो मिळतांच त्याच्यापाशीं हे रहस्य करूं लागले. तो रहस्य करूं लागलेला माणूस अर्थातच यांस बातम्या देऊं लागला. यांनीं जी काय माहिती विचारावी ती त्यानें यांस द्यावी, असा क्रम सुरू झाला, तेव्हां जोशीबोआंस फारच आनंद झाला. पुढें त्यांनीं त्या बातम्यांचें एक पत्र तयार करून तें महाराजांस—शिवाजीमहाराजांस—पाठविण्याच्या कामीं मदत मागितली, तीही त्यानें ताबडतोब देतों ह्मणून आपण स्वतःच मुका-

त्यानें तें पत्र घेऊन जाण्याचें कबूल केलें. आपल्यास मोगली राज्यांत नोकरी करण्याचा अतोनात कंटाळा आला आहे, आपण ती सोडून शिवाजीमहाराजांस मिळणार असें त्यानें निश्चयपूर्वक सांगितलें आणि अमुक वेळीं आपण ही छावणी सोडून तिकडे जाण्यास निघूं असेंही त्यानें कबूल केलें. जोशीबोआंस अर्थातूंच अत्यंत आनंद झाला. त्यांनीं ठरविल्याप्रमाणें तो वेळेवर पोषाख करून त्यांजकडे आला. दोघेही मोठ्या शिताफीनें छावणींतून बाहेर पडले. पुढें त्यांचें भाषण काय झालें हें वाचकांस कळलेंच आहे.

या रजपुतानें आपणास ठकविलें. आपलें काम अगदीं वेडगळपणाचें झालें. आपल्या सोंगाची बतावणी फार उत्तम झाली, या भरांत आपण आंधळे झालों, याबद्दल जोशीबोआंस फारच वाईट वाटलें. आतां या माणसास आपण येथें पारिपत्य करावें, याच्याजवळचें पत्र घ्यावें आणि आपणच निघून जावें, असा त्यांच्या मनांत विचार येऊन त्याच्या अंगावर हल्ला करण्यास व शस्त्र चालविण्यास त्यांचे बाहु जणूं काय स्फुरण पावूं लागले ! आणि वेडेपणाच्या भरांत त्यांनीं एकदम त्याच्या अंगावर लगट करून आपल्या कुबडींतील शस्त्र उपसलें.

तेव्हां तो रजपूत शांतपणें त्यांचें निवारण करून त्यांस ह्मणतोः—" इकडे पहा, तुह्मांला अशी बुद्धि होणं अगदीं स्वाभाविक आहे. पण तुह्मांला अशी बुद्धि होईल अशी कल्पना आमच्या मनांत आली नसेल, असं समजूं नका. मनुष्यस्वभावाची आह्मांलाही ओळख आहेच. पण तुम्हीं आम्हीं मारामारी करण्यांत कां कांहीं शहाणपणा आहे ? मला मारून तुम्हीं पत्र घेतलं, आणखी तें घेऊन गेलां तरी उपयोग काय ? त्या पत्रांत काय अशी बातमी आहे, कीं जी तुम्हीं आतां आपल्या महाराजांना पाठविलीत तरच फार फायदा आहे ! कांहीं आहे अशी बातमी ? कीं तुम्ही अमूक अमूक सरदार फोडले आहेत, त्यांनीं जयसिंगराजाशीं प्रतारणा करून तुम्हांला गुप्त मदत करण्याचं वचन दिलं आहे, किंवा जयसिंगाची फौज अमूक ठिकाणीं आली असतां आपण आपल्याकडून हल्ला करावा ह्मणजे या फौजेचा सर्वस्वी निकाल होईल. आहे का अशी कांहीं बातमी त्यांत ? बोला. मग माझ्यावर तुम्हीं शस्त्र चालवून मला मारण्यांत आणखी माझ्यापासून पत्र घेण्यांत कांहीं तरी फायदा ! पत्रांत हेंच लिहिलेलं कीं नाहीं, कीं आजपर्यंतच्या गोष्टी निराळ्या; आतांची गोष्ट तशी नाहीं ! झाल तर. शिवाय तुम्ही असा विचार करा, कीं मी अगदीं निःशस्त्र असेन का ? माझ्यावर कांहीं तरी प्रसंग ओढवल्यास मी का स्वस्थ बसेन ? तुह्मी फार फार कच्चे दिसतां. परंतु तुमचे हेतु मात्र फार चांगले आहेत, तेव्हां मला तुमच्याबद्दल समाधानच वाटतं आहे. तुम्हीं मला दिलेलं पत्र तुह्मांला परत पाहिजे का ? हें घ्या. त्या पत्रांत आहे काय ? आणखी जें काय त्यांत आहे तें जयसिंगराजास कळलंच आहे ! त्यांनींच तर तुह्मांला माझ्यासारख्या माणसाकडून सुरेख फस-

विलं. तेव्हां आतां आपण असा विचार करा, कीं आपण तलवार उपसून काय करणार ? ”

आमच्या तोतया जोशीबोआंस फार लाजल्यासारखें झालें. आतांपर्यंत आपण मोठी बहादुरी केली असें वाटून जो मनाला अभिमान वाटत होता, तो पार मावळला. शेवटीं मर्दुमकीच्या जोरावर या माणसास आपण आपली बहादुरी दाखवणार, तर त्याही बाबतींत त्यानें आपला कावा ओळखून आपल्यास खालीं पहाण्यास लाविलें. आतां आपण येथून मुकाट्यानें निघून जाण्यापलीकडे आपल्याला कांहींच शक्य राहिलें नाहीं असें त्यांच्या मनांत येऊन ते स्तब्ध बसले.

या गृहस्थास आतां आपली लाचारी पूर्णपणें दिसून आली, आतां याला आपण जास्त हिणाविणें चांगलें नाहीं, असें त्या दुसऱ्या गृहस्थाच्या मनांत आलें व तो त्यास ह्मणाला, “ आपण खिन्न होऊं नये. ज्या इसमानं आपल्याला अशा तऱ्हेनं फसविलं तो कांहीं आपला शत्रु नाहीं, तो आपला मित्रच आहे. त्याच्या मनांत आपल्याविषयीं दुर्बुद्धि नाहीं, सद्बुद्धिच आहे. आपण लाचार होण्याचं बिलकुल कारण नाहीं. आपल्या महाराजांच्या ठिकाणीं ज्यांचं फार आदरयुक्त असं प्रेम आहे, असे जे रजपूत तरुण आज उत्तरहिंदुस्थानांत आहेत, त्यांच्यापैकींच मी एक आहें. आपल्या महाराजांशीं नेहमीं पत्रव्यवहार करणाऱ्या रामसिंगाचा मी फार मोठा स्नेही आहें. स्वारींत जर आपल्या महाराजांना कळविण्याजोगं कांहीं झालं तर थैली पाठवून मुद्दाम कळीव, ह्मणून ज्याला रामसिंगानं सांगितलं, आणखी तसं सांगितलं आहे असं त्यानं आपल्या मागल्या पत्रांत ज्याच्याबद्दल लिहिलं होतं, तोच मी ! माझंच नांव कीर्तिसिंग. तेव्हां आतां तर आपल्याला कांहीं लाचारी वाटायला नकोना ? इतका वेळ मीं जें तुम्हाला सांगितलं, त्यांत तुमची मजा पहाण्याकरितां म्हणून कांहीं कांहीं गोष्टी सांगितल्या. जयसिंगराजांच्यापर्यंत गोष्टी गेल्या आहेत खऱ्या, परंतु आपलं हें पत्र त्यांच्यापर्यंत जाणार नाहीं. मीं उगीच आपल्याला सांगितलं. बाकी त्यांना तुमचा संशय आला आहे. त्यांनीं मला तुमच्यावर डोळा ठेवायला सांगितलं हीही गोष्ट खरी; परंतु त्यांना जितक्या गोष्टी सांगायच्या तितक्याच सांगितल्या आहेत; भलत्याच सांगितल्या नाहींत. शिवाय तुमच्याबद्दल त्यांच्या मनांत वावगे विचार नाहींत, तेव्हां तुम्ही लागलींच इथून निघून जाण्याचा विचार करतां आहां—तुमच्या चर्येवरूनच हें स्पष्ट दिसतं आहे—तो सोडून द्या. औरंगाबादेस गेल्यानंतर तेथून आपण बेलाशक जा. कोणी आपल्याला नको ह्मणणार नाहीं. पण आतांच जाऊं नका, आल्यासारखे शेवटपर्यंत छावणींतच रहा. आपलं खरं स्वरूप मला एकट्यालाच समजलं आहे आणखी मिर्झाराजांना समजलं आहे; पण दुसऱ्या कोणाला समजेल असं भय बाळगूं नका. मी तुमची चांगली व्यवस्था ठेवीन. महाराजांना कळवण्याजोगं असं काय असेल तें आपण त्यांना कळेल असं करूं,

त्याची तुम्हांला बिलकुल काळजी नको. पण तुह्मी जाऊं नका. माझा आ-पल्या महाराजांविषयीं फार आदर आहे, आणखी आपण तर त्यांच्या संगतींतच असतां, तेव्हां आपल्यापासून त्यांच्या गोष्टी ऐकाव्या, त्यांची माहिती करून घ्यावी असं मला फार वाटतं आहे. माझी फार उत्कट इच्छा आहे. दुसऱ्या कांहीं कारणाकरितां नाहीं, तरी या कारणाकरितां रहा, आणखी मला जें ऐका-यची इच्छा आहे, तें ऐकूं द्या. त्यांत तुह्माला कांहींच हरकत नाहीं. तुमच्या केंसालाही धक्का लागणार नाहीं. याबद्दल मी हमी घेतों."

"छे. छे. छे. माझ्या केंसाला धक्का लागेल या समजुतीनं मी जाण्याची इच्छा करतों असं का तुम्ही समजतां ? तसं मुळींच समजूं नका. आतां इथें रहाण्या-ला कांहीं कारण राहिलं नाहीं म्हणून मी आपला जाण्याची इच्छा करीत होतों ! परंतु शेराला सव्वाशेर असे तुम्ही भेटलां खरे ! माझं खरं स्वरूप जाणून आपण मला फसवण्यासाठीं माझ्याकडे आलां. ज्योतिषाबद्दल प्रश्न विचारण्याच्या मिषानं महाराजांबद्दल बोलून व त्यांना नांवाजून माझं मन आपल्याकडे ओढून घेतलं, आणि मीं विश्वास टाकावा असं वर्तन करून माझा विश्वासही जणूं काय ओढून घेतला, तेव्हां तुमची शिताफी जबर याबद्दल मुळींच शंका नाहीं. आणखी अशा शिताफीच्या लोकांमध्यें आपण राहून कांहीं फायदा होईलसं वाटेना ह्मणून आपला जाण्याचा विचार करीत होतों खरा, पण तोही आपल्या विलक्षण तर्कशक्तीनं आपण ताडला. तेव्हां पहिल्यानं जें मीं—आपण कोण हें ठाऊक नसतांनाही—आपल्याला सांगितलं, तेंच खरं कीं, आपल्यासारखे चतुर मुत्सद्दी मोगलांच्या सेवेंत आहेत, त्यामुळंच त्यांचं तरी राज्य चाललंसं वाटतं आहे. कीर्तिसिंग—पण आपण खरो-खरीच कीर्तिसिंग आहां कीं तेंही मला फसवूनच सांगितलं ?— "

**कीर्तिसिंगः**— नाहीं. आतां फसवायचा नाहीं. मीच कीर्तिसिंग—रामसिंगाचा स्नेही. ज्याचं नांव त्यानं तुमच्या महाराजांस पत्रांत लिहून पाठविलं आहे, तोच मी कीर्तिसिंग खरा. अगदीं शंका धरूं नका समजलांत. आतां आपण आणखी आह्मी कांहीं दोन नाहीं. मात्र आम्हांला तुम्हांला मदत करायला यायची नाहीं. आणखी दर खेपेप्रमाणें तुह्मांला या खेपेला यशही यायचं नाहीं. ती मागली मंडळी निराळी, आमचे जयसिंगराज निराळे; करितां त्या भानगडींत तुम्हीं पडूं नये. दुसरं तिसरं कांहीं नाहीं. आपण जर सामोपचारानं नमून असं घ्याल, तर आमचे जयसिंगराज आपणास क-धींच त्रासदायक वाटणार नाहींत. आपल्याला त्यांच्यापासून त्रास होणार नाहीं. म्हणून ह्मणतों, कीं आपण आतां आमच्याबरोबरच रहा. औरंगाबादेला गेलों—आतां चवथे दिवशीं औरंगाबाद. ती काय आतां लांब आहे ? तेथें गेलों ह्मणजे मग मिर्झाराजांना विचारून आपण पुढें चला. तोंपर्यंत आपल्याला जाऊं देऊं नये असाच आह्मांला हुकूम आहे. इतक्याही उपर आपल्याला शिवाजीमहाराजांकडे कांहीं बातमी कळवायचीच असली तर मी ती आपलीं विश्वासू माणसं आहेत, त्यांच्या हातीं

पोंचती करतों. मग तर झालं ? आपल्याला जें काय कळलं आहे, त्याच्यापेक्षां चार गोष्टी मी नव्या सांगतों ऐका. जयसिंगराजांनीं आपल्या प्रांतांतल्या कोणकोणत्या लोकांना बादशाही सैन्याला मदत करण्यासाठीं या म्हणून खलिते पाठविले आहेत, त्याची तुम्हांला कुठें माहिती आहे ? शिवाजीमहाराजांच्या विरुद्ध ज्यांच्या ज्यांच्या मनांत म्हणून यत्किंचित् तरी कांहीं आहे, त्या प्रत्येकाला कांहींना कांहीं तरी आमिष दाखवून त्यांनीं मोगल सैन्याच्या मदतीला बोलावलं आहे. ज्या घोरपड्यांचीं पाळंमुळं खणून टाकण्याचं तुमच्या महाराजांनीं कंकण बांधलं होतं, त्यांना पत्रं गेलीं आहेत. जावळीकरांकडे खलिता गेलाच आहे. अफझुलखानाच्या मुलाला एक पथक देऊन त्याला स्वतंत्र स्वारी करायलाच सांगणार आहेत. त्याच्या बापाला मारल्याचा सूड उगवण्याची त्याला संधि देण्याचा त्यांचा विचार होऊनच हें पत्र त्याला गेलं आहे. कर्नाटकाकडे कांहीं माणसं गेलींच आहेत, कीं तिकडूनही आपल्या महाराजांना त्रास व्हावा, इतकंच नाहीं, पण आपल्या ताब्यांत जितके गड आहेत, त्यांच्यावरल्या बहुतेक ठाणेदारांकडे पत्रं जाऊन त्यांनीं फितूर व्हावं म्हणून त्यांना जहागिरी, इनामं, सरदाऱ्या व दरकदाऱ्या देण्यांत येतील म्हणून लालूच दाखविण्यांत आली आहे ! बोला. इतकीं पत्रं घेऊन जासूद गेले, आपल्याला कांहीं तरी त्याची खबर लागली आहे का ? नाहीं लागली. कुठून लागणार ? पण मी सांगतों, आतां पत्र ल्याहा. या सगळ्या हकीकती त्यांना ल्याहा. या सगळ्या जासुदांचीं बऱ्हाणपुराहूनच पत्रं गेलीं. त्यांना जहागिरी इनामं मिळतील म्हणून पत्रं गेलीं, आणखी इकडे बादशहाकडे पत्रं गेलीं आहेत कीं यांना मी जीं इनामं आणखी जहागिरी देईन तीं आपण मान्य करून सनदा पाठवाव्या. सारांश मीं तुह्मांला सांगितलं काय, कीं जयसिंगांनीं एकदां एखाद्या कामाला हात घातला, कीं मग त्यांत टंगळ मंगळ किंवा दिरंगाई कधीं सुद्धां त्यांच्याकडून व्हायची नाहीं. एकदां कामाला लागले, कीं मग त्यांना मुळीं विसावा नाहींच. रात्रंदिवस विचार एक. त्या कामांत सिद्धि कशी येईल याच्याबद्दल उपाय चिंतीत रहायचं. चांगलेसे विचार सुचले, किंवा उपाय सुचले, कीं ते ताबडतोब अमलांत आणायचे. आणखी अशा कितीक गोष्टी तरी त्यांच्या आहेत. तुह्मी किती लिहिणार ? त्यांनीं औरंगजेबापासून पैशाच्या बाबतींत तर अशी मुभा मागून घेतली आहे, कीं जो होईल तो खर्च, पैसे सं त आलेसं वाटलं कीं पुनः बादशहाकडे मागणी करायची. आणखी बादशहानंही असा हुकूम दिला कीं, पैशाची टंचाई पडूं द्यायची नाहीं. अशा जय्यत तयारीनें ज्या लढाईला सुरुवात होणार, तींत आपल्याला काय यश येणार आहे ? गुजराथेंतून खालीं फिरंगी लोकांनीं जाऊन तुमच्या आरमारावर हल्ला करावा, एवढ्याकरितां बादशहाच्या दोस्तींतले दोन फिरंगी लोक फ्रान्सिस् आणखी डिक् या नांवाचे पाठविले आहेत. त्यांचा तिकडे उपद्व्याप चालूच असेल. या सगळ्या गोष्टी तुम्हांला आमच्या छावणींत नुसतं जोशाचं सोंग घेऊन येऊन का कळणार आहेत ? तेव्हां तुह्मी स्वतः जाण्यापेक्षां

चांगलं लांबलचक असं पत्र लिहिलं तर कांहीं तरी उपयोग होईल. त्याहा पत्र. म्हणजे आपलेच लोक किती फुटताहेत हें तरी समजण्याला ते यत्न करतील. नाहीं तर लढाईच्या ऐन प्रसंगीं एखाद्या किल्लेदाराला महाराजांनीं कांहीं हुकूम पाठवावा, आणखी त्यानं कांहीं तो मानूं नये, इतकंच नव्हे, तर त्याच्या उलट कांहीं तरी करून उलटा शत्रूचाच फायदा करावा असं होण्याचा संभव आहे. "

असें बराच वेळ त्यांचें बोलणें झालें, तेव्हां शेवटीं जोशीबोआंनीं महाराजांस पत्र लिहून तयार करावें, त्यांत हा सर्व प्रकारचा मजकूर लिहून कळवावा, कांहीं म्हणून मागें ठेवूं नये, आणखी कीर्तिसिंगानें तें पत्र गुप्तपणें महाराजांकडे रवाना करावें. इतकें ठरल्यानंतर कीर्तिसिंग व जोशीबोआ दोघेही परत आपल्या छावणींत आले !

# प्रकरण ७ वें.

## दक्षिणेंत आल्यावर.

मागील प्रकरणांत सांगितलेल्या गोष्टीनंतर चार दिवसांनीं मंडळी औरंगाबादेस आली. औरंगाबादेच्या बाहेर त्या प्रचंड सैन्याचा तळ पडला. औरंगाबादेस शहाजादा होता ह्मणूनच केवळ मुक्काम करावयाचा, नाहीं तर मुक्काम करण्याची मुळींच अवश्यकता नाहीं, असें जयसिंगराजाचें ह्मणणें होतें. त्या ठिकाणीं फक्त तीन दिवस मुक्काम करावयाचा असें ठरलें होतें. जयसिंग आग्र्याहून औरंगजेबाचा हुकूम घेऊन निघाल्यानंतर त्यानें मार्गांतून एक पत्र लिहिलें. त्या पत्रांतील मजकूर वाचला, ह्मणजे तो किती धूर्त व मुत्सद्दी होता हें समजण्यासारखें आहे. त्याच्या त्या पत्राचा सारांश वाचकांस देण्याजोगा आहे, ह्मणून तो येथें देतों. प्रथम रीतीप्रमाणें मायना झाल्यानंतर तो म्हणतो:

" खाविंद, ज्यानें स्वारी करून जय मिळवावयाचा, त्या सेनाधिपतीच्या हातांत सन्याला आशा दाखविणें किंवा भय दाखविणें या दोनही गोष्टींचा अधिकार पाहिजे. ज्यानें मर्दुमकी केली त्यास बक्षीस द्यावें, ज्यानें नामर्दी केली त्यास सडकून शासन करावें, याबद्दलचे पूर्ण अधिकार सेनापतीला नसले, कोणाचा मुशाहिरा वाढविणें, अगर कोणाचा कमी करणें जर त्याच्या हातीं नसलें, त्या बाबतींत जर त्याला दुसऱ्याच्या तोंडाकडे पहाण्याची पाळी आली, तर उपयोग काय ? शास्तेखानांच्या नंतर यासंबंधाचे सर्व अधिकार औरंगाबादेच्या कारकुनांच्या हातांत दिले गेले आहेत. एखाद्या शिपायानें मर्दुमकी केली तर त्याला तत्काळ बक्षीस आह्मांला देतां येत नाहीं. आम्हीं नुसती शहाजादा

मुआझीम याकडे शिफारस करावयाची. त्यांना बरें वाटलें तर त्यांनीं ऐकावयाची, नाहीं तर नाहीं. ही स्थिति बरी नव्हे. सेनाधिपतीचे हुकूम सैन्यानें ऐकावयास पाहिजेत तर त्या सेनाधिपतीच्या हातांत आपलें बरेंवाईट पूर्णपणानें आहे असें शिपायांस कळलें पाहिजे. तशी व्यवस्था जर अमलांत आणली तर ठीक होईल; नाहींपेक्षां जें जें आपल्याला हटकून घडवून आणावयाचें तें घडेलच असें खात्रीनें ह्मणतां येणार नाहीं. मी ह्मणतों यानें आपली खात्री झाली तर माझी इच्छा अशी आहे, कीं माझ्या हाताखालीं जीं माणसें दिलीं आहेत, त्यांना जहागिरी देणें अगर त्यांच्यापासून काढून घेणें, त्यांना मुशाहिरा देणें, वाढविणें किंवा कमी करणें यासंबंधाचे सर्व अधिकार मला असावेत. कोण कोणत्या प्रसंगीं कसा वागतो हें प्रत्यक्ष समजण्याला मला जशी संधि आहे, तशी इतरां कोणाला कशी असणार ! शहाजादे तरी स्वतः थोड्याच गोष्टी पहाणार. औरंगाबादेच्या कचेरींतले कारकून तें सर्व पहाणार, आणि ठराव करणार. आज अशी स्थिति होण्याचा संभव आहे, कीं आमचा दरारा त्या कारकुनांच्या ताब्यांत ! त्यांनीं आमच्या शिफारशी मानल्या, तर लोक आह्मांला मानणार किंवा वचकणार; नाहीं तर नाहीं. लढाईच्या दिवसांत अशी स्थिति बिलकुल उपयोगी नाहीं, असें खाविंदांच्या निदर्शनास येईलच. तर या गोष्टींचा विचार करून खाविंदांनीं या बाबतींत सर्व अधिकार व खजिना माझ्या ताब्यांत द्यावा. लढाई संपून आम्ही तिकडे परतलों ह्मणजे मग पुनः हे अधिकार जिकडचे तिकडे द्यावे. या माझ्या विज्ञापनेचा अनुकूल विचार झाला, तर ठीकच आहे, परंतु यदाकदाचित् खाविंदांच्या नजरेस तसें आलें नाहीं तर मीं अशी विज्ञापना केली होती आणि ती मान्य झाली नाहीं ह्या गोष्टीचा बभ्रा होऊं नये. तसा बभ्रा झाल्यास माझी दुप्पट नाचक्की होईल. या सर्व गोष्टींचा विचार करून काय ठरविणें तें ठरविण्यास खाविंद समर्थ आहेतच."

औरंगजेब अति संशयी व मत्सरी, परंतु हें पत्र वाचतांच त्यांतील मागणी किती न्याय्य आहे हें तेव्हांच त्याच्या ध्यानीं आलें; आणि त्यानें त्याप्रमाणें तिकडे औरंगाबादेकडे हुकूम पाठविला, कीं यापुढें जयसिंग जितक्या रकमेची वरात पाठवितील तितकी रक्कम त्यांस ताबडतोब दिली जावी. त्या रकमेची व्यवस्था त्यांचे ते करतील. त्याचप्रमाणें त्यांनीं पाठविलेलें सामान व कैदी ते पाठवितील त्या किल्ल्यावर ठेवून घेतलेच पाहिजेत असे हुकूमही जिकडे तिकडे त्यानें पाठविले. यामुळें सर्व व्यवस्था जशी जयसिंगास पाहिजे होती तशी झाली. अर्थातूच अशा प्रकारें त्यास जशी स्वस्थता व व्यवस्था पाहिजे होती तशी झाल्यावर जयसिंगास दक्षिणची स्वारी फत्ते करून दाखविण्यास विशेषच उल्हास आला हें सांगावयास नकोच. बरोबर एक लाख रुपये घेऊन स्वारी पुण्यास येऊन बसली. ज्या हेतूनें इतकी दगदग केली, तो हेतु साधण्यासाठीं आतां स्वारीला प्रारंभ कर-

त्यापूर्वी जयसिंगानें आधीं मनाशीं बराचसा शोध केला, कीं कोणकोणतीं नाकीं दाबलीं ह्मणजे आपला कार्यभाग सिद्धीस जाण्यास सुलभ जाईल. लढाईला प्रारंभ करावयाचा, शत्रूला पेंचांत आणावयाचें ह्मणजे मुख्य उपाय देशांतील नाक्याच्या जागा दाबावयाच्या. शत्रूचें नाक दाबावयाचें. हें पूर्णपणें ज्याला साधलें, त्याला शेंकडा नव्याण्णव हिश्शांनीं सिद्धि आली म्हणून समजावें. हें जाणूनच मोठमोठाले सेनाधिपति पहिल्या-प्रथम रणभूमीच्या सर्व प्रदेशाचें निरीक्षण करितात. त्याप्रमाणें जयसिंगानें प्रथम नीट निरीक्षण करून असें ठरविलें, कीं उत्तरेकडे जुन्नर प्रांतापासून तों तळकों-कणचे डोंगराच्या जवळचा सर्व प्रदेश मान्यांत ठेवला पाहिजे. त्या कामावर त्यानें कुतुबखानाची योजना करून त्याचे हाताखालीं ७००० लष्कर दिलें. यापैकीं ३००० लोकांची एक तुकडी त्यानें लोहगडासमोर ठेवली व बाकीच्या लोकांस ठिकठि-काणच्या वाटा मारण्यास योजिलें. दुसरी एक तुकडी दाभाड्यांच्या तळेगांवा-जवळ ठेवली. ईहतिशामखानास ४००० स्वारांची एक तुकडी देऊन त्यानें पुणें व त्यासभोंवतालचा प्रांत यांचें संरक्षण करावें असें त्यास फर्माविण्यांत आलें होतें. लोहगड आणि पुणें यांच्या दरम्यानचा प्रांत फार कठिण.त्या प्रांतावर दाब ठेवण्यासाठीं २००० स्वार ठेवून दिले होते. तिसरा महत्त्वाचा प्रांत ह्मणजे शिरवळच्या ठाण्याचा. पुरंदराला दक्षिणेकडून कुमक आणून पोंचवितां येऊं नये ह्मणून हा प्रांत दाबला होता. मोगलांस येऊन मिळालेले छत्रपतिमहाराजांचे कित्येक शत्रु या बाजूच्या फौजेंत सय्यद अबदूल अजीजच्या हाताखालीं होते. हे लोक कोण हें पुढें कळेल. त्याचप्रमाणें सुप्याच्या ठाण्यावरही सय्यद मनावरखान यांची नेमणूक झाली होती !

अशी एकंदर तयारी करून राजा जयसिंग शिवाजीमहाराजांवर चढून जाण्याचा कोठें आरंभ करावा याच्या विचारास लागला. बराच विचार करून त्यानें पुरंदर किल्ल्यावर पहिली स्वारी करावयाची असा निश्चय केला व पुणें सोडण्याचा विचार केला; परंतु तितक्यांत त्याला असें कळलें, कीं कुतुबुद्दीनखान जुन्नरास रसद पोंच-विण्यास गेला आहे, आणि आपण पुणें सोडून पुरंदराकडे चाललों आहों, असें ऐकतांच शिवाजीमहाराजांनीं लोहगडास ठाणें दिलें आहे. आपली पुण्याकडे पाठ फिरण्याचा अवकाश, कीं ते मोगल मुलखांत शिरून आपला पराक्रम दाखविणार. तसें कळतांच जयसिंगानें कुतुबखानास माघारी बोलावलें आणि आपणही मोर्चा फिरविला ! शिवाजीमहाराजांच्या हालचालीवर डोळा ठेवणें या वेळीं फार अवश्य होतें. स्वारीला प्रारंभ करावयाचा ह्मणजे किल्ले पटकावयाचें हें तर उघड आहे. आणि प्रथमचाच तडाखा पुरंदरावर व कोंडाण्यावर दिला ह्मणजे फार सुरेख होईल अशी त्यांची इच्छा. त्याप्रमाणें त्यांनीं कुतुबुद्दीनला

परत बोलावल्यावर तो जुन्नरास आला असें कळतांच त्यांनीं पुरंदरावर हल्ला करण्याचें ठरवून टाकिलें.

यांस आपण सध्यां पुरंदराकडे जाण्यास सोडून महाराजांकडे जाऊं.

---

# प्रकरण ८ वें.

## कोंडाणा व पुरंदर.

आपण दक्षिणेंत बादशहाच्या हुकुमावरून आलों आहों ते कांहीं उगीच नाहीं, तुमच्या सर्व गमजा बंद करून बादशाही अंमल पुनः पूर्णपणें जिकडे तिकडे जारी करण्यास आलों आहों, असें शिवाजीमहाराजांस पूर्णपणें वाटून आपल्या दबदब्यानें व दिमाखानेंच त्यांनीं घाबरून जावें, म्हणजे माणसांचा, द्रव्याचा व देशाचा मुळींच खराबा न होतां मोठ्या चतुराईनें आपण काम केलें असें होईल असा जयसिंगाचा कावा होता. हा कावा साधला नाहीं, तर प्रत्यक्ष लढाया करून महाराजांचा धुव्वा उडविण्यास त्याच्याजवळ धैर्य, शौर्य किंवा सैन्य नव्हतें असें नाहीं; परंतु विनाकारण प्राणहानि न होतां जर आपला इष्ट हेतु साधत असला, तर कोणाला नको असतो ? आतांपर्यंत जी एकंदर चपळाई झाली, तिनें अर्धें-अधिक काम झालें आहे अशी त्याची समजूत झालीच होती, यामुळें वर सांगितल्याप्रमाणें त्यानें नाकेबंदीची तजवीज केली आणि मग आपण कोंडाण्यास गराडा घालून तो बसला व दिलेरखानास त्यानें पुरंदर किल्ल्याशीं झगडण्यास पाठविलें. प्रथमतःच दिलेरखानास एके बाजूस नेऊन जयसिंगानें सांगितलें: "मराठ्यांशीं लढणं, त्यांतून त्यांच्या ताब्यांत असलेले किल्ले घेणं म्हणजे साधं काम नव्हे. विलक्षण संहार झाल्याखेरीज कधींही रहाणार नाहीं. तेंच आपण कांहीं केवळ दबदब्यानं, कांहीं सामोचारानं व कांहीं कर्तृत्व दाखवून असं साधूं, म्हणजे सैन्याचा नाश होणार नाहीं आणि आपलं कार्य होणारं आहे. परंतु केवळ रगीनं किल्ले घ्यायला जाणं म्हणजे सिंहाच्या जाभाडांत शिरून त्याची दाढ उपटण्यासारखं आहे. दाढ उपटली जाते, कीं आपला चेंदामेंदा होतो याचा नेम नाहीं."

परंतु दिलेरखानास जयसिंगाचें बोलणें बिलकूल पसंत पडलें नाहीं. त्यास रग फार. शिवाजीनें आजपर्यंत जितक्या मुसलमान सरदारांचा पराभव केला, तितक्या सर्वांबद्दल सूड उगवून आपण आपली मर्दुमकी गाजवूं, हा त्याचा अभिमान होता. जयसिंगाचें राजनीतिकौशल्याचें बोलणें एक भ्याडपणाचें तरी असावें, किंवा फितुरीचें तरी असावें असें त्यास वाटलें, आणि त्यानें तसें स्पष्ट

उच्चारूनही दाखविलें. जयसिंगास त्या त्याच्या बोलण्याचा संताप आला, परंतु मुसलमान सरदारांनीं—मग ते रजपूत सरदारांच्या हाताखालीं ह्मणून दिलेले असले तरी—रजपूत सरदारांशीं वाटेल तसें उद्दामपणानें वागावें, त्यांस वाटेल तीं दुरुत्तरें करावीं, आणि तें सर्व रजपूत सरदारांनीं मुकाट्यानें सोसून घ्यावें—किंबहुना हंसून गोड करूनही घ्यावें—हें त्या काळीं रजपूत सरदारांच्या अंगवळणींच पडलेलें होतें; यामुळें जयसिंगानें दिलेरखानास कांहीं प्रत्युत्तर न देतां त्यानें केलेलीं अपमानकारक उत्तरें मुकाट्यानें ऐकून घेतलीं. फक्त बऱ्याच वेळानें "मी ह्मणतों या गोष्टीचा आपल्याला अनुभव आला म्हणजे माझ्याच विचाराप्रमाणें करावं अशी आपली खात्री होईल. सध्यां आपल्या हेतूप्रमाणं चालूं द्या." असें त्यानें दिलेरखानास म्हटलें.

दिलेरखान मोठ्या दिमाखानें सभोंवतालीं उभ्या असलेल्या हुजऱ्यांकडे पाहून किंचित् हंसला. "कां कशी केली !" असें म्हणण्याचाच तो अर्थ होय. या त्याच्या कृतीनें तर जयसिंगाच्या तळपायाची आग मस्तकापर्यंत पोंचली, परंतु एक दीर्घ सुस्कारा टाकण्यापलीकडे त्यानें कांहीं केलें नाहीं. थोड्या वेळानें दिलेरखान तेथून उठून गेला. जयसिंग अगदीं खिन्न होऊन बसला होता, इतक्यांत दारवानानें बाहेरून आंत येऊन जयसिंगास विनंति केली, कीं "कोंडाण्यावरून कोंगाड्याचें सोंग घेऊन आपल्या लष्करांत शिरलेल्या एका माणसास हेर म्हणून पकडून आणलं आहे. तरी त्याचं पुढें काय करायचं ह्मणून विचारायला किरातसिंग आले आहेत." तें ऐकतांच जयसिंगानें आपल्या कपाळास आंठ्या घातल्या आणि किंचित् वेळ स्तब्ध बसून नंतर 'त्यांस आंत घेऊन ये' ह्मणून सांगितलें. किरातसिंग आंत येतो, तों जयसिंगाची चर्या नेहमींप्रमाणें झाली होती. कांहीं वेळापूर्वीं याला कांहीं त्रास झाला असावा, किंवा याच्या मनाला वाईट वाटलें असावें असें पहाणाराच्या मनांत येण्यास मुळींसुद्धां कांहीं चिन्ह दिसलें नाहीं. किरातसिंगानें आंत येण्याबरोबर जयसिंगास हात जोडून नमस्कार केला, व ह्मटलें:—"महाराज, आपल्या लष्कराची मी तपासणी करीत उगीच हिंडतां हिंडतां एक माणूस मला आढळला. हा रांगडा कोंगाडी असावा असा दिसतो; परंतु माझी खात्री आहे, कीं तो कोंडाण्यावरून किंवा राजगडावरून आपल्या गोटांत शिरून बातम्या काढण्यासाठीं आलेला कोणी तरी मराठा धाडसी पुरुष आहे. प्रथम मी त्याला तेथल्या तेथेंच ठार करणार होतों, परंतु पुनः असा विचार केला, कीं त्याला आपल्यापुढें आणून उभं करावं, आणखी मग आपल्याला वाटेल त्याप्रमाणें त्याची व्यवस्था करायला आपण मालकच आहां. मला अशी जबर शंका येते, कीं तो खुद्द शिवाजीच किंवा निदान त्याच्या अगदीं जवळचा विश्वासांतला असा कोणी तरी असावा."

हें बोलणें ऐकून जयसिंगानें अंमळ विचार केला. नंतर हंसून तो किरातसिंगास

ह्मणालाः " शिवाजी स्वतः फार धाडसी आहे, परंतु त्याच्याजवळचे लोक त्याला उठल्या सुटल्या भलतंच धाडस करूं देतील, तर राज्याची स्थापना होणार कशी ? शिवाजीकरितां–त्याच्या शब्दाकरितां–प्राण देणारे शेंकडों तरुण लोक त्याच्याजवळ आहेत. त्यांच्यापैकीं एखादा कोणी असेल. तूं त्याला पकडल्याबरोबर ठार केलं नाहींस हें ठीक केलंस. त्याला पकडून आणलंस हेंच फार चांगलं. असलीं धाडसी तरुण माणसं जतन करायचीं असतात, नाहींशीं करून टाकायचीं नाहींत. जा, त्याला इकडे घेऊन ये. तो काय ह्मणतो तें ऐकून तर घेऊं. त्याच्या बोलण्याचालण्यावरून खरं आहे काय तें तेव्हांच समजून येईल. "

" पण तो बोलत नाहीं. त्यानं मुक्याचं सोंग आणलं आहे; किंवा आतां सांपडलों खरे, पण कोण काय हें कळवून काय करायचं असा त्याचा विचार असावा. मीं पुष्कळ तऱ्हेनं त्याला विचारलं, पण एकना दोन. तो उत्तर देईल तर शपथ. त्याला ठार मारण्याचा धाक घातला, त्याचे हाल हाल करण्याचा धाक घातला, परंतु जणूं कांहीं त्याला ऐकायलाच येत नाहीं असं त्यानं वर्तन चालविलं आहे. "

जयसिंग पुनः जरा स्वस्थ बसला व नंतर ह्मणतोः " बरें व्यक्ति एकदां डोळ्यानें पाहून तरी घेऊं; तो कोण आहे, आणखी त्याचा हेतु काय आहे हें तेव्हांच काढूं. जारे कोण आहे तिकडे, त्या कैद्याला लवकर इकडे घेऊन या. पाहूं काय त्याची सूरत आहे ती. मला तर वाटतें, कीं त्याला दोनचार धमकावण्या दिल्या ह्मणजे चट सगळें कांहीं बाहेर येतें आहे. चवदावें रत्न मोठें वस्ताद आहे, असल्या माणसावर प्रयोग केला तर परिणाम खास होतो. " इतकें ह्मणून त्यानें त्या इसमास आंत आणण्याबद्दल पुनः फर्माविलें. थोड्या वेळांत त्यास हुजऱ्यांनीं आंत आणलें. जयसिंगानें कपाळास आंठ्या घालून आपल्या दाढीवरून हात फिरवीत त्याच्याकडे सूक्ष्म दृष्टीनें पाहिलें. त्या इसमाचा पोषाख कांहीं चमत्कारिक होता. एक नेसता पंचा आणि एक अंगावरलें तसेंच फडक्यासारखें. शेंडी मोठी थोरली आणि दोन पांढऱ्या मातीच्या उभ्या रेघा व मधें एक तांबडी उभी रेघ. आणखी एक सुताचा धागा सुद्धां अंगावर नव्हता. जयसिंगाच्यापुढें गेल्यावर त्यानें वेड्यासारखें इकडे तिकडे पाहिलें. सूक्ष्म निरीक्षण झाल्यानंतर जयसिंगानें त्यास हांका मारून कांहीं हिंदुस्थानींत विचारलें, परंतु तो त्याच्या तोंडाकडे पाहून नुसता वेड्यासारखा हंसूं लागला, व मला ऐकूं येत नाहीं आणि बोलतां येत नाहीं अशा खुणा करूं लागला. जयसिंग त्याच्याकडे पाहून हंसला व त्यास ह्मणालाः " तुझं सोंग तर फार उत्तम जमलं आहे बोआ ! पण एवढंच कीं या सोंगाला कोणी फसत नाहीं. तूं कांहीं कोंगाडी नाहींस आणखी मुकाही पण नाहींस. चांगला बोलका आहेस, तुला ऐकूं येतं आहे, आणखी लबाडीनं आमच्या गोटांत शिरून हेरपणा करायला आला आहेस. तेव्हां उगीच कांहीं तरी लफंगेगिरी करण्यांत काय तात्पर्य आहे ? खरा प्रकार काय आहे तो कबूल कर ह्मणजे झालें. तुला क्षमा करूं. "

जयसिंग कांहीं सामान्य माणूस नव्हे. फार मोठा धूर्त. तो जें बोलत होता तें मुद्दाम साध्या उर्दू भाषेंत बोलत होता. हेतु हा कीं, आपण जें कांहीं बोलतों आहों, तें हा लक्ष लावून ऐकतो आहे कीं काय ? हें पहावयाचें. जर ऐकत असेल तर अर्थातच तो लबाड असला पाहिजे. जर नसेल, तर पक्का तरी असला पाहिजे, किंवा खरा बहिरा व मुका असला पाहिजे. जयसिंगाच्या पहिल्या पांचसात शब्दांपर्यंत त्यास असा भास झाला कीं, हा माणूस लक्ष्य लावून ऐकतो आहे, परंतु पुढें त्याचें लक्ष्य आपल्या भाषणाकडे बिलकुल नाहीं, तो कोठें तरी दुसरीकडेच वेड्यासारखा पहातो आहे असें दिसलें. तथापि हें तो मुद्दाम करीत आहे, कीं त्यास खरोखरीच ऐकूं बोलूं येत नाहीं याबद्दल मनाची पक्की खात्री होईना. एक आमिष टाकलें तें मासा येऊन पकडीत नाहीं इतकें मात्र पक्कें झालें. आपल्या एवढ्या करण्यानें कांहीं कार्यभाग होत नाहीं एवढें सिद्ध झालें. परंतु तेवढ्यानें निःशंक होऊन प्रयत्न सोडून देणारा जयसिंग नव्हे. त्यानें आणखी एकवार गळ टाकून पहाण्याचा निश्चय केला. तो किरातसिंगाला ह्मणालाः " मीं मुद्दाम याच्याशीं साध्या उर्दूंत बोलून पाहिलं कीं गुलाम खरोखरी बहिरा मुका आहे कीं लबाड आहे, परंतु माझी खात्री झाली कीं तो खराच बहिरा मुका आहे. तुह्मी उगीच साप साप म्हणून भुई धोपटणार होतां. तिकडच्या तिकडे तुह्मीं बिचाऱ्याला जिवं मारलं असतं, तर एक निरपराधी माणूस मारल्याचं पातक मात्र तुम्हाला लागलं असतं. दुसरं तर कांहीं नाहीं. तेव्हां फार चांगली बुद्धि तुम्हाला झाली म्हणायची, कीं तुम्ही मला विचारायला आलां ! "

हेंही बोलतांना जयसिंगाचें लक्ष्य त्या माणसाच्या चेहेऱ्याकडे होतेंच. आतां आपण बोलूं लागतांक्षणींच पांचचार शब्द होईपर्यंत यानें कान आपलेकडे मुद्दाम लावले होते, अशी दृढ शंका त्याच्या मनांत आली. मघाच्या भाषणाचे प्रारंभीं जो केवळ भास होता, तो आतां पक्का संशय झाला. आणखी एकदां प्रयोग करून पाहिलें असतां त्या संशयाला बहुतकरून निश्चयाचें रूप येईल, असें जयसिंगाच्या मनांत आलें व त्यानें किरातसिंगास मोठ्यानें म्हटलें:

" हा आतां आपण दास म्हणून बाळगूं. याला सोडूनही दिलं असतं, परंतु कोणीही मनुष्य पकडून आणलेला लढाई संपेपर्यंत सोडूं नये. शिवाय बादशहाच्या जनानखान्यांत जसे कांहीं बहिरे, मुके खोजे आहेत, त्यांतलाच हा एक बनवूं. बसूं दे इथेंच याला. याच्या देखत आपल्याला कांहीं गोष्टी बोलायला हरकत नाहीं. बाहेर फुटेल ही भीतिच नको. कोंडाण्याची, आणखी पुरंदराची रसद बंद करणं आणखी या दोहों किल्ल्यांवरल्या लोकांत फितुर करणं कांहीं मोठं कठिण नाहीं. पहिल्या प्रथम मला वाटलं होतं, कीं हे शिवाजीचे लोक अगदीं कट्टे स्वामीभक्त आणखी स्वराज्यभक्त असतील. इंद्राचं राज्य जरी त्यांना कोणीं देऊं केलं, तरी कांहीं ते डगमगायचे नाहींत; परंतु इथें येऊन

पहातों तों सारंच निराळं ! मला वाटतं निव्वळ फितुरी करून किल्ले घ्यायचं म्हटलं तरीसुद्धां—एकासुद्धां माणसाचा जीव न घेतां—सगळे किल्ले शिवाजीपासून हिसकावून घ्यायला मुळींच अडचण पडणार नाहीं. या कोंडाण्याच्या ठाणेदाराची काय स्थिति आहे पहा ! मला त्याच्याकडून निरोप आला आहे, कीं आपल्याला मनसब मिळत असेल, तर आपण किल्ला मोंगलांच्या स्वाधीन करायला एका पायावर तयार आहों ! इतके शिवाजीचे लोक बेइमान असतील ही मला तर कल्पना नव्हती. परंतु आतांचा हा थोड्या दिवसांचा अनुभव पाहिला, तर असं दिसून येतं, कीं ते लोक लहानसान जहागिरीसाठीं अगदीं हपापले आहेत. जहागिरी देऊं केल्या कीं काम झालं ! पुरंदराची तरी काय, हीच अवस्था आहे. बोटचेपं झालेलं आहे. मुगरबाजी फितणार आहे. त्यानं आपल्या पंतांजवळ काय उद्गार केला ? 'आह्मी मूळचे तरी विजापूरकरांच्या पदरचे. त्यांच्यापासून फुटूनच इकडे आलों कीं नाहीं ? तसे शिवाजीपासून मोंगलांकडे जाऊं. शिवाजीनं काय आह्मांला जहागिरी दिल्या आहेत, तर त्याच्याचकरितां आम्हीं आपले प्राण देऊन बायकांमुलांना अन्नान्नगत करून घेऊं ! बादशहा आह्मांला हे किल्ले आणखी हा प्रांत इनाम देईल, तर आठ प्रहरांच्या आंत त्याच्या स्वाधीन सगळं मावळ करूं !' किरातसिंग, आजपर्यंत आपण ऐकत आलों त्या गोष्टी अगदीं व्यर्थ ! आंतून सगळं इथें पोकळ आहे. एकंदरींत मी आलों तो कांहीं व्यर्थ नाहीं, चांगली बहादुरी मिळवून जाईन. शिवाजीची स्वतःची लबाडी चालू द्यायची नाहीं—त्याच्या गुळचट बोलण्याला किंवा तहाच्या वगैरे भाषणाला भाळायचं नाहीं, इतकी सावधगिरी ठेवली, अफझुलखान, शास्तेखान, चंद्रराव मोरे यांच्यासारखा प्रसंग होऊं दिला नाहीं ह्मणजे झालं. खरं भय काय तें विश्वासघाताचं. त्याला जपलं पाहिजे."

जयसिंग हें बोलत असतां दर पांचचार शब्दांआड एकवार त्या बहिऱ्यामुक्या कोंगाड्याकडे पाहत असे. आपल्या तोंडून निघणाऱ्या प्रत्येक शब्दाबरोबर त्या कोंगाड्याच्या चेहेऱ्यावर काय फरक होतात, तें त्यास पहावयाचें होतें हें उघडच आहे. जर कांहीं फरक झाले नाहींत, तर तो अगदीं खरोखर बहिरा मुका. जर यत्किंचित् फरक झालासा दिसला, तर तो लबाड, यांत बिलकुल शंका नाहीं. जर तो शिवाजीचा इमानी नौकर असेल, तर त्याला आपल्या बोलण्याचा संताप आलाच पाहिजे. कां कीं, शिवाजीमहाराजांचे सर्व सरदार व शिपाई खरे खरे स्वामिनिष्ठ आणि प्राणास प्राण देणारे होते, त्याबद्दल कोणासच शंका नव्हती. शिवाजी इतरांच्या नौकरांस फोडी, परंतु त्याचे स्वतःचे नौकर कोणत्याही लोभानें फितणारे नव्हते. असे नौकर मनसबदारीच्या लोभानें फितत आहेत, आतां कांहीं त्यांत अर्थ नाहीं, अशा खोट्या गोष्टी आपण याच्यासमक्ष सांगितल्या, आणि त्यानें त्या ऐकिल्या, तर त्याला संताप आल्याखेरीज

राहणार नाहीं. तसा संताप आलेला दिसला कीं, आपलें काम झालेंच! गळ टाकला, त्याला मासा अडकला असें होईल. या हेतूनें जयसिंगानें बोलणें चालविलें होतें हें उघडच आहे. तो बोलतां बोलतां पुढें म्हणालाः–" मी तसल्या विश्वासघाताला आतां भीत नाहीं. पुढच्याला ठेंच मागला शहाणा. माझ्या-पूर्वीं दोन तीन त्याच्या जाळ्यांत सांपडले. त्यांची जशी अवस्था झाली, तशी मी आपली करून घेणार नाहीं. मात्र उलट त्याचे लोक आपल्याकडे जितके फिततील तितके भराभर फितवीन. नेटाजी पालकरासाखा, किंवा प्रतापराव गुजरासारखा माणूस आपल्याकडे आल्यावर आणखी काय पाहिजे? आपलं कामच झालं. नेटाजी आणखी प्रतापराव दोघेही आपल्याकडे आले, कीं शिवाजी-कडला चांगलाच जोर कमी होणार. आणखी हे दोघे येणार याबद्दल यत्किं-तूसुद्धां शंका नाहीं. मला त्यांचे निरोप आले आहेत. ते तर खास मिळणार!..."

" अगदीं खोटं. अगदीं खोटं." असे एकदम त्या कोंगाड्याच्या तोंडून उद्गार निघाले. हे उद्गार दांत ओंठ खाऊन अगदीं संतापानें काढलेले होते. ते काढतांना त्याचे डोळे इंगळासारखे लाल झाले होते व हात थरथर कांपत होते. जणूं काय ते जयसिंगाचे अंगावर प्रहार करण्यास अत्यंत उतावीळच झाले होते.

तें पहातांच किरातसिंग अत्यंत चकित होऊन त्या कोंगाड्याकडे पाहूं लागला व जयसिंग मोठ्यानें हंसून ह्मणालाः " ओहोहो! एकूण या जयसिंगाजवळ बहि-ऱ्यांमुक्यांना खडखडित ऐकायला आणखी बोलायला लावणारी जडीबुट्टी आहे; इतकंच नव्हे तर कोंगाड्यांना उत्तम उर्दू बोलायला सुद्धां त्या जडीबुट्टीनं येऊं लागतं. अरे बाबांनो, तुह्मी असा विचार करा, कीं कांहीं नाहीं तरी आज इतकीं वर्षं मीं शत्रूशीं झग-डण्यांत घालविलीं आहेत; तेव्हां तुमच्यासारख्या वस्ताद लोकांचा मला थोडा तरी अनुभव असेल! का सगळींच आमचीं वर्षं वायां गेलीं. आमचे केंस पिकले, आमचं शरीर पिकलं, त्याबरोबर आमची बुद्धिही पिकली असेलच, असं तुह्मांला वाटलं नाहीं, याचं आह्मांला मोठं नवल वाटतं. अरे गृहस्था, तुला मीं पाहिल्याबरोबर माझी खात्री झाली, कीं तूं कोणी तरी शिवाजी राजाच्या अगदीं जिव्हाळ्याच्या धाडसी दोस्तांपैकीं एक आहेस, आणखी हेरपणा करायला आला आहेस. पण तुह्मी वेड्यांनो कच्चे! जे तुमच्यासारखेच कच्चे होते, त्यांच्यावर तुमची कर्तबगारी चालली. एक आला मोठ्या थोरल्या विद्वान् ज्योतिष्याचं सोंग घेऊन आणि ज्याला त्याला सुटला सांगत भूत भविष्य वर्तमान! दुसरा आला, झाला कोंगाडी, आणखी शिरला गोटांत; पण इथें आपली कितपत डाळ शिजेल, कितपत नाहीं याचा कांहीं विचार? कांहीं हर-कत नाहीं; तुह्मी असलीं धाडसं करतां, हेंच विशेष आहे. तरुण आहांत, चुका होणं साहजिक आहे. तुह्मी कांहीं स्वार्थाकरितां करीत नाहीं. गोब्राह्मणांकरितां आणखी वैदिक धर्माच्या रक्षणाकरितां करीत आहां, हें काय मी जाणून नाहीं? पण एवढंच कीं आतां तुला मी इथून जाऊं देणार नाहीं. आतां लढाई संपेपर्यंत तुला माझ्याच

ताब्यांत रहावं लागेल. मी कधीं तुला सोडणार नाहीं. लढाई संपून परस्परांचे कैदी परस्परांनीं परत देण्याचं कलम जेव्हां तहांत ठरेल, तेव्हां तुमची रवानगी होईल; तोंपर्यंत आतां आपण इथेंच रहा. काय किरातसिंग, मी ह्मणतों असंच करायचं कीं नाहीं ? मला वाटतं असं केलं, तर आमचा एकंदर कसा काय इकरार आहे तो यांना कळून हे लवकर लढाई बंद करायलासुद्धां आपल्याला उपयोगी पडतील; समजलांत ? तेव्हां असंच. आज हे आपल्याला आपलं नांव गांव कांहीं एक सांगणार नाहींत, आणखी आपणही उगीच त्यांच्या पाठीमागें लागूं नये. कारण दुःखावर डागण्या दिल्यासारखंच होणार आहे. मला वाटतं जोशीबोआंना आपण जसं अडकवून ठेवलं आहे, तसंच यांनाही ठेवावं. जोशीबोआंना त्या कीर्तिसिंगाच्या दिमतीस ठेवलं आहे. तुह्मांला पाहिजे तर तुह्मी यांना घ्या. काय हो, बरा झाला कीं नाहीं हेर-पणा तुमचा ? ”

वरील भाषण जयसिंगानें कांहीं कुत्सितपणानें, कांहीं हंसत हंसत, कांहीं आढ्य-तेनें असें केलें होतें. त्याच्या प्रत्येक शब्दागणिक त्या कोंगाडी गृहस्थास वाईट वाटत असावें हें उघड दिसलें. परंतु करणार काय ? तो आतां त्याच्या नावडींत सांपडला होता खरा. किरातसिंगास तो साराच प्रकार फार चमत्कारिक वाटून तो अचं-ब्यांत पडला होता; कारण त्याला असें वाटूं लागलें होतें, कीं हा मुका बहिरा कोंगाडी कोणी तरी ढोंगी नसून खराखराच तसा आहे. केवळ भिक्षेकरितां ह्मणून गोटांत शिरला. प्रथम त्याला असें वाटलें कीं हा कोणी तरी हेर असावा व याच संशयानें त्यानें त्याला पकडलें. त्याच संशयानें त्याला ठार करण्याचाही त्याचा विचार होता; परंतु पुढें जेव्हां कांहीं बोलले, तरी तो आप-ला वेड्यासारखें करतो असें दिसूं लागलें, तेव्हां त्याला असें वाटलें, कीं आपला संशय वृथा आहे आणि ह्मणूनच त्याला आपण स्वतः शिक्षा न करतां आपल्या सेनाधिपतीच्या पुढें नेऊन उभें करावें असें त्यानें मनांत आणलें. तेथें आणून उभें केल्यानंतरही जेव्हां त्याचा एकंदर आविर्भाव तो अगदीं निरपराधी असल्याप्रमाणेंच दिसला, तेव्हां मग काय विचारतां ? त्याला अधिकच असें वाटलें, कीं आपण अगदीं निरपराधी प्राण्याला ठार मारणार होतों. पण पुनः पुढें जेव्हां वरील प्रकार झाला, तेव्हां आपण फसलों होतों असें त्याच्या मनांत येऊन त्याला फार वाईट वाटलें. अर्थात् ति-तक्या मानानें त्याला त्या इसमाचा रागही आला व तो एकदम जयसिंगास ह्मणतो: “ छे, छे, अशीं माणसं कैद करून ठेवण्यांत काय तात्पर्य आहे ? त्यांना एकदम सुळींच दिलं पाहिजे. ह्मणजे दुसऱ्या लोकांना दरारा बसेल. आणखी पुनः कोणी असलं धाडस करणार नाहीं. आपण त्या जोशीबोआंना अशीच दया दाखविलीत; परंतु मला तें अद्यापि बरं वाटत नाहीं. मी स्पष्ट बोलतों याबद्दल माफी असावी ! हे लोक जर आपली नजर चुकवून पळून गेले, तर आपला केवढा घात होईल. सगळ्या आपल्या बातम्या सांगतील……… ”

" हो. हो. पण आपण त्यांना आपली नजर चुकवायला संधि कां द्यावी? एक दोन नाहीं शेंकडों असे कैदी आपल्याला संभाळतां आले पाहिजेत. अरे किरातसिंग तूं अजून बच्चा आहेस. (त्याच्या कानाजवळ तोंड नेऊन) उद्यां आमच्या प्रेमळ वागवणुकीनं आणखी कांहीं इनाम जहागीर देऊं केल्यानं जर हीं माणसं आह्मांला वश झालीं, तर शिवाजीचा हा सगळा प्रांत हाताखालीं घालायला चार दिवससुद्धां लागायचे नाहींत; समजलास! आम्ही ह्मातारे जें करतों, तें सगळं कांही तरी विचार करूनच करतों, आम्हांला कांहीं तरी अनुभव असतो. तेव्हां आम्ही करतों तें योग्य करतों, असं समजून चालत जा. "

यावर किरातसिंग कांहीं बोलला नाहीं. तो विचार करीत बसला आणि थोड्या वेळानें आणखी कांहीं विषयावर बोलून तेथून चालता झाला. त्यास त्या कोंगाड्याचें सोंग घेऊन आलेल्या इसमाचा फार राग आला होता. आपण कधीं फसावयाचे नाहीं असा ज्यास अभिमान असतो, त्यास आपण फसलों असें एकदम कळून आलें ह्मणजे स्वतःचा स्वतःलाच मोठा राग येतो आणि त्या रागाच्या आवेशांत त्याला असें होऊन जातें, कीं आपण हा राग कोणावर ना कोणावर तरी काढलाच पाहिजे. तशीच अवस्था या वेळीं किरातसिंगाची झाली होती. त्याला असें वाटलें, कीं आपण या कोंगाड्यास तेव्हांच्या तेव्हांच ठार केलें असतें, तर फार उत्तम झालें असतें, परंतु जयसिंगाच्या स्वाधीन त्यास केल्यानंतर आतां त्यांत त्याला कांहींच करतां येईना. अर्थात् आपल्याशींच कुरकुरत व पुनः कोणी जर मला असा सांपडला तर त्याची तिथल्या तिथेंच गर्दन् उडवीन, एथवर आणतोंच कशाला? असें ह्मणून तो तेथून चालता झाला. तो कोणत्या मनःस्थितींत तेथून निघून गेला हें अर्थातच जयसिंगाच्या लक्ष्यांत आलें नाहीं असें नाहीं; परंतु तरुण मंडळींचें असेंच असावयाचें असें ह्मणून त्यानें त्याच्याकडे विशेष लक्ष्य दिलें नाहीं. तो गेल्यानंतर मात्र त्या कोंगाड्याचें सोंग घेऊन आलेल्या गृहस्थाकडे वळून जयसिंग ह्मणालाः—" मी आपल्याला आपलं नांव विचारीत नाहीं. पण इथें आपल्याला नजर कैदेंत राहिलंच पाहिजे. आज तुमच्या मनाला फार वाईट वाटलं असेल हें उघड आहे; पण चार दिवसांनीं आपण पुनः एकमेकांना भेटूं. मी तुह्मांला इथें बोलावून आणीन आणखी काय बोलायचं तें शांतपणानं बोलूं. त्या बोलण्याला, किंवा त्या बोलण्याचा विचार करण्याला जो कांहीं शांतपणा लागतो, तो आपल्याला आज नाहीं. तो दोन दिवसांनीं येईल आणखी मग मी जर कांहीं आपल्याला सांगितलं संवरलं, तर आपल्याला त्याबद्दल विचार करावा अशी इच्छाही पण होईल. तेव्हां आतां तुम्ही जा. मी सांगतों त्या माणसाच्या नजर कैदेंत तुह्मांला रहावं लागेल. यापेक्षां कोणत्याही तऱ्हेचा तुह्मांला त्रास पोंचणार नाहीं. "

इतकें बोलून त्यानें आपल्या एका हाताखालच्या परंतु सदासर्वदा जवळ अस-

णाऱ्या अधिकाऱ्यास बोलावून आणून असें सांगितलें, कीं "या गृहस्थांचा डेरा निराळा तयार करून मोठ्या मनसबदारांच्या दर्जाची सर्व व्यवस्था तेथें करून ठेवावी. कोणत्याही तऱ्हेची उणीव ह्मणून त्यांना पडतां कामा नये. मात्र डेऱ्याच्या बाहेर केव्हांही जातां येऊं नये, अशाबद्दल फार जबरदस्त काळजी घेऊन बंदोबस्ती ठेविली पाहिजे."

त्या सरदारानें 'जी हुजूर' ह्मणून ताबडतोब त्या कोंगाड्यास तेथून बाहेर नेलें आणि जयसिंग पुनः आपल्याशींच झाल्या गोष्टीसंबंधानें व इतर अनेक बाबतींबद्दल विचार करीत बसला.

---

# प्रकरण ९ वें.

## कोंगाडी.

कोंगाड्याची व्यवस्था ज्या रीतीनें करण्यास जयसिंगानें आज्ञापिलें होतें, त्या रीतीनें त्याची व्यवस्था झाली. त्याचा डेरा निराळा दिला गेला. त्याच्या जेवणाखाणाची स्वतंत्र व्यवस्था करून दिली. त्याला कशाचीही उणीव पडूं नये अशाबद्दल काळजी घेण्यांत आली. फक्त दोन तीन बाबतींत त्याच्यावर नजर होती. एक त्यानें कोणाशीं बोलूं नये, दुसरें त्याच्याशीं कोणी बोलूं नये आणि तिसरें जयसिंगाच्या परवानगीखेरीज त्याला कोणी नवा माणूस भेटूं नये. हा माणूस शिवाजी महाराजांच्या प्राणास प्राण देणाऱ्या नोकरांपैकीं कोणी असला पाहिजे, याबद्दल जयसिंगराजास शंकाच राहिली नव्हती; परंतु तो नक्की कोण हें त्याला समजेना. त्यानें बारकाईनें शोध करण्यास पुष्कळांना सांगितलें, परंतु कोणासही त्याची ओळख पटेना. जो गृहस्थ पकडला होता तो आपला पोषाख कोंगाड्याहून निराळा करीना आणि कोणाशीं एक अक्षरही बोलेना. ज्याप्रमाणें त्यानें प्रथमपासून आपण मुके व बहिरे आहों असें कोंग केलें होतें, तें त्यानें तसेंच पुनः पुढें चालविलें. जयसिंगाच्या मनांत तर वाटत होतें कीं, त्याचें नांव अवश्य कळायला पाहिजे. तेव्हां विचार करतां करतां त्यानें असें ठरविलें कीं, आपण एकवार त्या सोंगाड्या जोशाची व या सोंगाड्या कोंगाड्याची दृष्टादृष्ट करावी, ह्मणजे एकमेकांस पाहिल्याबरोबर एकमेकांचे तोंडून एकदम एकमेकांचीं खरीं नांवें बाहेर पडतील. त्याप्रमाणें घडवून आणण्याबद्दलचा विचार ही स्वारी करीत असतां एके दिवशीं त्या कोंगाड्यानें त्यांस निरोप पाठविला कीं, "आपली मला आतां भेट घेण्याची इच्छा आहे. कांहीं गोष्टी आपल्याला सांगाव्या असं वाटतं." जयसिंगानें तो निरोप ऐकतांच कांहीं वेळ विचार

केला आणि त्यास उलट जबाब पाठविला कीं, "आपला निरोप पोंचला. मला सवड असेल तेव्हां मी आपल्याला एकांतांत बोलावून घेईन. सध्यां मी फार गर्दीत आहें; कारण पुरंदर किल्ला अगदीं हस्तगत होण्याच्या बेतांत आहे. आज उद्यां इतक्यांत किल्ला शरण येईल. कोंडाणा तर आलाच."

या निरोपांतील शेवटल्या दोन गोष्टी उघड उघड मुद्दाम सांगून पाठविलेल्या होत्या आणि त्या सांगून पाठविणाराच्या हेतूप्रमाणें अर्थातच परिणामही झाला. त्या गृहस्थाच्या कपाळाला आंठ्या चढल्या. डोळे लाल झाले व विस्तारले. भुंवया वक्र होऊन खूपच वर चढल्या. दांताशीं दांत लागले आणि जसा एखादा क्षुब्ध झालेला सिंह सांपळ्यांत सांपडला असतां अत्यंत अस्वस्थपणानें आपल्या त्या सांपळ्यांत फेऱ्या घालूं लागतो, त्याप्रमाणें तो फेऱ्या घालूं लागला. समुद्रांत वावरणारें तारूं ज्याप्रमाणें समुद्राच्या लाटांवर हेलकावे खातें, त्याप्रमाणें त्याच्या विचारसमुद्रांत येणाऱ्या तरंगांवर जणूं काय त्याचें शरीर हेलकावे खाऊं लागलें. तो मध्येंच थांबे, कांहीं नवीन विचार मनांत आल्याप्रमाणें व तो विचार त्यास पसंत पडल्याप्रमाणें तो आपली मान तुकावी. एखादे वेळीं आपल्याच हातावर हात देऊन टाळी वाजवी. नंतर क्रुद्ध झाल्याप्रमाणें त्याच्या कपाळावर आंठ्या चढल्या. त्याच्या भुंवया पुनः वांकड्या झाल्या. डोळे विस्तारले, नाकपुड्या विस्फारल्या आणि जणूं काय कोणी अदृश्य शत्रु आपल्यापुढें उभा आहे, त्याजवर आपण प्रहार करतों आहोंत असे त्याचे हातवारे होऊं लागले. नंतर पुनः जणूं काय त्याचा पूर्वीचा विचार त्याला नापसंत पडून तो आपल्याशींच अगदीं असंतुष्ट झाला व अगदीं खिन्न असा चेहरा करून पुनः नुसत्या फेऱ्या घालूं लागला. नंतर आपल्याशींच पुटपुटला. "ही युक्ति मला जर आधीं सुचती, तर फार चांगलें झालें असतें. या हरामखोराचा केव्हांच निकाल लावून टाकला असता. परंतु काय उपयोग ? तो फार धूर्त. आपण त्याला चकविणार तों त्यानें आधींच आपल्याला चकवलें. एकदां दोनदां त्यानें प्रयत्न केले, त्याला आपण दाद दिली नाहीं. त्याचा कावा आपण ओळखला. परंतु तो ह्मणाला तें अगदीं खोटें नाहीं. तो आपल्या बारशाला जेवला आहे. त्यानें तिसऱ्यानें गळ टाकला, तें आमिष फार मोह करणारें अर्थात् एकदम आपलें भान नाहींसें झालें आणि आपण आपलें खरें स्वरूप एकदम प्रकट केलें. बरें तर बरें, लवकर भानावर आलों; नाहीं तर काय प्रसंग झाला असता कोणास ठाऊक. मग जें काय आपण धिम्मेपणानें करणार होतों तेंही झालें नसतें, आणि एकदम तर होतच नव्हतें. एकदां तर 'मूर्खा, कोणाचीं नांवें घेतोस ! तुझा बाप हा इथें उभा आहे' असें ह्मणण्याच्या बेतांत आलों होतों, परंतु तितक्यांत शहाणपणा सुचला. नाहीं तर त्यावरूनही त्यानें आमची किंमत केली असती. तेव्हांपासून त्यानें कायसा नानाप्रकारांनीं आपल्या नांवाचा शोध चालविला आहे. परंतु कोणीही त्याला अजून

सांगितलें नाहीं. कोणाला ओळखलेंच नाहीं, तर कोणीं सांगणार तरी काय ? पण हा जयसिंग वस्ताद खरा. त्याच्या वस्तादपणाची आपण नुसती ख्याति ऐकत होतों, आज त्याचा अनुभव आला. आतां पाहूं काय होतें तें. मला वाटलें होतें, कीं याला निरोप पाठविल्याबरोबर हा धांवत येईल, परंतु अद्याप त्याचा ठिकाण नाहीं. कां तर पुरंदरचा किल्ला पडला, आणि कोंडाणाही ताब्यांत आला त्याच्यासंबंधानें काम आहे ! काय चमत्कार आहे पहा. जे दोनही किल्ले अगदीं अभेद्य असें आम्ही समजत होतों, तेच किल्ले यांनीं पहिल्या सपाट्यास ह्मणून पाडले. महाराज हल्लीं कोठें आहेत कोण जाणे ! त्यांची सद्दी तर संपत आली नाहीं ! या गुलामाची सद्दी फार जबर दिसते. नाहीं तर इतर दोघे चौघे आले होते त्यांची जी वाट लागली, तीच याची लावली असती. परंतु याच्या गोटांत शिरून आह्मी थोडे हातपाय हालवतों तों याच्या माणसांनीं आह्मांला पकडून हेर ह्मणून जयसिंगाच्या पुढें उभें करून कैदेंत टाकून पार मसलत. असा प्रकार पूर्वीं कधींच घडला नव्हता. पूर्वीं आमचीं ह्मणजे अगदीं बेमालुम सोंगें असत; कोणाला उमगत नसत; पण हा माणूस कांहीं निराळा. बरें बच्चमजी अजून काय झालें आहे ! आतां माझा हा शेवटला उपाय तरी कसा काय फसतो पाहूं. पण आतांच आपल्या मनांतल्या मनांत फुशारक्या मारण्यांत तात्पर्य काय आहे. आतां होईल तें करूनच दाखवावें. आतां हा येईल तेव्हां खरें. पण आपला निरोप गेला आहे, तेव्हां कांहीं तरी आपण महत्त्वाचें सांगणार आहों असें त्याच्या मनांत आलेंच पाहिजे. 'मला कारागृहाचा, या नजर कैदेचा अगदीं आतां कंटाळा आला, तेव्हां आपल्याला मी आतां शरण येतों, आणखी आपण सांगाल ती कामगिरी करतों' हें किंवा अशाच प्रकारचें मागणें कांहीं तरी हा करणार असें त्याच्या मनांत आलेंच पाहिजे. पाहूं आतां तो येईल तेव्हां काय चमत्कार होतो तो. जर साधलें, तर आतांपर्यंत जेवढी ह्मणून त्याची बढाई झाली तेवढ्या सगळ्या बढाईचें उट्टं निघेल. मी इकडे याचें काम करतों. दुसरा कोणी तरी त्या दिलेरखानाचें काम करील. पण या गोष्टी साधल्या मात्र पाहिजेत. यानें आतांपर्यंत महाराजांच्या बहुतेक दुष्मानांना लाचलुचपत देऊं करून त्यांच्याजवळ मदत मागितली आहे. शिवाय जहागिरी कबूल करून कित्येकांना फितूर करण्याचा याचा खटाटोप चाललाच आहे. अशा स्थितींत जर का आपल्या या कामांत आपल्याला यश आलें, तर आणखी काय पाहिजे ! " अशा प्रकारचे विचार त्याच्या मनांत येऊन त्याचा चेहरा बराच प्रफुल्लित झाला. पहिला तो क्रुद्धपणा व मधून मधून आलेला खिन्नपणा दोनही कांहीं काळपर्यंत नाहींसे झाले आणि तो अत्यंत आतुरतेनें जयसिंगाकडून कोणी येण्याची वाट पहात बसला.

जयसिंगास निरोप जरी कळला होता, तरी जयसिंगानें ताबडतोब यास बोला-

वून नेलें नाहीं किंवा तो स्वतःही आला नाहीं. त्यानें आपण दुसऱ्या कामांत असल्याबद्दल निरोप पाठविला, इत्यादि गोष्टी वर सांगितल्याच आहेत. सुमारें एक दिवस याप्रमाणें गेला. दुसरे दिवशीं मात्र सकाळींच जयसिंग त्यास भेटण्यास त्याच्या डेऱ्यावर आला आणि त्यास ह्मणालाः " तुह्मीं मला निरोप पाठविला त्या निरोपावरून मीं तुह्मालाच तिकडे बोलावून न्यायचं; पण तुमच्या मनांतून कांहीं तसंच गुपित सांगायचं असेल, तेव्हां तें दुसऱ्या कोणाच्या देखत सांगायला नको ह्मणून मी आपण होऊन इकडे आलों. तर आतां निर्धास्तपणानं तुह्मांला मला काय सांगायचं असेल तें सांगा. "

जयसिंगाचें तें भाषण ऐकून तो सोंगाड्या कोंगाडी कांहीं वेळ अगदीं स्वस्थ बसला. नंतर एकदम ह्मणालाः " राजेसाहेब, मीं मनांत कांहीं हेतु धरून आपल्याला निरोप पाठविला खरा, परंतु आतां मला आपल्याजवळ तो बोलून दाखवावा असं वाटत नाहीं. किती झालं तरी आमचा देह त्यांच्या अन्नावर वाढलेला. त्यांनीं आह्मांला हातीं धरलं ह्मणून आह्मी पुढें आलों, आणखी त्यांच्यावर प्रसंग येतांक्षणीं आह्मीं त्यांच्यावर उलटावं हें कांहीं बरोबर नाहीं. एक क्षणभर मला दुष्ट बुद्धि झाली होती, पण ती आतां पालटली. आतां कांहीं मला तसं वाटत नाहीं. तेव्हां मला क्षमा करा, आणखी आपण..."

" नका, नका, तुह्मी आपला हेतु मला सांगूं नका. जी गोष्ट सांगूं नयेसं वाटत असेल, ती सांगूं नकाच. माझा आग्रह मुळींच नाहीं. मी तुमच्या निरोपाबरोबर आपण होऊन एवढ्याकरितांच आलों, कीं तुमच्या मार्फत पहिल्यानंच जर कांहीं सामोपचाराच्या गोष्टी होऊन तह झाला तर पहायचं. दोन्हीकडचीं माणसं तरी वांचतील. लढाया झाल्या, तर त्यांत शेवटीं आह्मांला जय हा मिळणारच, त्याबद्दल कधींच कोणी शंका धरूं नये. परंतु आपल्या आणखी बादशहाच्या सैन्याचं, खजिन्याचं वगैरे तारतम्य पाहून आपल्याला यश कितपत येईल, कितपत नाहीं, याचा विचार करून आपण जर पडतं घ्याल, तर सर्व कांहीं सुयंत्रित होईल. बादशहाच्या मनांत नीट भरवून दिलं, तर तो तुमच्या शिवाजी राजाला इकडलं सरसुभ्याचं काम देऊन आपल्या दुसऱ्या लोकांना माघारी बोलवून नेईल, याबद्दल आपल्याला शंका नको. पण एवढंच आहे, कीं सगळ्या ज्या गोष्टी करायच्या त्या धिमेपणानं आणि सामोपचारांनीं करून घेतल्या पाहिजेत. तेव्हां तुह्मी यांत कांहीं खटपट करीत असाल तर पहा. पुष्कळ दगदग आणखी प्राणहानि वांचेल. हजारों लोक दुवा देतील. मी तुह्मांला हेंच पहिल्या दिवशीं सांगणार होतों; परंतु तुमचा डाव फसल्याकारणानं तुम्हांला फार वाईट वाटलं होतं, तेव्हां त्या वेळीं असल्या गोष्टी काढून काथ्याकूट करण्यांत तात्पर्य नाहीं, असा विचार करून मी आपल्याजवळ ते दिवशीं बोललों नाहीं; पण केव्हां ना केव्हां तरी माझ्या मनांत ही गोष्ट आपल्याजवळ काढून आप-

त्याला महाराजांकडे विचार करण्यास पाठवावं असं होतं. पुरंदर आणखी कोंडाणा आतां चार दिवस सुद्धां टिकाव धरीत नाहींत याबद्दल कांहीं शंका नको. हे किल्ले ह्मणजे काय, हां हां ह्मणतां घेऊं. पण प्रत्येक किल्ल्याच्याभोंवतीं दगदग कोणीं करीत बसावं ? पहा तुह्मांला वाटलं तर,. मी वारंवार वारंवार सांगण्यांत कांहीं तात्पर्य नाहीं. तुमची मंडळी अशी सुद्धां आहे, कीं आमची तयारी चांगली नाहीं, फार कच्ची आहे, तेव्हां तें सारं झांकून ठेवण्याकरितां ह्या तोडजोड करायच्या गोष्टी बोलताहेत असं ह्मणूं लागेल; पण उपयोग काय? तुह्मी कांहीं जरी बोललां, तरी जो निकाल आह्मांला लावायचा तो लावल्याखेरीज आह्मी रहात नाहीं. मी इकडे आलों आहें तो कांहीं झालं तरी तसाच्या तसाच हात हालवीत परत जात नाहीं. तह झाला तह करून जाईन; नाहीं झाला, तुह्माला गिरफदार करून बरोबर घेऊन जाईन. "

हें जयसिंगाचें बढाईचें भाषण ऐकून कोंगाडी गृहस्थास फार संताप आला व त्या संतापावेशांत तो त्यास कांहीं दुरुत्तर करणार, तों पुनः त्यास कांहीं विचार सुचून त्यानें आपली जीभ आवरून धरली. नंतर थोडा वेळ मूकस्तंभपणा धरून शेवटीं तो ह्मणालाः–"आपण म्हणतां तेंच योग्य, याबद्दल मला तर कांहीं शंका नाहीं. मी हेरपणा करायला म्हणून आलों, त्यांत मला जें काय पहायचं तें मीं पाहिलं; आपली व्यवस्था पाहिली, आणखी आतांपर्यंत जसे प्रसंग झाले, तशांतला हा प्रसंग नव्हे असं पूर्णपणें मीं जाणलं. परंतु एकदम तसं कबूल करणं मला कांहीं योग्य दिसलं नाहीं ह्मणून मी बोललों नाहीं. आतां आपण स्पष्टपणानं सांगतां, तर आतां मीही स्पष्टपणानं कबूल करतों, कीं आपण ह्मणतां तशी स्थिति आहे खरी. महाराजांनीं आतां तोच विचार करावा. आपल्यापुढें त्यांचं कांहीं चालायचं नाहीं. परंतु ते ऐकायचे नाहींत. ते फार हेकेखोर आहेत, यामुळं कित्येक वेळां आपण आपली स्वामीभक्ती उगीच व्यर्थ घालवितों आहोंत, महाराजांच्या हेकेखोरपणानं सगळी इमारत ढासळून जाईल आणखी सगळ्याचाच बोजवार होईल, असं आह्मांला सुद्धां वाटतं. आह्मीं यापूर्वी महाराजांना हें सारं सांगितलं नाहीं असं नाहीं, परंतु ते ऐकतात कोठें ? त्यांनीं हुकूम करावे आणखी आह्मीं मानावे हा त्यांचा नेहमींचा परिपाठ. आह्मांला काय ह्मणतां त्यांच्या या करण्याचा त्रास येत नाहीं ? राग येत नाहीं ? परंतु स्वामीभक्तीमुळें पुनः पुनः त्यांना चिकटून रहावं, सोडूं नये, कारण ते जें काय करताहेत तें आमच्या धर्माच्या उद्धाराकरितांच करताहेत हें आह्मांला दिसतंच आहे. पण आतां आपली ही व्यवस्था पाहून आमच्या मनानं असं घेतलं आहे, कीं दिल्लीच्या बादशहाशीं तुटून वागण्यानं कांहींही लाभ व्हायचा नाहीं. उलट आमचा नायनाट होईल. तेंच त्याला नमून आपल्या धोरणानं वागलों, तर कांहीं तरी निभाव लागेल, स्वराज्याची उभारणीही होईल........ "

हें त्याचें बोलणें चाललें असतां जयसिंग चकित मुद्रेनें त्याच्याकडे पाहून ऐकत होता. हा गृहस्थ जें बोलतो आहे, हें कशा प्रकारें बोलतो आहे ! याच्या मनांत एक आणि बाहेर एक असें बोलतो आहे, कीं जें बोलतो आहे त्याप्रमाणें त्यास वाटत आहे ? आतांपर्यंत या गृहस्थाचें जें वर्तन त्यानें पाहिलें होतें, त्यावरून हा गृहस्थ कांहीं अशातशांतला नव्हे, शिवाजीच्या अगदीं अंतःस्थ गट्टींतला. त्याच्या जीवाला अणुमात्र त्रास होतो, किंवा त्याजवर कांहीं संकट येतें आहे असें कळल्याबरोबर वाटेल तसलें धाडस करणारांपैकीं असावा अशी त्याची खात्री झाली होती, आणि एकाएकीं त्याच्या तोंडून असे उद्गार निघालेले पाहून त्यास फार आश्चर्य वाटलें. आपल्याला फसवण्याच्याच उद्देशानें त्यानें असें बोलणें चालविलें असावें, असें त्यास वाटल्यावांचून राहिलें नाहीं; परंतु तोही वस्तादच होता. आपल्यास काय वाटलें, हें कळूं न देतां त्यानें तो पुढें काय म्हणतो हें ऐकण्याच्या निश्चयानें त्यास म्हटलें: “ एकूण तुम्हांलाही आमच्यासारखंच वाटतं तर ? वा ! तुम्हांला वाटलं, तर आणखी काय पाहिजे ? शिवाजीची सारी मदार तुमच्यावर. तुम्हीं त्याला असं नाहीं, असं आहे असं सांगितलं, कीं सर्व कारभारच आटपला ! त्याला तुमच्या म्हणण्याप्रमाणं केलंच पाहिजे. तुम्हांला सोडून त्याचं चालणार कसं ? ”

सोंगाड्या कोंगाडी त्यावर म्हणतोः “ बराबर. बराबर. आपण म्हणतां ती गोष्ट खरी. परंतु शिवाजीमहाराज आमचं म्हणणं सगळ्या बाबतींत ऐकतात असं नाहीं. ऐकायच्या बाबतींत ऐकतात, नाहीं तर चापून सांगतात ‘ मी सांगतों तसं करा, जास्त बोलूं नका. ’ आपण तर त्यांच्या नौकरीला कंटाळलों. बरं, इतकी प्राणापलीकडे नौकरी करून बक्षीस काय ? कांहीं नाहीं म्हटलं तरी चालेल. एकाला सुद्धां त्यांनीं कोठें वीतभर जमिनीचा तुकडा इनाम म्हणून दिलेला नाहीं. मग गांव जहागीर देण्याची गोष्ट दूरच. आपण तर बोंआ आतां कंटाळलों, आणखी आपल्या मनांत असाही विचार आला आहे, कीं त्यांची नौकरी सोडून आपल्या नौकरींत यावं. कांहीं मर्दुमकी केली तर आपण मनसब तरी देतां. आमच्या चाकरी नौकरीचं चीज तरी होईल. इथें चीज बीज कांहीं नाहीं. फार झालं तर एखादा शेला, आणखी एखादं कडं ! काय करतां त्याला ? पण आपल्या धर्मासाठीं म्हणून चिकटून रहायचं. पण आतां आपलं हें ऐश्वर्य पाहून आम्हांला असं वाटूं लागलं आहे, कीं बादशहाची नौकरी करून म्हणजे धर्माचा उद्धार करायला यायचा नाहीं असं कांहीं नाहीं. आपण कांहीं धर्माच्या रक्षणाकरितां कमी उद्योग करीत असाल असं नाहीं. आपण बादशहाच्या मर्जींतले आहां म्हणून कांहीं त्याचा धर्म आपण घेतला नाहीं. तेव्हां आपण आम्हांला पदरांत घेत असलां तर आपली नौकरी करावी अशी माझी इच्छा आहे. मात्र शिवाजीमहाराजांच्या विरुद्ध लढायला जायला आम्हांला सांगूं नका. त्यांच्या लोकांवर—म्हणजे आ-

मच्याच लोकांवर शस्त्र उगारायला मला लावूं नका. त्याखेरीज मला आपण कांहीं सांगितलं तरी मान्य आहे. जरी मी यापुढें आपला झालों, तरी आतांपर्यंत त्यांचा होतों. तेव्हां त्या मंडळीच्या विरुद्ध शस्त्र कसं उचलूं? एक नोकरी मी करीन. ती आपण मला सांगणार नाहीं एवढीच काय ती भीति वाटते. ती कोणती? तर आपल्या तैनातींत असायचं. आपण मला आपल्याजवळ ठेवलं, तर आपल्या शरीराचं रक्षण मात्र वाटेल तीं संकटं आलीं तरी करीन. प्रत्यक्ष शिवाजीमहाराज आपल्याला मारायला आले, आणखी मी एकटा आपल्याजवळ आहें, तर मी आधीं मरेन तेव्हां आपल्या केंसाला धक्का पोंचेल. ही गोष्ट आपण लक्ष्यांत धरा. यांत तिळभरही कांहीं अंतर पडणार नाहीं. तेव्हां आपण या गोष्टीचा विचार करा. माझ्या मनाची कांहीं चमत्कारिक स्थिति झाली आहे. तें हेलकावे खात आहे. आपल्याजवळ हें बोलणं बोलावं असं मला किती वेळ तरी वाटत होतं, परंतु पुनः मन कच खाई. पुनः वाटे, आपण असा प्रकार करूं नये. पुनः वाटे, कीं जर आतां आपलं मन उडालं आहे तर आपण तरी लबाडीनं शिवाजीमहाराजांच्या नोकरींत कां रहावं! जें मी बोलणार नव्हतों तें बोलून गेलों. आपलं स्वतःचं मन आपल्याजवळ उघडं केलं. आतां आपण मला आपल्या नोकरीला घेत असलां तर घ्या, नाहीं-पेक्षां जी माझी स्थिति आहे ती आहेच. पण मी येथून सुटलों तर महाराजांकडे परत जाणार नाहीं. गोसावी बैरागी होऊन कोठें तरी काशी, प्रयाग, हरिद्वार इकडे जाईन. महाराजांच्या नोकरीविषयीं आजपर्यंत एक भाव होता, आतां द्विधाभाव झाला. आतां त्यांच्याजवळ रहावं, त्यांनीं पहिल्याप्रमाणंच आपल्यापाशीं वागावं आणि आपण मात्र मनांत तिसराच हेतु धरून असावं हें ठीक नाहीं. पहा, आपणच सांगा मी ह्मणतों यांत कांहीं तथ्यांश आहे कीं नाहीं. आपण जरी माझा अंगीकार केला, तरी मी दोन तीन अटी घालणार आहें. त्या आपण कबूल कराल, तर मी आपली सेवा करीन. पण ती सेवा मात्र मग अशी एकनिष्ठेनं करीन, कीं आजपर्यंत कधींच कोण्या धन्याची कोणीं तशी सेवा केली नसेल. आपण हूं ह्मणत असाल, तर मी आपल्या अटी आपल्याला सांगतों."

जयसिंगानें पुनः एकदां बारीक दृष्टि करून त्याच्या चेहेऱ्याकडे पाहिलें. जणूं काय त्याच्या चर्येवरील प्रत्येक रेषानुरेषा फार बारकाईनें पाहिल्याबरोबर त्याचें या सर्व बोलण्यांतलें खरें हृद्गत आपणांस दिसून येईल असें त्यास वाटत असावें. त्याची दृष्टि या वेळीं इतकी सूक्ष्म होती, कीं तो ज्याच्याकडे पहात होता त्यास तिचा सूक्ष्मपणा चांगलाच जाणवत असावा. जी दृष्टि—अंतर्भेदी दृष्टि ह्मणून ह्मणतात, ती ती होती, परंतु या वेळीं तिनें अंतर्भेद करून कांहीं मिळविलें कीं नाहीं याबद्दल शंकाच होती. शेवटीं तो आमच्या सोंगाड्या कोंगाड्यास ह्मणाला: "काय तुमच्या अटी आहेत त्या तर मला कळूं द्या. अटी कळल्या ह्मणजे पुढें

काय तें बोलूं. बाकी आपण आज आमचे कैदी आहां, तेव्हां आपल्या अटी ऐकल्या काय आणि नाहीं काय ? ''

या शेवटल्या बोलण्याकडे त्या कोंगाड्यानें दुर्लक्ष्य करून त्यास ह्मटलें: " आमची पहिली अट ही, कीं सध्यांच्या लढाईंत उपयोगी पडणारी एक रतिमात्र माहिती आह्मांला आपण विचारूं नये, आणखी आह्मी आपल्याला देणार नाहीं. शिवाजीमहाराजांची नौकरी आह्मी सोडणार, परंतु त्यांचा विश्वासघात कधींही करणार नाहीं. तुह्मी ह्मणाल, कीं पुरंदराच्या किंवा कोंडाण्याच्या चोरवाटा आह्मांला दाखवून द्या, तर प्राण गेल्यानं तें काम करणार नाहीं. दुसरी अट मीं मघाशींच सांगितली कीं लढाईंत आमच्या माणसांविरुद्ध शस्त्र चालवणार नाहीं. येथून उत्तरेकडे आपण गेलांत, किंवा विजापूरकरांवर स्वारी झाली, तर त्या वेळीं आमची मर्दुमकी काय ती दाखवूं. पण महाराजांविरुद्ध ! तें कधीं होणार नाहीं. तिसरी अट ही, कीं आपल्या स्वतःच्या शरीराचें संरक्षण करण्याची सेवा करूं; इतरा कोणाची सेवा करणार नाहीं. नाहीं तर आपण ह्मणाल, जा दिलेरखानाच्या तैनातीला, तर ती गोष्ट होणार नाहीं. इतक्या सगळ्या गोष्टी आपल्याला मान्य असल्या, तर मला आपण पदरांत घ्या, नाहीं तर आपली मर्जी. जोंपर्यंत अशा बांदिवासांत ठेवाल तोंपर्यंत राहूं, किंवा आह्मांला कांहीं हिकमत करतां आली तर निसटून जाऊं. नाहीं निसटून गेलों, निसटून जाण्याच्या यत्नांत फसलों, तर आपण कांहीं तरी जबरदस्त शिक्षा कराल, किंबहुना सुळीं द्याल, जिवें मारण्याची शिक्षा द्याल, तर एकदांच या यातनांतून सुटूं; पण बेइमानपणाची वागणूक कधीं होणार नाहीं. आतां आणखी कांहीं आह्मांला आपल्याला सांगायचं नाहीं. आपण जें काय ठरवाल तें आम्हांला कळवा. पटल्यास होय ह्मणूं, नाहीं तर आमचं आमचं काय तें होतंच आहे. ''

हेंही बोलणें होत असतां जयसिंग त्याच्याकडे मोठ्या मर्मभेदक दृष्टीनें पहातच होता. शेवटीं ह्मणतो: " ठीक आहे. पण आमच्या शरीराचं संरक्षण करायला आमचे आह्मी समर्थ आहोंत, आणखी आमचे जुने रजपूत नौकर आहेत, तेव्हां आपल्याला आणखी हीच सेवा काय सांगावी ? तथापि आपल्याला आम्ही आमच्या जवळ ठेवतों, आमचा हेतु एवढाच, कीं आपण शिवाजीकडे निरोप वगैरे पाठवून, तो लढाई वगैरेंच्या भानगडींत न पडतां तह करील, मोगलांना शरण जाईल, त्यांचा नौकर म्हणून आपण दक्षिणेंत राहूं असें कबूल करील, अशी कांहीं तरी तजवीज करा. तसा कांहीं रंग दिसला, तर आपल्याला त्यांच्याकडे पाठवूं. पण या सर्व पुढल्या गोष्टी आहेत. सध्यां तुमचं म्हणणं, कीं तुम्ही आमच्या शरीराचं संरक्षण करण्याची सेवा करणार ! आह्मांला जी सेवा नको आहे, ज्या सेवेची जरूरी नाहीं, तसली सेवा त्यांत होते. कांहीं तरी माहिती दिली, किंवा किल्ला लवकर आमच्या हातीं पडेल असं कांहीं तरी केलं, तर त्याबद्दल कांहीं

तरी आपल्याला बक्षीस मिळेल. जहागीर मिळेल, इनाम मिळेल; नुसती आमची सेवा करण्याबद्दल काय मिळेल ? काय देतां येईल ? कांहीं नाहीं. तेव्हां जर कांहीं खरोखर मदत करायची असेल, तर ती तशी करा. ......."

" तशी मदत करणं ह्मणजे बेइमानपणा करणं–तो आपल्या हातून कधीं होणार नाहीं. मग आपण ज्या कारागृहांत टाकलं आहे त्यांत जन्मभर खितपत पडावं लागलं तरी हरकत नाहीं. "

हें भाषण त्यानें जरा कठोर व निश्चयी आवाजानें केलें. परंतु जयसिंगानें तिकडे लक्ष्य दिलें नाहीं. तो उलट त्या कोंगाड्याकडे पाहून हंसला व त्यास ह्मणालाः " कांहीं हरकत नाहीं. आपल्या धन्याशीं बेइमानपणा करण्यांतही एक प्रकारचा करारीपणा तुमच्यांत आहे, असं दिसलं ! ... ... "

" बेइमानपणा ? " कोंगाडी मोठ्यानें ओरडलाः " यांत बेइमानपणा ? यांत कसला आला आहे बेइमानपणा ? जर मी त्यांचे गुप्त हेतु तुह्मांला सांगेन, त्यांच्या बातम्या फोडीन, त्यांच्या गुप्त वाटा दाखवून देईन, तर बेइमानपणा खरा. आतां फक्त मी त्यांची नौकरी सोडून आपली धरतों आहे, यांत बेइमानपणा कसा होतो ? त्यांच्या गुप्त गोष्टींतील एक अवाक्षर जर मी आपल्याजवळ बोलेन, तर मात्र मी बेइमान होईन. तसं जोंपर्यंत मी करणार नाहीं, तोंपर्यंत मला कांहीं वाटत नाहीं मी बेइमानपणा केला असं. माझ्या मनांतून आपल्या स्वतःच्या मर्दुमकीनं, कांहीं तरी बहादरी मिळवावी असं आहे. महाराजांच्या पदरीं राहून ती यापुढें मिळेल असें वाटत नाहीं. तेव्हां आतां बादशहाची नौकरी आपल्यासारख्याच्या मार्फत करून मनसबदारी किंवा सरदारी मिळाली तर पहायची. कां पाहूं नये ? आपणच सांगा. यांत बेइमानपणा काय ? जोंपर्यंत शिवाजीमहाराजांची नोकरी करायची, तोंपर्यंत ती केली. त्यांच्या नौकरींत असतांना कळलेल्या गोष्टी मी आपल्याला मुळींच सांगत नाहीं इतकंच नाहीं, पण प्रसंग पडला, तर त्या गोष्टींच्या माहितीचा उपयोग आपण करावा असा मोह पडेल, ह्मणून मी सध्यांच्या लढाईंत त्यांच्या विरुद्ध लढायला उभा राहणार नाहीं असंही पण आपल्याला निक्षून सांगितलं. आतां आपण पुनः पुनः मला बेइमानपणा केल्याचा कां बरं दोष देतां ? "

जयसिंग त्याचें तें बोलणें स्वस्थपणें ऐकून घेत होता. इतका वेळ याच प्रकारचें बोलणें त्यानें त्या कोंगाड्याच्या तोंडून चार पांच वेळां ऐकलें. परंतु आतांच्या या बोलण्यानें त्याच्या मनावर जसा परिणाम झाला, तसा यापूर्वी झाला नव्हता. आतां जें हा बोलतो आहे त्यांत कांहीं तरी अर्थ आहे, कांहीं तरी तत्त्व आहे, हें त्याला स्पष्ट दिसलें आणि त्यानें असें आपल्याशींच ह्मटलें, कीं आतां हा येथपर्यंत आला आहे, याच्या पुढेंही थोड्या अवकाशानें याला नेतां येईल त्याच्यापासून वाटेल ती माहिती काढून घेतां येईल. याला आपण पहिल्यानेंच जर कांहीं ह्मटलें असतें,

तर हा एवढ्याला सुद्धां कधीं कबूल झाला नसता ? आपल्या पूर्वीच्या धन्याची-शिवाजीची-नौकरी सोडून आपली नौकरी करण्याला हा तयार झाला हेंच काय कमी आहे ? जो पुरुष इतक्याला तयार झाला, तो याच्या पुढें जाईल. खास जाईल. निदान आपल्या अंगांत त्याला पुढें नेण्याची खचित करामत आहे. आजपर्यंतचे आपले दिवस कांहीं वांया गेले नाहींत. मनुष्याची पारख आपल्याला फार उत्तम आहे तिचा कांहीं तरी उपयोग झालाच पाहिजे. हा माणूस आपल्याला उपयोगी पडणार. अशा प्रकारचे विचार जयसिंगाच्या मनांत येऊन तो थोडासा आनंदित झाला, आणि त्यास ह्मणतोः "तूं अटी घालतोस या किती चमत्कारिक आहेत ! आह्मी ज्या मोहिमेवर आलों आहोंत, त्या मोहिमेंत फत्ते मिळविण्या-करितां तर आमचा सगळा अट्टहास; ती मोहिम फत्ते व्हावी ह्मणून तर सगळा प्रयत्न. आणखी त्या मोहिमेंत ह्मणे मी तुह्मांला कांहीं मदत करणार नाहीं. मग तुह्मी आह्मांला मदत हवी कशाला ? दुसऱ्या कोणत्या मोहिमेंत आह्मांला तुझा उपयोग होणार ? मला तर कांहीं कोणत्याही मोहिमेंत तुझा उपयोग दिसत नाहीं. तूं शूर असशील, पण तुझ्यासारखे आमच्या रजपुतांत शूर काय कमी आहेत ? हजारों तसे शूर निघतील. लढाईत शौर्यापेक्षां शत्रूकड-ल्या बातम्या अधिक उपयोगी असतात. शत्रूची हालचाल कशी चालली आहे. कोणत्या ठिकाणीं काय योजना आहे, कोणत्या मार्गानं गेलं असतां अचूक हल्ला करायला सांपडतो, या गोष्टी कळल्या तर उपयोगी. नुसता शूर असला, तर काय होईल ? बारीक सारीक किंवा मोठ्या कोणत्याच संकटांना दाद द्यायचा नाहीं. आपल्या लोकांना धीर देईल. पण युक्त्या नसल्या, बातम्या नसल्या तर त्या शौर्याचा तसा उपयोग काय ? कांहीं नाहीं. तेव्हां जर असली मर्जी, तर मला सर्वस्वी मदत कर. नाहींपेक्षां तूं शूर आहेस, एकवचनी आहेस, तुला मी आपल्या-जवळ ठेवतों, नाहीं असं नाहीं; पण माझी खरी इच्छा काय ती तुला सांगितली."

तो मराठाही उलट त्यास जोरानें ह्मणालाः "ठीक. ठीक. पण मी तुह्मांला आधीं बजावलं, कीं ती गोष्ट माझ्या हातून व्हायची नाहीं. आणखी मग आतां कां उगीच पुन्हां पुन्हां तेंच तेंच बोलतां ? नाहीं तर नाहीं. मी आपल्या स्वामींशीं बेइमान होणार नाहीं. त्यांचा हेर ह्मणून इकडे आलों, तो तुमचा हेर ह्मणून त्यांच्याशीं विश्वास-घात करूं काय ? छे. छे. कालत्रयींही गोष्ट होणार नाहीं. पण एवढं मी आप-ल्याला सांगतों, कीं त्यांच्याकडून कांहीं तरी विश्वासघात किंवा गफलत होऊन जर आपल्या प्राणावर बेतत असेल, तर मी आपल्या प्राणाचें रक्षण खचित करीन. त्यांत अणुभरही कसूर करणार नाहीं. तुह्मांला कदाचित् वाटत असेल, कीं यांत कांहींच नाहीं, पण ही मात्र आपली चूक आहे. यांत पुष्कळ आहे. अनुभव येईल तेव्हांच समजेल. यापेक्षां मी जास्त बोलत नाहीं. आतां आपण वाटेल तें करा."

इतकें बोलून तो अगदीं स्वस्थ बसला. जयसिंगराजेही किंचित् वेळ विचार करीत बसले आणि शेवटीं आपल्याशींच पुटपुटले: " नाणं अस्सल आहे. आपण याला आपल्याजवळ तर ठेवून घ्यावं. हा आपल्या बाजूला आहे, याला आपल्याजवळ आपण बाळगलों, एवढं शिवाजीकडे कळल्यानं किती तरी गोष्टी होतील ! " नंतर त्याला ह्मणतात: " ठीक आहे. तुम्हाला आम्ही आमच्या खुद्द तैनातीला ठेवतों. नेहमीं आमच्याजवळ असा. आणखी तुम्हांला जी वाटेल ती नोकरी करा. आतांच आपल्याला पोषाख आणून देववितों, तो पेहरा आणखी मजबरोबर चला. दुसरे पांच चार माझ्या तैनातींतले लोक आहेत, त्यांना याबद्दल थोडं वैषम्य वाटेल, पण कांहीं हरकत नाहीं. त्यांची समजूत कशीही घालतां येईल. "

असें ह्मणून त्यांनीं लागलीच आपल्या बरोबरच्या हुजऱ्याला पाठवून आपल्या डेऱ्यांतून एक पोषाख आणविला. तो पोषाख अर्थातच मराठ्याचा नव्हता. तो त्या कोंगाड्याच्या हातांत देतांना जयसिंग त्यास ह्मणाला: " आतां रजपुताची नोकरी धरलीत तेव्हां रजपुताचा पोषाख आलाच पाहिजे. तुमचा शिवाजी तरी आपल्याला रजपूतच ह्मणवितो कीं नाहीं ? चढवा हा पोषाख आणखी भगवान् एकलिंगजीचं एकवार नांव घ्या. मी आतां जातों. मग आपल्याला आमची ही मंडळी आमच्या डेऱ्यावर घेऊन येतील. पहा आतां आह्मी आपल्यावर इतका विश्वास ठेवला आहे, कीं आपल्याला अजून आह्मी आपलं नांव सुद्धां विचारलं नाहीं. आणखी काय पाहिजे ? आपल्या मर्जीला येईल तेव्हां आपण नांव सांगा, पण सध्यां आह्मी आपल्याला ' सुजनसिंग ' ह्मणायला लागूं. कोणीही आह्माला विचारलं, तर सुजनसिंग ह्मणून सांगूं. ह्मणजे कोण आपल्या बाजूचा माणूस शत्रूच्या गोटांत गेला आहे हें तरी शिवाजीला समजणार नाहीं. कोणी तरी गेला आहे असं ह्मणतील फार झालं तर ! "

असें ह्मणून तो तेथून उठला. त्याची पाठ वळतांच आमच्या या गृहस्थाची चर्या एकदम फिरली. त्याचे डोळे आनंदित झालेसे दिसले. त्यांच्यांत हर्षाची चमक दिसली. आपण अखेरी साधली, आतां एकदां शेवटचा डाव साधला कीं झालें कामच झालें, असा त्या चर्येचा अर्थ होता. थोड्या वेळांत त्यानें पोषाख चढविला. पोषाख चढवून तो बाहेर येतांच सर्व त्याच्याकडे फार आश्चर्यानें पाहूं लागले. जयसिंगानें त्या रखवालदारांना हुकूम देऊन ठेवलाच होता, कीं हा सुजनसिंग पोषाख करून तयार होतांच त्यास आपल्या डेऱ्यावर घेऊन यावें. त्याप्रमाणें त्यांनीं त्यास जयसिंगाच्या डेऱ्यावर चलण्याविषयीं विनंति केली. तो तर जाण्यास तयारच होता.

जयसिंगाच्या डेऱ्यावर जाण्याबरोबर त्यानें त्याचें स्वागत केलें आणि म्हटलें: " मीं आपल्या शब्दावर विश्वास ठेवून आपल्याला जवळ केलं आहे. आतां आपण त्या इमानाप्रमाणें वागा म्हणजे झालं. "

सुजनसिंगानें ( आपण या सोंगाड्या कोंगाड्यास सुजनसिंग याच नांवानें आतां उल्लेखूं. ) शब्दांनीं उत्तर दिलें नाहीं. नुसती अर्थपूर्ण रीतीनें मान तुकावली; तेव्हां जयसिंग त्यास पुढें ह्मणतोः " तुमचं काम इतकंच, कीं तुह्मी नेहमीं माझ्याजवळ असावं आणि जी नौकरी तुह्मी करीन ह्मणालांत ती करण्याचा प्रसंग आला तर करावी. आतां त्याबद्दल मी तुह्मांला ज्यास्ती कांहींच सांगत नाहीं. माझ्या गोटांतील बातम्या तुह्मांला कळतील, त्या तुह्मी आपल्या पहिल्या मालकाला कळवून माझ्याशीं दगा कराल तर मात्र फसाल. कारण तुमच्यावर आमच्या माणसांचा डोळा हा रहायचाच. हें सारं मी तुह्मांला आधींच सांगून ठेवितों, याचं कारण तुह्मी तसल्या कामाच्या भानगडींत पडूंच नये हें होय. पडलांत आणखी मग त्यांत तुह्मांला अपयश आलं; तुमचा दगा उघडकीस आला ह्मणजे मग तुह्मांलाच फार वाईट वाटेल. मीं तुमच्यावर पूर्ण विश्वास ठेवला आहे. त्याप्रमाणं तुह्मी माझ्यावर ठेवा. माझं दुसरं कांहीं सांगणं नाहीं. याउपर पुनः मी या बाबतींत तुमच्याशीं बोलणार नाहीं. "

याही बोलण्यावर सुजनसिंगानें कांहीं उत्तर दिलें नाहीं. फक्त फार चमत्कारिक चर्या करून जयसिंगाकडे पाहिलें. ही चर्या चमत्कारिक आहे हें जयसिंगाच्या लक्ष्यांत आलें असेल किंवा नाहीं कोण जाणे! त्याचप्रमाणें ती चर्या पाहिली असली तरी त्या चर्येचा अर्थ काय हेंही त्याच्या लक्ष्यांत आलें असेल कीं नाहीं कोण जाणे; परंतु त्याच्या सूक्ष्म व अंतर्भेदी दृष्टींतून कांहीं वगळलें असल्याचा संभव फार कमी.

---

# प्रकरण १० वें.

## पुरंदरकडे.

दिलेरखान पुरंदरास वेढा देऊन बसला होता. त्याची पहिली उमेद ही, कीं आपण चुटक्यांचे मांडव वाजवून सर्व किल्ला तेव्हांच हस्तगत करून घेऊं. परंतु वेढा बसल्यापासून दोन दिवसांच्या आंत जेव्हां का वेढा देणारांची रसद बंद झाली, तेव्हां आपण समजत होतों तितकें हें काम कांहीं सोपें नाहीं, किल्ला प्रचंड आणि अतिशय बिकट, त्याच्या सभोंवतालच्या प्रदेशाची आणि वाटांची आपल्या लोकांस मुळींच माहिती नाहीं. अशा स्थितींत आपण येऊन पडलों याबद्दल त्यास थोडेंसें वाईट वाटूं लागलें. आपली रसद अशीच बंद झाली तर आपण किती दिवस निभावून नेणार ! तरी पण आपण निकर करून हा किल्ला घेतला पाहिजेच. हा आपण घेतला नाहीं तर आपल्या इभ्रतीला कमीपणा आहे, असें त्याला एका

दृष्टीनें वाटत होतें. दुसऱ्या दृष्टीनें असें वाटत होतें, कीं जितक्या सहजपणें आपल्याला हा घेतां येईल असें वाटत होतें, तितक्या सहजपणें घेतां येत नाहीं इतकेंच नव्हे, पण रसद जर अशीच बंद झाली, तर आपल्याला वेढा उठवून दुसरी कांहीं तरी युक्ति करावी लागेल. हें त्यास स्पष्ट दिसत होतें तरी पण तो असें म्हणेच, कीं किल्ला घेतल्याखेरीज आपण कधींही रहाणार नाहीं. हा जयसिंग जर कांहीं गडबड करील, तर तेंही आपण कधीं ऐकणार नाहीं. जो कोणी हिंदु येतो, तो आपल्या जातभाईला सामील होतो. त्याला जाऊन मिळतो. तसाच जर कांहीं प्रकार हा जयसिंग करील, तर त्यावर आपल्याला डोळा ठेवायला पाहिजे. त्याला बिलकुल असल्या फंदांत पडूं देतां उपयोगी नाहीं. तशा फंदांत पडूं दिलें, कीं सारा कारभार बुडालाच ह्मणून समजावें. जसवंतसिंगानें जें केलें तेंच हा जयसिंग करील, यांत तर शंका नाहीं. आपण बादशहाला याप्रमाणें सांगितलें, परंतु बादशहाचा जयसिंगावर विलक्षण विश्वास, यामुळें त्यानें आपलें ऐकलें नाहीं. त्याला मुख्य आणखी आह्मांला त्याच्या हाताखालीं ह्मणून दिलें. पण एवढें तरी बरें केलें, कीं त्याच्यावर पूर्ण विश्वास आहे ह्मणून त्याच्या विरुद्ध कांहीं मला कळवतां कामा नये वगैरे कांहीं मला हुकूम दिला नाहीं. बादशहाचा तरी पूर्ण विश्वास कधीं कोणावर असतो आहे! त्याला तर सर्व जग आपल्याप्रमाणेंच लबाड, अप्रामाणिक, विश्वासघातकी, कपटी असें दिसतें आहे. त्यानें माझी आणि जयसिंगाची जोडी घालून दिली म्हणजे काय? मीं कांहीं वावगें केलें तर त्यानें चुगली करावी, त्यानें कांहीं केलें तर मीं चुगली करावी. एकमेकांवर एकमेकांना हेर म्हणूनच नेमलें आहे म्हणाना! त्याच्यावर विश्वास नाहीं, माझ्यावर नाहीं. तें कसें जरी असलें, तरी आपण असेंच धरून चालणार, कीं आपण जें काय करूं ती पूर्वदिशा. जयसिंगाच्या हाताखालीं मला दिलें आहे खरें, पण रजपुताच्या हाताखालीं मोगल सरदार असो, किंवा मोगल सरदाराच्या हाताखालीं रजपूत असो, वरचष्मा नेहमीं मोगलाचाच असावयाचा! रजपुतांना, हिंदूंना—बादशहाच्या तक्ताची काय काळजी? उलट तें तक्त केव्हां आपण बळकावूं असें त्यांना झालेलें आहे! अशा लोकांना जुमानून जर आम्ही वागावयाला लागलों, तर मोगल पादशाही केव्हांच नाहींशी होईल. त्यांना मोठेपणा द्यावयाचा म्हणजे काय? त्यांचा अगदींच नायनाट झाला, तर लोकांत विलक्षण काहूर माजेल तें नको, आपल्याला राज्य चालविण्याला फार त्रास पडेल, तसें न व्हावें इतकेंच. या बादशहाच्या मनांत तरी रजपुतांना मान द्यावा, त्यांस मोठ्या पदव्या द्याव्या असें कां येते, तर त्याच्या अंगांत रजपुताचें रक्त आहे. अकबरापासून रक्तांत भेसळ आहे, ती जाते कुठें? आमच्यासारखें अगदीं शुद्ध असें कुळ आजकाल मुसलमानांत आहे तरी कुठें? असो. चला. आपण आपल्या कर्तव्यांत चुकूं नये झालें. तो गडबड करावयाला

लागला, तर साफ सांगावें, कीं मी बादशहाला कळवून त्याचा काय तो हुकूम आणतों, नंतर पाहूं. असें कांहीं केल्याखेरीज कांहीं काम वठावयाचें नाहीं. वठावयाला पाहिजे तर खरें. दिलेरखानाचे हे असे विचार होते ! हे विचार त्याच्या वेळच्या बहुतेक मोगलांचे होते म्हटलें तरी चालेल.

मनुष्याला रिकामपण असलें, म्हणजे त्याचें मनही नानाप्रकारचे विचार करूं लागतें, तशीच स्थिति सध्यां दिलेरखानाची झाली होती. त्याला जयसिंगाच्या हाताखालीं दिल्याचें मोठें वैषम्य लागलें होतें. परंतु तो जयसिंगच असल्यामुळें त्याला आपल्या मनांतलें तें वैषम्य बादशहास स्पष्टपणें बोलून दाखवितां येईना. लाक्षणिकरीत्या सांगायसुचवावयाचें तें त्यानें बादशहास सुचविलें होतें, हें वरच्या त्याच्या आत्मगत भाषणावरून किंवा त्याच्या विचारांचें वर्णन केलें आहे, त्यावरून स्पष्ट दिसलेंच असेल. पुरंदरास वेढा देऊन अडकून बसल्यानंतर त्याच्या मनांत हे वर दिलेले विचार फारच वारंवार येत राहिले. इतकेंच नव्हे, तर जयसिंगाचें उणें कोठें सांपडेल आणि आपण तें बादशहास कळवून त्याच्यावरला विश्वास अपात्रीं आहे असें त्याच्या मनास केव्हां भासवूं असें त्याला होऊन गेलें होतें. यामुळें त्यानें गुप्तपणें जयसिंगाच्या डेऱ्यांत काय चालतें, कोण येतो, कोण काय बोलतो, वगैरे गोष्टी आपल्याला कळण्यासाठीं आपले हेर ठेविले होते. जयसिंग अति धूर्त, अशा प्रकारें आपल्यावर दिलेरखानानें हेर ठेवले असतील याबद्दल त्याला संशय होताच. बादशहा आपल्यावर विश्वास आहे विश्वास आहे असें बोलून दाखवितो, आपल्यावर मोठमोठीं कामें सोंपवितो, परंतु आपल्यावर नजर ठेवण्याकरितांच कीं काय, आपल्या मागें एखादा मुसलमान सरदार —नांवाला दुय्यम, परंतु खरोखर हेर व शिरजोर—म्हणून देतो, ही गोष्ट त्यास दिसत नव्हती असें नाहीं. आपण नांवाला मुख्य परंतु आपल्या हाताखालीं म्हणून दिलेले मोगल सरदार आपला यत्किंचित्सुद्धां मुलाजा राखीत नाहींत, त्यांना जातींचा फार मोठा पाठिंबा वाटतो हा अनुभवच आजपर्यंत त्यास कितीकदां आला होता, यामुळें तोही या हाताखालीं दिलेल्या मोगल सरदारांस फारसे नाराज करूं इच्छित नसे. परंतु आतां आपणास दिलेरखानाकडे पहावयाचें आहे, तेव्हां त्याच्याच डेऱ्यांत काय चाललें आहे तें पाहूं.

वर सांगितल्याप्रमाणें विचार करीत दिलेरखान हुक्का ओढीत बसला होता. एक पोऱ्या वारंवार वारंवार त्या नैच्यावरील चिलमा प्रज्वलित करीत होता, त्यावर गुडाखू घालीत होता आणि खानसाहेब सावकास सावकास मधून मधून झुरके मारीत होते, परंतु त्यांचें चित्त गुडाखू ओढण्याकडे नव्हतें हें अगदीं उघड होतें. ते कोणीकडे तरी पहात होते. मध्यें उगीच त्यांच्या ओंठाचे कोपरे किंचित् किंचित् हलत होते. परंतु त्या तसल्या फुसक्या झुरक्यांनीं धूर कांहीं केव्हां निघालेला दिसला नाहीं. त्याचे डोळे मात्र फार धुंद दिसले. मग त्यास झोंप येत असल्याकारणानें ते तसे झालेले असोत, किंवा दुसऱ्या कांहीं कारणानें असोत. अशा धुंदीत

ह्मणा अगर विचारांत ह्मणा, तो असतांना त्याच्या हुजऱ्यानें वर्दी दिली, कीं जयसिंगाच्या छावणींतून किरातसिंग आला आहे. किरातसिंग हें नांव ऐकतांच दिलेरखान एकदम खडबडून जागा झाल्याप्रमाणें झाला आणि " बोलाव बोलाव त्याला. आंत बोलाव. इतका वेळ बाहेर काय ह्मणून त्याला ठेवलंस ? तुला कितीदां सांगितलं आहे, कीं किरातसिंग आला तर त्याला मुळीं सुद्धां विलंब न करतां माझ्याकडे घेऊन येत जा ह्मणून. तुह्मी लोक मोठे गाढव बोआ!"

तो हुजऱ्या अर्धवट पुटपुटला: " आह्मी मोठे कसले? हुजूर आपण मोठे ! "

परंतु त्याच्याकडे लक्ष्य न देतां दिलेरखान पुढें ह्मणतो:–" बरं चल. आतां तरी तावडतोब त्याला घेऊन ये. ए करतो आहेस काय ! कोण अशुद्धाळ माणसं बोआ हीं ! चल जा. "

वास्तविक इतकें बोलण्याइतकी त्या हुजऱ्यानें किरातसिंगास आणण्याची दिरंगाई केली नव्हती. परंतु यास त्याला भेटण्याची भयंकर आतुरता होती. तो आला ह्मणतां क्षणींच भेटायला पाहिजे होता. आणि तशांत याच्या मनांत जे कांहीं विचार चालले होते त्याचा व त्याच्या येण्याचा कांहीं संबंधही असेल. हा किरातसिंग वाचकांनीं कोण तो ओळखलाच असेल. त्याची व वाचकांची यापूर्वी भेट झालेली आहे.

आपल्या मालकानें इतकी तातडी केली आहे, तेव्हां किरातसिंगास केव्हां एकदां आंत आणून सोडीन असें त्या शिद्दी हुजऱ्यास होणें किती साहजिक ! तो लागलीच बाहेर गेला. त्यानें किरातसिंगास जलदीनें आणलें व आपल्या यजमानापुढें उभें केलें. किरातसिंगास पाहतांच दिलेरखान जागचा उठला. त्यानें मोठ्या आदरानें त्यास आलिंगन दिलें. त्याच्याकडे हंसून पाहून त्याचें स्वागत केलें आणि त्याला आपल्याजवळ बसवून घेऊन त्यास ह्मटलें: " कां ! आज इकडे कोणीकडे आपल्या पायाची धूळ झाडली ! मिर्झाराजांना विचारून आलां कीं डोळा चुकवून ! त्यांचा डोळा चुकवून येणं मोठं कठिण आहे ! बरं, कांहीं नवीन हालहवाल ! आपल्या चेहऱ्यावरून कांहीं तरी नवीन हालहवाल दिसते आहे ! बोला बोला. तुमचं आमचं आग्रयास ठरल्याप्रमाणं कांहीं जर सांपडलं, तर बहार होणार आहे ! "

" तसं बहार होण्याजोगं कांहीं नाहीं. पण मिर्झाराजे कांहीं तरी तहाबिहाचा घोंटाळा घालणारसं दिसतं. परवांपासून त्या शिवाजीचे दोन हेर पकडले गेले, परंतु त्या हेरांना शिक्षा करण्याऐवजीं त्यांना आपल्या जवळ मोठ्या मेजवानांप्रमाणं त्यांनीं राहून घेतलं. नांवाचे मात्र नजरकैदी; परंतु त्यांचा थाट ह्मणजे काय ! विचारूं नका. हे दोघेही शिवाजीचे हेर याबद्दल मुळींसुद्धां शंका नाहीं. आणखी ते कांहीं त्याबद्दल नाकबूल जाताहेत असं नाहीं. पण आपला त्यांचा बडेजाव पहावा तों जसे कांहीं ते फार मोठे पाहुणे ! वास्तविक त्यांना केव्हांच झाडाला लटकावा-

यला पाहिजे होतं, नाहीं तर सुळीं देऊन कुऱ्याकोल्ह्यांना मेजवानी द्यायला पाहिजे होती, परंतु पाहिलं तों आतां या म्हाताऱ्याला निराळाच विचार सुचायला लागला आहे. त्याचा सगळा खटाटोप असा आहे, कीं कांहीं तरी थातुरमातुर करून शिवाजीला अंकित केल्याचं मिष करावं आणखी मोहीम फत्ते केली म्हणून आल्या वाटेनं परत जावं! त्या माणसांना बोलवून आणून किंवा हा म्हातारा त्यांच्याकडे जाऊन म्हणा, पण कांहींना कांहीं तरी त्यांच्याशीं याचं हितगुज चाललं आहे. त्यांना फितवून घेऊं म्हणून त्याचा सगळा खटाटोप चालला आहे. पण याच्या असं ध्यानांत येईना, कीं आमच्या गोटांत शिरण्याचं धाडस करून इकडल्या बातम्या काढायला म्हणून जे आले, ते सांपडले, म्हणून काय आपल्या गोटांतली बातमी दुष्मानाला देतील ? असे फितण्याजोगे जे पुरुष असतील त्यांना त्यांचा राजा इकडे पाठवील कशाला ? पण या म्हाताऱ्याला असं वाटतं, कीं इनाम, मनसब, जहागीर अशीं आमिषं दाखविलीं म्हणजे वाटेल ती व्यक्ति आपल्याला अनुकूळ होईल ! ही काय समजूत ही ! ........"

"जो तो आपल्या आपल्यावरून जगाच्या स्वभावाची परीक्षा करतो नाहीं किरातसिंग ! " दिलेरखान आपल्या लांब दाढीवरून हात फिरवीत फिरवीत व मोठ्यानें हंसून म्हणतोः

"अलबत ! अलबत ! " किरातसिंगानें त्यास त्वरित उत्तर दिलें. "या लेकानं मोठ्या पदव्या, मोठे मानमरातब, वगैरेंच्या आशेनं तर कित्येक स्वतंत्र संस्थानांना बादशहातींत आणून घातलं ! " परंतु इतकें तो बोलला आणि त्याचें त्यालाच असें वाटलें असावें, कीं आपण हें काय बोललों ! म्हणून त्यानें जीभ चावून दिलेरखानाकडे वांकड्या नजरेनें पाहिलें. दिलेरखानाच्या लक्ष्यांत कांहीं आलें नाहीं असें नाहीं. तें आलें व म्हणूनच तो किरातसिंगास एकदम म्हणालाः "नको, नको, तूं जीभ चावण्याचं कारण नाहीं. बादशाही अंमल वाढला याबद्दल आम्हांला जरी आनंद झाला, तरी हा अंमल वाढवायला तुमचेच लोक आम्हांला साहाय्य करतात ही गोष्ट खऱ्या दृष्टीनं आम्हांला काय बरी वाटते आहे काय? आम्हाला फायदा होतो, आम्ही त्यांना उत्तेजन देतों, जहागिरी देतों, पण खरं पुसशील तर यांची फाटक्या जोड्याइतकी सुद्धां आम्हांला किंमत वाटत नाहीं. तेव्हां तूं जीभ चाऊं नको. जीभ चावायचं कांहीं सुद्धां कारण नाहीं. आम्हांला जें फार वाईट आणखी नीचपणाचं काम वाटतं, तें तुम्हांला तसं वाटलं तर त्याबद्दल आम्हांला राग कां यावा ? तूं सांग पुढें काय काय झालं तें."

"पुढें काय ! त्यांपैकीं एकाला आतां अगदीं स्वतंत्र करून आपल्याजवळ आपला शरीररक्षक म्हणून ठेवून घेतलं आहे. बोला आतां काय तें. त्यांना जर असं का केलं म्हणून विचारायला गेलं, तर असं सांगतील, कीं शत्रूकडील गुप्त बातम्या, आणखी कांहीं गुप्त वाटा—किल्ल्याला जाणाऱ्या अगर किल्ल्यापासून

दूर जाणाऱ्या–अशा–या लोकांना माहीत असतील त्या त्यांच्याकडून समजून घ्यायच्या आहेत.पण ते मला दोघेही असे खमंग दिसताहेत, कीं ते आपल्याजवळच्या बातमीचा मागमूस सुद्धां लागूं द्यायचे नाहींत. यांना मात्र रिकामी आशा लावून येथें आमच्या गोटांतले सगळे प्रकार घेऊन हे सूं बाल्या करून पळून न जावोत. म्हणजे झालं. मिर्झाराजांची अशी बुद्धि पालटेल ही कल्पना आपल्याला कांहीं नव्हती. परंतु हल्लीं पहातों तों हा असा प्रकार आहे ! ”

“ नव्हता कधीं ? ” दिलेरखान मोठ्या ऐटीनें म्हणालाः “ हे म्हातारे म्हणून आम्ही तरुणांनीं यांच्या विरुद्ध बोलायचं नाहीं. पण माझी अशी समजूत आहे, कीं याची जी मर्दुमकी मर्दुमकी म्हणून नाणावली आहे, ती या असल्या फितवाफितवी करण्यावरच. फितवाफितवी करायचीन् राज्यं घ्यायचीं आणखी म्हणायचं मात्र माझ्या मर्दुमकीनं मी हा मुलूख कार्बीज केलान् तें राज्य जिंकलं. आग्र्याहून बादशहाची परवानगी घेऊन निघाल्यापासून यांनं किती लोकांना आतांपर्यंत मनसबा किंवा जहागिरी देण्याच्या वचनांनीं भरलेलीं अशीं पत्रं पाठविलीं ! आहेना तुला माहीत ? झालं. असे लालची लोक मिळाले; म्हणजे राज्यं हातांत यायला काय अडचण आहे ? बादशहाला मात्र आपल्या मर्दुमकीच्या वर्णनाचीं पत्रं लिहिलीं म्हणजे झालं. मला तर वाटतं जयसिंगराजे, शिवाजी–जो आमचा कट्टा दुष्मन्–त्याला सुद्धां ‘ तुला तुझं हें सारं राज्य बहाल करतों. तूं बादशहाचा अंकित म्हणून कबूल कर’ असं म्हणायला चुकायचे नाहींत ? ”

तें ऐकतांच किरातसिंग मोठ्यानें हंसूं लागला आणखी म्हणतोः ‘ मग मी आपल्याला बातमी सांगायला आलों आहें ती काय ? तुम्ही म्हणतां असा निरोप नव्हे, अस्सं पत्र शिवाजीकडे गेलं आहे. मला हें कळल्यापासून माझ्या अंगाचा नुसता तिळपापड उडाला आणखी मी आपला कांहीं तरी सबब काढून इकडे निघून आलों हा सर्व मजकूर आपल्या कानावर घालावा म्हणून. आपण म्हणतां असाच प्रकार चालला आहे.

“ तो काय ? काय मला सांग तर खरा ! ”

“ शिवाजीकडे असा निरोप गेला आहे!आहे, कीं ‘ तूं मुकाट्यानें बादशहाला शरण ये. बादशहाची ताकद फार जबर. तुझा त्याच्यापुढें कांहीं टिकाव लागणार नाहीं. तूं शरण येऊन बादशहाचा अंकित ह्मणून राहिलास, तर तूं जितकें मिळविलें आहेस इतकंच नव्हे, तर सगळ्या दक्षिणेचा सुभा तुझ्या स्वाधीन होईल. तेव्हां हे सगळे किल्ले आणखी प्रांत मी केवळ बादशहाचे ह्मणून वहिवाटतों आहें अस तूं ह्मण आणि आमच्याकडे ये ह्मणजे आपण तह करूं. बादशहाची समजूत तेवढ्यानें होईल. ’ असं कांहीं तरी लिहून त्याला भेटीला बोलावलं आहे किंवा त्याचा वकील यावा ह्मणून सूचना केली आहे. त्याचा उपयोग आतां काय होईल तें कांहीं सांगतां येत नाहीं.... ”

वरील मजकूर ऐकत असतां दिलेरखानाच्या अंगाचा अगदीं संताप झाला आणि तो ह्मणालाः " हें असं कांहीं तरी होणार हें मला पक्कं ठाऊकच होतं. बादशहाला मीं याच्याबद्दल आधींच सांगून ठेविलं होतं. पण बादशहाला काय या मिर्झाराजाची भुरळ पडली आहे ! तो जें ह्मणेल तें करायचंच असं त्याला वाटतं. मीं त्याला सर्व गोष्टींबद्दल आधीं सावध करून ठेवलं असून, पुनः पहातों तों त्याच्या हातीं खजिना, त्याच्या हातीं जहागिरी, मनसबी, इनामं देण्याचा पूर्ण अधिकार आग्र्याहून येतो. एकंदरींत याची सद्दी बळकट आणखी मोठी खरी. आणखी आह्मी कांहीं याच्या विरुद्ध बादशहाला सांगायला गेलों, तें अक्षरशः खरं असलं, पुराव्यानिशीं सिद्ध केलं, तरी कांहीं नाहीं. तो ह्मातारा माणूस आहे; तो करील तेंच बरोबर. असो चला. आतां तूं बातमी येऊन सांगितलीस ती जर खरी असली, तर मुकाट्यानं पत्रं लिहून बादशहाकडे पाठवावीं झालं. आणखी खरोखरी तह करायचं बोलणं झालं, तर मी या गोष्टीला साफ कबूल नाहीं ह्मणून सांगेन. जरी दुय्यम ह्मणून मला बादशहानं पाठवलं आहे, तरी मी वागणार मुख्य असल्याप्रमाणंच. याला एकट्याला काय आहे अधिकार तह करून शिवाजीला दक्षिणचा सुभेदार करीन ह्मणून ह्मणायला ! "

" आपण जर कांहीं असा जोर धरला, तरच कांहीं ठीक होणार आहे; नाहीं तर मिर्झाराजे आपलं ह्मणणं शेवटास नेतील. " किरातसिंग कपटानें ह्मणाला.

" एः त्याची काय बिशाद आहे मी कबूल नाहीं असं ह्मणत असतांना तह करण्याची ! मी जर खरा दिलेरखान असेन, तर शिवाजीचा किल्लान् किल्ला घेऊन त्यांच्यावर बादशहाचं निशाण लावीन तेव्हां राहीन. त्या गप्पा नकोत. अरे तुह्मां हिंदूंचा मोठेपणा आपला तुमच्यापुरता ! एकीकडे मिर्झाराजासारखा सरदार आणखी दुसरीकडे मी. आह्मां दोघांत बेबनाव झाला तर बादशहा मला सोडून मिर्झाराजाचा पक्ष घेईल काय ! कधींच घेणार नाहीं. आधीं मीच इथें दरडावून सांगितलं, कीं मला कबूल नाहीं, तर मिर्झा राजा तह करायचा नाहीं. माझीं आर्जवं करीत बसेल माझी कबुली मिळवावी ह्मणून. "

" आणखी ती आपण त्या आर्जवांनीं द्यालही. " किरातसिंग कुत्सितपणें बोलला.

" छे. कधीं देणार नाहीं. शिवाजीची हड्डी नरम करून त्याला गिरफदार करून मी बादशहाच्या पुढें नेऊन उभा करीन तेव्हां राहीन. मी जयसिंगाच्या गुळचट थापा ऐकायचा नाहीं. आणखी त्या दगलबाज शिवाजीला तर आतां मुळींच दाद द्यायचा नाहीं. त्याचा दगलबाजपणा असा किलीदां सिद्धीला जाणार ! दोन चार लोक तर त्याला बळी पडले. मिर्झाराजाच्याप्र मनांतून पडायचं असेल तर तो पडेल हवा तर. मी तर आतां त्या दिशेच वारं आलं तरी त्यांत कांहीं गुप्त खंजीर, किंवा वाघनखं किंवा विष आहे कीं काय हें पाहीन. जयसिंगासारखीं भोळवट माणसं असतात तींच बळी पडतात. "

" मला वाटतं त्यांना लढायां मारण्याचा कंटाळा येतो. तेव्हां जय मिळवायच्या सोप्या युक्त्या काढायला ते जातात, आणि अशा कपटी लोकांच्या जाळ्यांत सांपडून फशीं पडतात. "

" अशीच गोष्ट खरी. यांत कांहीं शंका नाहीं. पण आतां आलेल्या जोडीपैकीं मी तरी निदान कधीं असा फसायचा नाहीं. तें सांगतांना, मी शिवाजीचा निकाल करून येथून जाणार. तुह्मी हिंदु एक होणार आणखी त्याचा बडेजाव वाढवणार. त्याला तुमच्या मनांतून मदत करायची. मी जर आलों नसतों मिर्झाराजांबरोबर, तर मला वाटतें तुह्मी त्याच्याशीं मिलाफी होऊन दक्षिणेंत मुसलमानांचं बीं राहूं द्यायचं नाहीं असाच कट केला असतात ! जसवंतसिंगानं शहाजाद्याला भुरळ घातली, आणखी काय पाहिजे ! "

" खानसाहेब ! आह्मी सगळेच सारखे असं समजूं नका आपण. कांहीं तरी आमच्यासारखे स्वामीनिष्ठ आहेत, अगदींच नाहींत असं कां ह्मणतां ? "

" तुझी एक गोष्ट निराळीरे. पण किरातसिंग तूंच पहा आतां शास्तेखानासारख्यांना ज्यानं पाणी प्यायला लावलं, त्याचा सूड उगवण्यासाठीं आह्मी इकडे आलों, आणखी इथें आलों नाहीं तों त्याच्या दुष्मानाशीं तह करण्याच्या गोष्टी काढूं लागलों ही तऱ्हा तरी काय ? तुमच्या मनांत बादशहातीचं प्रेम नाहीं. तुमच्या मनांत शिवाजीला मदत करायची. परंतु ती उघड करायची नाहीं. करतां येत नाहीं ह्मणून ही अशी युक्ति करतां..................

# प्रकरण ११ वें.

## किरातसिंग.

मागें सांगितल्याप्रमाणें दिलेरखान बोलत आहे, त्याचें तें वाक्य अर्धवट तोंडांत अर्धवट बाहेर अशी स्थिति आहे, तों बाहेर एकदम कांहीं तरी हाहाकार उडाला असावा असें त्यास वाटून तो व किरातसिंग दोघेही चपापून उठले. दूर कोठें तरी मोठा थोरला कोलाहल चालला असावा असें त्यांस वाटलें व दिलेरखान तें मघाचें वाक्य तसेंच टाकून एकदम ह्मणतो "इन्शाल्ला ! हे मराठे खरोखरीच सैतानाची अवलाद आहेत. यांचा कोठें मागमूस नाहीं असं वाटत असतं आणि त्यामुळें आपण शांतपणें बसावं, तों एकदम जमिनींतून वर आल्याप्रमाणं पुढें उभे राहतात. हा आतां गोलमाल त्यांचाच असला पाहिजे यांत बिलकुल शंका नाहीं. मला बाहेर जाऊन आतां आधीं त्यांची व्यवस्था लावली पाहिजे. लेकाचे सैतानाच्या फौजेसारखे केव्हांच पटकन् पुढें येतात, आपण जरा सावध

होऊन हत्यारें सरसावलीं, तों हे लुटालूट करून जाळपोळ
कडच्या कोणीकडे चालते होतात. पण हे असे आहेत, म्हणून काय
खेरीज का आपण राहायचं आहे? किल्ल्याला आम्हीं वेढा दि
रसद त्यांनीं बंद केली आहे. आम्हीं त्यांना किल्ल्यांत अडव
तरी गुलामाचे केव्हांच कोणत्या बाजूनं खालीं उतरतात, आम
डावर हल्ला करितात आणि पुनः पळून जातात. आतां हा गर
हा खास त्यांचाच आहे. ते पहा त्यांचे पेटलेले हिलाल दिसतात
नाची अवलाद यांत मला तर शंका नाहीं. आणखी अशा
नह करतां, त्यांना फितनां, तेव्हां तुम्हांला म्हणावं तरी काय?
बर, तुला या लोकांची काय मजा आहे ती दाखवितों!"

असें म्हणून दिलेरखान उठला. त्यानें बाहेर येऊन मोठ्यानें
त्या लोकांस जागे व सावध करण्याचा हुकूम दिला. त्याप्रमाणें
कडे तिकडे लोकांत चळवळ उडाली. आतांपर्यंत स्वस्थ लोळ
गाण्याबजावण्यांत दंग झालेल्या लोकांनीं आपापलीं हत्यारें स
तो "क्या है! क्या है!" असें विचारूं लागला. ही मोगल
किरातसिंगानें आज नव्यानें पाहिली असें नाहीं. तथापि त्याल
त्या सैन्याची ती अवस्था पाहून हंसूं आलें. परंतु दिलेरखान जव
रणानें त्यास तें आपलें हंसूं ओंठांतल्या ओंठांतच दाबून टाकावें
नानें लागलींच आपल्या लोकांस समोरून येणाऱ्या लोकांशीं
होण्याबद्दल इशारा केला. ते आपल्या अंगावर येण्याच्यापूर्वी आपण
पडण्याबद्दलही त्यानें ताबडतोब हुकूम सोडला. लोक निघाले तों
आलें, कीं समोरून येणारी मंडळी एकदम डावे बाजूस वळली.
नाची मंडळीही त्या बाजूस वळली. खुद्द छावणी होती तेथें फार
राहिलीं. समोरून येणारी मंडळी जर आपल्या तडाख्यांत सांपड
त्याला आपलें शौर्य गाजविण्यास फार चांगली संधि मिळेल अ
वाटलें. किल्ल्यावर चढाव करण्याचें दुर्घट काम त्यानें पांच सहा
परंतु तिनक्या वेळां त्याला दांतीं तृण धरून परतावें लागलें. आर
यासें ही मंडळी खालीं उतरली आहे, तर आतां त्यांची आधीं
असा त्यानें विचार केला आणि त्या विचारामुळेंच स्वारी स्वतः
च्या पुढें झाली. समोरून हिलाल घेऊन येणारी मंडळी चांगली
सावी. किल्ल्यावर आणखी किती असणार? या पांचशेंच्या
आहों, तेव्हां त्यांचा धुव्वा उडविण्यास आपणास काय अडचण
असें त्याच्या मनांत विचार चालले असतां त्यास असें दिसून
ज्यांच्यावर आपण चाल करून जाणार ते पुरंदरच्या डोंगराच्या पाय

बसले असावे, तेव्हां हा त्या गुलामांचा कांहीं तरी जबरदस्त कावा आहे. हा काय कावा आहे, तो त्यांनीं सिद्धीस नेण्यापूर्वीं आपण त्यांजवर अचानक हल्ला करावा आणि त्यांस जमीनदोस्त करून टाकावें. असें मनांत येतांच त्यानें आपल्या लोकांस झपाट्यानें चाल करून जाऊन त्या डोंगराच्या पायथ्यापाशीं बसलेल्या लोकांची अचानक कत्तल करा असा हुकूम दिला. तो देतांच दीन् ! दीन ! या अल्ला ! महंमद रसूलइल्ला, इन्शाल्ला इत्यादि शब्दोच्चार करून अंगांत वीरश्री आणून ते लोक त्या मराठे लोकांच्या बाजूला वळले. आपण संख्येनें अतिशय तेव्हां या मूठभर लोकांना तेव्हांच पकडूं किंवा त्यांची कत्तल करूं अशी घमेंड त्यांना फार होती हें उघडच होतें. मोगल शिपाई मोठ्या उत्साहानें मराठ्यांवर तुटून पडण्यासाठीं चालले होते. दिलेरखान त्यांच्याबरोबर होता. त्यानें किरातसिंगासही आपल्याबरोबर घेतलें होतें.

होतां होतां पुरंदरच्या अगदीं पायथ्याशीं मंडळी आली, तरी मराठे लोकांत कांहीं हालचाल दिसेना. त्यांचे हिलाल अगदीं कायम होते. आपण इतक्या जवळ आलों असतांही हे इतक्या निश्चलपणें बसले आहेत, हा विचारच दिलेरखानास कसासाच वाटला आणि तो एकदम चपापल्यासारखा झाला. आपल्याला या मराठ्यांनीं कांहीं तरी फसविलें असें त्याच्या मनांत आलें. त्यानें दोन हेर पुढें पाठविले आणि आपल्या लोकांस थांबण्याचा हुकूम केला. ते दोन हेर टेहळणी करून परत आले व त्यांनीं असें सांगितलें कीं "खानसाहेब, तेथें माणूस मुळींच नाहीं. नुसते शें दोनशें हिलाल जमिनींत पुरून जळत ठेवले आहेत ! आसपास सुद्धां माणूस नाहीं."

तें ऐकतांच दिलेरखान व किरातसिंग दोघेही फार चकित झाले. दिलेरखान शेवटीं ह्मणतो:—"हे लोक रोज एक नवीन शक्कल काढून मला फसवतात. दाद ह्मणून कांहीं लागूं देत नाहींत. किल्ला तर असा प्रचंड, कीं आह्मी असे कितीही दिवस राहिलों, तरी तो सुखानें किंवा कष्टानें कशानेंही आमच्या ताब्यांत येणार नाहीं. कांहीं तरी निराळीच शक्कल काढून जेव्हां आतां किल्ल्यावर मारा करावा तेव्हां खरा. काय शक्कल काढावी याचा मी पुष्कळ विचार करतों आहें. आज किल्ला घेईन, उद्यां घेईन, अशी घमेंड मनांत बाळगतों, परंतु हातून कांहीं घडत नाहीं याला काय करावें ?"

दिलेरखानाचें असें बोलणें ऐकून किरातसिंग त्याच्याकडे आश्चर्यचकित होऊन पाहूं लागला. आपला निर्बळपणा दिलेरखान अशा प्रकारानें कबूल करतो आहे हा त्याला अगदींच नवीन अनुभव ! कारण दिलेरखानाचें केव्हांही बोलणें घमेंडीचें असावयाचें ! परंतु घमेंडखोर माणसासही केव्हां केव्हां दुसऱ्यानें आपल्यास फसविलें असें दिसलें, म्हणजे मोठें चमत्कारिक होतें व त्याची घमेंड थोडीशी उतरून तो आपला निर्बळपणा कबूल करण्याच्या तारेंत येतो. तशीच स्थिति या वेळीं दिले-

रखानाची झालेली होती. मराठ्यांनीं ही आज एक नवीन शक्कल काढून आपणांस चकविलें, हें तर त्यास स्पष्ट दिसलें. तेव्हां अर्थातच त्या वेळेपुरती तरी त्याची घमेंड उतरून तो मनांत मोठा लाचार झाला. आजपर्यंत झालें तें झालें, आतां तरी आपण यांच्या फसवणुकीला न फसतां चार दिवसांत किल्ला हस्तगत करून घेऊं असें त्यास आजच वाटूं लागावयाला, आणि अशा तऱ्हेनें पुनः फसण्याला एकच गांठ पडल्या कारणानें त्यास आपल्या निर्बलतेबद्दल विशेषच वाईट वाटलें. अशी कांहीं मनाची स्थिति झाली ह्मणजे एकदम एखादे वेळ कांहीं उद्गार निघतात तसेच हे त्याचे उद्गार निघाले होते. किरातसिंगाजवळ याप्रमाणें तो बोलल्यानंतर त्यास एकदम आपण हें काय बोललों असें वाटूनच काय तो त्यास म्हणतो: " परंतु आतां यांचीं १२ वर्षं पुरीं भरलीं. यापुढें आतां त्यांनीं मला फसविण्याला त्यांना संधि ठेवतिच नाहीं. चार दिवसांत निकाल करतों. असा निकाल लावल्याखेरीज जयसिंगालाही आपला आवांका काय आहे हें समजून येणार नाहीं. पण हे नुसते हिलाल येथें पुरून जळत ठेवण्यांत या लबाडांचा हेतु तरी काय असावा? दुसऱ्या कोठें तरी जाऊन नासधूस करण्याचा तर त्यांचा कावा नव्हता? आम्ही या हिलालांनीं फसावें आणि इकडे यावें......"

इतकें बोलून त्यानें एकदम चपापल्याप्रमाणें केलें. त्याच्या मनांत एकदम कांहीं विचार आला. नंतर एकदम तो आपल्या लोकांकडे वळला आणि त्यांना पुनः आपल्या छावणीकडे परतण्याचा त्यानें हुकूम केला. लोक परतले. सुमारें हजार कदम गेले नाहींत तों त्यांच्या पिछाडीवर जबरदस्त मारा झाला. ते लोक तसे सावध नव्हते. आपण उगीच कांहीं तरी हुलकावणीनें इकडे आलों आणि परत चाललों याबद्दल सखेदाश्चर्य करण्याच्या भरांत होते तोंच त्यांच्यावर मारा झाला. तेव्हां तर त्यांच्या आश्चर्यास पारावारच नाहींसा झाला. आपण इतका वेळ येथें आहोंत, परंतु मनुष्याचा गंधसुद्धां आला नाहीं, पण पाठ वळली नाहीं तों सपाटून मारा सुरू झाला, तेव्हां हें आहे तरी काय? असें त्यास वाटून ते इकडे तिकडे पाहूं लागले. या रानांतल्या झाडांचीं माणसें झालीं, कीं दगडांतून माणसें निघालीं! हें आहे तरी काय? या आश्चर्यांतून बाहेर पडून ते लोक आपल्या शत्रूंशीं तोंड देण्यासाठीं मागें वळतात, तों काय चमत्कार! शत्रू पार नाहींसे झाले. अर्थातच आतां परत जावें, कीं शत्रू शोधून काढून त्यांजवर झोड उठवावी याबद्दल त्याजपुढें प्रश्न उभा राहिला. शेवटीं दिलेरखानानें एक तुकडी तेथेंच ठेवून ते चोर मराठे कोठें दडले असतील, त्यांची कत्तल उडविल्याखेरीज राहूं नका, असा त्यानें तीस हुकूम केला आणि अर्धी मंडळी घेऊन तो परत आपल्या छावणीकडे गेला. त्याला अशी खास शंका येत होती, कीं हे जे लोक येथें टेंभे ठेवून नाहींसे झाले, ते आपल्या छावणीवर हल्ला करून तेथील दाणागोटा नाहींसा करण्याकरितांच गेले असावे. ही त्याची शंका त्याच्या मनास एक-

सारखी जाचत होतीच. आपण या लोकांच्या या हुलकावर्णास फसून इकडे आलों, ही फार मोठी चूक केली असें त्याच्या मनानें घेतलें आणि जितक्या गर्दीनें त्यानें आपलें सैन्य त्या हिलालांच्या बाजूला नेलें, त्याच्या दुप्पट गर्दीनें त्यानें आपल्या लोकांस परत नेलें. छावणीजवळ येतात तों एकच हलकल्लोळ छावणींत उडाला असावा असें त्यास स्पष्ट दिसून आलें. त्याला वाटूं लागलेली भीति अगदीं खरी ठरली. ते जे लोक नाहींसे झाले ते छावणीवर आले. छावणींत बाजारबुणगे आणि जनाना यांखेरीज दुसरें कोणी नव्हतें. आपण किल्ल्यावरून खालीं उतरलों आहों, असें भासवून आपल्या सैन्यास हुलकावणी देण्यासाठीं गुलामांनीं हिलाल हातांत घेतले, आणि एके बाजूस जाण्याचा बेत दाखवून तिकडे जाऊन हिलाल जमिनींत पुरून ठेवले. दुरून कोणास असें वाटावें, कीं कोणी तरी लोक तेथें बसून कांहीं तरी विचार करीत आहेत. असें वाटलें म्हणजे यांची एकदम कत्तल करूं अशी आशा उत्पन्न होऊन मोगलांचे लोक उठून तिकडे जातील. त्यामुळें अर्थातच छावणी मोकळी पडेल. छावणी मोकळी पडली, कीं आपण तिच्यावर छापा घालावा, असा मराठ्यांचा एकंदर कावा दिलेरखानाच्या आतां ध्यानांत आला. परंतु आतां तो ध्यानांत येऊन काय उपयोग होता. मराठ्यांनीं छावणीची चांगलीच लुटालूट करून ते नुकतेच पळून गेले होते. त्यांच्या मागोमाग दिलेरखानानें आपले लोक पाठविले, परंतु उपयोग काय ! डोंगरावर नेहमीं स्वच्छंदानें राहणाऱ्या हरिणांप्रमाणें उड्या मारीत ते लोक केव्हांच नाहींसे झाले.

हा झालेला एकंदर प्रकार पहाण्याबरोबर दिलेरखानाच्या अंगाचा अतोनात संताप झाला. परंतु ती वेळ विचार करण्याची नव्हे. कोठें कोठें काय झालें, काय आहे, तें पहाण्यासाठीं त्याला सबंध छावणी हिंडणें जरूर होतें. छावणी जेथें दिली होती, त्या छावणीच्या शिंवेवरच त्यास हा सर्व प्रकार समजला. तेव्हां कोणाचें काय झालें आहे याचा पक्का तल्लास लागेपर्यंत आपल्या शमीआन्यांत जाऊन बसणें त्यास उचित नव्हतें. तो अतिशय खिन्न व संतप्त झाला होता, तरी त्यानें हें आपलें कर्तव्य करण्यांत कसूर केली नाहीं. तो ठिकठिकाणीं जाऊन चौकशी करीत होता, इतक्यांत त्याच्या जनान्यावरील मुख्य खोजा अबदल्ला मगरूर हा त्याच्या पुढें येऊन त्यानें त्याच्या पायावर अंग टाकलें व तोंडानें म्हणेः " खाविंद, गरीब परवर, मी आतां या तोंडानं काय बोलूं ? आतां माझ्या तोंडून काय तें ऐकण्यापेक्षां माझी आधीं गर्दन् छाटा. गर्दन् छाटल्यावर माझं मुंडकं व मढ कोल्ह्याकुत्र्यांना खायला टाका. माझ्याइतका नादान कोणी नाहीं. मी आपला सर्वस्वी अपराधी. बंदा गुलाम तर आहेच. तेव्हां झाल्या गोष्टीबद्दल आपण मला मारून टाकण्याची शिक्षा दिली, तरी त्यांत अणुभरही अन्याय होणार नाहीं."

इतकें बोलून अबदल्लानें आपली मान त्याच्या पायांवर ठेवली. दिलेरखानाला

कांहीं उमगेनाच. हा अबदल्ल्या आपल्या जनानखान्यांतून येथें आला कशाला ? आणि ही एवढी लांबलचक हकीकत सांगतो आहे काय ? गर्दन् छाटा म्हणतो काय ? कांहीं लक्ष्यांत येईना. तेव्हां त्यानें आपल्या पायाची एक ठोकर मारून त्यास म्हटलें: " ऐ गव्हार ! विवळतो आहेस काय, आणखी करतो आहेस काय ? काय झालं तें नीटपणें तुला आधीं सांगतां येत नाहीं काय ? ऊठ, नाहीं तर........."

" नाहीं तर—काय सरकार ? " अबदल्ला त्यास विचारतो. " माझी गर्दन् एकदम छाटून टाका ही तर मी आपल्याला विनंति करतों आहें. याहून आपण आणखी काय करणार ? खरोखर जी गोष्ट झाली, त्यांत माझा वांक कांहीं नाहीं. पण आपल्याला मी तें सांगून काय उपयोग होणार आहे ? जी गोष्ट झाली, ती माझ्या कसूरीनं झाली, असंच तुम्ही धरून चालणार; आपण माझी मग तरी गर्दन् उडवणारच ती आतांच उडवा. " असें म्हणत त्यानें एकीकडे किरातसिंगाकडे डोळे मिचकाविले. किरातसिंग तें पाहून विस्मय पावला असें दिसलें. परंतु हा प्रकार दिलेरखानाच्या लक्षांत मुळींच आला नाहीं. त्यानें त्या खोजास आणखी एक जोराची लाथ मारून उठून उभें राहण्याबद्दल दरडाविलें, त्याबरोबर तो अर्धवट उभा राहिला. परंतु पुनः लाचारी दाखवून ओणवा होऊन दोही दोही हातांनीं कुर्निसा करीत म्हणतो: " सरकार, कां उगीच गरिबाला जिवाची आशा लावतां ? जें काय घडलं आहे, तें असं आहे, कीं आपण त्याबद्दल मला केव्हांही क्षमा करणार नाहीं. जीवेंच माराल. मग चार घटका तरी कां ठेवतां ? खाविंद, झाल्या गोष्टींत माझी खरोखर कसूर नाहीं. आपणच पहा मी एकटा किती संरक्षण करणार होतों ? त्यांतूनही धडपड केली, पण मला त्या लोकांनीं अडकवून धरलं. कांहीं इलाज चालेना. मी तरी काय करणार. तरी मी चार लोकांना लोळवलं, आठ लोकांना पाणी पाजलं, सोळांना जखमी केलं. आणखी काय करूं ! सांगा. त्यांनीं घोड्यावर घालून त्यांना नेलं. मी घोड्यापुढें सुद्धां लोळण घेतली, परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. माझ्या अंगावरून उडी मारून घोडा गेला. "

हें अबदल्ल्याचें बोलणें ऐकून त्या तशा प्रसंगींही कोणास हंसूं आलें असतें. परंतु तो जें बोलत होता त्यांतील एका वाक्यानें दिलेरखानाची फारच त्रेधा उडाली. तें वाक्य " त्यांनीं घोड्यावर घालून त्यांना नेलं " हें होय. तें वाक्य ऐकण्याबरोबर जसा एखादा घोडा त्याच्या जवळ कोठें एकाएकीं बार झाला असतां चमकून उडी मारतो, तशीच दिलेरखानाची अवस्था झाली. तो एकदम ओरडून त्यास म्हणतो: " त्यांनीं म्हणजे कोणीं ? आणखी त्यांना म्हणजे कोणाला ? बोल. बोल. "

" काय बोलूं ? माझ्यानं बोलवत नाहीं, मग काय बोलूं ? "

" बोल, नाहीं तर तुझी आत्तां गर्दन् छाटून टाकीन. "

" मीं तर आल्याबरोबर आपल्या पायीं लोळण घेऊन आपल्याला विनंति केली, कीं माझी गर्दन् छाटून टाका. आतां आपण छाटणार असलां तरी होऊं द्या. ही गर्दन आपल्यापुढें आहे. या बाजूनं छाटणार, कीं या बाजूनं? बोला.पण......"

" ऐ सूवर, तुला काय वाटतं जनान्यांत मी चैनीनं बसलों असतांना तूं जशा चेष्टा करतोस, तशा चेष्टा पहायची आणखी तुझ्या मूर्खपणाच्या थट्टा ऐकायची ही वेळ आहे काय? ऊठ, नीटपणानं काय तें सांग. माझ्या काळजाला विंचू लागल्या-सारखं झालं आहे आणखी तूं वेळ अवेळ मनांत न आणतां मूर्खपणाचीं भाषणं करतो आहेस, तेव्हां तुला काय ह्मणावं? चल बोल. नीट बोल...... "

अबदुल्ला अगदीं रडें आल्याप्रमाणें करून ह्मणतोः "खाविंद, आतां मी काय सांगूं! जें होऊं नये ह्मणून आपण इतकं जपत होतां तेंच झालं. दुसरं कांहीं नाहीं.... "

" बोल, नीट बोल, नाहीं तर आतां तुझीं शंभर वर्षं भरलीं असं खात्रीनं समज. घोड्यावर घालून कोणीं कोणाला नेलं? बोल, तुला मारण्याचा माझ्या हाताला विटाळ होऊं देऊं नको. संतापाच्या भरांत काय होईल याचा नेम नाहीं."

" मी मरणाला कुठें भितों आहें? भिऊन तरी काय होणार! ज्या वेळीं माझ्या देखत त्यांनीं त्यांना नेलं, त्याच वेळीं आपलं मरण आलं असं माझं मला कळून चुकलं. "

त्याच्या तोंडून हे शब्द निघण्याबरोबर दिलेरखानानें त्यास एक सपाटा मारून खालीं पाडलें—आणि तो तसा पडल्याबरोबर त्याला आणखी एक लाथ मारून मोठ्यानें ह्मटलेंः " अरे या गव्हाराला कोणीं नीट बोलायला लावील काय? हा पाजी ह्मणतो आहे तरी काय? "

त्यावरोबर अबदुल्ला त्यास ह्मणतोः "दुसरा कोण बोलायला लावायला पाहिजे? मीच बोलतों आहेना? काय बोलूं आणखी? आपली मुलगी नूर एल् हुदा हिला मराठ्यांनीं बळंच घोड्यावर घालून नेलं. माझ्याकडून तिच्या संरक्षणाकरितां जितका प्रयत्न करवला तितका मीं केला. कितो तरी लोक मारले, परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. मी तरी काय करूं? आपण जनान्यांत जाऊन काय हाहा-कार उडाला आहे तो पहा!"

परंतु नूर एल् हुदा हिला मराठ्यांनीं नेलें एवढे शब्द ऐकण्याबरोबर दिलेरखा-नाचें देहभान नाहींसें झालें. त्यानें आपल्या हातची तलवार अबदुल्लयास ठार मारण्यासाठीं उपसली. आतां त्याच्या अंगावर घाव घालणार, इतक्यांत किरा-तसिंग पुढें होऊन दिलेरखानाचा हात धरून ह्मणतोः " छे. छे. आपल्यासारख्या शूर पुरुषाचा हात खोजाच्या रक्तानं विटाळूं नये. शिवाय आपण विचार करा, कीं त्यानं काय करावं? आपण त्या मराठ्यांच्या हुलकावणीस भुलून एकदम सारेजण छावणी सोडून गेलों, मागें कांहीं भयंकर प्रकार होईल ही कल्पनाही आपल्याला नाहीं, याचं उट्टं या भिकार माणसावर कां काढतां? "

इतकें नुसतें बोलून किरातसिंग थांबला नाहीं. तो त्या अबदल्लयाजवळ गेला, आणि त्यानें त्याला डोळ्याची खूण करीत एक लाथ मारून जोरानें ह्मटलें: "चल, ऊठ, आपल्या धन्यापुढें आपलं काळं तोंड फार वेळ ठेवूं नको. फुकट मरशील. चालता हो."

पडत्या फळाची आज्ञा घ्यावी त्याप्रमाणें अबदल्लयानें केलें. तो तेथून तत्काळ फरारी झाला. दिलेरखान संतापानें अंध झाला होता. त्याचें चित्त ठिकाणावर नव्हतें. आपला हात किरातसिंगानें धरला आहे, या पलीकडे त्याला कांहीं दिसत नव्हतें. अबदल्ला फरारी झाला हें त्यास दिसलेंही नाहीं. "ऐ सैतान, सैतान् तुझी ही अवलाद् इतकी वाईट असेल ही कल्पनासुद्धां मला नव्हती. मला लोक असं सांगत आले, कीं मराठे लोक बायकामुलांना बोट लावीत नाहींत. आणखी आज तर प्रत्यक्ष माझी मुलगी, माझा प्राण, माझ्या जिवाचा सगळा आधार त्यांनीं अशा गफलतीनं नेला. आतां यांचं मी कोणत्या तऱ्हेनं पारिपत्य करूं? एकएक माणूस धरून जिवंत तेलाच्या कढईत टाकीन तरी सुद्धां माझा आत्मा शांत होणार नाहीं. ऐ माझा कालिजा नूर एल हुदा तुला त्या चांडाळांनीं नेलं तरी कुठें? काय सगळे लोक इथें मेले होते? त्यांना कांहीं करतां आलं नाहीं? या त्यांच्या कृत्याबद्दल मी सगळ्यांची कत्तल करीन, कधीं सोडणार नाहीं," अशी बडबड त्यानें चालविली. आपण काय बोलतों आहोंत, याचें त्याला कांहीं भान राहिलें होतें कीं नाहीं समजणें शक्य नव्हतें. आपण मराठ्यांचें शासन करण्यासाठीं गेलों असतां, आपल्या गोटांत मराठ्यांनीं शिरून आपला असा उपमर्द केला, याबद्दल त्याच्या अंगाची लाही उडाली. त्या सर्व प्रांताला आग लावण्याचें जर त्याच्या हातीं असतें, तर त्यानें तसें जरूर केलें असतें, अशी त्याच्या मनाची विलक्षण स्थिति झाली होती. आतां छावणींतील दुसऱ्या कोणाचें काय नुकसान झालें याचा शोध करण्याचें त्याच्या मनांतही राहिलें नाहीं. तो तडक आपल्या डेऱ्यावर गेला. तेथें त्यानें शोध करतां त्यास एवढेंच दिसलें, कीं आपला खजिना लुटला, गवताच्या सांठ्यास आग लावली आणि धान्याधुन्याच्या कोठ्या पार लुटल्या. कोणाही माणसास—पुरुषासही फारसा त्रास पोंचला नाहीं. बायकांच्या तर वाटेसही कोणी गेलें नाहीं. जो गरीबीनें न घेतां जोरावर येईल, त्याच्यावर मात्र शस्त्र उगारलें जाऊन त्यास लंबे करण्यांत आलें. जनान्यांत जीं माणसें शिरलीं, त्यांनीं तर नूर एल हुदा हीस घोड्यावर घालून नेण्यापलीकडे कांहीं केलें नाहीं. तिच्याखेरीज कोणास स्पर्श केला नाहीं. या त्यांच्या करण्यांत हेतु तरी काय? दिलेरखानाला एकच हेतु दिसला. नूर एल हुदा हिचें सौंदर्य असें होतें, कीं तिच्यावरून सर्व जग ओंवाळून टाकावें. ती आपल्या पित्याचा जीव कीं प्राण होती. वयानें अगदीं तरुण—नव्हे बाला—सतरावें वर्ष लागलें असेल नसेल. त्याची इच्छा अशी, कीं बादशहा आपला व्याही व्हावा आणि नूर एल हुदा हिच्या सौंदर्यामुळें तें केवळ अशक्य

होतें असेंही नव्हे. इतकेंच नव्हे, तसा योग जुळून येईल असा रंगही दिसत होता; परंतु मध्येंच हें विलक्षण विघ्न उपस्थित झालें, तेव्हां त्याच्या अंगाची लाही लाही होऊन मराठ्यांचा समूळ नाश करून टाकण्याची त्यानें प्रतिज्ञा करावी यांत नवल काय ? आपली मुलगी नाहींशी झाली, तिला मराठ्यांनीं नेलें, असें पहातांच त्याचें सर्व लक्ष्य ती कोठें असेल, तिला कोठें नेलें असेल, याचा तलास लावण्याकडे लागलें. आपल्या छावणींतला दाणागोटा व खजिना किती गेला, याचा त्याला पत्ताही लावण्याची आतां इच्छा राहिली नाहीं. लोक येऊन त्याला वर्दी देतच होते, तो ऐकतच होता. परंतु लक्ष्य सगळें पोरगी कोठें गेली या शोधाकडे होतें. त्यानें आपल्या लोकांच्या शंभर शंभराच्या दहा वीस टोळ्या करून जिकडे तिकडे पाठविल्या. किरातसिंगानें त्यास ".नूर एल् हुदा बेगमेस मराठ्यांनीं आपल्या किल्ल्यावर नेलं असेल, दुसऱ्या कुठें नेलं असण्याचा संभव नाहीं. उगीच सगळ्या देशभर माणसांची दौड करण्यांत अर्थ नाहीं" असें सुचविलें. परंतु त्याच्याकडे लक्ष्य देतो कोण ? उलट दिलेरखान त्याच्याच अंगावर दरडावून ओरडून म्हणाला, "तुझं कोरडें पांडित्य मला नको. मघापासून मी बोललों नाहीं, पण मूर्खा माझ्या समोर नुसतं पांडित्य करण्यापेक्षां त्या माझ्या कलिजाला परत आणशील, तर मला तुझ्याबद्दल कांहीं तरी आदर उत्पन्न होईल. जा. आलास तसा जा. माझ्या गोष्टी जयसिंगाला सांगाव्या, जयसिंगाच्या मला सांगाव्या, याच्या पलीकडे तुझ्या अंगांत कांहीं कर्तबगारी दिसत नाहीं. माझ्या काळजाचे तुकडे तुकडे झाले आहेत आणखी तूं मला नुसतं पांडित्य सांगतोस. जिवावर उदार होऊन त्या मरगट्ट्यांच्या हातून तिला सोडवून आणायला तयार असशील, तर पुनः तोंड उघड, नाहींपेक्षां आपलं तोंड काळं कर."

किरातसिंगाची आतांपर्यंतची समजूत अशी होती, कीं आपल्याला दिलेरखान अशा प्रकारें उपमर्दाचे शब्द कधींही बोलणार नाहीं. परंतु त्याची ती समजूत या भाषणानें एकदम नाहींशी झाली. त्या उपमर्दकारक भाषणानें त्याला फार संताप आला. त्याचा हात त्याच्या तलवारीकडे जाण्यास उत्सुक झाला. परंतु विचार लागलींच आड आला व तो दिलेरखानास अगदीं शांतपणें म्हणालाः "आपण मला बोललांत, त्याचा मी राग धरीत नाहीं. आपलं मन ठिकाणावर नाहीं. एक तर मुलगी शत्रूंनीं नेली, आणखी आपण शत्रूच्या हुलकावणीला फसलां. तेव्हां मी जातों. आपण बोललां तें अगदीं विसरून जातों."

"कोणी कितीही उपमर्दाची बोलणीं बोलला, तरी मुकाट्यानं सहन करून घेऊन आपलं तोंड काळं करायचं नाहीं तर निर्लज्ज बनायचं याच्यापलीकडे रजपुतांना येतें आहे काय ? जा, तुला मी येथून जिवंत जाऊं देतों हेंच भाग्य समज. जास्त वेळ उभा राहशील तर माझ्या हातून संतापाच्या भरांत काय होईल याचा नेम नाहीं. तेव्हां जाणं हाच तुला उत्तम मार्ग आहे."

हें आणखी उपमर्दाचें भाषण ऐकून पुनः किरातसिंग त्याला म्हणतो: " ! दिलेर-खान हें असं मला बोलनाहेत अशी माझी समजूतच नाहीं. दिलेरखानाच्या अंगांत कोणी जीन शिरून बोलतो आहे हें जाणून मी ज्यास्त बोलत नाहीं. बाकी नूर-एल्हुदा हिला मराठ्यांनीं नेलं असलं, तर त्याबद्दल सूड उगवायला माझे हात कांहीं कमी सिद्ध आहेत असं समजूं नका. जर कधीं काळीं तिचा तपास लागला, तर तो मीच लावीन. मीच तिची आणि तिच्या बापाची भेट करवून देईन. आजच्या माझ्या येण्याचा परिणाम भलताच्या भलताच झाला, त्याला माझा इलाज नाहीं. येतों आतां. " असें ह्मणून किरातसिंग तेथून निघून गेला.

दिलेरखानानें त्याचें बोलणें ऐकलें नाहीं. किंबहुना त्या वेळीं त्याच्या मनाची अशी स्थिति झाली होती, कीं कोणी कांहीं बोललें असतें, तरी त्याला ऐकूं आलें नसतें. किरातसिंग त्याच्या समोरून निघून गेला. दिलेरखानानें शेंकडों लोक चारी दिशांस पाठविले आणि तो स्वतःही आपल्या पोरीच्या शोधाकरितां धडपडत होता. आपल्या गोटांतून आपल्या कट्ट्या शत्रूंनीं आपली दिव्य सुंदर कन्या बळजबरीनें नेली, ही नुसती कल्पनाच त्याला किती तरी भयंकर वाटली. एखाद्यानें त्याला जर असें सांगितलें असतें, कीं मराठे लोक यमाच्या तोंडांत शिरले आणि त्यांनीं त्याची दाढ उपटून नेली, तरी देखील त्याला एक वेळ तें खरें वाटलें असतें; आपल्या तोंडांत मारून त्यांनीं आपल्या पोरीला येथून नेलें, हें त्यास किती तरी अशक्य वाटलें. परंतु तसें झालें असें तर लोकांनीं त्याला स्पष्ट सांगि-तलें, तेव्हां त्याच्या मनाची स्थिति किती चमत्कारिक झाली असेल ! मराठ्यांचा त्यास आधींच अतोनात राग होता. तशांत आणखी हा भयंकर प्रसंग झाला, मग काय विचारतां ! मी या मरगट्ट्यांना जमीनदोस्त करून टाकीन, तर नांवाचा दिलेर-खान होईन, अशी त्यानें प्रतिज्ञा केली.

त्याचे लोक सगळीकडे सैरावैरा हिंडून आले. कोठें त्याच्या मुलीचा तपास लागेना. मराठ्यांनीं तिला किल्ल्यावर नेऊन ठेविलें असाच सान्यांचा समज झाला. तेव्हां आपण इकडे तिकडे भटकण्यांत कांहीं अर्थ नाहीं असेंच ज्याला त्याला वाटलें. नूर एल् हुदा ही खरोखरीच स्वरूपानें परीसारखी आहे अशी ख्याति सर्व सैन्यांत होती, तेव्हां ती नाहींशी झाल्यामुळें सर्वांना मनापासून वाईट वाटलें यांत यत्किंचि-तूही शंका नव्हती.

परंतु आपली कन्या नाहींशी झाली, मराठ्यांनीं तिला नेलें, असें पाहून चड-फड धडपड करणाऱ्या दिलेरखानास सोडून आपण आतां किरातसिंगाबरोबर जाऊं.

किरातसिंग दिलेरखानापासून निघाला तो आपल्याबरोबर आणलेल्या आपल्या अनुचरांस घेऊन आपल्या छावणीकडे जाण्यास ह्मणून निघाला. दिलेरखानाची छावणी सोडून तो आपल्या मार्गाला लागल्यावर थोड्या अंतरावर जाऊन त्यानें शीळ घातली. ही शीळ घालण्याचा हेतु काय हें अर्थातूच त्याच्या अनुचरांस

समजलें नसावें, कारण ते कावरेबावरे होऊन इकडे तिकडे पाहूं लागले. इतक्यांत एका झाडाआडून एक सिद्धी त्याच्या पुढें उभा राहिला व दोनही हात जोडून त्यास म्हणतोः " खाविंद आज आपण वांचविलेला जीव आतां यापुढें आपलीच सेवा करणार. केली ही सेवा कांहींच नाहीं. आपण सांगितलेल्या संकेताप्रमाणें सारं काम बेमालूम झालं. इतके दिवसांची दोघांची इच्छा एकदांची सफल झाली. आतां ती शेवटपर्यंत कशी सिद्धीस जाईल, हें आपल्यावर आहे. आपल्याला अभिवचन दिल्याप्रमाणें मी बरोबर सारं केलं. आणखी त्यांत मराठ्यांच्या या हुलकावणीची ऐन वेळीं भर पडायची होती, ती पडली! आणखी काय पाहिजे? ही मराठ्यांची हूल या वेळीं फारच वेळेवर आपल्याला मदत करायला आली. ती जर न येती, तर सगळी छपवाछपवी व्यर्थच झाली असती. कारण दुसऱ्यावर घालायला ही संधि चांगली सांपडली. भरींत भर पडली. आतां आपण काय शक्कल लढवणार ती लढवा! "

" अरे हो. अरे हो. अबदल्ल्या, गुलामा तुला कांहीं अक्कल नाहीं. केवढ्यानं बोलतोस. दुसऱ्या कोणाला कांहीं समजलं त्यांतलं तर? "

" काय? आपल्या ह्या लोकांपैकीं कोणाला कांहीं समजलं तरीसुद्धां आपल्याला भय वाटतं? हीं तर माणसं तुमचींच आहेत ना? हीं तुमच्या जिवाला जीव देणारीं ना? "

" अरे मूर्खा, या दिवसांत कोणी कोणाच्या जिवाला जीव देत नाहीं. घ्यायला सगळे आहेत. जो तो आपलें साधीत असतो. मी जसं आपलं काम साधण्याकरितां एवढा खटाटोप केला, तूं जसं आपलं काम साधण्याकरितां खटाटोप केलास, तसाच दुसऱ्या कोणाच्या मनांत कांहीं हेतु साधायचा असं आलं, तर तो ही आपली गुप्त बानमी फोडून आपला हेतु साधील! कां? मी म्हणतों तें खरं कीं नाहीं. बेट्या, या जगांत इमान कसलं आणखी काय कसलं? जोंपर्यंत आपलं काम साधायचं आहे, तोंपर्यंत इमान. काम साधायची वेळ आली, कीं मग रे कसलं आलं आहे इमान? माझ्याशीं तूं इमान राखलंस, पण धन्याशीं बेइमान झालास कीं नाहीं? बोल. तेव्हां इमानाच्या गोष्टी बोलूं नकोस. तुझं काम साधलं, माझं साधलं, असं ह्मण, पण तेंही मोठ्यानं बोलूं नको. आपण या भानगडींत आहोंत. नूर एल्हुदा हिला खरोखर मराठ्यांनीं नेलं नाहीं, आपण पळवलं असं कळून त्या माहितीचा फायदा घ्यायचा असं जर माझ्या शिपायांपैकीं कोणाच्या मनांत आलं, तर काय होईल याचा काय नेम सांगावा? तें कांहीं नाहीं. पकडून आणलेली मैना तिच्या पिंजऱ्यांत जाऊन पडली ह्मणजे आपण मिळवली. मग किती जरी बभ्रा झाला, तरी त्याबद्दल आपल्याला काळजी नको. पुढचं पुढें काय तें पाहून घेणारे घेतील. ... ... "

हें किरातसिंगाचें बोलणें अगदीं हळू चाललें होतें. त्याच्या अनुयायांस कांहीं ऐकूं येत नसावें. निदान ऐकूं येतें आहे असें त्यांच्या वर्तनावरून

दिसलें नाहीं. कदाचित् असेंही असेल, कीं थोरांच्या पदरच्या माणसांच्या नेहमीं-च्या वर्तनाप्रमाणें त्यांना कान असूनही ऐकूं येत नाहीं असें दाखवावें लागत असेल.

अबदुल्ला त्याचें तें भाषण ऐकून म्हणालाः "सरकार, आपण ह्मणतां ती गोष्ट खरी, पण मी आतां ही घोरपड आपल्या गळ्यांतून काढायची काय करूं? मला जर तुह्मी लवकर औरंगाबादेला नेऊन पोंचविलं नाहीं, तर माझी काय स्थिति होई-ल? खान मला आतां क्षणभर तरी जिवंत ठेवील काय? त्याचं काळीज कापून आणून तुमच्याजवळ दिलं, आणखी......"

"अरे हो, अरे हो, मला काय हें सारं ठाऊक नाहीं असं समजतोस? मीं त्याबद्दल सगळी तजवीज केली आहे." असें म्हणून त्यानें आपल्या अनुयायांपैकीं दोघांस जवळ बोलाविलें आणि त्यांच्या कानांत कांहीं कुजबुजून भाषण केलें. त्यांपैकीं एकानें मान डोलवून आपल्या कमरेचें शिंग घेऊन मोठ्यानें फुंकलें. शिंग फुंकून सुमारें पाव घटि-का झाली असेल नसेल, तों सुमारें पन्नास घोडेस्वार एकदम दौड करीत पुढें येऊन उभे राहिले. त्यांच्यापैकीं एकजण एकदम किरातसिंगाच्या पुढें उभा राहून त्यास अत्यंत नम्रपणें सलाम करून ह्मणालाः "महाराजांच्या आज्ञेप्रमाणें मी आपल्या लोकांसह हजर आहें. म्याना आणायला सांगितला होता तोही तयार आहे. पुढला हुकूम होईल त्याप्रमाणें करायला बंदा तयार आहे."

किरातसिंगानें त्यास जवळ बोलावलें व त्याच्या कानांत कांहीं सांगितलें. त्यानें-ही "आज्ञेप्रमाणें अक्षरशः करतों" असें आश्वासन दिलें आणि तो अबदुल्लाकडे वळून त्यास म्हणतोः "सरकारस्वारींनीं सांगितल्याप्रमाणें आह्मांला तुझ्या आज्ञेंत रहायचं आहे. तूं सांगशील तिकडे येतों."

थोड्याच वेळांत अबदुल्ला व त्याचे ते घोडेस्वार तेथून निघून गेले.

ते गेल्यानंतर किरातसिंगही आपल्या मार्गाला लागला. योग्य वेळानें तो आप-ल्या छावणींत येऊन दाखल झाला. आपल्या पश्चात् कांहीं अधिकउणें घडलें कीं काय, याबद्दल त्यानें चौकशी केली. तों कांहीं विशेष घडलें नाहीं असें त्यास कळलें. नंतर थोड्या वेळानें त्यानें पुनः कांहीं व्यवस्था करावयाची ती करून जयसिंगाकडे जाण्याची तयारी केली. आणि तो तिकडे जाण्यास निघाला व थोड्या वेळांत जाऊन पोंचलाही. तो दिवस दिलेरखानाकडे गेल्यापासूनचा चवथा किंवा पांचवा होता. जयसिंगाच्या छावणींत आल्यानंतर त्यानें आपण तातडीनें भेटण्यास आ-ल्याबद्दलचा निरोप जयसिंगास पाठविला. निरोप पोंचतांच जयसिंगानें कपाळास आंठ्या घालून आपल्याशीं ह्मटलें: "या तरुण पोरास सांगितल्या हुकुमाप्रमाणें वागायला नको. कांहींना कांहीं तरी आपली अक्कल चालवायला पाहिजे. याच्या मनांत कांहीं तरी विचार आला असेल, लागलीच आपली जागा सोडून आला धांवत इकडे. आतां इथें याला जरासं चमकावलं पाहिजे." नंतर मोठ्यानें त्यानें त्यास आपलेकडे आणण्याबद्दल चोबदारास सांगितलें, लागलीच किरात-

सिंग आंत आला व जयसिंग त्यास कांहीं बोलणार, तों तो स्वतःच मोठ्यानें आणि कपाळाला पुष्कळशा आंठ्या घालून ह्मणतोः

" महाराज, आपली आज्ञा आह्मीं ऐकायची, कीं खानसाहेबांची, याचा एकदां निकाल लावून दिला, तर आमची गरिबांची त्रेधा तरी उडणार नाहीं. आपण बोलावून अमुक काम कर ह्मणून सांगितलं, आह्मीं करायला तयार आहोंत. त्यांच्याकडे जाऊन ते काम सांगतील तें कर, असा हुकूम असला तर तोही आह्मांला कबूल; पण एक काय तें अगदीं निखालस कळलं पाहिजे. परवां आपली आज्ञा घेऊन गेलों. छावणींत जाऊन थोडं हुश्श असं करून बसतों तों खानसाहेबांचा हुकूम आला कीं, " अबीकेअबी बुलाया ! " असा संताप आला, कीं साफ नाहीं येत ह्मणून सांगून पाठवावं, पण मातीच्या भांड्यानं तांब्याच्या भांड्याशीं कुठें कधीं टक्कर मारली आहे ! चुंबित उठलों आणखी रखडत गेलों. जाऊन पोंचलों. बराच वेळ खाशांची गांठच पडली नाहीं. शेवटीं एकदांची मुलाखात झाली. माझ्यावर नजर पडण्याबरोबर सलामी ही ! 'क्यों किरातसिंग ! कांहीं फितुरीचा मामला सुरू झाला आहे कीं नाहीं? तुह्मीन् तो शिवाजी एक होऊन आमची करा अफजुलखानासारखी व्यवस्था ह्मणजे झालं. पण सांगा तुमच्या जयसिंगांना, कीं मी असा फसणार नाहीं. असा फितुरीचा कांहीं मामला सुरू झाला आहे अशी अफवा माझ्या कानीं येऊं मात्र द्या, कीं एकदम आपल्याला गिरफदार करीन.' हें मी आपल्याजवळ येऊन सांगण्यांत कांहीं चुगल्या करतों असं नाहीं. हें त्यांचं भाषण चारचौघांसमक्षच झालं ह्मटलं तरी चालेल. हा प्रकार आहे काय ? बरं तेवढ्यानं संपलं नाहीं. मला त्यांनीं सांगितलं, 'मी देतों हा लखोटा घेऊन तूं स्वतः औरंगाबादेला जा.' मीं सांगितलं, 'मी मिर्झाराजांच्या आज्ञेप्रमाणें वागेन. त्यांचा हुकूम झाला तर मी जाईन, नाहींपेक्षां मला जातां येणार नाहीं.' माझ्या तोंडून हे शब्द निघाले मात्र. आणखी मग त्यांच्या बडबडीला जी सुरुवात झाली आहे, ती विचारूंच नका. मी ती आपल्याला सांगतच नाहीं. तेही मोठे, आपणही मोठे. वेळ आली ह्मणजे आपण आणखी ते एक व्हाल आणखी आमच्यासारखे गरीब खोटे ठरून तोंडघशीं पडूं. त्यापेक्षां गप्प बसलेलं काय वाईट ? खानसाहेबांच्या हुकुमाप्रमाणें मी औरंगाबादेला जाऊं कीं काय एवढंच विचारण्यासाठीं आलों आहें. कां कीं आह्मी आपल्याला मानतों. आपण जा ह्मणून सांगितलं, चाललों. नको ह्मटलं, तर परत आपल्या ठिकाणावर जाऊन बसतों ! "

त्याचें तें भाषण ऐकून मिर्झाराजे कांहीं वेळ स्वस्थ बसले. त्यांच्या कपाळास आंठ्या चढल्या. त्यांनीं आपले दांत घट्ट मिटून धरले. नंतर आपल्या तोंडावरून हात फिरविला. दाढीवरून हात फिरविला. कोणीकडे तरी पाहिल्याप्रमाणें त्यांनीं केलें, आणि ह्मटलें: " त्यांनीं तुला बोलावणं पाठविलं, तेव्हांच तूं माझ्याकडे येऊन विचारायचं

होतंस. तें तूं केलं नाहींस. आतां त्यांनीं तुझ्या हातीं लखोटा दिला तो पोंचवि-ण्याबद्दल कबूल केल्यासारखं करून तूं तिकडून इकडे आलास. आतां तो तूं पोंचविलाच पाहिजेस. लखोटा कोणाच्या नांवचा आहे ? "

" आपणच पहा. पण थैली मोहरबंद आहे. तेव्हां आपण उघडून पाहिल्याखेरीज काय समजणार ? मला कोणाजवळ देण्याबद्दल हुकूम आहे तें पाहिजे असल्यास सांगतों. "

" सांग सांग. " मिर्झाराजे अतिशय उद्वेगानें व तिरस्कारानें ह्मणालेः

किरातसिंगानें त्यांच्या कानांत हळूच कांहीं नांव सांगितलें. तें ऐकतांच जय-सिंगाचे ते सूक्ष्म हृदयमर्मभेदी नेत्र विशेष विस्तारले. त्याच्या मनांत कांहीं तरी विशेष विचार आला असावा. त्यामुळें त्यांनीं आपल्याशींच मान तुकावली. नंतर एकदम ह्मणतात. " जा. ज्याला ती थैली द्यायला सांगितली आहे त्याला ती नेऊन दे. कांहीं हरकत नाहीं, परंतु या थैलींतल्या लखोट्यांत काय आहे हें मात्र मला सांगितल्याखेरीज राहूं नको. तुझ्या ठिकाणीं माझा विश्वास किती आहे, हें तुला माहीत आहेच. तेव्हां मी आतां कांहीं जास्त सांगायला पाहिजे असं नाहीं. जा. "

" ठीक आहे. " असें ह्मणून किरातसिंग उठला. त्याच्या चेहेऱ्यावर हास्य दिसूं लागलें होतें. तें इतकें स्पष्ट होतें, कीं जयसिंगानें त्यास हंसतोस कां ह्मणून शेवटीं विचारलें, तेव्हां तो हात जोडून त्यास ह्मणतोः " सरकार क्षमा करा, क्षमा असेल, तर हंसण्याचं कारण मी सांगतों. "

" सांग " अशा अर्थी त्यांची मान हलल्यावर किरातसिंग त्यांस ह्मणतोः " राजे-साहेब, मी तेथें गेलों. सायंकाळीं बोलत बसलों. बोलतां बोलतां एक मौज झाली. मराठ्यांनीं—किल्ल्यावरल्या लोकांनीं—एक हुलकावणी दिली तिला खानसाहेब तेव्हांच फसले. मराठे तरी काय सामान्य आहेत ! कोणीही कसाही चतुर आणखी जागरूक असला, तरी सहज फसेल अशीच ती हुलकावणी होती. गुलाम हातांत चुडी, हिलाल असे घेऊन किल्ल्यावरून उतरले. एका बाजूनं डोंगराच्या पायथ्याशीं उतरले. तेथें बसल्याचा त्यांनीं बहाणा केला. आपल्या चुडी व हिलाल तेथें जमि-नींत पुरून ठेवले आणि स्वतः तेथून केव्हां निसटले तें कोणाला कांहींच समजलं नाहीं. खानसाहेबांना त्यांच्या ओरड्याआरड्यावरून अशी आशा उत्पन्न झाली, कीं आपण त्यांजवर तुटून पडून हल्ला करावा, ह्मणून त्यांनीं आपली फौज उठविली. जिकडे त्या चुडीन् हिलाल होते तिकडे स्वाऱ्या गेल्या. परंतु तेथें काय होतं ! चिट पाखरूं सुद्धां नाहीं. तेव्हां शेवटीं स्वारी चुरमुरे खात परतली. पण छावणींत येतात तों जिकडे तिकडे हलकल्लोळ ! दाणागोटा पार नाहींसा झाला. आणखी सगळ्यांत विलक्षण गोष्ट ही, कीं खानसाहेबांची रूपवान् कन्या नूर एल् हुदा नाहींशी झाली. तिच्या जनान्यावरील मुख्य खोजा अबदुल्ला हा रडत रडत यजमानाजवळ सांगायला आला, कीं आपली मुलगी मराठ्यांनीं नेली ! "

" काय ? मराठ्यांनीं नेली ? " जयसिंग एकदम मोठ्यानें ह्मणाला, " दिलेरखानाची मुलगी मराठ्यांनीं नेली ? अशक्य. अशक्य. मराठे लोक कोणाच्या स्त्रियांच्या अंगाला कधींही स्पर्श करणार नाहींत. आजपर्यंत त्यांनीं कधीं अशी गोष्ट केली नाहीं. त्यांच्या राजाची–शिवाजीची–त्यांना सक्त ताकीद आहे. कांहीं तरी त्यांत लबाडी आहे. शिवाजीचे लोक असं कधीं कधीं करणार नाहींत. त्यांना त्यांच्या कामांत नेहमीं यश येतं तें यामुळंच. "

" तें काय असेल तें खरं. पण अबदल्ल्यानं असं येऊन सांगितलं. आणखी दिलेरखानाला तें खरं वाटून त्यानं त्यांचा तीन दिवसांत अगदीं विध्वंस करून टाकण्याची प्रतिज्ञा केली आहे."

# प्रकरण १२ वें.

## औरंगाबाद.

मराठे लोक आपल्या शत्रूशीं कितीही लबाड, ठक, महाठक असले; तरी आजपर्यंत त्यांनीं कधीं कोणाच्या स्त्रियांचा अपहार केला नाहीं. धन लुटण्याच्या कामांत त्यांनीं कधीं कसूरी केली नाहीं. शत्रू ह्मटला ह्मणजे त्याचा विश्वासघात करण्यांत त्यांस कधीं कांहीं वाटलें नाहीं. या सगळ्या गोष्टी खऱ्या, परंतु स्त्रियांच्या पातिव्रत्याला–शत्रूंच्या स्त्रियांच्याही पातिव्रत्याला--त्यांनीं कधीं स्पर्श करण्याचें मनांत सुद्धां आणल्याचें उदाहरण शिवाजीमहाराजांच्या आरंभींच्या किंवा नंतरच्या कारकीर्दींत कोठें घडलें नाहीं, यामुळें तेवढ्या बाबतींत जो तो महाराजांच्या व त्यांच्या लोकांच्या गुणांचें वर्णनच करीत असे. कधीं कोणीं तसला अत्याचार केल्याची गुणगुण जरी शिवाजीमहाराजांच्या कानीं आली, तरी त्याजवर त्यांचा विलक्षण राग होऊन ते त्यास आपल्या दृष्टीसमोर येऊं देत नसत इतकेंच नव्हे, तर त्यास आपल्या सेवेंतून दूर करीत असत. ते ह्मणत, आपल्यास द्रव्याचें व मुलुखाचें कारण. तीं दोन हस्तगत झालीं ह्मणजे तिसरीकडे पहाण्याचें पाप कधींही कोणी करतां कामा नये. एके स्वारींत एका फिरंगी किल्लेदाराची मुलगी महाराजांच्या सरदारानें धरून आणून महाराजांसमोर उभी केली असतां " हिच्याप्रमाणें आमची मातुश्री सुरूप असती तर आह्मीही सुरूप झालों असतों." असें ह्मणून त्यांनीं त्या मुलीस नजराणा देऊन तिच्या बापाकडे परत पाठविलें आणि दुष्ट हेतूनें शत्रूच्या स्त्रियांस धरून आणणाऱ्या आपल्या सरदाराचें त्यांनीं लागलेंच पारिपत्य केलें अशी आख्यायिका आहे ही सर्वांस माहीतच आहे. इतरांप्रमाणें ही आख्यायिका व आणखी असल्याच शिवाजीमहाराजांच्या स्त्रियांच्या बाबतींतल्या वर्तना-

संबंधीं गोष्टी जयसिंगराजाच्या कानीं गेल्या होत्या, यामुळें त्यांस किरातसिंगानें सांगितलेली गोष्ट अगदीं खरी वाटेना. भलतीच हूल दाखवून भलत्याच बाजूला शत्रूला नेऊन आपण एकदम तिसऱ्याच ठिकाणीं उठून ते शत्रूचा नाश करतील, याबद्दल कधीं कोणास शंका नव्हती. आणि जोंपर्यंत सत्ययुगांतलें धर्मयुद्ध कोणीच करीत नव्हतें तोंपर्यंत धर्मयुद्ध केलें नाहीं ह्मणून शिवाजीमहाराजांस कोणी नांवेंही ठेवण्याचें कारण नव्हतें. किल्ल्यावरील मंडळींनी एके बाजूस उतरण्याची हूल दाखवून व तेथें तळ दिल्याचें ढोंग करून दिलेरखानास फसविलें, याबद्दल जयसिंगास उलटें कौतुक वाटलें व हंसूंही आलें. कारण दिलेरखानास फार घमेंड ! एका चार प्रहरांत किल्ला घेतों ह्मणून पन्नासदां त्यांनीं किल्ल्यावर चढ केला, तरी कांहीं झालें नाहीं. अर्थातच मराठ्यांनीं सहज एक हूल दाखवून त्याची फजिती केली तें ठीक झालें, असें जयसिंगास वाटलें त्यांत मुळींच नवल नाहीं. परंतु एका बाजूनें खालीं उतरल्याची हूल दाखवून भलत्याच बाजूनें चाल करून येऊन त्यांनीं दिलेरखानाचा जनानखाना लुटला व त्याची सुस्वरूप मुलगी पळवून नेली हे शब्द ऐकण्यास जयसिंगाचें मन मुळींही तयार होईना. त्यानें किरातसिंगाचा त्या बाबतींत वारंवार वारंवार निषेध केला आणि ह्मटलें, कीं "तूं ह्मणतोस ही गोष्ट सर्वथा खोटी. यांत कांहीं तरी आंतल्याआंत लबाडी आहे."

तें ऐकून किरातसिंग पुनः अजाण माणसासारखा चेहेरा करून ह्मणतोः "कोण जाणे! जें मीं तिकडे छावणींत ऐकलं तें आपल्याला सांगितलं. असेल त्या अबदुल्ल्याची लबाडी असेल. त्यालाच कोणी तरी फुसलावून हा असला प्रकार केला असेल. या मुसलमान लोकांत जनान्याच्याबाबतींत कोण काय लबाड्या करील, याचा नेमच नाहीं. गुलामांनीं आमच्या स्त्रिया कितीक पळवून नेल्या, तेव्हां आपापसांतही असलेच प्रकार केले तर नवल काय! दुसऱ्या कोणा सरदाराचा डोळा असेल, त्यानं अबदुल्ल्याला वश करून घेतलं असेल, आणखी लढाईचा हा धुडगुसाचा अवसर पाहून कोठें तरी तिला लांबवलं असेल." असा भाषणाचा निरवा करून किरातसिंग कांहीं वेळ पुनः स्वस्थ बसला. नंतर पुनः जयसिंगराजांस ह्मणतोः "सरकार, मग ही थैली जिकडली तिकडे पोंचवायला जायला आपली परवानगी आहे ना!" जयसिंगानें "हो" ह्मणण्याच्या अर्थाची मान हालवली, त्यासरसा किरातसिंग उठला व त्यानें रीतीप्रमाणें मुजरा वगैरे करून तेथून जाण्याची आज्ञा घेतली. "तूं जातोस तर तेथली एकंदर हालहवाल पाहून ये आणखी कमीज्यास्ती काय आहे तेंही काढून ये. बादशहाचा माझ्या ठिकाणीं विश्वास आहे, परंतु हा विश्वास अळवाच्या पानावरल्या पाण्याप्रमाणें असावयाचा. इकडे मला एक हुकूम पाठवील, तिकडे आपल्या पोराला तिसराच हुकूम पाठवील; याला त्याच्यावर हेरपणा करायला लावील, त्याला याच्यावर लावील, असं करून तर त्यानं राज्य मिळविलं. तेव्हां तूं जातोच आहेस, तर तेवढी कांहीं बातमी निघाली

तर पहा. आपल्याकडे आतां यापुढें खजिन्याचा अधिकार ठेवला नाहीं इतकेंच नाहीं, परंतु आपल्याला परत बोलाविलें ह्मणून शहाजादा मुआझीम याला फार राग आला आहे. पण आह्मीच ह्मणून त्याचा इलाज नाहीं. दुसरा एखादा असता तर त्यानें त्याचीच उचलबांगडी केली असती आणि त्याच्यावर काय प्रसंग आणला असता कोणास कळे. " असें कांहीं बोलणें बोलून त्यानें किरातसिंगास ती थैली घेऊन औरंगाबादेस जाण्याची परवानगी दिली. किरातसिंगास अर्थातच असें दाखवावयाचें होतें कीं, आपण केवळ जयसिंगराजांचे अंकित. दुसऱ्या कोणीं कांहीं कामगिरी सांगितली, तरी ती जयसिंगराजांची अनुमती असली तर करावयाचे, नाहीं तर कधीं करावयाचे नाहीं. तेव्हां त्यानें पुनः एकदां " आपण आतां जा ह्मणतां तर माझा इलाज नाहीं, नाहीं तर मला कांहीं या दिलेरखानाच्या कामगिरीवर जाण्याची यत्किंचितूसुद्धां इच्छा नाहीं. न जाणों या पत्रांत काय गुप्त कट असेल आणखी काय नाहीं. आपल्याच विरुद्ध कांहीं नसेल ह्मणून कशावरून ? अहो आपल्याला बादशहा एवढा मान देतो हें या दिलेराला किंवा शहाजाद्याल्या दोघांनाही खपतं आहे कोठें ? परंतु बादशहापुढें त्यांचा इलाज नाहीं, " असें ह्मणून तो तेथून निघून गेला. वास्तविक पहातां त्याच्या मनांतून तेथून जलदीच निघावयाचें होतें, परंतु सारें सोंग बरोबर झालें पाहिजे ह्मणून जितका धिमेपणा दाखवतां येईल तितका त्यानें दाखविला.

तेथून बाहेर पडल्यानंतर तो औरंगाबादेच्या वाटेस लागला. त्यानें आपल्या बरोबर स्वतःच्या संरक्षणाकरितां किंवा दुसरें कांहीं कारण पडलें, तर मनुष्यबळ असावें ह्मणून सुमारें पंचवीस निवडक जवान दिलास दिल व जीवास जीव देणारे घेतले होते. जयसिंगाच्या छावणींतून निघून कांहीं अंतरावर गेल्यानंतर त्यानें आपल्या लोकांस एकदम हुकूम सोडला, कीं अबदल्ला व त्याची मंडळी पुढें गेली आहेत ती औरंगाबादेच्या जवळ जाण्यापूर्वी आपण जाऊन त्यांस गांठलें पाहिजे. शहाजाद्यास जी शिकार नेऊन द्यावयाची तिची पहिली बातमी आपणच जाऊन दिली पाहिजे. अबदल्ल्याला तो मान मिळतां कामा नये. हा असा हुकूम सोडण्यांत त्याचा मुख्य हेतु काय होता तें उघडच होतें.

सुलतान मुआझीम याची मर्जी संपादन केली असतां आपल्यास अनेक तऱ्हेचे फायदे आहेत असें किरातसिंगाच्या मनानें पक्कें घेतलें होतें. त्याच्या मनाची अशी पक्की खात्री, कीं बादशहानें जयसिंगासारखे कितीही सरदार जवळ केले व त्यांस मिठ्या मारिल्या तरी शेवटीं रक्ताचा जोर व्हायचा तो व्हायचाच. आणखी दक्षिणचा सुभाच काय, वेळ पडली तर आपलें तक्त सुद्धां तो मुआझीमलाच देणार. त्यानें जी एक उदेपुरी म्हणून बायको केली आहे, तिच्या पोटीं झालेल्या मुलावर औरंगजेबाचा खराखरा जीव आहे अशी सार्वत्रिक समजूत होती, परंतु मुआझीम इतका जीव कोणावर नाहीं असें त्याला वाटे. मुआझिमाबद्दल बादशहाला

संशय नव्हता असें नाहीं. त्यानें शिवाजीस मिलाफी होऊन इतके दिवस त्याचें बंड चालूं दिलें अशी बादशहाची पक्की समजूत होती. परंतु त्या त्याच्या मिलाफीच्या संशयामुळें मुआझीमवर बादशहाची खरी भक्ति होती. कारण काढील तर हाच पोरगा कांहीं थोडें नांव काढील असें त्यास वाटे.

पुरंदरापासून औरंगाबादेस जाणारा रस्ता फारच सुंदर असे. नानाप्रकारचे वृक्ष काय, वेली काय, यांची जणूं काय घनदाट राईची राईच कित्येक ठिकाणीं मधून मधून लागलेली. त्यांत कित्येक ठिकाणीं सुंदर ओहोळ होते. कित्येक ठिकाणीं सुंदर शेतें होतीं. वाड्या होत्या. बाग होते. परंतु मार्गानें अशा सुंदर गोष्टी कितीही असल्या तरी पहाणाराची चित्तवृत्ति रसिक लागते तर त्यास तें सर्व दिसतें. ज्याची चित्तवृत्ति दुसऱ्या कांहीं कारस्थानांत गुंतलेली, त्याला सृष्टीची रमणीयता काय आणि पक्ष्यांचें मधुर गायन काय सर्व सारखेंच असें झालेलें असतें. तीच स्थिति या वेळीं किरातसिंगाच्या मनाची झालेली होती. त्याला दुसरें तिसरें कांहीं सुचत नव्हतें. आपला मार्ग आटपून आपण एकवार अबदल्लयास केव्हां गांठूं असें त्यास होऊन गेलें होतें. आपण मोठी शिताफी केली, परंतु जर का ती शिकार मधल्या मधेंच कोठें नाहींशी झाली, किंवा दुसऱ्या कोणी पळवून नेली, तर आपला सगळा व्यूह व्यर्थ झाला असें होईल. तसें होतां कामा नये, याकरितां त्याला मोठी तळमळ लागली होती. शिवाय त्याला असेंही वाटत होतें, कीं आपण जाण्यापूर्वी अबदल्लया जाऊन पोंच-ला असला, तर तो गुलाम आपली शिफारस गाजविण्यासाठीं आपणच पुढें होऊन मुआझिमापासून शाबासकी आणि इनामही दोनही उपटील. मग आपला इतबार कांहींच रहाणार नाहीं. तेव्हां एका पावलाच्या वेळांत चार पावलें टाकून आपण त्याला वाटेंत गांठलें पाहिजे असा त्याचा कृतनिश्चय झाला होता. तो निश्चय पार पाडण्यासाठीं त्यानें माणसांच्या किंवा जनावरांच्या जिवाकडे पाहिलें नाहीं. एकसारखी घोडेपीट चालविली होती. चढ्याघोडयानिशीं जर जाईन तरच वेळेवर पोंचेन आणि अबद-ल्लयाला गांठीन. त्याच्याबरोबरचे लोक फार त्रासले. त्यांना कांहीं त्याची उत्कंठा नव्हती. आपला मालक दौडतो म्हणून आपण दौडावयाचें, एवढें त्यांस समजत होतें, यामुळें त्यांना मनापासून जरी त्रास वाटत होता, तरी त्यांची दौड चाललीच होती. अगदीं नाइलाज झाला कीं मुक्काम करावयाचा, काय खाणें पिणें करावयाचें असेल तें करावयाचें, काय थोडी माणसांना व जनावरांना विश्रांति जरूर ती त्यानें दिली, कीं लागलींच पुनः माणसें पिटाळावयाचीं असें चाललें होतें. तो स्वतः श्रमाला मोठा कंटक. घोड्यावर अष्टौप्रहर काढण्याचा प्रसंग आला तरी कांहीं हरकत नाहीं, सपाटा मारून तो पुढें व्हावयाचाच, असा कांहीं त्याचा पराक्रम असे, यामुळें कोणासही त्यास नांवें ठेवण्यास तशी जागा नसे.

अशी घोडेपीट करून तो चालला असतां अर्थातच त्यानें अबदल्लयास गांठलें. अबदल्लयाच्या बरोबरीचे लोक कांहीं त्याच्या कह्यांत राहणार नव्हते. ते किरातसिं-

गाच्या कह्यांतले लोक. ते त्याचें काय ऐकतात ? त्यानें जलदी केली, तरी यांनीं सावकाश चालावें. मुक्काम केल्यावर त्यानें तो लवकर उठविण्यास सांगितलें तरी त्याला जुमानूं नये. ' घोडे ठार मारायचे आहेत कीं काय ? माणसांचा जीव आहे कीं नाहीं ? ' असलीं भाषणें त्यांनीं करावीं आणि वेळ काढावा असा त्यांचा प्रकार होता. यामुळें अर्थातच अबदल्लच्याच्या मनाप्रमाणें व्हावी तशी गर्दी झाली नाहीं. हेंही एक एका अर्थी किरातसिंगाला इष्ट तसेंच झालें. त्यांच्या त्या दिरंगाईमुळें त्यास त्यांना वाटेंतच गांठतां आलें. अबदल्लच्याची मंडळी दिसतांच किरातसिंगास फार आनंद झाला. आतां आपला सगळा डाव जसा साधावयाचा तसा साधणार याबद्दल त्यास कांहीं शंका राहिली नाहीं.

मनुष्याची मनोवृत्ति ही विलक्षण चंचल असते. आपल्या मनाप्रमाणें सर्व कांहीं आतांपर्यंत घडत आलें, असें पहातांच किरातसिंगास नवीनच हांव सुटली. नूर एल हुदा ही अप्सरेसारखी स्वरूपवान् आहे असें ऐकल्यापासून त्याची इच्छा कीं आपण एकवार तिला पहावें. परंतु दिलेरखानाच्या जनान्यांत याचा प्रवेश कसा व्हावा ? किंवा ती कोठें याच्या दृष्टीस कशी पडावी ? अर्थातच मनांतले मांडे मनांत खाऊन त्यास स्वस्थ बसावें लागे. परंतु आज तशी स्थिति नव्हती. आज त्यानें मनांत आणलें, बर ती सुंदरी आपल्यापुढें आणून डोळे भरून पाहून घेण्यास सुद्धां हरकत नव्हती. परंतु पुढें ? तिला आपल्यापुढें आणण्याचें धारिष्ट करून आतां क्षणभर सुख भोगल्यानें काय होणार ? ज्या देवाला प्रसन्न करण्याकरितां आपण हा महानैवेद्य आणला, त्याला जर असें कळलें, कीं हा नैवेद्य आपल्या दृष्टिक्षेपांनीं विटाळला आहे, तर आपले हाल कुत्रासुद्धां खाणार नाहीं अशी स्थिति होईल. आणि मग आपल्या सगळ्या महत्त्वाकांक्षा, आपल्या सगळ्या आशा, या साऱ्यांचें काय होईल ? आपल्याला कोणीं क्षणभरसुद्धां जिवंत ठेवणार नाहीं. आपले हाल हाल करतील. तेव्हां आपण दरिद्र्यानें भलत्याच अन्नाची वांछा धरूं नये. नुसता दृष्टिसंतोष झाला ह्मणून काय होणार आहे ? आपला लोभ ज्यास्त वाढेल. दृष्टीचे पांग फिटले, कीं मन उड्या मारूं लागेल आणि मग कोण्या थराला गोष्टी जातील त्याचा मुळींच भरंवसा नाहीं. त्यापेक्षां आहे यांत आपण संतुष्ट रहावें हें चांगलें.

असें त्यानें आपलें समाधान करून घेतलें. परंतु उच्छृंखल झालेल्या मनाचें समाधान असें कोठें होतें ? एखादें दुष्कृत्य करण्याची आतुरता तें दुष्कृत्य हातून घडण्यास लागणाऱ्या साधनांच्या सांनिध्यावर फार अवलंबून असते. जर साधनें अनुकूल व सांनिध नसलीं तर ती आतुरता अगदीं कमी होते. परंतु तींच साधनें जर सांनिध असलीं तर तें दुष्कृत्य केव्हांच होऊन जातें. मन ताब्यांत रहातच नाहीं. अशीच स्थिति या वेळीं किरातसिंगाच्या मनाची झाली होती. त्यास आपली इच्छा तृप्त करून घेण्यास सर्व साधनें अनुकूल होतीं. सर्व माणसें त्याच्या कह्यांतलीं. नूर एल हुदाच्या शमिआन्यांत बेधडक शिरून त्या परीचें मुख पाहण्यास कांहीं कोणत्याही

गोष्टीचा आडपडदा असण्याचा संभवच नव्हता. अबदल्लाच्या काय किंमतीचा माणूस होता हें धडधडीत दिसतच होतें. त्याला लालूच दाखविली, कीं तो वाटेल तें करून देईल. असें करण्यांत आपलें काय नुकसान होईल हें आपलें आपल्याला मात्र पाहिलें पाहिजे. तेव्हां तिच्या स्वरूपाचें वर्णन तरी एकदां पुनः अबदल्लाच्याच्या तोंडून ऐकावें असें त्यानें मनांत योजून अबदल्लास आपल्याजवळ बोलाविलें आणि विचारलें.

" काय अबदल्ला! तुझी यजमानीण कशी काय आहे! कांहीं रडूं रडूं करीत नाहींना!"

" इन्शाला! तिला रडूं रडूं करण्याचं कारण काय? दिलेरखानाच्या मनांतून शहाजाद्याशीं संबंध व्हावा असंच होतं कीं नाहीं? तो शहाजादा नाहीं, हा. त्यांत काय मोठंसं? कोणीकडून शहाजाद्याशीं शहाजादा असला ह्मणजे झालं!"

" तें खरं रे " किरातसिंग त्यास म्हणतो " पण आपल्याला कोण कोणीकडे नेनं आहे याचा कांहीं पत्ता तिला लागला आहे का? तिनं तुला विचारलं नाहीं?"

" हो विचारलं, नाहीं असं कसं होईल? पण मीं तिची समजूत अशी घालून दिली, कीं अजून मराठे लोकांनींच अपाल्याला पकडलं आहे आणि मराठेच कोणीकडे नेतें आहेत. थोडासा अवकाश गेला ह्मणजे तिला सांगेन, कीं मराठ्यांचा राजा शिवाजी यानं तिला शहाजाद्याकडे पोंचवून द्यावी असा आपल्या लोकांना हुकूम केला, ह्मणून तुला त्यांनीं शहाजादा मुआझीमकडे आणलं आहे. त्याला आतां वाटलं तर तो तुला तुझ्या बापाकडे पाठवील अगर काय वाटेल तें करील. हें आपण तिला औरंगाबादेच्या शिवाराजवळ गेलों ह्मणजे मग सांगूं. पण अजून तिची समजूत अशीच आहे, कीं आपल्याला मराठ्यांनीं पकडून चालविलं आहे. कोठें तें तिला माहीत नाहीं."

किरातसिंगानें तें ऐकलें, आणि तो थोडा स्तब्ध झाला. अबदल्लाचें म्हणणें त्याला बरोबर वाटेना. मराठ्यांनींच आपणास कोठें तरी चालविलें आहे अशी अद्यापि नूर एल्‌ हुदाची समजूत असेल हें त्यास संभवनीय दिसेना. तिला जरी पडदपोशींत रहावें लागत होतें, तरी तिला बाहेरचें अगदीं कांहीं दिसत किंवा ऐकूं येत नव्हतें असें थोडेंच होतें. आपल्याला नेत असलेले लोक मराठे नाहींत, रजपूत आहेत एवढें समजण्यास कांहींच अडचण नव्हती. त्यांचीं भाषणें चालत, तीं अर्थात् तिच्या कानीं पडत असलींच पाहिजेत. अशीं भाषणें कानीं पडत असूनही ती अद्यापि आपण मराठ्यांच्याच तावडींत आहोंत अशी समजूत धरून बसली असेल हें संभवनीय नव्हतें, परंतु अबदल्ला तर तशी खात्री सांगत होता.

किरातसिंग नंतर त्यास म्हणालाः " काय मराठे लोकांनींच तुला शहाजादा मुआझीमकडे पाठविलं आहे असं तिला भासवणार? असं भासविल्यानं काय होईल?"

" आपल्याकडे कांहींच दोष येणार नाहीं. मागेंपुढें दिलेरखानाला जरी कळलं,

कीं आपली मुलगी शहाजाद्याच्या जनानखान्यांत आहे, तरी आपला संबंध त्यांत कांहीं दिसूं नये. तुझ्याप्रमाणेंच मलाही कैद करून आणलं आहे असं मीं तिला सांगून दिलं आहे. शहाजाद्याच्या जनान्यांत ती गेली, कीं मी आपला दिल्लीला परत जातों ह्मणून हट्ट धरून पळून जाईन. तुमच्यावर तर कांहींच येणार नाहीं. तुह्मी यायला, आणखी आपलीं इतके दिवसांचा बेत सफल होण्याची संधि यायला कशी एकदम गांठ पडली बघा! असा कांहीं योगायोग असतो. तेव्हां जें झालं आहे तें फार उत्तम. मागें पुढें तंटा उभा राहिला तरी मोठ्यामोठ्यांत उभा राहणार, आपल्याला त्याचा कांहीं संबंध नको. मोठे मोठे लढले तरी त्यांचं तें सारं पाहून घेतील. आपल्याला त्याची जरूरी काय? मराठ्यांनीं पोरीला पळविलं, त्यांनींच शहाजाद्याकडे आणून घातलं. आपण नांवानिराळेच असा प्रकार आहे."

अबदल्ल्याचें तें शहाणपणाचें भाषण ऐकून किरातसिंगास फार हंसूं आलें. नंतर तो त्यास ह्मणतो, "कायरे अबदल्ला, ही तुझी यजमानीण खरीच इतकी खुबसुरत आहे काय? तशी असेल, तर गुलामा आमच्यासारख्याला एकदां नजरेनं तरी पाहूं दे. डोळ्याचं पारणं तरी फिटूं दे. कारण आमच्या तरी असलं रत्न कधीं दृष्टीस पडणार? बोल, आहे कांहीं युक्ति? असली तर सांग. पण आमच्या डोळ्याचं पारणं एकदां फेड."

अबदल्ला तें ऐकून हंसला व म्हणालाः "किरातसिंग, ती परी डोळ्यानं पहाण्याची तूं मनांत बिलकुल आशा बाळगूं नकोस. ही तुझी आशा तुझ्या नाशाला कारण होईल, हा तूं मनांत पक्का निश्चय बाळग. राजाच्या ताटाकडे दृष्टि गेली, तर तें अन्न शापल्याखेरीज कधीं सोडायचं नाहीं, हा अगदीं पक्का नियम. तूं त्या परीला दुरून पाहिलंस, तरी तुला अशी अनिवार इच्छा होईल, कीं हिची मालकी आपल्याकडे असावी. गुलाबकळी दृष्टीनं पाहिली, कीं ती तोडून नाकाजवळ न्यावी असं वाटल्याखेरीज कधींच राहत नाहीं. हीच अवस्था तुझी होईल. तेव्हां तूं या भानगडींत पडूं नको. दिव्याची ज्योत तेजस्वी दिसते, ह्मणून तिच्यावर झांप टाकणारे कितीक पतंग आजपर्यंत प्राणाला मुकले याचा विचार कर. मीं—माझ्यासारख्या यःकश्चित् खोजानं—तुला असा उपदेश करावा हें बिलकुल बरं नव्हे, पण तुझ्याबद्दल माझ्या मनांत एक प्रकारची भक्ति आहे म्हणून हें सारं सांगतों, उघड भीडभाड न ठेवतां बोलतों. तूं नुसतं दृष्टिसुख घेशील तें क्षणभर होईल; पण जर हें बाहेर कळलं तर तापलेल्या सळयांनीं तुझे डोळे काढायला सुद्धां हे लोक कमी करणार नाहींत. हा आपला विचार कर......"

आपल्या मनांत जे विचार आले, तेच विचार त्याच्याही मनांत येऊन हा आपल्याला इतक्या कळकळीनें उपदेश करतो आहे तेव्हां हा आपली हेटाळणी करण्याच्या बुद्धीनें खचित नव्हे, असें त्यास पक्कें वाटलें. देवासाठीं आणलेला महानैवेद्य आपल्यासारख्यांनीं दृष्टीनें विटाळला असें मनांत येतांच, देव आपलें काय

शासन करील याचा नेम नाहीं, हें त्याच्याही मनांत आलेंच होतें. परंतु संधि सांपडली असतां आपण ती गमावली असें होऊं नये ह्मणून त्याला असें वाटलें, कीं जिच्या स्वरूपाबद्दल इतकी जिकडे तिकडे वाखाणणी झाली आहे, तें स्वरूप तरी काय आहे तें पहावें. अबदल्लयाजवळ गोष्ट काढली, तर तो आपल्याला नाहीं ह्मणणार नाहीं. कांहीं तरी युक्ति करून आपल्याला तिचें दर्शन करून देईल असें त्याला वाटलें होतें व त्यावरूनच त्यानें त्याच्याजवळ गोष्ट काढली. परंतु उपयोग काय ! तो तर आपणास उलट उपदेश करूं लागला. तेव्हां आतां त्याच्या साह्याची अपेक्षा कशी करावी ! अशी कांहीं त्याची विशेषच चलबिचल झाली. अबदल्लयानें नको ह्मटल्यापासून तर त्याला असें होऊन गेलें, कीं एकवार तरी चोरून मारून कसेंही करून आपण तिचें दर्शन घ्यावेंच. अबदल्ला वश झाला तर ठीक; नाहीं तर दुसरा कांहीं मार्ग. पण आपली इच्छा तृप्त करून घ्यावी. ही त्याची इच्छा वाढतच चालली. त्याचें मन फार अस्वस्थ होत चाललें आणि तो कावरा बावरा झाला. दिव्याच्या ज्योतीवर उड्या घालून आपल्याला जाळून घेणाऱ्या पतंगाप्रमाणें हा आपली स्वतःची स्थिति करून घेणार अशी त्याच्या चर्येवरून अबदल्लयाची पक्की समजूत झाली. याच्या इच्छेप्रमाणें त्या परीचें दर्शन यास होऊं देणें अगदीं सोपें आहे, परंतु दर्शन झालें, कीं हा वेडा बनलाच असें त्यास स्पष्ट दिसलें. तेव्हां त्यानें असा मनाचा निश्चय केला, कीं आपण याला इतक्याही संकटांतून वांचवूंच.

वर सांगितल्याप्रमाणें त्या दोघांचें भाषण झाल्यानंतर किरातसिंग अगदीं स्तब्ध राहिला व दोघेही एकमेकांच्या जवळून मुकाट्यानें चालूं लागले. किरातसिंगाला विवेकानें अगदीं सोडलें. नूर एल हुदा हिचें दर्शन आपणास कसें होईल असें त्यास होऊन गेलें आणि त्याच्या मनांत दुसरा कांहींही विचार नाहींसा झाला. तो इकडे तिकडे पाही आणि पुढें चाललेल्या मेण्यांत त्याचें चित्त गुंते. काय व्हावयाचें असेल तें पुढें होईल, पण सध्यां आपण तर आपली मनीषा पूर्ण करून घ्यावी असें एकदां वाटे, परंतु पुनः वाटे अशी ही आपली इच्छा तृप्त करून घेतल्यास आपल्याला आपल्या पुढल्या सर्व महत्त्वाकांक्षांना फाटा द्यावा लागेल, आपल्या जिवावरही बेतेल. नूर एल हुदा अत्यंत सुस्वरूप लावण्यवती आहे; तिचें तें लावण्य, तें सुस्वरूप आपण दृष्टीनें पाहिलें ह्मणून काय होणार ? त्याचा आपल्याला काय फायदा होणार? असे परस्परविरुद्ध विचार त्याच्या मनांत आतां वारंवार वारंवार येऊं लागले आणि तो वेडा होणार अशीं चिन्हें दिसूं लागलीं. त्याच्या चित्तवृत्तींत हा फरक पडलेला अबदल्लयास दिसला आणि तो फार आश्चर्य करूं लागला. या वेड्याला असें बहकूं दिलें, तर हा कोण्या थराला जाईल याचा नेम नाहीं. त्याचा घोडा त्या मेण्याकडे जातो आहे असें दिसलें, कीं अबदल्लयानें त्याच्या मार्गांत आडवें होऊन त्यास ताळ्यावर आणावें असा प्रकार कितीदां तरी झाला. पुढें अबदल्लयास

असें झालें, कीं हा रस्ता एकदांचा संपून आपण औरंगाबादेला लवकर पोंचूं तर फार बरें होईल. आतां एकाच मुक्कामाचा अवधी राहिला होता. तो मुक्काम गांठून तेथें तळ दिल्यावर काय अवस्था होते तिकडे त्याचें लक्ष्य लागलें. त्या तळाचे वेळीं किरातसिंग कांहीं तरी गडबड करील, तर त्याजवर नजर ठेविली पाहिजे हें त्यास स्पष्ट दिसलें आणि त्याप्रमाणें त्यानें स्वतः जागरूक राहण्यासाठीं योग्य तितकी खबरदारी घेतली. किरातसिंग आपलेकडून आपल्या प्राणाची आहुति देण्यासाठीं अटोकाट परिश्रम करीत होता. त्यास अबदल्लयानें बळी पडूं दिलें नाहीं. परंतु या दोघांस आतां तेथेंच सोडून आपण पुरंदराकडे दिलेरखानाची काय हकीकत आहे ती पाहूं.

---

# प्रकरण १३ वें.

## प्रातःकाळची वेळ.

अद्यापि सूर्य पूर्णपणें वर आला नव्हता. दुर्जनांनीं वाटेंत आणलेल्या हजारों अडचणींना दूर सारून बाहेर निघण्यासाठीं धडपड करणाऱ्या सज्जनांप्रमाणें प्रातःकाळींच त्याच्या तेजाला झांकून टाकण्याचा प्रयत्न करणाऱ्या ढगांस दूर सारून तो आपलें डोकें वर काढीत होता. दिवस असे होते, कीं मधेंच ढग येत. परंतु पावसाळा अद्यापि बराच लांब असल्यामुळें हे प्रातःकाळीं सूर्यतेजाला झांकण्यासाठीं उठणारे ढग तितक्याच योग्यतेचे असत. मात्र ते आपल्याकडून कांहीं वेळ तरी धडपड करीतच असत. तशाचपैकीं आजचा हा दिवस होता. सूर्य आपल्या नित्य नियमाप्रमाणें उदय पावतच होता. परंतु हे पोकळ–निर्बल–ढग त्याला आपला तेजःप्रसार करण्याला जितकीं विघ्नें त्याच्या मार्गांत आणवतील, तितकीं आणण्याची पराकाष्ठा करीतच होते. परंतु उन्हाळ्यांतल्या ढगांची पराकाष्ठा ती काय असावयाची ? हीनबळांची पराकाष्ठा सबळांच्या कीर्तीसच विशेष कारण होते, तशांतलाच प्रकार आज होत होता. कित्येक झाडांस पालवी फुटून तीं झाडें पर्णमय झालीं होतीं. कित्येकांना आतां पालवी फुटत होती. त्या नवीन नवीन पल्लवांवर बालसूर्याचे आरक्त किरण पडून ते पल्लव विशेष शोभिवंत दिसत होते. ज्यांचीं सर्व कृत्यें प्रकाशांत चालावयाचीं, त्यांस कशाचेंच भय नाहीं; अशीं मनुष्यें जसा आपला व्यवहार खुशाल सुरू करतात, त्याप्रमाणेंच नानाप्रकारचे पक्षी स्वैरपणें उडूंबागडूं व भक्ष्याकरितां हिंडूंफिरूं लागले होते. ज्यांना उजेडाचें वावडें आणि अंधार आवडे, अशा लोकांप्रमाणें घुबडें व वडवाघळें मात्र आपापल्या ढोलींत किंवा गर्दछायेच्या–वडापिंपळाच्या झाडांत स्वस्थ बसलीं होतीं, किंवा आपल्या

देहास उलटें टांगून घेऊन सूर्याच्या नाशाकरितां अनुष्ठान मांडून लोंबकाळत राहिलीं होतीं. सज्जनांचा काळ आला, आपल्याला आतां कोणी विचारीत नाहीं, आपलें कांहीं चालावयाचें नाहीं असें वाटून खिन्नवदन होणाऱ्या दुःशील लोकांप्रमाणें सर्पादि विषारी प्राणी व व्याघ्रादि हिंस्र प्राणी आपापल्या बिळांतून व गुहांतून तोंडें लपवून बसले होते.

वेळ फार रमणीय—कालची रात्र जाऊन आजचा हा आनंदाचा दिवस उगवला ही केवढी आनंदाची गोष्ट असें मनांत येऊन सर्व सृष्टिजात जणूं काय परमेश्वराचें स्तवन करीत आहे असें दिसत होतें; परंतु अशाही प्रसंगीं क्वचित् एखाद्या सज्जनाला चिंता उत्पन्न होते. आणि एकंदर बाह्यसृष्टीचें जें काय आनंदमय स्वरूप, त्याचा त्याच्या मनावर किंचितूही परिणाम होत नाहीं. तशीच औरंगाबादेच्या रस्त्यावरून जाणाऱ्या एका गृहस्थाची स्थिति झाली होती. गृहस्थ अगदीं एकटा होता. तो घोड्यावर होता. त्याच्या मागून एक नौकर तसाच घोड्यावर बसून चालला होता. तो नौकर होता हें त्याच्या अदबीच्या वागणुकीवरूनच दिसत होतें.

पुढें चाललेल्या गृहस्थाच्या चर्येवर चिंता दिसत होती आणि त्याच्या मनांत विचार—फार विचार— चालला असावा असें स्पष्ट दिसलें. सभोंवतालीं सृष्टिसौंदर्य इतकें विलक्षण होतें; परंतु याचें अंतःकरण त्या सौंदर्याचें निरीक्षण करण्यास योग्य अशा स्थितींत नसल्यामुळें त्याचा प्रवास अगदीं सरळपणें चालला होता. त्याच्या कर्णांस प्रातःकाळीं आनंदित झालेल्या पक्ष्यांचें सुस्वर गान ऐकूं येतच नव्हतें, त्याचे नेत्र सभोंवतालचें सृष्टिसौंदर्य पहातच नव्हते, असें ह्मटलें तरी कांहीं हरकत नाहीं. आपला रस्ता बरा आणि आपण बरे. आपले विचार बरे आणि आपण बरे. अशा प्रकारें त्यानें आपल्या मार्गाचें आक्रमण चालविलें होतें.

होतां होतां त्यास आपल्यापुढें कोणी तरी दुसरे प्रवासी चालले आहेत असा भास झाला. थोडा पुढें गेल्यानंतर त्याची खात्री झाली, कीं बरीच मंडळी पुढें चालली असावी. आपण या मंढळीच्या मधून पुढें जावें, कीं यांना टाळून जावें याबद्दल त्यानें क्षणमात्र विचार केला असावा. नंतर आपल्याला त्यांच्याशीं काय करावयाचें आहे ? आपण आपल्या मार्गानें पुढें जावें असा विचार करून त्यानें आपल्या घोड्यास थोडें जलद चालण्याचा इषारा दिला. घोडा आतां अगदीं ताजा तवानाच होता. त्यास इषारा होतांच तो जोरानें चालूं लागला. अर्थातच थोड्याच वेळांत पुढील मंडळीस त्यानें आटोपलें. पहातो, तों ती सर्व मंडळी नवीन, दिल्लीहून आलेल्या शिपाई गड्यांपैकीं. त्यांस पाहतांच आमच्या या गृहस्थास थोडें चमत्कारिक वाटलें. त्यानें त्यांच्याकडे निरखून पाहिलें. त्यांच्या मध्यभागीं एक मेणा चालला आहे. त्या मेण्याभोंवतीं जंगी खडा पहारा आहे आणि शिवाय मागेंपुढेंही पहारा आहे, हें पाहून त्यास आश्चर्य वाटलें, त्यानें

आपलें तें आश्चर्य फारसें बाहेर दिसूं दिलें नाहीं. त्या मंडळीकडे एकवार पाहिलें न पाहिलेंसें केलें. परंतु त्याची दृष्टि इतकी तीक्ष्ण, कीं त्या एकवार पाहिलें न पाहिलेंसें करण्यांत त्यानें जें काय पहाण्याजोगें होतें, तें पाहून घेतलें आणि जाणण्याजोगें होतें तें जाणूनही घेतलें. परंतु त्याबद्दल कांहीं विचार करण्याचें कारण नव्हतें, ह्मणून तो आपला तसाच पुढें चालूं लागला.

ज्याप्रमाणें यानें त्या लोकांकडे पाहिलें त्याचप्रमाणें त्या मंडळींपैकीं कांहींनीं याच्याकडेही पाहिलें. जे सामान्य लोक होते, त्यांस त्याच्याकडे विशेष लक्ष्यपूर्वक पहाण्याचें कारण नव्हतें. अर्थातच त्यांनीं त्याच्याकडे सहजगत्या पाहिलें, आणि आरशापुढून जाणाऱ्या पदार्थाच्या प्रतिबिंबाप्रमाणें तो दिसेनासा होतांच बहुतेकांच्या मनांतून तो नाहींसाही झाला; परंतु सर्वच लोक साधारण नव्हते. त्यांत कांहीं विशेष लोकही होते. निदान एक तरी खास होता. त्याची दृष्टि त्यापुढें गेलेल्या गृहस्थाच्या दृष्टीसारखीच तीक्ष्ण होती. त्यानें त्याच्याकडे नीट पाहिलें. आरशापुढून जाणाऱ्या पदार्थाच्या प्रतिबिंबाप्रमाणें त्याच्या मनावरील प्रतिबिंब तो गृहस्थ दूर जातांच नष्ट झालें नाहीं. फोटोग्राफाच्या कांचेवर त्याची प्रतिमा उठते तशी ती राहिली. हा आपल्याजवळून गेला हा पुरुष असामान्य असावा, कोणी तरी रस्त्यानें जाणारा वाटसरू नव्हे, असें त्याच्या मनानें घेतलें आणि त्याच विचारानें तो त्याच्या त्या मनावर उठलेल्या प्रतिमेकडे पाहूं लागला. होतां होतां त्याला असें वाटलें, कीं हा मराठ्यांच्या मुख्यांपैकीं एक असावा, परंतु या वेळीं हा एकटाच औरंगाबादेकडे कां चालला असावा? कोणाकडे चालला असावा? याला आपण जर अडथळा केला, तर आपल्याला कांहीं फायदा होईल काय? याला तसेंच जाऊं दिलें तर आपल्याला त्रास होईल काय? असे विचार त्याच्या मनांत येऊं लागले. एक मन त्यास असें ह्मणे कीं आपला त्याचा संबंध कांहीं नाहीं, तो आपल्या वाटेनें चालला आहे, आपण आपल्या वाटेनें जातों आहों, तेव्हां त्याला हटकण्यांत कांहीं अर्थ नाहीं. दुसरें मन असें ह्मणे, कीं तो कांहीं साधारण मनुष्य नाहीं, खरोखर कोणी असामान्य पुरुष आहे. न जाणों, आपण याला अटकाव करून परत फिराविलें, तर आपल्याला फार मोठा फायदा होईल. नाहीं ह्मणून कशावरून? असले विचार त्या एका माणसाच्या मनांत येत होते. हा माणूस कोण व ही मंडळी कोण याबद्दल वाचकांनीं तर्क केले असतीलच. हा माणूस किरातसिंग होय. किरातसिंगाच्या मनावर त्या थोड्या वेळापूर्वीं त्याच्या पुढून गेलेल्या गृहस्थाची प्रतिमा कायम बसल्याप्रमाणें झाली आणि त्यानें असाही विचार केला, कीं आपण त्या माणसास गांठून त्याच्याशीं भाषण तर करून पहावें. आपल्या तर्काप्रमाणें जर तो शिवाजीकडलाच माणूस आहे असें वाटलें, तर त्यास आपण तावडतोब गिरफदार करूं. कोणी तरी गरीब माणूस आहे असें दिसलें, तर सोडून देऊं. आपल्याचपैकीं असें वाटलें, तर त्याचा उपयोग

करून घेऊं. परंतु केवळ रस्त्यानें गेला असें पाहिलें ह्मणजे त्यास आपल शत्रूंत गणावें व कैद करून आपल्या ताब्यांत ठेवावें असा अन्या करूं नये. असे नाना प्रकारचे विचार त्याच्या मनांत येऊं लागले. तथा त्यानें पुढें होऊन त्या व्यक्तीस गांठावयाचें असा विचार करून, आपल्य जवळच्या लोकांपैकीं एका अत्यंत विश्वासू नौकरास जवळ बोलावून ह्मटलें; " पुढें हो. आतांच आपल्या पुढें जो घोड्यावर बसून गेला, त्याचा नौकर त्याच्य पाठीमागून जातो आहे, त्यास गांठ आणि तो पुढें चाललेला इसम कोण, काय कोणीकडे चालला आहे याबद्दल तपास कर. मी तुझ्याही पुढें झपाट्यानें जातों आणि त्या पुढच्या इसमाची–त्या यजमानाची पाठ धरतों. तुला जर तसेंच कांह विशेष कळलें, तर घोड्याला थोडी टांच मारून पुढें तरी ये किंवा मी सांगतों अशी शीळ घालून मला खूण तरी कर. मी माघारी येऊन तुझ्यापासून काय ती माहिती घेईन. हा माणूस आपल्या कार्याच्या आड येणार असें आपलें माझ्या मनानें घेतलें आहे. नाहीं तर त्याला पाहिल्यापासून माझें मन इतकें अस्वस्थ झालें नसतें. त्याच्याकडे माझें लक्ष्यच गेलें नसतें परंतु माणूस अगदीं असामान्य यांत शंका नाहीं. " हीं शेवटलीं दोन तीन वाक्यें त्यानें आपल्या विश्वासू नौकराला उद्देशून उच्चारलेलीं नव्हतीं. तीं स्वतःशीं भाषण केल्याप्रमाणेंच होतीं. त्यानें त्या आपल्या नौकरास याप्रमाणें फर्माविण्याबरोबर तो नौकर पुढें निघाला, हाही त्याच्याबरोबर पुढें झाला. याच्या मनांत त्या पुढें गेलेल्या गृहस्थास एकदम गांठावें आणि त्याच्याशीं एकदम भाषणाला सुरुवात करावी असें नव्हतेंच. किंबहुना प्रथम तसें आलें असलें, तरी आतां तें नाहींसें झालें. आपण याच्या मागें मागें जाऊन हा कोठें कोठें जातो, कोणाकडे जातो, याचा तपास ठेवावा एवढेंच त्याच्या मनांत आतां आलें, आणि त्याप्रमाणें त्याच्या पावलाबरोबर पाऊल राहण्याकरितां त्यानें आपल्या घोड्याला तितक्या बेतानें तितक्या अंतरावर ठेविलें.

इकडे त्याचा तो विश्वासू नौकर यजमानानें सांगितल्याप्रमाणें त्या गृहस्थाच्या मागून चाललेल्या त्याच्या नौकराजवळ जाऊन त्यानें त्यास बोलण्यांत गुंतविलें. त्यांचें भाषण झालें तें हिंदुस्थानींत झालें. फार वर्षांपासून– मुसलमानी अंमल या देशांत जारी झाल्या दिवसापासून उर्दू भाषा लोकांच्या वापरांत आली. कोणीही माणूस आपली भाषा बोलून शिवाय उर्दू– अर्धामुर्धी कां होईना– परंतु उर्दू भाषा बोलत असे. यामुळें रजपूत आणि मराठा एकत्र भेटले तरी त्यांस आपले विचार एकमेकांस कळवितां येत. उर्दू भाषा साधारणतः थोडीबहुत तरी प्रत्येकास येत असे. ज्यांचा दरबाराशीं संबंध येई, ते तर त्या भाषेचा अभ्यास मुद्दाम करीतच. आमच्या वरील दोन गृहस्थांचे नौकर अर्धवट उर्दू जाणणारे होते. त्यांनीं त्या भाषेंत भाषण करण्यास सुरुवात केली.

---

# प्रकरण १४ वें.

## औरंगाबादेकडे.

"सरदार साहेब, कोणीकडे चाललां? आणखी हे पुढें चाललेले यजमान... "

परंतु त्या मराठ्या स्वारानें त्या रजपूत शिपायाकडे अशा प्रकारें पाहिलें, कीं त्यास आपण पुढें बोलावें कीं नाहीं याची शंकाच येऊन तो तितकाच थांबला. "लेका, तुला नसत्या चौकशा सांगितल्या कोणी? काय तुझ्या वाटेंत मी आलों होतों? गप्प बस् नाहीं तर काय परिणाम होईल तो ध्यानांत घे." अशा अर्थाची त्याची ती दृष्टि होती. यामुळें तो रजपूत प्रथम दचकला आणि थबकला. त्यानें जरा माघार घेतली, परंतु लागलीच पुढें ह्मणतो:–" वाटेनें वाटसरू चालले, मग एकमेकांला तुम्ही कोण कुठले कोणीकडे चाललां? असे प्रश्न विचारायचेच; मग आपण एवढे रागावलां कां? तशांतून तुह्मी शिपाई गडी, मीही त्याच पेशाचा!"

परंतु त्या मराठ्या शिपायाची ती पहिली मुद्रा आतां बदलली. तिच्यावरील तो तिरस्कार आतां पार गेला आणि थोडासा शांतीचा प्रादुर्भाव झाला. नंतर तो त्या रजपूत शिपायास म्हणतो: "तसं कांहीं नाहीं, तसं कांहीं नाहीं. आपण मला प्रश्न विचारले ते मला बरोबर समजले नाहींत. मी कांहीं दुसऱ्याच विचारांत होतों. आह्मी औरंगाबादेकडे चाललों आहों."

"औरंगाबादेकडे! ओहो! मग आमची व आपली दिशा एकच आहे. मी जयसिंग राजांच्या बरोबर जी फौज आली आहे त्या फौजेबरोबर आलेल्या एका रजपूत सरदारांच्या पदरचा आहें. ते आमचे यजमान पहा......"

"मग! आपण इकडे कसे!" मराठ्या शिपायानें त्यास उलट विचारलें. "जयसिंग राजांच्या सगळ्या फौजेचे तुकडे तुकडे होऊन त्यांनीं त्या शिवाजी राजाला वठणीस आणण्यासाठीं ठिकठिकाणीं वेढे दिले आहेत. बरं होईल बोआ त्याचं जर बंड मोडेल तर. गरीब लोकांना फार फार त्याच्यापासून त्रास होतो आहे. कोणाला ह्मणजे आपण निर्धास्त आहों असं वाटत नाहीं. पावलोपावलीं धास्ती......

हे त्या मराठ्या शिपायाचे शब्द ऐकून तो रजपूत शिपाई चकित होऊन विस्तारलेल्या डोळ्यांनीं त्या मराठ्या शिपायाकडे पाहूं लागला! आणि त्यास म्हणतो: "काय! तुम्ही त्या शिवाजीच्या लोकांपैकीं नाहीं? मला तर वाटलें, कीं तो पुढें चाललेला तुमचा यजमान आणखी तुह्मी, दोघेही शिवाजीच्या लोकांपैकींच आहां. एकूण तुह्मी शिवाजीचे नाहीं–पण मराठे दिसतां...... "

"हो. हो मराठे आहों तर! आह्मी अस्सल मराठे. पण सगळे मराठे तेवढे

काय शिवाजीच्या अंकित झाले आहेत कीं काय ? छे. छे. छे. आह्मी पिढीजाद् बादशहातीचे नोकर आहों. आह्मांला शिवाजीचें करणें बिलकुल आवडत नाहीं. बादशहाच्या हातून अजून त्याचं शासन कसं होत नाहीं याचंच मला फार आश्चर्य वाटतं. बादशहाकडे कोणी जोमाचा माणूसच राहिला नाहीं. ............ ''

" हं. असं नका ह्मणूं आं ? अगदीं असं नका म्हणूं. जयसिंग राजे आले आहेत हे त्याचं शासन केल्याखेरीज खचित परत जात नाहींत. ......... ''

" परत जायचे नाहींत एवढी गोष्ट खरी. परत नाहीं जाणार. पण शासन कितपत त्यांच्या हातानं होणार आहे त्याची वानवाच आहे. आतांपर्यंत कितीक शास्तेखान, अबदुलखान त्यांचं शासन करायला आले. परंतु आपलंच शासन करून घेऊन चालते झाले. ! तसंच कांहीं तरी आतांही होईल दुसरं काय ? ''

" छे. छे. छे. छे. आतां तसं होण्याची गोष्ट नका मनांत आणूं. आतां दिलेरखान आणखी जयसिंग राजे असे दोघे–जोडगोळीसारखे आले आहेत."

" बरं आहे, पाहूं. पण तुम्ही कोणीकडे इकडे ? कांहीं जनाना चालवला आहे वाटतं ?...... ''

" परंतु त्या मराठ्या शिपायाच्या या प्रश्नाला त्या रजपूत शिपायानें उत्तर न देतां तो त्यास म्हणाला आपले यजमान पुढें चालले आहेत ते आणखी आपण दोघेही मोठे धीट दिसतां. बादशहाचें सैन्य वावरत असतां तुम्ही एकटे खुशाल चाललां आहां.... ''

" ह्मणजे ? बादशाही सैन्याची भीति आम्हांला काय ? आम्ही आपले साधे लोक, कामधंदा मिळेल किंवा असेल तिकडे जाणारे. त्या आह्मांला बादशाही सैन्याची काय भीति. ......... ''

" पण तुमचा पेशा तर लढवय्याचा–शिपाईगिरीचा दिसतो. तेव्हां आमची समजूत कीं, तुम्ही कोणी तरी त्या शिवाजीचेच लोक त्या. ......... ''

" छे. छे. छे. तसं कांहीं नाहीं. आम्ही आपले वाटसरू–कांहीं कामाकरितां औरंगाबादेला जातों आहों. आपण आह्मांला प्रश्न विचारतां पण आह्मीं विचारल्या प्रश्नांचीं उत्तरं देत नाहीं याचा अर्थ काय ? आपण कोणीकडे ? ''

" आह्मीं औरंगाबादेलाच. हा शहाजादा मुआझीमचा जनाना आहे, तो पोंचवण्यासाठीं चाललों आहों.

" शहाजाद्याचा जनाना ? आणखी तो इकडे कोणीकडे होता ?– असो. पण आह्मांला काय करायचं आहे. आपण आपल्या, आणखी आह्मी आपल्या वाटेनं जाणार ''

असें ह्मणून त्या मराठ्या स्वारानें आपल्या घोड्याला जलद चलण्याबद्दल थोडा इषारा दिला; त्याबरोबर तो त्याचा भिमथडी घोडा एकदम पुढें निघाला.

इकडे रजपूत शिपाई आपल्या यजमानाजवळ जाऊन ह्मणतोः " त्यांत कांहीं अर्थ नाहीं. हे कोणी तरी मराठे कांहीं कामाकरितां औरंगाबादेला चालले आहेत,

ते शिवाजीचे लोक नाहींत, असंही दिसतं. कारण शिवाजीची गोष्ट निघतांच त्यानें नाक मुरडून त्याची उलट निंदा केली. "

" असं काय? " किरातसिंग थोडा विचार करून ह्मणालाः "एकूण मुआझीमला अनुकूल झालेल्या लोकांपैकीं ही स्वारी दिसते आहे. मग आपल्याला भय वाटण्याचं कारण मुळींच नाहीं. पण संभाळलं पाहिजे हो ! या मराठ्यांच्या इतके लबाड लोक आपल्याला यावज्जन्मांत कोठें दुसरीकडे दिसावयाचे नाहींत. ते सांगतील एक आणखी खरं असेल तिसरंच...... "

" छे. तशापैकीं हा माणूस दिसतच नाहीं. अगदीं भोळसर. मी प्रश्न विचारले मात्र आणखी एखादी थैली मोकळी करावी तशी त्यानं आपली जीभ मोकळी केलीनू. शिवाजीला शिव्या द्यायला लागला आणखी शिवाजीला शिक्षा करायला हल्लीं कोणी बादशहापाशीं माणूस नाहीं ह्मणून बादशहातीला नांवें ठेवूं लागला. पण माझी इतकी खात्री होती, कीं हा कोणी तरी बडा सरदार असावा. शिवाजीचे करणं ज्यांना आवडत नाहीं अशा मराठ्या सरदारांपैकीं कोणी तरी सरदार असावा. पहा, आपल्याला अनुकूल झाला तर, ह्मणजे तिकडल्या बातम्या तरी समजतील, त्या शिवाजीचं शासन करायला तेवढं सोपं जाईल. "

" अरे वा ! तूंही आतां या लढाईच्या बाबतींत विचार करायला लागलास का ! कशाला तूं या भानगडींत पडतोस ? दे सोडून. आपल्या आपल्या पुरतं पहा. एकूण हे कांहीं त्या शिवाजीच्या कडले लोक नाहींत ! "

"नाहींत. खाचित नाहींत. आपले रस्त्यानें जाणारे अगदीं गरीब वाटसरू आहेत. शिपाईबाण्याचे दिसतात परंतु त्यांतही कांहीं तात्पर्य नाहीं. आपलं स्वतःचं रक्षण करण्यापुरता तो बाणा...... "

" एवढं मात्र मला खरं वाटत नाहीं. त्याचा तो जो मालक पुढें गेला आहे, तो खात्रीनेंच कोणीतरी शूर पुरुष असला पाहिजे. इश्रतच सांगते अनू तूं काय म्हणतोस?"

" असेल. मला आपण चौकशी करायला सांगितली ती मीं केली. मला जें दिसलं, तें सांगितलं. आपल्याला तसं वाटतं असलं, तर असेल. पण मला वाटत नाहीं."

या त्याच्या बोलण्यांत त्या यजमानाच्या बोलण्यानें मन खट्टू झाल्याची झांक दिसत होती. आपण इतक्या चाणाक्षपणानें चौकशी केली, आणखी ती बरोबर नाहीं, आपलें चुकलें असें किरातसिंगानें म्हणावें हें त्यास बरें वाटलें नाहीं. परंतु तो ज्यास्त कांहीं बोलला नाहीं.

किरातसिंगास असें वाटलें, कीं आपणच पुढें जाऊन त्या पुढें गेलेल्या सरदाराला निरखून नीट पहावें, ह्मणजे आपल्याला जो संशय आहे तो दूर होईल कदाचित् जरूर वाटली, तर त्याच्याशीं बोलण्यालाही हरकत नाहीं. असा विचार करून त्यानें आपल्या घोड्यास टांच दिली त्याबरोबर घोडा भरधांव निघाला. परंतु पुनः काय त्याच्या मनांत आलें, त्यानें आपल्या घोड्याला आवरलें आणि पुनः तो माघारी

वळला. आपला संशय व्यर्थ आहे. तिकडे जयसिंग राजांनीं आणखी दिलेरखा-नानें नेट लावला आहे. सगळीकडून पिडल्यासारखें झालें आहे आणि हा इकडे येईल हें संभवनीयच नाहीं. आपण भलतीच शंका घेऊन त्या शंकेवरून भलतीच आशा मनांत धरून कांहींतरी करायला धांवण्यांत कांहीं तात्पर्य नाहीं. आपला मार्ग सोडून आपण गेल्यास आपल्याला मात्र कांहीं संकट ओढवूं नये म्हणजे झालें, असें त्याच्या मनांत आलें आणि तो परतून आपल्या त्या मंडळींबरोबर चालला.

इकडे आमचा मराठा शिपाई आपल्या यजमानाजवळ गेला आणखी ह्मणतोः " ही मंडळी चालली आहेत त्यांच्या नाईकाला कांहीं तरी संशय खचित आला आहे. त्याखेरीज त्यानें मुद्दाम माझ्याकडे माणूस पाठवून विचारपूस केली नसती. मी त्याला उडवून दिला. पण त्याचा कांहीं नेम नाहीं. ज्या त्याच्या मालकाला शंका आली, तो कदाचित् याच्या सांग-ण्यानें संतुष्ट व्हायचा नाहीं. आपण आपल्या घोड्यांना जरा इषारा देऊन लवकर येथून चालतें व्हावें तें चांगलें. "

तें ऐकून तो पुढला गृहस्थ किंचित् चकित झाला व हंसून त्याच्याकडे पाहून ह्मणतोः– " तूं आतांशा फारच संशयखोर झाला आहेस. मी त्या माणसांकडे पाहिलें, पण मला नाहीं कुठें तूं ह्मणतोस तशी शंका आली. असो. पण तुला शंका तरी काय आली ? बरं तुला त्यानं विचारलं तसं तूं कांहीं त्याला विचारून काढलंस का ते कोण, काय ?

" हो. तो कोणाचा तरी जनाना घेऊन चालला आहे. कोणाचा ह्मणून विचा-रला तर शहाजाद्या मुआझिमचा असेंही त्यानें उत्तर दिलें, परंतु त्यावर जेव्हां मी विचारलें कीं मुआझिमचा जनानखाना इकडे कोणीकडे गेला असणार ? तेव्हां तो आपल्याला त्या भानगडींत पडून काय करायचं आहे असं ह्मणाला. त्यावरून मला कांहीं तरी लटपट दिसते आहे. कोणाची तरी स्त्री पकडून तर हे तिला बळेंच मुआझिमच्या जनान्यांत नेत नाहींतना ? आपल्यापैकीं कोणाची मुलगी किंवा बायको नसेलना ? हे मुसलमान लोक बायका पळवि-ण्यासाठीं काय करतील याचा नेम नाहीं. तिच्या त्या मेण्याभोंवतीं केवढा कडक पहारा आहे ! आपण नजर दिलीत ना ? "

कोणाची तरी मुलगी अगर बायको पळवून नेल्याबद्दलच्या त्याच्या संशयाच्या उद्गारांवरून तो त्याचा मुख्य एकदम स्तब्ध झाल्याप्रमाणें झाला व जरा विस्तारित अशा नेत्रांनीं त्याच्याकडे पाहून ह्मणतोः " काय तुला असा संशय आला ? असा संशय येण्याला कारण ? तसं जर कांहीं असतं तर कांहीं तरी निराळी गडबड दिसली असती. "

" निराळी गडबड काय असायची ? बिचारी एकटी, तिच्या मेण्याजवळ नागव्या तरवारी घेऊन चाललेल्या लोकांचा पहारा. घाबरून निपचित पडलेली असेल.

गडबड कसली करते आणखी काय करते ! मला तर खास तसा संशय येतो. त्याखेरीज इतका असा विलक्षण लवाजमा दिसला नसता. तो एक खोजा विलक्षण दिसत होता. दुसरी आपण अशी मजा पहा, कीं जो कोणी वाटेनें येईल जाईल तो आपल्या पाळतीवर आपला माग काढीत आला कीं काय अशी शंका त्यांना येते असें वाटतें. तेव्हां मला स्वतःला तरी माझी शंका अगदीं बरोबर वाटते. ''

त्याचा यजमान, त्याचें हें बोलणें चाललें असतां तें अगदीं स्तब्धपणें ऐकून घेत होता. त्याच्या मनांत कांहीं तरी विचार चालला असावा हें उघड होतें. नंतर कांहीं वेळानें तो त्यास ह्मणालाः ''पण तुला असा संशय येण्याला कारण काय ?''

'' कारण कांहीं अमूकच म्हणून मला सांगतां येत नाहीं. पण असं वाटतं खरं कीं, कोणाची तरी मुलगी किंवा बायको पोंचवायला कांहीं ही मंडळी चाललेली नाहींत. कांहीं तरी दगा करून कोणाची तरी स्त्री यांनीं पळवून जबरीनें कोठें तरी चालविली आहे. आपण आपल्या नादांत चाललां होतां यामुळें आपलं लक्ष तिकडे गेलं नाहीं. पण मीं बारकाईनं पाहिलं. आमची चाहूल ऐकण्याबरोबर त्यांची किंचित् चलबिचल झाली. सहज साखसुरत जनाना चालला असता, त्यांत कांहीं लांडी लबाडी नसती, तर इतकी चलबिचल कधींच व्हायची नाहीं अशी आपली माझी समजूत आहे. मग आपल्या काय ध्यानांत येईल तें खरं ''

ते त्या आपल्या नोकराचे शब्द ऐकून स्वारी पुनः विचारांत पडली. बराच वेळ विचार झाला. नंतर त्यानें आपल्या त्या नोकरास ह्मटलेंः–''असें जर असलें, तर आपल्या ब्रीदाला जागलें पाहिजे. त्या बिचाऱ्या स्त्रीला सोडविलें पाहिजे. आणि तिला जेथल्या तेथें पोंचविलें पाहिजे. ''

'' काय ! आपण म्हणतां तरी काय ! आपण दोघे, आणखी ते किती याचा कांहीं विचार ! आपल्याजवळ मी आधीं आपली शंका बोलून दाखवायलाच नको होती. परंतु माझ्यानें रहावेना ह्मणून बोललों. बोलूं लागलों तेव्हांच मला वाटलें कीं मी करतों आहें हें कांहीं चांगलं नाहीं. पण मनांत आलेली गोष्ट आपल्याजवळ बोलल्याखेरीज कधींच राहिलों नाहीं आणखी आतांच कसा राहणार ! त्यांतून मजा अशी झाली कीं, मी जेव्हां त्यांना विचारलें कीं हा कोणाचा जनाना ! तुह्मी पोंचवायला जातां आहां काय ! तेव्हां त्यांनीं '' हो शहाजादा मुआझीमचा '' असें उत्तर दिलें. तेव्हांच मी समजलों कीं यांत कांहींतरी घोंटाळा आहे. आणखी आपल्याजवळ तें सांगण्यासाठीं आलों. माझा विचार असा कीं त्यांना आपल्याबद्दल संशय आला आहे तर आपण आपलं येथून लवकर चालतं व्हावें......''

'' हा वेड्या, गरीब बिचारी एखादी स्त्री अशा संकटांत पडलेली आपल्या नजरेला आली असतां तिला तशीच सोडून आपण आपला जीव बचावण्यासाठीं पळून जावें हेंच का आजपर्यंत आपण शिकलों. आपल्या......तें कांहीं नाहीं आपण आतां येथेंच कोठेंतरी झाडाआड लपून बसूं. अजून एक मुक्काम करून ही मंडळी जातील.

निदान मध्यान्हीच्या वेळीं कोठेंतरी विश्रांतीला बसतील. तेव्हां त्याच्याबद्दल पक्का शोध करूं आणखी तूं म्हणतोस तसंच जर असलं, तर ताबडतोब त्या बिचारी-ला सोडवूं...... "

" पण आपण दोघे. ते कितीजण याचा कांहीं विचार ? त्याचा विचार केला नाहींतर आपला काय परिणाम होणार याचा विचार ? "

" त्याचा विचार परमेश्वर पाहून घेईल. आपल्या ब्रीदाला आपण जागलें पाहिजे. वेडा कुठला ! आपल्या स्वतःच्या बचावासाठीं एका पतिव्रतेला खुशाल भ्रष्ट होऊं द्या ह्मणून सुचवतो. वेड्या पतिव्रता ती पतिव्रताच. मग ती मुसलमान असो कीं हिंदु असो. पतिव्रतेचं रक्षण हें केलंच पाहिजे. चल, आपण एखाद्या आडवळणाला जाऊन कांहीं वेळ स्वस्थ उभे राहूं, आणखी मग सावकास चालून यांचा मुक्काम होईल तेथें तुला आलेल्या संशयाचा पक्का छडा काढूं. "

असें बोलून त्यानें आपला घोडा आड रानांत घातलाच. ज्या कामाकरितां औरंगाबादेला गृहस्थ चालला होता, तें काम दूरच राहिलें. कोणा तरी पतिव्रते-चा छल होतो आहे अशी शंका जेथें येईल, तेथें त्या शंकेचें निवारण होईपर्यंत किंवा त्या पतिव्रतेचें संरक्षण होईपर्यंत दुसरें कार्य हातीं घ्यावयाचेंच नाहीं, एका पतिव्रतेला अशा तऱ्हेनें रक्षिली, तर हजार गाईचा वध थांबविल्याचें श्रेय होय, असें त्यांच्या मनानें घेतलें होतें. आडरानांत बरीच लांब गेल्यानंतर स्वारी थबकली व त्यांनीं आपल्या नौकरास म्हटलें:—" मी या मोठ्या थोरल्या वडाच्या-खालीं बसतों. तूं पुनः परत जा. आणखी त्यांचा रोंख कोणीकडे आहे तो पाहून ये."

आज्ञा ह्मणजे आज्ञाच. ही आज्ञा हिताची नाहीं, हिच्या योगानें नुकसान होणार आहे तेव्हां आपण ही मानूं नये असला प्रकार नोकरांच्याकडून होतांच कामा नये, असें या मराठ्या शिपायास पूर्णपणें ठाऊक असल्यामुळें त्यानें त्या आज्ञेवर अधिक कांहीं एक कुरकुर न करितां तेथून आपल्या घोड्यास पिटाळलें; व तो त्या इतर मंडळींच्या रस्त्यापासून किंचित् अंतरावर उभा राहिला. ती मंडळी मागाहून आली व पुढें गेली. तेव्हां हाही हळू हळू त्यांच्या मागून चालला. यदा-कदाचित् ही मंडळी आतां मुक्कामासाठीं कोठें थबकली, तरी आपल्याला जास्त माहिती काय लागणार ! असा प्रश्न त्यानें आपल्या मनास विचारला. तें कांहीं असो. आपण सांगितल्या कामाचे नौकर. जर कांहीं नवीन माहिती लागली, किंवा संशय आला, तर तो जाऊन निवेदन करायचा हें आपलें काम. असें त्यानें आपलें समाधान केलें, आणि तो त्यांच्या मागोमाग जाऊं लागला. होतां होतां बऱ्याच वेळानें ती पुढील मंडळी एक सुंदरसें झाड पाहून त्याच्या खालीं तळ देण्याच्या विचारांत दिसली. आपण आतां यांच्यांत पुनः घुसावें आणि कांहीं पत्ता लागला तर पहावा असा आमच्या मराठ्या शिपायानें विचार केला आणि तो पुढें झाला. त्यास पहा-तांच त्याच्याशीं थोड्या वेळा पूर्वीं बोलणारा रजपूत शिपाई चकित झाला व

त्यानें त्याच्याजवळ येऊन त्यास विचारलें: "कांहो, तुह्मी तर मघाशीं मोठ्या झपाट्यानें आमच्या पुढें गेलां, आणखी आतां पहातों तों पुनः आमच्या मागें ? "

"काय करूं मला झाड्याला जाण्याची जरूरी लागली तेव्हां मालकाची परवानगी घेऊन पलीकडे त्या ओढ्यावर गेलों. तेथें जरासा वेळ लागला. मालकांनीं सांगितलें कीं, आपण तडक पुढें जातों. तूं मागून सावकास ये. आपल्याला तर आतां थोडी न्याहारी केल्याखेरीज जातां येत नाहीं. एक पाऊल पुढें पडायचें नाहीं. काय करावें या विचारांत होतों, इतक्यांत तुमची मंडळी पुढें दिसली. तेव्हां विचार केला कीं, आपल्या तळांतच आपलाही तळ द्यावा. आपल्या मालकाची परवानगी असली तरची गोष्ट आहे हो. नाहीं तर आम्ही आपले दुसरीकडे जाऊं. घोड्याला जरा विश्रांति देऊं. आपण मघाशीं आमच्याशीं भलेपणानें बोललां, आपला स्वभाव मोठा चांगला आहे असें दिसलें म्हणून आम्हीं तरी आलों आपल्याजवळ. नाहीं तर दूरच कोठें तरी बसलों असतों. जशी आपली मर्जी. आपला आमचा चौका निराळा, सगळें निराळें. पण आपली चांगली सोबत. त्यांतून मालक पुढें तातडीनें निघून गेले मला सावकास ये ह्मणून सांगितलें ह्मणून. नाहीं तर एव्हांना धडपड करीत गेलेंच पाहिजे होतें.

त्या रजपूत शिपायानें त्याच्याकडे एकवार फार सूक्ष्मपणें पाहिलें. नंतर तो त्याला म्हणतो: " कांहीं हेरपणा करायला तर नाहीं ना मागें राहून आमच्यांत घुसायला आलास ? जर तसा कांहीं प्रकार असला, आणखी तो आमच्या नजरेला आला, तर तुझी चामडी सुद्धां रहाणार नाहीं हें पक्कें समज.

मराठा शिपाई हंसून ह्मणाला: " कबूल, कबूल ! "

मराठ्या शिपायाचें तें हांसून दिलेलें उत्तर ऐकून तो रजपूत शिपाई त्यास ह्मणाला: " तुह्मी मराठे मोठे लबाड अशी तुमची ख्याति आहे. कोण्या वेळीं कोणाच्या पोटांत कसे शिराल त्याचा नेमच नाहीं. विश्वास दाखवून गळे कापाल, भाऊ म्हणून तळपट उडवाल, तेव्हां तुमचा विश्वास तरी काय धरावा ? "

तें ऐकल्याबरोबर त्या मराठ्या शिपायाच्या कपाळाला जबरदस्त आठ्या पडल्या. परंतु क्षणार्धांत त्या नाहींशा झाल्या. आणि तो मोठ्यानें हंसून पुनः ह्मणतो: " आपण आह्मां मराठ्यांचें वर्णन असें केलेलें ऐकून कोणाही मराठ्याला संताप यावा. परंतु मला उलट हंसूंच येतें. कारण मला ठाऊक आहे, कीं आपल्याला मराठ्यांची माहिती नाहीं, ह्मणून आपण असें त्यांचें वर्णन करतां आहां. हीच जर आपल्याला मराठ्यांची खरी माहिती असती, तर आपण त्यांचें कधीं असें वर्णन केलें नसतें. आपल्याला अनुभव नाहीं. इकडे आलेले चार लोक येथून परत गेले ह्मणजे काय सांगतील, तेंच आपल्याला ब्रह्मवाक्य होतें ! मराठ्यांची खरी दानत काय याचा अनुभव त्यांच्यापासून ज्यानें नौकरी घेतली असेल त्यांनाच माहीत ! इतरांना काय माहिती असणार ! शिवाजीनें आजपर्यंत आपले कांहीं लोक फस-

वाफसवी करून मारलें, अशी तुमची समजूत कोणीं करून दिली आहे, ह्मणून तुमची तरी जीभ त्यांची अशी निंदा करिते. नाहीं तर कशी करती ! पण एक तर शिवाजीनें फसवाफसवी केली असली, तर ती आपल्याला विश्वास देऊन आपल्या जिवावर उठणाऱ्या माणसाशींच केली ! इमानानें वागणाराशीं कधीं केली नाहीं. शिवाय तो तर बोलून चालून तुमच्याशीं— मुसलमानाशीं शत्रूपणा करूनच राहिला आहे. तेव्हां त्यानें दगा केला, तर त्यांत नवल काय ? तुमची नौकरी करणारा, तुमच्याशीं इमान दाखविणारा मराठा कधीं कोठें बेइमान झाला आहे काय ? नाहीं. असा मराठा कुठें नाहीं. मराठ्यांचें तें शील नाहीं. ती दानत नाहीं. शत्रूखेरीज तो कोणाशीं कधीं दगाफटका करायचाच नाहीं. तो आपल्या जबानीचा सच्चा आणखी कमानीचाही पण सच्चा ! आपल्याला माहिती नाहीं, ह्मणून आपण अशा प्रकारानें बोलतां. वास्तविक अशा प्रकारानें आपल्याविषयीं बोलणाराजवळ माझ्यासारख्यानें उभेंसुद्धां राहूं नये. पण तुह्मांला माहिती नाहीं ह्मणून तुह्मी बोलतां आहां, त्याखेरीज बोललां नसतां, असें मला ठाऊक ह्मणून मी हंसून घालवितों ! पण मी आतां मराठे खरोखर कसे आहेत, तें सांगितल्यावर कांहीं तुह्मी त्यांच्याबद्दल वावगें बोलणार नाहीं ! ”

असें बोलत बोलत त्या मराठ्या शिपायानें घोड्यावरून खालीं उडी टाकून त्याच्यावरलें खोगीर सैल करण्यास सुरुवातही केली ! जणूं काय आपल्या या लांबलचक बोलण्यानें आपल्याला त्या रजपुतांनीं पूर्ण परवानगी देऊन आपल्यांत घेतलेंच. त्याच्या त्या लगटीच्या वागण्यांतच इतकी कांहीं खुबी झाली, कीं त्या रजपूत शिपायास त्याला दूर करणें शक्य नाहींसें झालें व त्यानें त्यास आपल्यांत खुशाल मिळूं दिलें. इतरांप्रमाणें त्यानें त्या आपल्या नवीन ओळख झालेल्या शिपायाजवळ आपली पथारी पसरली. एका झाडाखालीं आपल्याही घोड्यास बांधून त्याला थापटून उभें केलें ! त्या रजपूत शिपायापासूनच थोडा दाणा घेऊन त्या घोड्यास तोबरा दिला आणि आपल्या स्वतःसाठीं थोडा आटाही घेतला ! आतां जणूं काय त्या मराठ्याबद्दल त्या मंडळीचा संशय पार निघून गेला ! पहिल्यानें त्याच्याशीं एकच बोलत होता, आतां त्याच्याशीं अनेक बोलूं लागले ! किरातसिंगानेंही त्यास बोलावून नेलें व त्याच्याशीं भाषण सुरू केलें ! आपल्या शिपायाजवळ यानें जें भाषण केलें, त्यांत खरेपणा कितपत आहे हें पहायचें हा त्याचा उद्देश, दुसरें कांहीं नाहीं हें उघडच होतें. परंतु त्याच्याशीं बोलतां बोलतां त्यानें ज्या गोष्टी सांगितल्या त्यानें शिवाजीच्या एकंदर कृत्याबद्दल जी नापसंती दाखविली ती ऐकून किरातसिंगाच्या मनांत एक नवीनच विचार आला व तो त्यास ह्मणतोः—“ तूं औरंगाबादेला काय कामाला चालला आहेस ? ”

“ खरें जर पुसाल महाराज, तर मी नौकरी पहायला चाललों आहें ! शहा-

जादा मुआझीम आतां लवकरच उत्तरहिंदुस्थानांत आपल्या बापाकडे जाणार, तर आपण त्याच्याकडे कांहीं नौकरी मागून तशी मिळाली तर देशत्याग करावा असा माझा हेतु आहे, दुसरें कांहीं नाहीं. आमचा पेशाच लष्करांत नौकरी करण्याचा. मी आणखी आमचे मालक. आह्मांला इकडचा कंटाळा आला. शिवाजी-च्या पदरीं नौकरी करायला गेलों, तर आतां नौकरी मिळेल, पण काय उपयोग? आह्मांला त्याची नौकरी करावीशी वाटत नाहीं. अहो, त्याचा हा पुंडावा किती दिवस टिकणार? जोंपर्यंत मोंगलांनीं खग नेट धरून आमच्यासारख्या चार लोकांची मदत घेतली नाहीं तोंपर्यंत! आजपर्यंत आमचे लोक मोगलांना त्यांच्याविरुद्ध मदत द्यायला खुषी नसत. पण याची ही पुंडाई आतां कांहीं जय-सिंगराजापुढें आणखी दिलेरखानापुढें चालत नाहीं असें लोकांना दिसूं लागलें, तसें तेही पण गेले. दोन माहितगार असे शिपाई आमच्यासारखे आपण जवळ करून त्यांचा उपयोग करून घ्यायला सुरवात केली पुरे! शिवाजीचा पाडाव व्हायला आठ दिवस लागायचे नाहींत! हे त्याचे किल्ले इतके भयंकर वाटतात, पण माझ्यासारखा त्यांत हिंडलेला एक किडा आपल्यासारख्याला वश झाला पुरे, कीं एक एका किल्ल्याला एक एक दिवस सुद्धां लागायचा नाहीं. नाक दाबलें कीं तोंड उघडलेंच पाहिजे. पण नाक कुठें आहे तें मात्र सांपडलें पाहिजे! कां मी ह्मणतों तें खरें का खोटें!......... "

हें त्या मराठ्याचें बोलणें चाललें असतां किरातसिंगाच्या डोक्यांत कांहीं विचार सुरू झाले होते! आपण जी कामगिरी करावयास आलों आहों, ती कामगिरी केल्याबरोबर आपल्याला येथून निघालें पाहिजे आणि पूर्वीच्या कामाला लागलें पाहिजे. मग आपण त्याही कामगिरींत आपला वर्चष्मा दाखविण्याचा प्रसंग हातचा कां जाऊं द्यावा? त्या कामांत जर वर्चष्मा करून दाखविला, तर मागेंपुढें आपला हा आतांचा प्रकार उघडकीस आगरी तर आपलें शासन करण्याला दिलेरखानाला जड गेलें पाहिजे! आपली कदराचा उत्तम करायला आपल्याला उत्तम माहिती पाहिजे. आतांच आपल्याला पु काम-किल्ला घेण्याच्या कामांत जर दिलेरखानाला मदत करतां आली, तर केवढी आहे! गिरी बजावलीशी होणार आहे! दिलेरखान जवळ जवळ निराश झाला प्रसन्न अशा वेळीं आपण त्याच्या उपयोगीं पडलों, तर त्याची मर्जी आपल्याव आपल्या होईल. शिवाय त्याला असें वाटतें आहे, कीं आपली पोरगी मराठ्यांनीं णशत-किल्ल्यावर नेली आहे. तेव्हां तो किल्ला तावडतोब हस्तगत झाला तर आप में दि-कृत्य केलें असें त्यास वाटणारच, किल्ला सर झाल्यावर पोरगी तेथें नाहीं अ गटा सलें, ह्मणजे त्यांनीं ती पळवून दुसऱ्या किल्यावर नेऊन ठेवली, किल्ल्यांना चोरव-फार असतात असें ठोकून द्यायला आपल्याला कांहींच हरकत नाहीं. तेव्हां हा मरा ठा शिपाई ह्मणतो आहे, यांत जर कांहीं खरेपणा असला—हा जर त्या किल्ल्यांतून

हिंडलेला किडा असला, तर याला कां आपल्या हाताशीं घेऊं नये ? मला वाटतें आयता आपला मार्गांत आला आहे. त्याला भुलथापा देऊन आपल्या पदरीं ठेवून घ्यावें आणखी आपली कामगिरी करून घ्यावी. आपण जशी बेइमानपणा करण्याला मुळींच दिक्कत बाळगीत नाहीं, तशीच याही माणसाला वाटत नसावी. आपल्या मालकाशीं बेइमानपणा करून तोही आपल्याचसारखा आपला भाग्योदय करून घ्यायला झटेल, त्याचें काय ? आणखी आपण यांत बेइमानपणा तरी काय करणार ? आपण आपला भाग्योदय करून घेण्याकरितां झटणें ह्मणजे कांहीं बेइमानपणा नाहीं. तेव्हां या माणसाला जर खरोखर या किल्ल्यांची माहिती असली, तर आपण याचा फायदा करून घ्यावा. याला पुष्कळशा थापा देऊन जवळ करावा आणखी किल्ले पाडाव करून घेण्यांत उपयोग करावा. हा तरी शिवाजीच्या जवळून नाखुष होऊन निघालेलाच दिसतो आहे. तथापि तसा तो आहे, आणखी त्याला किल्ल्यांच्या गुप्त वाटांची चांगली माहिती आहे अशी खात्री मात्र करून घेतली पाहिजे.

या किरातसिंगाच्या डोक्यांत काय विचार चालले आहेत, ते जणूं काय एकसाग्रे स्पष्ट दिसतातच आहेत. सूक्ष्मपणें त्याच्याकडे पाहिलें मात्र पाहिजे असें वाटूनच जणूं काय त्या मराठ्या शिपायाची काकदृष्टि किरातसिंगाकडे लागलेली दिसली. आणि त्या त्याच्या दृष्टीला जें काय दिसलें, तें पाहून जणूं काय त्यास समाधान झालें; परंतु वाटेल तेव्हां बावळी मुद्रा धारण करण्याचें विलक्षण कसब त्यास साधलें असल्याकारणानें त्यानें आपल्या मनाला काय वाटलें, तें क्षणार्धांत जणूं काय आंत मुरवून वरून बावळेपणा आपल्या मुद्रेवर आणला. खोल अशी विहीर शत्रूच्या लक्ष्यांत येऊं नये ह्मणून तिच्या तोंडावर हिरवेंचार गवत पसरून ठेवण्याप्रमाणेंच तें होतें ! इतक्यांत किरातसिंगाचाही विचार संपून तो त्यास ह्मणतोः "कायरे बोआ, तुझें आमचें आपलें दोन स्पष्ट शब्द होऊं दे. तूं म्हणतोस कीं आपण शिवाजीच्या नौकरींत होतों, परंतु त्याची धडपड फार दिवस टिकायची नाहीं ह्मणून तूं त्याची नौकरी सोडून देऊन मोगलांच्या नौकरींत आपलं नशीब उघडलं, तर पहावं ह्मणून जातो आहेस, आणखी तुझा मालकही त्याच विचारांत आहे, ही गोष्ट तरी खरी का ?"

"खरी कीं खोटी याची खात्री माझ्या नुसत्या शब्दांनीं जर तुह्मांला होईल तर माझ्याकडून वाटेल तशी खात्री घ्या. पण अशी खात्री कुठें शब्दांनीं होत असते महाराज ? त्याला अनुभव लागतो. तसा अनुभव आपण घ्या, मग आपली खात्री होईल. शिवाजीची धडपड व्यर्थ आहे अशी आमची खात्री झाली एवढंच कांहीं केवळ आह्मांला त्याला सोडून जाण्याला कारण नाहीं, आमचा त्यानं कांहीं कारण नसतां फार अपमान केला, हेंही एक कारण आहे. पहिल्यानं आह्मी कांहीं त्याला कधीं सोडून गेलों नसतों, पण त्याला आतां भराभर जय मिळायला लागले, तेव्हां त्याला आमच्यासारख्यांची किंमत वाटेनाशी झाली ! नवी नवी मंडळी

त्याला येऊन मिळूं लागली, मग जुन्यांना तो विचारिनासाच झाला. पण आतां आपलेच दांत आणखी आपलेच ओंठ, तेव्हां काय सांगावं आपल्याला, पण असा त्वेष येतो, कीं आपला असा अपमान करणाऱ्याला कांहीं तरी शासन केलंच पाहिजे. पण पुनः वाटतं, कीं जी इमारत बांधायला आपण चांगला हातभार लावला ती इमारत आपणच पाडून टाकण्यासाठीं मदत करूं नये. बाकी आमच्यासारखीं दोन माणसं जर आपल्यासारख्यांनीं अनुकूल करून घेतलीं, तर त्या सुर्वे प्रांतांतले पांच पंचवीस किल्ले महिना दोन महिन्यांत आपल्या हातीं आले ह्मणून समजा. अहो, किल्ल्यांत किती सामग्री असली, आणखी किती माणसं असलीं तरी काय? एक गुप्त वाट दाखवून दिली, आणखी त्या वाटेनें किल्ल्यावर जाऊन दत्त ह्मणून त्या मंडळींसमोर उभे राहिलां पुरे कीं झालीच ती मंडळी गर्भगळित! आहे काय आणखी नाहीं काय? उंदराचं बीळ जोंपर्यंत कोणाला सांपडलं नाहीं, तोंपर्यंत त्याची चलाखी नू धिटाई. एकदां कां तें बीळ उघडकीस आलं ह्मणजे तो कसा गर्भगळित होतो आपण पाहिलं नाहीं का? त्यांतलाच हा प्रकार आहे."

त्या मराठ्याचा तो दृष्टांत ऐकून किरातसिंगास फार हंसूं आलें. मराठे लोकांस मुसलमान व रजपूत त्या काळीं डोंगरांतले उंदीर ह्मणत असत. तेव्हां तोच उंदराचा दृष्टांत घेऊन यानें आपल्या लोकांचें वर्णन केल्याबरोबर हंसूं येणें हें अगदीं साहजिक होतें हें उघड आहे. तो त्याप्रमाणें मोठ्यानें हंसून त्यास म्हणालाः "तर मग एक डोंगरांतला उंदीर आपल्या साऱ्या भाऊबंदांच्या बिळाची माहिती मांजरांना द्यायला तयार आहे अं?"

"हो. हो. त्या उंदराला जर शेवटीं गट्ट करून टाकणार नाहीं अशी हमी मिळेल, आणखी त्याला कांहीं तरी फायदा करून दिला जाईल, तर तो उंदीर त्या मांजराला उपयोगीं पडेल; कां पडणार नाहीं? आपल्या मनांत डांचत असलेला सूड उगवायला त्याला दुसरा उपायच नाहीं.

'सूड' हा शब्द ऐकल्याबरोबर किरातसिंग किंचित् विचार करूं लागला. शिवाजीच्या गोटांतलींच हीं दोन माणसें असून त्यांच्यावर कांहीं तरी कारणानें फार जळफळत असावींत. त्या जळफळण्याच्या भरांतच त्यांनीं औरंगाबादेची वाट धरली असावी, असें त्यास पक्कें वाटलें. परंतु त्याबद्दल पक्की खात्री करून घेण्यासाठीं तो त्यास म्हणतोः "तुम्हाला जर सूड उगवायचा होता, तर तेथल्या तेथें जयसिंगराजाकडे जाऊन मिळण्याचें सोडून औरंगाबादेकडे कोणीकडे चाललां?"

तो प्रश्न ऐकून तो मराठा शिपाई प्रथम थोडा गोंधळल्यासारखा दिसला. नंतर हंसून म्हणतोः "आपण तरी फार मार्मिक आहां म्हणायचे. आपण प्रश्न विचारला तो अगदीं बरोबर; पण जयसिंगराजाकडे जा कोणच्या मिषानें? आम्ही तुम्हाला मदत करतों असें म्हणून एकदम आमच्यावर ते कसे विश्वास ठेवतील? कोणाच्या

तरी शिकारशीनेंच त्यांच्याकडे गेलें पाहिजे. शहाजाा घेऊं नये ? मला वाटतें परस्परांचीं मनें वळवायला पहात होते, तेव्हां आमऱ्देऊन आपल्या पदरीं ठेवून होते, ह्यामुळें शहाजाद्याकडे प्रथम जाण्याचा ीी बेइमानपणा करण्याला सर्व हकीकत सांगून त्याच्याचकडून जयसिंगराजाक्ष्त नसावी. आपल्या खानाकडे संधान बांधायचें, नाहीं तर देशत्याग ग्योदय करून घ्यायला उत्तर हिंदुस्थानांत निघून जायचें असा आमचा विचार. ाय करणार ? आपण राजा जयसिंगाकडे आमचा प्रवेश होईल ही कल्पनासुद्धां आानपणा नाहीं. तेव्हां वाटली; कारण शहाजाद्याच्या हातून कांहीं कामगिरी होईना, ण याचा फायदा त्याला इकडे पाठवलेला. तें काय त्याला आवडलें असेल थोडेंच ! किल्ले पाडाव कीं त्याच्याकडे गेल्यावर कोणी तरी तिकडला माणूस भेटेल, कांहीं त निघा-निदान जुने मध्यस्थ ह्मणून त्याची आमची जी ओळख झाली आहे, त्या र गुप्त वरून तो आह्मांला आपल्या पदरीं तरी ठेवून आपल्याबरोबर घेऊन जाईल

शिवाजीच्या आणखी शहाजाद्याच्या दर्म्यान चाललेल्या मेथकुटांत हीं म्मा-मध्यस्थ होतीं असें ऐकल्या वेळेपासून किरातसिंग कांहीं निराळाच विचार लें लागला होता. हीं माणसें जर शहाजाद्याच्या ओळखीचीं आहेत, तर त्या गोष्टे आपण फायदा कां घेऊं नये ? मराठ्यांनीं दिलेरखानाच्या पोरीला पळवून नेल असा बहाणा आपण केला आहे, तो खरा करून आपलें अंग बाहेर दिसावयाचें नाहीं अशी तजवीज करण्याला काय हरकत आहे ? तशी तजवीज अगदीं शक्य आहे. या माणसांवर थोडा विश्वास टाकावा. आणखी ही आपली मंडळी आहे अशीच बरोबर ठेवून यांच्या हातीं तिला शहाजाद्याकडे पाठवून द्यावें. बरोबर पत्र दिलें ह्मणजे सगळा खुलासा होतोच आहे. शहाजाद्याकडे मराठ्यांनीं पोंचविली—मराठ्यांचें आणखी शहाजाद्याचें खलबत चालू होतें, तेव्हां अर्थातच मराठ्यांनींच आपल्या पोरीला येथें—शहाजाद्याकडे आणून घातलें असें धरून चालण्यास त्यांना अडचण पडणार नाहीं. आपलें नांव पुढें करावयाला नको. हा विचार त्याच्या मनांत येऊन त्याला पक्का मोह झाला, कीं या माणसावर विश्वास टाकून याच्याच बरोबर शहाजाद्याला फक्त पत्र देऊन या पोरीला त्याच्याकडे पाठवावें. आपण त्या खोजाकडून जें असें उठविलें आहे, कीं मराठ्यांनीं त्या पोरीला नेलें, तें खरें भासवि-ण्याला परमेश्वरानें एक मोठेंच साधन आपल्या वाटेंत आणून टाकलें आहे, त्याचा आपण फायदा करून घेतला पाहिजे. असा एकंदर विचार करून तो त्या मराठ्या शिपायास ह्मणतोः "तुला आणखी तुझ्या धन्याला खरोखरीच आमच्या पदरीं नोकरी करायची इच्छा आहे काय ? उगीच कांहीं तरी गप्पा झोंकून मला फसवूं नकोस. तुला जर खरोखरी इच्छा असली, तर तुला एक फार विश्वासाची कामगिरी सांगतों. ती कामगिरी केलीस, तर तुला किती बढतीवर नेईन आणखी किती मान्याला चढवीन त्याची सीमाच नाहीं असं समज."

" वा ! अशी आमची कर्तबगारी आणखी इमानीपणा जर कोणी कसोटीला लावतील, तर आह्मांला किती तरी आनंद होईल. आपलें काय विश्वासाचें काम असेल तें बेलाशक आपण आह्मांला सांगा......."

किरातसिंग विचार करीत स्तब्ध राहिला.

# प्रकरण १५ वें.

## ठकास महाठक.

किरातसिंग विचार करीत स्तब्ध बसलेला पाहून त्या मराठ्या शिपायास फार संतोष झालासें दिसलें. हा एकंदर काय प्रकार आहे हें समजण्याला फारच आपल्याला उत्तम संधि मिळाली हें त्यास स्पष्ट दिसलें. आणि आतां या वेळीं आपण लगट केली तर बहार होणार आहे हेंही पण त्याच्या नजरेस आलें. ह्मणून तो लागलीच किरातसिंगास ह्मणतोः-"आपण विचार कसला करतां महाराज ? आपल्या मराठ्यांची कामगिरी-विश्वासाची कामगिरी-पहायची असली तर आतां हीच वेळ आहे. कसोटीस लावा. एक विश्वासाची कामगिरी केली, तर दुसरी होईल कीं नाहीं हें समजायला काय वेळ लागतो ? " किरातसिंगानें त्याचें ह्मणणें ऐकलें परंतु तिकडे लक्ष्य न देतां तो आपल्याशींच विचार करतो. मुआझिमाला तरी आपण जर असें लिहिलें कीं मराठ्यांनीं तिला आपल्याकडे आणून घातलें असेंच बाहेर जाहीर कर, तर तो कांहीं नाहीं ह्मणायचा नाहीं. माझें नांव जाहीर करण्यांत त्याचा फायदा कांहींच नाहीं. त्याला हवें तें आपण केलें. मराठ्यांनीं आपल्याकडे तिला आणून पोंचविलें हें तरी बाहेर जाहीर करण्याची जरूर केव्हां ? जेव्हां याच्या जनान्यांत ती आहे असें कळेल तेव्हांचीच गोष्ट. तर आतां या माणसांच्या इकडे येण्यापासून आपल्याला फायदा होत असला तर करून घ्यावा. हेंच विहित आहे. मराठे आणखी मुआझीम शहाजादा यांचा कांहीं तरी बोटचेपा संबंध आहे. त्यांना लुटालुटीला वगैरे शहाजाद्यानें खुशाल मुभा दिली. तो बादशहाच्या उलट फितुर झाला होता, याबद्दल कांहींच शंका नाहीं, तेव्हां मराठ्यांनीं दिलेरखानाकडे नूरएलहुदा हीस पोंचविलें असें कळल्यास त्यांत आश्चर्य कांहींच नाहीं. मग शहाजाद्यानें ठेवून कां घेतली ह्मणून दिलेरखानाची आणखी त्याची काय मारामारी होईल ती. आपल्याला काय ! आपण नामानिराळे !

किरातसिंगाच्या मनांत हे विचार आले, ते त्याला इतके आवडले, कीं आपल्या मुत्सद्देगिरीबद्दल आपण आपल्यालाच शाबासकी घ्यावी असें त्याला वाटूं लागलें.

त्याचप्रमाणें आपलें नशीबही एकंदरींत फार चांगलें आहे असेंही त्यास वाटलें आणि त्याबद्दलही त्यास कौतुक वाटूं लागलें ! आपण शहाजाद्याची कामगिरी तर करणार ! आपण तर नामानिराळे राहणार. आपण स्वतः नूरएल्हुदा हिला घेऊन गेलों असतों तर आपल्याला कोणी पाहिलें असतें. मग आपला यांत कांहीं संबंध नाहीं असें दाखविण्याला फार अडचणी पडल्या असत्या. परंतु आतां ? आतां हा मराठा आपल्याला मध्यें सांपडल्यानें कामगिरी करूनच्या करून पुनः नामानिराळा ! वा ! किरातसिंग या विचारानें इतका खुष झाला, कीं त्यास आतां डोक्यानेंच चालावें कीं काय असें वाटूं लागलें. बराच वेळ तसा विचार करून स्वारी एकदम भानावर आली आणि मग त्या मराठ्या शिपायाकडे वळून ह्मणतेः–
"हं. झाला माझा विचार. तूं तयार असलास तर मी कामगिरी तुझ्याकडे सोंपविणार. तुला आपल्या यजमानाला विचारायचें असलें तर कसें ? कारण तुझ्यावर कामसोंपविलें ह्मणजे मग तुला माझ्याशीं कांहीं काम नाहीं. तूं जा, आणखी कामगिरी सांगेन तशी कर ह्मणजे झालें !...... "

" हो. हो. आमचे मालक नाहीं म्हणायचेच नाहींत. त्यांना तर याचा मोठा अभिमान वाटेल. आपल्या सारख्यांनीं सांगितलेली–विश्वास ठेऊन सांगितलेली–कामगिरी कोणाला आवडणार नाहीं. आमचें तर खरोखर मूठभर मांस वाढेल आणखी आपली कामगिरी विश्वासानें केली, तर आपण आह्मांला आणखी एखादी विश्वासाची कामगिरी सांगाल. त्यांत आमचा काय तोटा आहे. "

हें या मराठ्याचें बडबडणें चाललें असतां किरातसिंग आणखी आपल्याशींच विचार करीत होता. विचार कायम कायम असा तो करी, आणि मध्येंच त्याला शंका येई. त्याबरोबर पुनः मनाची चलबिचल होई. शेवटीं निश्चय झाला. आणि त्यानें त्या मराठ्याला अगदीं आपल्याजवळ घेऊन ह्मटलें: " जो जनाना आमच्या बरोबर आहे तो दिलेरखानाचा आहे. दिलेरखानाची मुलगी नूर एल्हुदा ही या मेण्यांत आहे. तिला शहाजाद्याकडे पाठवायची आहे. शहाजाद्याला मी एक पत्र देईन तेंही या पोरीबरोबर त्यालाच अर्पण करायचें. तोंडानें मात्र असें सांगायचें कीं, " आह्मी मराठ्यांनीं दिलेरखानाला हूल दाखवून एका बाजूला नेला आणखी मग त्याच्या छावणीवर हल्ला करून नूर एल्हुदा हिला पळवून आणली, ती आपण आमचे साहाय्यकर्ते ह्मणून आपल्याला अर्पण करायला आणली आहे. माझें नांव तुमच्या भाषणांतसुद्धां आणूं नको. शिवाजीचीं माणसं तुह्मी, तुह्मी त्याच्यावर–दिलेरखानावर–हल्ला केला. भलत्याच प्रकारची हूल दाखविली, आणखी तो फसल्याबरोबर त्याच्या छावणीवर हल्ला केला आणखी आपल्याला ही नजर आणली आहे. एवढें तुह्मी बोललां ह्मणजे माझें काम झालें. आणखी तुमचेंही पण झालें. बोल बाबा आतां जें असेल तुझ्या मनांत तें ! "

मराठा शिपाई प्रथम हंसला नंतर विचार केल्याप्रमाणें करून ह्मणतो: "कामगिरी

तर आपण फार नाजूक सांगितली इतक्या थोड्या अवकाशांत आपला आमच्या-वर इतका विश्वास बसला हें पाहून समाधान मानावं का भय मानावं कांहीं समजत नाहीं. पण आतां आलं लक्ष्यांत. आपल्याला स्वतःला हें यश उघडपणानं नको आहे. पत्रांत आपण खरी हकीकत लिहिणार. बाहेर आमच्या तोंडानं दुसरीच जाहीर करणार. दिलेरखान आह्मां मराठ्यांवर संतापणार. शहाजादा आपल्यावर खुष होणार. शहाजाद्याची आणखी दिलेरखानाची जुतेपैजार होणार! तरी कांहीं हरकत नाहीं. आपण ही कामगिरी करायला तयार आहों. दिलेरखान संतापला तर मराठ्यांवर संतापणार. आह्मीं आतां त्यांच्यांत नाहीं. शिवाय संतापून संतापून तरी तो अधिक काय करणार! त्यांना जमिनदोस्त करण्यासाठीं जो आला आहे तो अधिक काय करणार! कांहीं नाहीं. आह्मी आपल्याला खुष केलें. तर आह्मांला आपण प्रसन्न व्हाल. एखादी मनसबदारी देण्याबद्दल जयसिंग राजाला सांगाल. आमचं काम होईल. अगदीं कबूल आहे. आपण एवढा विश्वास आमच्यावर टाकतां तर आह्मी त्याला पात्र आहों असं दाखवतों. आपण खरी हकीकत सांगूं तेव्हां विश्वास टाकलाच म्हणायचा. आतां त्यांत राहलं काय! आतां माझी विनंति एवढीच आहे कीं, मी पुढें दौडतों. आपल्या यजमानाला ही सर्व हकीकत सांगतों. त्यांची अनुमती मिळायची नाहीं असं व्हायचंच नाहीं. परंतु त्यांना कळवल्याखेरीज कोणचीच गोष्ट मला करतां यायची नाहीं. म्हणून एवढी विनंति. जें काय करायचं तें पहिल्यानें त्यांना कळवायचं. त्यांची अनुमति झाली, कीं दोघांनींही करायचें. तेव्हां आतां मला रोटी खाण्याचीसुद्धां काळजी नाहीं. मी दौडलोंच समजा. आपण आपला तळ हलवून खुशाल निघा. मी आपल्याला पुनः वाटेंत गांठतों. आमचे मालक कांहीं फार लांब गेले नसतील. कोठें तरी झाडाखालीं गाशा टाकून बसले असतील. जातों, त्यांना सांगतों, कीं परतलोंच. आपल्याला काळजी कशाला. अगदीं काळजी नको. जी गोष्ट आम्ही करतों म्हणून सांगितलें ती करण्यास यतकिंचितूही माघार घेणार नाहीं.

इतकें बोलून तो किरातसिंगाकडून निघाला. त्याला एक शंका होती कीं, आपण जें काय ऐकलें तें ठीक. परंतु या लोकांनीं दिलेरखानाची मुलगी पळविली केव्हां? कां हें आतां त्याला समजलेंच होतें. परंतु केव्हां तें लक्ष्यांत येईना. त्यानें आपल्या पहिल्या रजपूत मित्राजवळून तेवढा मुद्दा काढून घेण्याचा विचार केला. आणि तो त्याच्याकडे गेला. त्याचा आपल्यावर विश्वास बसावा ह्मणून त्यानें त्याला हळूच कानांत सांगितलें कीं, " तुह्मी ज्या जनान्याला शहाजाद्याकडे पोंचवतां आहां तो जनाना कोणाचा आहे तें मला कळलें आहे. तो शहाजाद्याकडे पोंचविण्याचं काम माझ्याकडे आहे. पण कायरे यार, ही तुमच्या तुमच्यांतच काय भानगड आहे? हिला तुह्मी पळविली तरी कशी? मोठी वस्ताद, मोठी हुशार मंडळी बोआ तुह्मी! "

त्या मराठ्या शिपायाचें तें कांहीं थट्टेच्या, कांहीं विश्वासाच्या अशा आवाजांत केलेलें भाषण ऐकून त्या रजपूत शिपायास मोठी मौज वाटली व आपल्या मुख्यानें जर त्याजवर इतका विश्वास ठेवला आहे तर आपणही याला कांहीं सांगायला हरकत नाहीं. असा विचार करून त्यानें त्याला काय हकीकत होती ती सांगितली. मराठे आले कसे ? त्यांनीं हूल दाखविली कशी ? आपण फसलों कसे ! त्यांनीं छावणीवर हल्ला केला कसा ? आणखी मग आज पुष्कळ दिवस ठरल्याप्रमाणें त्या जनान्यावरल्या खोजानें नुर एल हुदाला तेथून नाहींसें करून मराठ्यांनीं तिला नेलें ह्मणून उठाविलें कसें ? ती एकंदर हकीकत ऐकून तो मराठा शिपाई फारच हंसला. परंतु त्याला आतां अधिक वेळ नव्हता यामुळें तो तेथून आपल्या घोड्या-वर खोगीर टाकून चालता झाला. ज्या ठिकाणीं त्यानें आपल्या यजमानास सोडलें होतें तेथें तो गेला. तेथें त्याचा यजमान एकसारखा इकडे तिकडे करीत होता. त्याला चैन नसावेंसें दिसलें. हा जाऊन पोंचतांच त्यास त्यानें "काय प्रकार आहे" ह्मणून विचारलें. ह्यानें काय प्रकार तो सांगतांच त्याचे डोळे लाल झाले. "तूं ही गोष्ट आपण करतों ह्मणून कबूल करून आलास ?" असें संतापानें त्यानें त्यास विचारलें. तो मराठा घाबरला व अगदीं स्तब्ध बसला.

तो संतप्त झालेला गृहस्थ पुढें ह्मणालाः "मूर्खा, ही असली अधमपणाची काम-गिरी तूं पतकरून आलास ? तुझ्या मनाला कांहींसुद्धां त्याबद्दल वाटलं नाहीं ! मराठ्यानं शत्रूचं निर्दालन करण्याला वाटेल त्या गोष्टी जरी केल्या, तरी कधीं असल्या अधमपणाच्या कृत्याला हातभार लावूं नये ! तुह्मांला कशा अकला नाहींत ! त्या पतिव्रतेला सोडवण्याची जी काय कामगिरी ती करायला पाहिजे. ती टाकून तूं हें भलतंच काय मनांत आणलंस ?"

मालक संतापून बोलूं लागला ह्मणजे नौकरानें तोंडास तोंड न देतां कांहीं वेळ शांतपणा धरावा. संतापाचा भर निघून गेला, ह्मणजे मग आपल्याला काय सांगायचें तें नौकरानें सांगितलें तर तें मालक ऐकून घेतो, आणि आपला संताप अस्थानीं झाला असें वाटण्याजोगें तें सांगणें असल्यास त्यास वाईटही वाटतें. हें तत्त्व आम-च्या मराठ्या शिपायास फार चांगलें ठाऊक होतें. त्याचा तो मालक एकसारखा बोलत असतां हा कांहींएक बोलला नाहीं. त्याचें बोलणें संपल्यानंतर हात जोडून नम्रपणानें हळूच म्हणतोः "सरकार, मी आपल्या शिकवणीनं पढलेला. मी एक-दम अमूक गोष्ट अशी अशी करूं ह्मणून ह्मटलं तर त्याला कांहीं तरी कारण अस-ल्याखेरीज कसं ह्मणेन ! त्यांच्या पोटांत शिरायचं, त्यांचा विश्वास संपादावयाचा, तर ते काय ह्मणतील त्याला 'होस हो' केल्याखेरीज दुसरा मार्ग काय ! आपण आज्ञा केली, कीं हें प्रकरण काय आहे तें पाहून ये त्याप्रमाणं गेलों, जशी संधि आली तसा त्या संधीचा उपयोग केला. त्यांच्या पोटांत शिरलों. आपण दोघां-नींच एकदम त्यांच्यावर हल्ला करण्यांत तात्पर्य काय आहे ? काय उपयोग

होणार आहे ? असा विचार मनांत आला. परंतु तेंच जर आपण युक्ति प्रयुक्तीनें कांहीं केलं, तर त्यांतही आपला हेतु साधेल. नाहीं तर कसा साधणार ? आपणाजवळ येथें मनुष्यबळ नाहीं. तें असतं तर आपण धाडस करून त्यांच्यावर हल्लाही केला असता. पण एकट्या दोघांनीं हल्ला करून काय उपयोग ? तसा कांहीं उपयोग नाहीं हें काय आपण जाणत नाहीं असं थोडंच आहे. माझ्या तर मनाला असं वाटतं कीं आपण होय ह्मणून त्यांच्यांत शिरावं. तिला व या मंडळीला नेऊन आपल्या त्या वाड्यांत ठेवावं. आणखी चोरवाटेनं तिला तेथून काढून तिच्या बापाकडे पावती करावी...... "

तो दुसरा मराठा गृहस्थ तें बोलणें आतां किंचित् शांतपणें ऐकून घेत होता. त्याचा पहिला संताप ओसरण्याच्या मार्गाला लागला होता. त्या नौकराचें भाषण थोडें थांबलें तेव्हां तो त्यास ह्मणतो: " अरे, तूं ह्मणतोस तितकं कांहीं तें सोपं नाहीं. खुद्द औरंगाबादेस तिला भलत्याच वाड्यांत नेऊन ठेवून, तेथून पळवून दिलेरखानाकडे पावती करावयाची हा तरी प्रकार काय ? शक्य आहे बरं ? पण तूं ह्मणतोसच आहेस तर तसं करावं. बाकी त्या लोकांवर हल्ला करून आपला कार्यभाग करावा तें सगळ्यांत उत्तम. ते असे आहेत तरी किती ?

" किती ते आपण पाहिलेच. चांगले तीस चाळीस आहेत. आपण दहा जरी असतों, तरी हल्ला करायला कमी केलं नसतं. हल्ला करून आपल्याला पाहिजे तें साधलं असतं. पण आपण पडलों कायते दोघे. याउपर आपण जो काय विचार कराल त्याच्या पलीकडे एक तिळभरही मी जायचा नाहीं. नाहीं तर, आपण आपल्या कार्याला लागूं. त्यांचं तें काय आहे तें ते पाहून घेतील. "

" छे. छे. छे. पतिव्रतेचा छळ होतो आहे हें प्रत्यक्ष कळल्यावर तिला सोडविल्याशिवाय आधीं दुसरं काम ? ही तर गोष्ट या देहाच्या हातून कालत्रयीं घडावयाची नाहीं हें काय तुला माहिती नाहीं ? कांहीं हरकत नाहीं. तूं ह्मणतो आहेस तसं कर. मी पुढें होतों. तूं पाठीमागून या मंडळीला घेऊन ये. मी जाऊन वाड्याची तयारी करीन. तूं काय युक्ति लढवायची ती लढवून, तिकडे त्यांना आण. आतां मी कांहीं सांगत नाहीं.

" पण सरकार, मला एक शंका आहे ती विचारूं का ? आपण जर विचार ह्मणाल तर विचारतों. "

" विचार. विचार. काय विचारणार तें. "

" आपण या मुलीला याप्रमाणें सोडवून दिलेरखानाकडे नेऊन पोंचविली, आणखी अमक्या अमक्यांनीं असं केलं ही गोष्ट शहाजाद्याला कळली, तर शहाजादा काय ह्मणेल ? "

" हा मूर्खा, पतिव्रतेचा नाश करून का शहाजाद्याची मर्जी संपादन करायची आहे ! तुला एवढं कसं समजत नाहीं. शहाजाद्याचा आपला चरेपणा अशा अधम

कृत्यांत त्याला मदत करून कांहीं मिळविलेला नाहीं. तो गेला तरी बेहेत्तर आहे. समजलास ? ".

" मी तें समजूनच आहें. परंतु आपल्या नजरेलां गोष्ट आणून दिली. दुसरं कांहीं नाहीं. बाकी त्याच्या बरेपणाची आतां तादृश जरूरही नाहीं ह्मणा. कारण त्यालाच जर येथून काढून दिला आहे, तर तो आतां जाण्याच्याच विचारांत असेल. येथें राहून काय करणार ?

" त्याच्या बरेपणाची आतां जरूरी नाहीं ह्मणजे कायरे ! गरज सरो आणखी वैद्य मरो का रे ? त्यानें आपल्याला पुष्कळ संभाळून घेतलं. तो तसा संभाळून घेण्याच्या विचारानं न वागता, तर अफ्जुलखान, शास्तेखान यांच्या सारखी त्याची वाट लावावी लागली असती. पण त्यालाही बापाचं इतकं कांहीं प्रेम नाहीं. विशेष अधिकाराची किंवा जय मिळवायची हाव नाहीं. शिवाय आह्मी कांहीं त्याला अगदींच फितवून टाकला होता असं नाहीं. तो आमच्यावर अंमल गाजवायला कमी करीत नव्हता. एकसारखा त्याच्याकडून कांहींना कांहीं तरी उद्योग करीतच होता. आह्मी त्याला मथवायला युक्त्या करीत होतों, होतां होतां दोघांचं जुळलं !"

" असेल, असेल, पण आजमित्तीला त्याची तरी समजूत अशी ना ! कीं, आपल्याविरुद्ध ही मंडळी जायची नाहींत. दिलेरखानाची मुलगी फार रूपवान अशी तिची ख्याति आहे, आणखी त्यामुळेंच ती बादशहाच्या थोरल्या मुलाला द्यावी अशी त्यानं आपल्या मनांत आशा धरली आहे. तेव्हां बादशहाच्या दुसऱ्या मुलाचाही तिच्यावर डोळा असला, तर त्यांत कांहीं नवल नाहीं. आतां त्या किरातसिंगाच्या एकंदर सांगण्यावरून मला तर असं वाटतं, कीं मुआझिमानं त्याला ही एक कामगिरीच सांगितली आहे ! ती त्यानं बजावली आहे. आणखी या वेळीं जर आपण त्याच्या आड आलों तर एखाद्या राक्षसाचा बळी त्याच्यापुढें ठेवलेला असतांना आणखी खाण्यासाठीं तो आपलें तोंड पुढें करीत असतां त्याच्यापुढून तो बळी उचलण्यासारखं होणार आहे ! त्याला हवी ती स्त्री त्याच्या हस्तक लोकांनीं मोठ्या मिनतवारीनं पळवून आणली, आणखी आपण त्याचे दोस्त ह्मणविणारे ती मधल्यामध्येंच पळवून कोणीकडे तरी घेऊन जाऊन तिच्या बापाच्या स्वाधीन करतों याला काय म्हणावं ? तोही आपल्यावर संतापणार नाहीं तर काय करील ?........

" तो काय वाटेल तें करो, परंतु आपण कांहीं ही मुलगी अशा तऱ्हेनं त्याच्याकडे जाऊं देणार नाहीं. औरंगाबादेस नेऊन एखाद्या वाड्यांत ठेवून तेथून पळविण्यापेक्षां साखसूरत या लोकांवर हल्ला करून तिला सोडवणं बरं. ठरलं. आपण त्याच्यावर हल्ला करून तिला सोडविणार. तूं फक्त मी सांगतों त्याप्रमाणें कर. तूं माघारी त्यांच्याबरोबर जा, आणखी औरंगाबादला पोंचण्याला कसाना कसा तरी उशीर कर. तूं ह्मणतोस तेंही खरं. अगदींच एकट्यानं हल्ला करण्यापेक्षां कांहीं

माणसं मिळालीं तर चांगलीं. औरंगाबादच्या अलीकडे बोरगांव आहे, तेथें तुम्ही याल तों दिवस मावळून जाईल असं कर. आणखी मी आपल्या तेथल्या लोकांना इशारत देऊन दबा धरून बसतों, तुम्ही येतांच हल्ला करून तुमची दाणादाण करतों. भोयांनीं मेणा टाकून दहा वाटा धरल्या, कीं आपल्या माणसांकडून मेणा उचलून नेऊन बोरगावांतच रात्र काढूं. सकाळीं तूं त्या मंडळीला घेऊन परत नीघ. मी शहाजाद्याची भेट घेऊन त्याच पावलीं परततों. जी काय कामगिरी होईल ती ताबडतोब निवेदन केली पाहिजे. पण पहिली कामगिरी ही ! ”

त्या दुसऱ्या मराठ्यानें खिन्नपणें उत्तर दिलें. “ जशी आपली आज्ञा होईल, त्याच्याबाहेर मीं थोडाच आहें. परंतु मला असं वाटतं, कीं आपला हा विचार बरोबर नाहीं. पहिलाच विचार बरा होता. कोठल्या तरी वाड्यांतून तिला पळविण्यांत तिची ती पळाली असा बहाणा तरी करायला सांपडेल, आपल्यावर कांहीं येणार नाहीं. नाहीं तर यापासून विनाकारण शहाजाद्याचा आणखी आपला वितुष्टभाव येणार आहे. ”

“ एकदां जो विचार ठरला तो ठरला. तूं थोडासा जास्त आव आणायला लागलास वाटतं. सांगितल्याप्रमाणं काम कर. शहाजादा नाहीं शहाजाद्याचा देव असला म्हणून त्याला पतिव्रतेचा व्रतभंग करायला मदत करूं कीं काय ? हा मूर्खा ! ”

यावर कांहीं बोलणें उरलेंच नाहीं. तो मराठा शिपाई ताबडतोब निघाला. जातांना त्यास म्हणतोः “ ठीक आहे. मी आपल्या आज्ञेच्या बाहेर कधींच नाहीं. बोरगांवच्या जवळ जाण्याला अगदीं तीनसांजा होतील अशी तजवीज ठेवतों. आपण तेथें पुढली काय व्यवस्था ठेवावयाची असेल ती ठेवा म्हणजे झालं. बोरगांवास शिरकोजी असला, तर माणसांची मुळींच अडचण पडायची नाहीं. ”

इतकें बोलून तो तेथून चालता झाला. त्याच्या त्या मालकास त्या वेळीं मोठें समाधान झालें असावें असें दिसलें. तोही ताबडतोब घोड्यावर आरूढ होऊन त्यानें आपला बोरगांवचा रस्ता धरला. चढ्या घोड्यानिशीं तो बोरगांवास जाऊन पोंचला. तेथें कर्मधर्मसंयोगानें ह्मणा, किंवा नूर एल हुदाच्या नशीबीं बापाकडे परत जावयाचें होतें ह्मणून ह्मणा; पण शिरकोजी पाटील गांवच्या शिवेवरच भेटला. एखादें कार्य मनाप्रमाणें व्हावयाचें असलें ह्मणजे असें होतें. शिरकोजी पाटलास यानें दुरून पाहिलें मात्र. लागलींच त्याला जवळ बोलावून कांहीं सांकेतिक शब्दांनीं त्याला आज्ञा केली. ती ऐकतांच व त्या गृहस्थास पाहतांच शिरकोजी आश्चर्यचकित होऊन त्याच्या तोंडाकडे पाहूं लागला. अगदीं ध्यानीं नाहीं मनीं नाहीं. अशा वेळीं ही स्वारी एकदम आपल्यापुढें उभी राहते कशी ? याचें त्याला आश्चर्य वाटलें असावें हें उघडच आहे ! परंतु आश्चर्य दाखवीत बसण्याच्या भानगडींत न पडतां स्वारी एकदम तेथून निघाली. जातांना फक्त “ एका पाव घटकेच्या आंत माणसं आलींच ह्मणून समजा ” एवढेंच तो ह्मणाला.

करणारा खुद्द शहाजादा. त्याच्या जनान्यावर आतां तूं मुख्य खोजा होणार. दिलेरखान तर काय, परंतु त्याचे सगळे पितर जरी खालीं आले, तरी त्यांच्यानं तुझं काय होणार आहे ? अरे तूं तर राजासारखा अगदीं बिनधोक आपल्या खीराज्यांत रहाणार ! शहाजाद्यानं ज्याला आपल्या पंखाखालीं घेतला, त्याच्या नखाला सुद्धां कोणाला धक्का लावणं शक्य नाहीं. मग आणखी तर काय ? "

" किरातसिंग, आपण ह्मणतां ती गोष्ट अगदीं खरी; पण जनानखान्यांत माझ्यासारख्याला जितकी भीति तितकी कोणालाच नाहीं. किरातसिंग, जनान्यांत काय दुःखं असतात, तीं जे त्यांत असतील त्यांनांच माहीत. इतरांना समजायचीं नाहींत. कोण्या वेळीं कोणाचा जीव कसा जाईल, आणखी कोण घेईल याचा कोणाला अजमास लागायचाच नाहीं. त्यांतून माझ्यासारखा नवा माणूस, नवीन यजमानीण घेऊन गेला तर माझ्या जीवाला केवढा धोका बसेल, आणखी केव्हां बसेल याचा नेमच नाहीं. असो. चला, आतां त्याचं काय ? आतां मला कांहीं परत जाणं शक्य नाहीं. परत गेलों, तरी तेंच; इथें राहिलों, तरी तेंच. तेव्हां त्यांत कांहीं अर्थ नाहीं. "

त्याचें तें बोलणें ऐकून किरातसिंग हंसला, आणि ह्मणतो, " ठीक आहे, ठीक आहे, निदान मी तरी आपला आतां परत जातों. तुझ्या जीवाला कांहीं धोका नाहीं. माझ्या जीवाची काळजी मला वाहिली पाहिजे. मी करतों आहे हेंच एकंदरींत मला बरं वाटतं आहे. दुसरं काय सांगूं ? " इतकें बोलून किरातसिंगानें तेथून आपलें चंबूगवाळें हालविलें. त्या मराठ्याजवळ त्यानें लखोटा लिहून थैलींत घालून शहाजाद्याला देण्यासाठीं दिला. त्या लखोट्यांत त्यानें आपली कामगिरी केवढी मोठी होती तें नमूद केलें होतें हें सांगणेंच नको. इतकें झाल्यानंतर स्वारी तेथून निघून गेली. परंतु आपण आतां त्याच्या मागोमाग न जातां त्याच्या मंडळीच्या मागोमाग जाऊं. त्याचें चरित्र या कथानकाशीं बरेंच संबद्ध आहे, तेव्हां तें वारंवार आपल्यापुढें येईलच.

किरातसिंगानें लखोटा थैलींत घालून, या मराठ्या शिपाई गड्याजवळ ती थैली देतांच बाहेरून जरी त्यानें कांहीं विशेष दाखविलें नाहीं, तरी मनांतल्या मनांत तो मराठा शिपाई हंसलाच. मोठे कारस्थानी लढवय्ये पुरुषही केव्हां केव्हां अगदीं यःकश्चित् अशा माणसाकडून कसे उत्तम तऱ्हेनें फसले जातात, असें मनांत येऊन त्यास तसें हंसूं आलें. या गृहस्थानें आपणांस यशाचें यश मिळालें, आणि त्याबद्दल कांहीं प्रायश्चित्त भोगण्याची पाळी आली तर निसटायला जागा असावी अशाकरितां हा सर्व खटाटोप केला, हें त्यास स्पष्टच दिसलें. परंतु अगदीं अनोळखी, कोणी सुद्धां ज्याला ओळखीत नाहीं अशा माणसाकडे पहिल्या प्रथम पाहिल्याबरोबर असली कामगिरी—जबाबदारीची कामगिरी—सोंपवावी हें जरूरीचें

असेल, पण मुत्सद्दीपणाचें काम नव्हे असें त्यास पक्कें वाटलें आणि त्यामुळेंच त्यानें आपल्याशीं हंसून घेतलें. तें सर्व झाल्यानंतर तो आपल्या त्या रजपूत अनुयायांस ह्मणतो, " चला बोआ, आतां आपण फार उशीर लावतां कामा नये. मध्यें मुक्काम पडूं नये अशा बेतानें चला. येथून थोड्या अंतरावर बोरगांव आहे तेथें लोक फार वाईट आहेत. तें गांव टाकून एकदां पुढें निघालों ह्मणजे मग कांहीं सुद्धां पंचाईत नाहीं. औरंगाबाद इतक्या जवळ असून, असा गांव तेथें रहावा हें विचित्र आहे. परंतु आहे त्याला इलाज नाहीं. आहे तो खरा. तो टाकून पुढें गेलं कीं मिळविली. बाकी आपल्यासारखी मंडळी असतांना गांवचं भय काय ह्मणा ! पण आपला आमचा अनुभव आहे तो आपल्याला सांगून टाकला. आपल्यावर त्या लोकांनीं हल्ला करावा, मग आपण त्यांना जेरीस आणावं यांत काय तात्पर्य ? तेंच आपले दिवसा उजेडी पुढें गेलों ह्मणजे संपलं. प्रवास अगदीं संपायला आणखी असं कांहीं तरी होण्याला एक गांठ पडूं नये. थोडक्याकरितां कांहीं तरी अपघात व्हायचा !' तें त्याचें बोलणें ऐकून सर्व मंडळी त्याची थट्टा करूं लागली. "आह्मी बादशहाच्या सैन्यांतले लोक आणखी जातीचे रजपूत त्या आमच्यावर हल्ला करण्याची छाती तरी कोणाची आहे पाहूं ! तुमच्यासारखे लोक चोराचिलटांना भ्यायचे. आह्मी असे भ्यायला लागलों तर कसं होणार ? तें कांहीं नाहीं. अशी चोरांचिलटांची भीति दाखवून तुम्ही आम्हांला भिववायला पहाल तर त्यांत कांहीं तात्पर्य नाहीं. आम्ही मुद्दाम उशीर करूं. काय इकडले लोक करतात तें तरी पाहूं. "

तें ऐकून मराठा शिपाई हंसला, आणि ह्मणाला, " नसं म्हणाल तर ते विचारे काय करणार ! लुटालूट आणखी प्राणहानि याहून दुसरं काय करणार ? लुटालूट करण्यांत ते फारच प्रवीण आहेत...... "

त्या मराठ्या शिपायाच्या ओळखीचा तो पहिला रजपूत शिपाई त्यास ह्मणतो, " लुटालूट करतील कसली ? आमच्याजवळ शस्त्रास्त्रांखेरीज त्यांस लुटालूट करायला आहे काय ? आणि आम्ही आपलीं शस्त्रास्त्रं सहजगत्या लुटून देऊं काय ? तुह्मां मराठ्यांचा स्वतांला मोठा अभिमान आहे. परंतु या अभिमानांत कांहीं अर्थ नाहीं. तुमची तऱ्हा विलक्षण. चोरमारा करायचा. परंतु असा चोरमारा किती दिवस वहिवाटणार ? शहाजाद्याच्या राहण्याच्या ठिकाणाजवळ जर असला गांव, तर ह्मणावं तरी काय ? आपण तर गर्दी करून निघणारच नाहीं. पडूं या संध्याकाळ बोरगांवाजवळ पडली तरी. तुमच्या लोकांची मजा तरी पाहूं बरं काय करतात तें. इतके दिवसांचे तुमचे वाईट ह्मणून नाणावलेले लोक तरी आह्मी नाहींसे करून टाकूं. लोकांना तरी त्यांच्या छळापासून सोडवूं. मग काय आणखी ? "

" बरोबर. बरोबर. तुह्मी त्यांच्या छळांतून सुटलां, तर इतर लोकांना सोडवाल खरे. तेवढं तरी खरोखरीच श्रेय घ्या. तें कांहीं वावगं नाहीं. तुह्मांला चांगलं पुण्य

लागेल. जरूर जरूर तेवढी व्यवस्था करा. बाकी आपल्या किरातसिंगांनीं सांगितलेली कामगिरी करून परत येतांना जर हें धाडस आपण केलंत तर ठीक होणार आहे. सध्यां हें धाडस केलंत आणखी कांहीं त्रास झाला, तर त्यांत काय मजा रहाणार? ते तरी जे कोणी त्या मार्गानं जातात, त्या सर्वांवर हल्ला करतात असं थोडंच आहे! कधींमधीं असे हल्ले करतात! आपल्यासारख्यांचा हा जमाव पाहून ते कदाचित् आपली जागा सोडून बाहेर यायचे सुद्धां नाहींत!"

"अस्सं. असे जरा वाटेवर या. अरे बाबा, आमच्यासारख्या लढवय्यांवर हल्ला करण्याची गोष्ट काढतोस कशाला? एकटा दुकटा दुबळा सबळा वाटसरू पाहिला, त्याच्यावर हल्ला केला, त्याला लुटून घेतला, ती गोष्ट निराळी आणखी आमच्यासारख्या शिपाई गड्यांवर हल्ला करून त्यांच्याशीं झुंज मारण्याची गोष्ट फार निराळी."

आमच्या मराठ्या शिपायानें त्यांस वाटेल तसें बोलूं दिलें, आणि बोलण्यांत वेळ घालवून आपला मनांतला इष्ट हेतु साधून घेतला.

---

# प्रकरण १६ वें.

## हल्ला.

रजपूत लोक मूर्ख ह्मणावे तर तसेही नव्हते. परंतु आपल्याला ज्याच्याबरोबर जाण्यास किरातसिंगानें सांगितलें, त्या माणसाच्या चढावणीच्या व मराठ्यांच्या बढाईच्या गोष्टींनीं खुलून व इरेस पडून त्यांनीं खरोखरच विनाकारण औरंगाबादेस जाण्यासाठीं निघण्यास उशीर केला. त्यांची इच्छा ही, कीं ज्या बोरगांवच्या लोकांबद्दल एवढी हा मराठा आपल्याजवळ बढाई मारतो आहे, त्या बोरगांवच्या लोकांची प्राज्ञा काय आहे ती तरी पहावी. वस्तुतः पहातां पहिल्यापासून सर्वच कारभारांत किरातसिंगानें आपल्या मूर्खपणाची बहार उडवून दिली होती. आपली लुच्चेगिरी साधेल व आपल्या कातडीला कांहींसुद्धां धक्का पोंचणार नाहीं अशा दोन गोष्टी साधल्या तर पहाव्या म्हणून त्यानें जसा प्रसंग पडेल तशी वागणूक चालविली होती. ज्या दिलेरखानाची मर्जी संपादली तर आपली बढती होण्याचा संभव, त्याची मुलगी त्यानें पळवून शहाजाद्याच्या घरांत घालण्याचा खटाटोप केला. हें सर्व आपण केलें, ह्मणून शहाजाद्याकडून शाबासकी व बक्षिशी त्यास पाहिजे होती. परंतु आपला त्यांत कांहीं संबंध नाहीं, आपण उलट तिच्या शोधाकरितां आपले प्राण अनेकवार संकटांत घातले, असें दिलेरखानास भासवून त्याची मर्जी राखावयाची होती. त्याचप्रमाणें दिलेरखानाचें व राजा जयसिंगाचें नीट नव्हतें तें पुरें बांकडें करून तिकडूनही आपला डाव त्यास साधावयाचा होता. या दुटप्पी हेतूनें त्यानें अगदीं अनो-

लखी अशा मराठ्याच्या थापांवर भरंवसा ठेवून नूर एल् हुदा आणि आपले लोक यांना त्याच्या हुकमतींत दिले ! आणि त्या लोकांसही थापा मारून त्या मराठ्यानें आपल्या हेतूप्रमाणें मुद्दाम संध्याकाळ झाल्यानंतर बोरगांवाजवळ आणलें ! त्याची खात्री होती, कीं जें कार्य साधावयाचें तें साधणार. त्याची अगदीं खात्री होती, कीं आपला वरिष्ठ बोरगांवास आधीं जाऊन त्यानें माणसांची व्यवस्था खचित करून ठेवली असणार. अशी पक्की खात्री असल्यामुळें तो त्या रजपूत शिपायांस त्या बोरगांवच्या लोकांसंबंधानें अधिकाधिकच भयाच्या गोष्टी सांगूं लागला. ते लोक त्याची अधिकाधिकच चेष्टा करूं लागले आणि त्याची आपल्याकडून टर उडवूं लागले. होतां होतां बोरगांवचें रान लागलें. कोणी माणसें किंवा कांहीं नाहीं. त्या रजपूत नाइकानें मराठ्या शिपायाची फारच टेर उडविण्यास आरंभ केला. कोणी कोठें दिसेना, कोठें चाहूल लागेना, तेव्हां मराठ्या शिपायासही फार आश्चर्य वाटूं लागलें. जी काय व्यवस्था करावयाची होती, ती कांहीं जुळली नाहीं असें त्यास स्पष्ट दिसलें. परंतु त्याच्या मनाची तशी अगदीं पक्की खात्री मात्र होईना. तथापि तो आपल्या मनांत ह्मणाला “आपलें तरी काय, जुळलें तर जुळलें. नाहीं तर निदान आपल्या सरदाराची भेट झाल्यावर पुढें काय करावयाचें तें कळेपर्यंत या लोकांस झुलविलें तर पाहिजे. न जाणो कदाचित् औरंगाबादेस जाऊन एखाद्या भलत्याच घरांत मंडळी नेऊन ठेवून मग तेथून या दिलेरखानाच्या मुलीस मुकाट्यानें पळवून नेण्याची पहिली युक्ति बरी असें कशावरून ठरलें नसेल!” असे नाना प्रकारचे विचार त्याच्या मनांत चालले होते. इतक्यांत एका ठिकाणीं एक शिताफळीची फार गर्द अशी राई आली. तींतून बाजूनें ही मंडळी चालली होती आणि एकाएकीं “हरहर महादेव” असा ध्वनि उठला. त्या मंडळीला आतां आपल्यावर हल्ला येण्याचा संभव नाहींच असें वाटण्याची स्थिति आली होती इतकेंच नव्हे तर आतां त्या मराठ्यानें दाखविलेलें भय अगदीं व्यर्थ, असें त्यास वाटूं लागलें होतें आणि ते अगदीं आनंदांत होते. अशा आनंदाच्या भरांत एकदम जेव्हां शेंपन्नास मराठ्यांचा हरहर महादेव असा शब्द कानीं पडला तेव्हां त्यांचें अंतःकरण अगदीं चकित झालें. तथापि आपण बढाई मारल्याप्रमाणें आतां आपलें शौर्य दाखविण्याची पाळी आली असें त्यांस दिसतांच त्यांनीं—त्यांच्या नायकानें उदाहरण घालून दिल्याप्रमाणें—युद्ध करण्याला पुढें सरसावण्याची तयारी केली. मराठ्यांनीं प्रथम एकदम त्या नूर एल हुदाच्या सभोंवतालीं वेढा घातला. भोयांस मेणा खालीं ठेवण्याचा हुकूम केला. हा प्रकार काय आहे हें रजपुतांस समजेना. परंतु तो प्रकार काय, आणि हा काय याबद्दल चौकशी करण्याची ती वेळच नव्हे. अर्थात् रजपुतांनीं त्या गराडा घालणाऱ्या लोकांवर सपाटून हल्ला केला आणि दोनही पक्षांचें तुमुल युद्ध सुरूं झालें. इतक्यांत मराठ्यांचे आणखी कांहीं लोक एकदम दुसऱ्याच शेजारच्या राईतून बाहेर आले आणि त्यांच्या अंगावर चालून गेले.

मेण्याला गराडा घालणाऱ्या लोकांशीं झुंजणाऱ्या रजपुतावर त्यांनीं हल्ला केल्यामुळें त्या रजपुतांस तोंडें फिरवून लढावें लागलें. या नव्या मराठ्यांनीं लागलींच पळून जाण्याचा बहाणा केला. त्याबरोबर रजपुतांस स्फुरण चढून ते त्यांचा पाठलाग करण्याच्या बुद्धीनें त्यांच्या मागें लागले ! ही विलक्षण हूल दाखविण्यांतच मराठ्यांची मोठी हिकमत, ती साधली कीं मग काय विचारतां ! त्यांचा हेतु साध्य झालाच ह्मणून समजावें. जेथें ही आपली हिकमत सोडून त्यांनीं लढण्याचा डाव मांडला, तेथें त्यांस अडचणी आल्या. परंतु जेथें हा डाव साधला तेथें त्यांना नेहमीं जयच प्राप्त झाला, त्यांतलीच स्थिति आतां झाली. उत्तर हिंदुस्थानांतून नवीन रजपूत आलेले, त्यांना अद्यापि हा मराठ्यांचा कावा पक्का माहिती नव्हता. आपण तोंडें फिरविण्याबरोबर हे लोक पळताहेत हें पहातांच रजपूत फुरारले आणि पुढें झाले, पाठलाग करूं लागले. आपण काय करतों ! आपण असे गेलों तर आपल्या या नूर एल् हुदाची अवस्था काय होईल ? कांहीं त्यांच्या लक्ष्यांत आलें नाहीं. या मराठ्यांचीं लबाडांचीं हाडें मोडून काढूं असेंच त्यांना वाटूं लागलें. आणि त्या आशेनें, ते मेण्यापासून ढळले.; मराठ्यांना विशेष मर्दुमकी करण्याची गरजच राहिली नाहीं. त्यांना तरी तेंच पाहिजे होतें. कोणत्याही तऱ्हेनें नूर एल् हुदा हिला त्रास पोंचूं नये हाच कायतो त्यांचा हेतु होता. तसा त्रास पोंचला नाहीं ह्मणजे आपण आपल्या ब्रीदाप्रमाणें केलें ही त्यांची समजूत. मेण्याभोंवतालीं लढणाऱ्या लोकांची गर्दी कमी होतांच मराठ्यांनीं तेव्हांच मेणा उठविला. तो पार कोणीकडच्या झाडींत गडप झाला. पन्नास रजपुतांपैकीं कांहीं तर पडलेच होते दुसरे जे कांहीं जिवंत होते, ते मराठ्यांच्या पाठीस लागले. हे लोक आपल्यावर हल्ला करून आले ते आपल्यास लुटण्यासाठीं आले. आपल्या ह्या दिलेरखानाच्या मुलीला पळविण्यासाठीं आलेले नव्हत अशी त्यांची—त्या रजपुतांच्या मनाची पक्की समजूत, यामुळेंही ते अगदीं गैरसावध असावेत. कसेंही असो. हल्ला करणाऱ्या मराठ्यांचा डाव साधला. त्यांनीं नूर एल् हुदा हीस एकदम उडविली आणि कोणीकडे नेली. कांहीं पत्ता नाहीं. इकडे आपल्यावर हल्ला करणारी मराठ्यांची टोळी आपण तिचा पाठलाग करूं लागतांच कोणीकडच्या कोणीकडे नाहींशी झाली. यामुळें उल्हसित होऊन मराठ्यांच्या मर्दुमकीची चेष्टा करण्याच्या उद्देशानें ती रजपूत मंडळी जों परत येते आहे तों मेणा उडालेला, आणि मोयांचाही पत्ता नाहीं. असें पहातांच त्या रजपूत लोकांची जी त्रेधातिरपीट झाली आहे, ती तर कांहीं विचारूंच नये. ज्या माणसाची ते कुचेष्टा करणार, तोही कोठें दिसेना. तो या धांदलींत मारला गेला, कीं पळून गेला त्यांस कांहींच समजेना. नूर एल् हुदाला पळवून नेण्यांत त्या माणसाची कांहीं लबाडी असावी हा अजून त्यांस तर्क झाला नव्हता. बोरगांवचे

लोक फार वाईट. त्यांच्या नादीं आपण लागूं नये ह्मणून आपणांस हा सांगत होता, तेव्हां त्यांचा हरहर महादेव हा वीरशब्द ऐकण्याबरोबर तो बहुतकरून घाबरून जाऊन त्यानें आपला जीव बचावला असावा, असेंच त्यांना वाटलें. आणि काय लेंकाचा भित्रा, त्यानें पळून आपला जीव वांचविला. झालें. त्याचा पाठलाग करण्यांत कांहीं तात्पर्य नाहीं. आतां आपण नूर एल् हुदाला मात्र शोधून काढलें पाहिजे असें त्यांस वाटलें. नूर एल् हुदाच्या अंगावर व जवळ कांहीं तरी जडजवाहीर असलें पाहिजे तें आपणांस मिळण्यासाठीं मराठ्यांनीं तिला दुसऱ्या कोठें तरी जवळच नेलें असलें पाहिजे. तेथें ते तिच्या अंगावर जडजवाहीर असेल तें काढून घेतील, आणि तिला सोडून देतील. आतां-पर्यंत त्यांनीं तिला सोडून दिलेंही असेल. तेव्हां आपण तिचा ताबडतोब शोध करून तिला हस्तगत केलें पाहिजे. ती जर आपल्या हातून नाहींशी झाली, तर सगळाच प्रकार विचित्र झाला ह्मणावयाचा. किरातसिंग आपले प्राण घेतल्याखेरीज क्षणभरही राहणार नाहीं. असें त्यांस उघड उघड दिसून आलें. अर्थात् त्यांना आपली जेवढी काय पराकाष्ठा होती, तेवढी सगळी करून नूर एल् हुदाचा तपास करावा लागला. परंतु मराठ्यांनीं तिला नेलें होतें तें ती पुनः यांच्या हातांत सांपडावी म्हणून थोडेंच नेलें होतें! तिचा कोठें मागमूससुद्धां लागेना. तिचा पत्ता लागेना, तिच्या खोजाचाही पत्ता लागेना. अबदल्लयाला त्या लोकांनीं पकडून नेलें असेल हें त्यांना शक्य वाटेना. कारण अबदल्लयाला नेऊन त्यांना द्रव्याच्या दृष्टीनें फायदा काय? परंतु या मराठ्यांच्या ज्या त्यांनीं गोष्टी आतांपर्यंत ऐकल्या होत्या त्यांवरून त्यांना असेंही वाटलें कीं, त्या सुंदरीच्या अंगावरलें व जवळचें जवाहीर तिच्या अंगाला आपण स्पर्श न करितां घ्यावयाचें अशा हेतूनें त्या मराठ्यांनीं त्यालाही बरोबर पकडून नेलें असेल. मराठे लोक गनीमी कावा करीत. परंतु त्यांनीं कधीं कोणाच्या—अगदीं कट्या शत्रूच्यासुद्धां बायकांस त्रास दिला नाहीं. बायकांच्या अंगावरील जवाहीर काढावयाचें असल्यास त्यांच्या पुरुषांच्या हातून काढवून आणतील, परंतु स्वतः दुसऱ्याच्या बायकोवर हात टाकणार नाहींत किंवा तिच्या अब्रूस धक्का बसेल असें वर्तन करणार नाहींत. शत्रूचीं धर्मस्थानें आणि धर्मस्त्रिया या त्यांस आपल्या स्वतःच्या धर्मस्थानाप्रमाणें व धर्मस्त्रियांप्रमाणें वंद्य असत. या सर्व गोष्टी मराठ्यांच्या संबंधानें त्यांनीं ऐकिल्या होत्या. यामुळें त्यांना असें वाटलें, कीं त्या अबदल्लयास त्यांनीं याच कारणाकरितां पकडून नेलें असेल. परंतु त्याचाही कोठें पत्ता लागेना. मूळ मालकिणीचाच पत्ता लागेना, तेव्हां त्या खोजाचा—जर त्या मराठ्यांनीं त्याला खरोखरी त्याच्या मालकिणीबरोबर धरून नेलें असलें, तरी कसचा पत्ता लागतो आहे? त्यांनीं चुडी पेटवून सर्व रान शोधून काढलें परंतु त्यांचा कांहीं पत्ता नाहीं. कोणाचाच पत्ता नाहीं. आपल्या बरोबरचा मराठा शिपाई

नाहीं, त्याचा मालक नाहीं, नुर एल हुदा नाहीं, तिचा खोजा अबदल्ला नाहीं आणि रात्र मी ह्मणते आहे. तेव्हां आतां पुढें काय करायचें तें त्यांस सुचेना. तेथून औरंगाबादेकडे तरी जायचें कशाला ? औरंगाबादेकडे जाण्याचें प्रयोजन नाहींसें झालें. परत जावें तर किरातसिंगाला काय सांगावें ? असा त्यांस पेंच पडला. रात्र त्यांनीं तेथेंच राहून काढावयाची असें ठरविलें. दुसरें काय ठरविणार ? सकाळीं उजाडल्यानंतर पुढें काय होतें तें पहावें असा बेत केला. रात्र निघाली. सकाळीं उठल्यानंतर त्यांनीं एकत्र जमून पुष्कळ खलबत केलें. त्यांनीं पुष्कळ शोधही केला. परंतु कांहीं कोणाचा पत्ता लागेना. शेवटीं हताश होऊन त्यांनीं एक दिवस तेथेंच मुक्काम करण्याचें ठरविलें.

# प्रकरण १७ वें.

## नूर एल् हुदा.

जसा एखादा चेंडू मुलांच्या हातांत सांपडला ह्मणजे तीं त्याला इकडून तिकडे फेंकून आपली करमणूक करून घेत असतात, तशीच या वेळीं बिचाऱ्या नूर एल् हुदाची अवस्था झाली. तिच्या संरक्षणासाठीं ठेवलेल्या अबदल्ल्यानें आपल्या यजमानाशीं व यजमानणीशीं बेइमान होऊन तिला शहाजाद्याच्या स्वाधीन करण्यासाठीं पळविलें, तेव्हांपासून तिच्या मनाची स्थिति काय झाली असेल, तें तिचें तिलाच ठाऊक. अबदल्ल्यानें तिला अगदीं एकटीला निराळें काढलें आणि किरातसिंगाच्या स्वाधीन केल्याप्रमाणें केलें. तिच्या तैनातीसाठीं ह्मणून तिच्या खानगींतली दासीसुद्धां तिच्या जवळ त्यानें ठेवली नाहीं. वाटेंत कोणी तरी बाई कोठून तरी धरून आणून तिच्याकडून तिची चाकरी करवावी. तिला औरंगाबादेस नेऊन घातल्यानंतर पुढें आपल्याकडे कांहींच राहिलें नाहीं, तिची सर्व व्यवस्था होतेच आहे, असा किरातसिंग व अबदल्ल्या या दोघांचाही विचार होता व त्याप्रमाणें त्या नीचांनीं आतांपर्यंत तिची फरपट चालविली होती. तोंड बांधून बुक्क्यांचा मार अशी तिची अवस्था झाली. याबद्दल अर्थातच कांहीं आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. ती फार सहनशील ह्मणून ह्मणा, अगर तिला अबदल्ल्यानें काय गोष्टी सांगितल्या असतील त्यांवर तिचा पूर्ण भरंवसा बसला ह्मणून ह्मणा, ती आपल्या दुर्दैवाला नावें ठेवून स्वस्थ बसून आला प्रसंग लोटीत होती. अशा प्रसंगीं पुनः तिजवर हा हल्ला आला, तेव्हां तिच्या मनाची काय अवस्था झाली असेल, हें काय सांगतां येईल ? तिला कांहीं समजेना. तिला असें वाटलें, कीं आपणांस अबदल्ला वगैरे मंडळी कोठें तरी घेऊन जात असतांना वाटेंत कोणी तरी वाटमाऱ्यांनीं हल्ला केला असावा आणि त्यांनीं

आपल्याला कोणीकडे तरी चालविलें असावें. असा कांहीं मनाचा समज होऊन ती घाबरली असतांना तिला नेणारांनीं खुद्द बोरगांवांत एका वाड्यांत नेलें. हा वाडा फार मोठा होता. त्या वाड्याच्या एका मागल्या चौकांत तिच्याकरितां एक महाल तयार केला होता. त्या महालांत तिचा मेणा त्यांनीं नेऊन ठेविला. मेणा ठेविल्यानंतर एक मराठ्याची स्त्री मेण्याच्या दाराशीं येऊन तिला फार सौम्य उर्दू भाषेंत ह्मणाली:—"बेगमसाहेब, आपल्याला मोठ्या संकटांतून सोडवून येथें सुरक्षित आणलं आहे. आपण बिलकुल भिऊं नका. आपल्यावरलं संकट गेलं आतां. लवकरच आपल्याला आपल्या वडिलांकडे सुरक्षित रवाना केलं जाईल. आतांपर्यंत आपल्याला भोगावा लागलेला त्रास पार संपला. आपण अणुभरही संशय धरूं नका. इथली मंडळी शिवाजीमहाराजांच्या आज्ञेंत वागणारी आहे. आणि त्यांनीं कधीं कोणाही स्त्रीचा—मग ती शत्रूकडील असो किंवा कोणाकडील असो—कधीं अपमान किंवा छळ होऊं दिला नाहीं. आपल्याला आज त्यांच्या माणसांनीं फार मोठ्या संकटांतून सोडविलं आहे. आपण अगदीं निःशंकपणानं बाहेर या. आपल्याला विश्रांति घेण्यासाठीं या वाड्यांत आणून ठेविलें आहे, तर येथें दोन दिवस विश्रांति घ्या. आपल्याला कोणत्याही प्रकारचा कसलाही त्रास होणार नाहीं."

ती स्त्री हें सर्व इतक्या सौम्य व ऐकणाराच्या मनाला आश्वासन येईल अशा आवाजानें बोलली, कीं नूर एल् हुदा हीस ही स्त्री कोण आहे व आपण कोठें आहोंत हें जाणण्याची तात्काळ इच्छा झाली व त्याबरोबर तिनें दार उघडून बाहेर डोकावून पाहिलें तों तिला तो सुंदर महाल दिसला आणि त्या तिच्याशीं बोलणाऱ्या स्त्रीखेरीज कोणीही दिसलें नाहीं. तिनें बराच वेळ इकडे तिकडे पाहिलें. नंतर त्या स्त्रीस ह्मटलें: "काय माझ्या तखृदिरांत आहे तरी काय? चार सहा दिवस झाले, माझी एकसारखी तिरपीट उडाली आहे. तेव्हां मी अखेरीस आलें आहें तरी कुठें तें एकदां मला समजलं, तर बरं होईल, नव्हे ! "

नूर एल् हुदा हिचें तें बोलणें इतकें उत्कंठेचें व भित्रेपणाचें होतें, कीं तें ऐकून त्या मराठ्या स्त्रीला तिची कींव आली व ती तत्काळ तीस ह्मणाली: "बेगमसाहेब, आपण अगदीं आपल्या वडिलांच्या जवळ असतांना जितक्या सुरक्षित होतां, तितक्या या वेळीं या ठिकाणीं आहां असें समजून चाला. मुळींसुद्धां मनांत भय किंवा शंका धरूं नका. आपलं भय गेलं. आतां आपण अगदीं बिनधास्त येथें रहा. आपल्या केंसालासुद्धां धक्का लागणार नाहीं, मग इज्जतीची तर गोष्ट कशाला ? हा वाडा खानसाहेबांचा स्वतःचा आहे, आपला स्वतःचा आहे, असं आपण समजून रहा. या. बाहेर या. आपली बडदास्त फार उत्तम राहील याबद्दल अणुभरसुद्धां मनांत शंका धरूं नका. माझी तुमच्या तैनातीकडे योजना झाली आहे त्याप्रमाणें मी सगळी व्यवस्था ठेवतेंच आहे. आपण मुळीं मुळींसुद्धां मनांत किंतु आणूं नका."

या मराठ्या स्त्रीनें याप्रमाणें अगदीं आग्रहपूर्वक व निक्षून सांगितल्यानंतर नूर

एल् हुदाला कांहीं शंका राहिली नाहीं. ती मेण्यांतून बाहेर आली. तिनें आपल्या सभोंवार पाहिलें तों त्या महालांत खरोखरीच फार श्रेष्ठ अशा कुटुंबांतील स्त्रीला रहाण्याला सर्वथैव उपयोगी अशी सर्व व्यवस्था होती. इतकी ही जनान्यांतली व्यवस्था केवळ एकदम कोणी तरी करून झालेली नाहीं. कोणा तरी थोर पैरदाराच्याच वाड्यांतील जनान्यांत आपणास आणून ठेविलें आहे अशी तिच्या मनाची खात्री झाली. आतां आपण येथें सुरक्षित आहों कीं नाहीं, एवढीच तिला शंका राहिली; परंतु त्या मराठ्या स्त्रीनें नाना प्रकारांनीं सांगायचें तसें सांगितलें असल्यामुळें आतां आपण विनाकारण शंका घेऊं नये असें लागलीच तिनें आपल्या मनाचें समाधान केलें. ती लागलीच समोर तिला बसण्यासाठीं मांडलेल्या उंच अशा चौरंगावर जाऊन बसली. हा चौरंग चांगला विस्तृत होता. त्यावर बसण्यास मखमाली मश्रूची गादी खूप जाड व मऊ अशी असून तिच्या दोनही बाजूस सुंदर अशा गिर्द्या, उशा वगैरे ठेवलेल्या होत्या. तिला वारा घालण्यासाठीं दोन कुळंबिणी उभ्या होत्या. सारांश, तिच्या स्वतःच्या महालांत जशा प्रकारची व्यवस्था असावयाची, तशा प्रकारची व्यवस्था येथें कोणीं तरी अगदीं मुद्दाम केली आहे, अशी तिच्या मनाची खात्री झाली. त्या मराठ्या स्त्रीनें तिला पुनः एकदां आश्वासन देऊन असें सांगितलें, कीं "आपण आपल्या महालांत दासदासींनीं वेष्टिलेल्या आहांत अशी मनाची पक्की समजूत करून घेऊन येथें रहा. येथून आपणांला दोन दिवसांनीं पुनः पुरंदराकडे जावें लागेल. पण वाटेंत आपली यत्किंचित् सुद्धां गैरसोय होणार नाहीं किंवा आपल्याला त्रास पोंचणार नाहीं. आपल्या केंसाला सुद्धां त्रास न होतां आपल्याला आपल्या वडिलांच्या स्वाधीन केलं जाईल."

एकदां नाहीं, दोनदां नाहीं, पंचवीस वेळां नानाप्रकारानें जेव्हां तिला याप्रमाणें आश्वासन देण्यांत आलें, तेव्हां तिला बराच भरंवसा आला. आतांपर्यंतच्या आपल्या स्थितींत आणि आतांच्या स्थितींत कांहीं तरी अंतर आहे असें तिचें तिला वाटलें आणि ती स्तब्धपणें तेथें बसली. जेवणाखाण्याची सर्व प्रकारची तिची व्यवस्था जशी असावी तशी असल्याबद्दल तिची खात्री करून देण्यांत आली, त्यामुळें तिला जास्त समाधान—अर्थातच अशा स्थितींत जसें समाधान वाटणें शक्य तसें समाधान—वाटलें आणि ती तेथें राहिली. मात्र तिला आपण कोठें आहोंत, आपल्याला येथें कोणीं आणलें याबद्दल कांहीं तर्क होईना. तें जर आपण एकदम विचारलें, तर आपल्याला कोणी सांगणार नाहीं, तेव्हां आपण आपलें मुकाट्यानें एखादा दिवस काढून हलके हलके या बाईच्या पोटांत शिरून काय तें काढूं असा तिनें विचार केला. हाच विचार पोक्त होय. आपण त्रागा करून अमूक असें झालें पाहिजे तर आपण अमूक करूं नाहीं तर अमूक करूं असें हट्टानें बोलण्यापासून फायदा होणार नाहीं, हें तिचें तिला दिसून आलें. आपल्यावर कोणतें तरी संकट येणार आहे किंवा कोणीं तरी आ-

पणास कांहीं तरी भयंकर प्रसंगांत लोटणार आहे असें तिच्या मनास वाटेना. तिच्या सभोंवतालची स्थिति अशा प्रकारची होती कीं तिच्या मनाला एका क्षणीं जरी कांहीं भीति वाटली, तरी दुसऱ्या क्षणीं ती खरी नव्हे असेंच वाटे. अशा स्थितींत ती तेथें राहिली.

तर आतां आपण तिला तशीच सोडून त्या मराठ्या सरदाराकडे जाऊं.

बोरगांवास रजपुतांवर हल्ला झाला त्यांत तो मराठा सरदार नव्हता. परंतु त्या हल्ल्यांत रजपुतांचा पराभव करून नूर एल हुदा हिला पकडून आणल्यानंतर तिची व्यवस्था किती चांगली, कुठें व कशी ठेविली जावी याबद्दल त्यानें सुरेख तजवीज लावून ठेविली. त्याचा शब्द ह्मणजे कधीं कोणी मोडणार नाहीं अशी आज्ञाच होय. यामुळें जें जें त्यानें सांगितलें, त्याप्रमाणें सर्व व्यवस्था लागली. परंतु तो तेवढी व्यवस्था लागली असें पाहूनच स्वस्थ बसला नाहीं. नूर एल हुदा हिला आपल्या लोकांनीं पकडून आणून त्या वाड्यांत नेऊन ठेवीपर्यंत तो तेथून हलला नाहीं. तिची आपल्या मनाप्रमाणें व्यवस्था लागल्यानंतर तो तेथून औरंगाबादेकडे जाण्यास निघाला. त्याचा तो मराठा शिपाई ज्यानें त्या रजपूत शिपायांत मिसळून त्यांस आपल्या त्या मराठे लोकांच्या मान्यांत आणलें तो पुनः त्यास येऊन मिळालाच. दोघांची भेट झाल्यानंतर सरदार त्या शिपायास ह्मणतोः— "येथपर्यंत कामगिरी तर फार उत्तम झाली, पण याच्यापुढें कशी काय व्यवस्था? शहाजाद्याकडे जाऊन आतां पुढली कामगिरी ठरवायची, परंतु त्याच्याशीं बोलतांना आतांचा हा सगळा प्रसंग नजरेपुढं राहणार आणि तो तसा राहिला तर त्याच्याशीं कोणच्या तोंडानं आपण बोलणार? त्याला अद्यापि हा प्रकार कळला नसणारच. कळला तरी आतां कळत नाहीं, मागून कळणार. पण आपल्याला ज्या कामासाठीं इकडे पाठविण्यांत आलें आहे त्या कामाची व्यवस्था लागण्याला त्यांची मदत मागायची तर ती कशी मिळणार? आणखी आपण मागणार तरी कशी? पण ज्या कारणाकरितां जी आज्ञा घेऊन आपण निघालों, ती आज्ञा तर आपण पार पाडली पाहिजे! ती आज्ञा पार न पाडतां जर आपण असेच परत गेलों, तर काय आपली अवस्था होणार?"

"पण सरकार, याचा विचार आधींच करायला पाहिजे होता. हा विचार आपल्या मनांत आला नाहीं असं थोडंच आहे! मघाशींच त्याचा पूर्ण विचार झाला आहे! आतां आपण वास्तविक औरंगाबादेस जाण्याचं कारणच नाहीं!"

"जाण्याचं कारण नाहीं? अरे तूं हें बोलतो आहेस काय? जाण्याचं एक कारण तर फार जबर आहेच!"

"तें कोणचं?" त्या मराठ्या शिपायानें मुद्दाम विचारलें.

"ज्या कारणानं आपण औरंगाबादेस जाण्यासाठीं निघालों तेंच."

"होय. पण ती आज्ञा आतां आपण पार पाडणार कशी? आज नाहीं

उद्यां झालेला प्रकार शहाजाद्याच्या कानीं जाणारच. मग तो आपल्याला मदतीला येणार आहे काय ? कधीं येणार नाहीं. उलट तोही आपल्याला त्रासच देईल. जें काम करून घेण्याला आपल्याला पाठविलं तें काम बिनसलं असंच आतां आपण समजून परत गेलें पाहिजे."

त्या शिपायाचें तें बोलणें ऐकून तो सरदार अगदीं स्तब्ध बसला. नंतर कांहीं वेळानें ह्मणतोः "झाली ही गोष्ट कोणच्याही तऱ्हेनें वावगी झाली किंवा ही झाल्यानें एकंदर कामगिरी बिघडली ह्मणून आपलें मोठेंसें बिघडलें असें थोडंच आहे ! याबद्दल आपल्याला शाबासकी मिळेल, दोष दिला जाणार नाहीं ही अगदीं खात्री ! परंतु झालें तर काम करून जावें एवढीच इच्छा होती. तें कांहीं असो, आपण थेटपर्यंत जाऊन निकाल करून घेणार आणि झाल्या गोष्टी परत जाऊन यथासांग सांगून देणार. मला कांहीं वाटत नाहीं, कीं त्याबद्दल आपल्याकडे दोष येईल ! तें कांहीं नाहीं. आपण आतां पुढें जावें याखेरीज दुसरा मार्गच नाहीं. जणूं काय मध्यंतरीं जें झालें, तें कांहींच नाहीं असें धरून आपण पुढें चलूं, पाहूं मग पुढें काय होणार आहे तें ! सध्यां त्याची कांहींच आपल्याला अडचण पडणार नाहीं."

असा त्या दोघांचा संवाद होऊन ते वाटेनें चालूं लागले. औरंगाबादेस गेल्यानंतर ते एका भव्य वाड्याशीं गेले. तेथें जातांच त्यांना उतरून घेण्यासाठीं दहा पांच नोकर धांवले. स्वाऱ्या उतरल्यानंतर भोजनादि सर्व विधि झाले. नंतर त्यांनीं तेथील एका कारकुनास जवळ बोलावून त्यास कांहीं कामगिरी सांगितली. तो लागलीच तेथून निघून शहाजाद्याच्या वाड्यांत गेला. तेथें त्यानें आपण आल्याची कारभाऱ्याकडे वर्दी दिली. पुढें कारभाऱ्याची मुलाखत झाली. कारभाऱ्यास जें काय सांगावयाचें तें सांगून त्यानें त्यास कांहीं विचारिलें. कारभारीसाहेब तेथून निघून दुसरीकडे गेले. थोडे वेळानें कारभारीसाहेबांची स्वारी पुनः परत आली. त्यांनीं त्यास काय सांगावयाचें होतें तें सांगितलें. तें ऐकून तो कारकून तेथून निघाला व पुनः त्या मराठ्या सरदाराकडे आला. दुसरे दिवशीं सकाळीं तो मराठा सरदार एकटाच त्या वाड्यांतून निघाला व शहाजाद्याच्या वाड्यांत गेला. त्याच्या येण्याची वर्दी लागतांच त्यास शहाजाद्याकडे घेऊन जाण्याबद्दल हुकूम येऊन भालदार चोपदारांनीं त्यास शहाजाद्याकडे पोंचतें केलें. पोंचविणारी मंडळी फक्त दारापर्यंत होती. दारांतून मागें वळली. लागलीच दारें लागलीं. आतां तो मराठा सरदार व शहाजादा यांखेरीज कोणीही तेथें राहिलें नाहीं. तेव्हां शहाजादा त्यास ह्मणतोः— "आपल्याला कां पाठविलें आहे त्याचा मला तर्क झाला आहे. माझी अशी समजूत आहे, कीं आपण या वेळीं पडती घेतल्याखेरीज दुसरा उपाय नाहीं. मी तर आतां जातोंच. कारण आतां येथें रहाण्यांत कांहीं तात्पर्य नाहीं. आमच्या वडिलांचा आधीं

माझ्यावर विश्वासच बेताबाताचा होता. त्यांत मी आपल्या मंडळीच्या मोहात पडून थोडेंबहुत वर्तनही तसंच केलं. तेव्हां त्यांनीं तसा संशय घेऊन ही दुसरी मंडळी पाठविली, तर त्यांत नवल काय ? आतां माझी आपल्याला सल्ला अशीच आहे, कीं आपण कांहीं फार त्रास करून घेण्याच्या भरीस पडूं नये. जी जोडी वडिलांनीं पाठविली आहे ती काम केल्याखेरीज येथून जाणार नाहीं. नमून वागून जर कांहीं जमलें तर जमेल. नमून जर घेतलं नाहीं तर कांहीं होणार नाहीं. उलट सगळा कारभार भलताच होईल. मी सुद्धां आतां पडत्या फळाची आज्ञा ह्मणून आपला आग्र्याचा रस्ता धरणार. इथं राहूं नको ह्मणून बादशहाचा हुकूम ! तो मान्य केला नाहीं, तर याच लोकांना आह्मांला अटकेंत ठेवण्याबद्दलसुद्धां हुकूम व्हायला कमी होणार नाहीं. बरें तसा हुकूम झाला, तर हे लोक तरी काय करतील ? त्यांना तो हुकूम तोडतां येतो आहे ? कधीं तोडतां येणार नाहीं. तेव्हां अशी सगळ्यांचीच चमत्कारिक स्थिति करण्यापेक्षां आपण आपला रस्ता धरावा. वडिलांची आज्ञा पाळल्यासारखं होईल. आपणही त्रासांतून सुटलों. मी इतकं लांबलचक बोलून तुम्हांला सांगतों तें एवढंच, कीं आतां आमच्यापासून मदत किंवा तहनामा होण्याच्या संबंधानं कांहीं खटपट हीं केवळ अशक्य आहेत ! ”

मराठ्या सरदारानें त्याचें बोलणें ऐकून घेतलें व तो फारच खुबीदार तऱ्हेनें हांसला ! नंतर तो ह्मणतोः “ आह्मी नमून घ्यायचं ह्मणजे आजपर्यंत काबीज केलला मुलूख सगळा यांच्या स्वाधीन करून आपण स्वस्थ बसायचं एवढंच कीं नाहीं ! दुसरा कांहीं उपायच नाहीं. आपली मदत असती, तर या लोकांनासुद्धां खडे चारायला मागें पुढें पाहिलं नसतं. पण आपणच जाणार ह्मणतां तेव्हां काय करायचं ! ”

“ यांना खडे चारण्याचं काम आपण समजतां इतकं सोपं नाहीं. राजांना आजपर्यंत कोणी खडे चारणारा भेटला नाहीं आणखी पुढें भेटेल ही कल्पनाही व्यर्थ आहे. त्यांत आणखी दिलेरखान आहेत. या दोघांवर आमच्या वडिलांचा अगदीं पुरा पुरा विश्वास. इतका कांहीं आह्मां कोणावर नाहीं. आणखी खरं बोलायचं तर ते दोघे आहेतही तसेच. तेव्हां त्यांच्याशीं झुंज करण्याचा विचार कांहीं आपण करूं नये असा आमचा सल्ला. सांगा, आह्मी उगीच कांहीं तरी होय नाहीं म्हणण्यांत काय अर्थ आहे ? आतां आमचा आपल्याला कांहीं उपयोग होणार नाहीं. आपण झुंजण्याचा विचार रहित करावा. कांहीं कावा करून आपलें कार्य साधेल अशी समजूत धरली तरी ती व्यर्थच. मी सांगतों हें कांहीं तरी उगीच नाहीं. माझ्या दृष्टीनें योग्य तीच सल्ला मी देतों आहें. या उपर आपण आपला विचार पहा !”

मराठा सरदार अगदीं स्वस्थ बसला होता !

---

# प्रकरण १८ वें.

## पुरंदरकडे.

मागें एका प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें पुरंदरावरील मराठ्यांनीं दिलेरखानास फसवून त्याच्या छावणीचा फार खराबा केला. शिवाय मराठ्यांच्या त्या छाप्याचा फायदा घेऊन अबदल्ल्यानें दुसऱ्या तऱ्हेनेंही त्यांचें सर्वस्व अपहरण केलें, यामुळें त्याच्या अंगाचा तिळपापड उडाला. त्याची कन्या नुर एल हुदा ह्मणजे त्याचा जीव कीं प्राण होता. तिला या मराठ्यांनीं नेलें असें समजण्याबरोबर त्याला असें झालें, कीं केव्हां एकदां पुरंदरचा पाडाव करीन आणि त्यावरील मराठ्यांस पकडून त्यांना उभें जाळीन. परंतु कोणाचें नुकसान झालें, कीं त्याला तें नुकसान करणाऱ्याचा जो संताप येतो व त्या संतापांत ज्या ज्या इच्छा उत्पन्न होतात, त्या त्या जर त्याला सत्य करून दाखवितां आल्या, तर आजमितीस जगावर मनुष्याची वस्तीच राहिली नसती. दिलेरखानास मराठ्यांचा अतोनात संताप आला; परंतु त्या संतापास किल्ल्यावरील लोकांचे बळी घेणें तर शक्य नाहीं. अशा स्थितींत काय करावें आणि काय करूं नये असें त्याला झालें; आणि त्यानें कोणाचा तरी बळी घ्यावयाचाच अशा निश्चयानें आजूबाजूचीं खेडींपाडीं जाळून फस्त करण्याचाच सपाटा सुरू केला. आजूबाजूच्या खेड्यांस आग लावून देऊन त्यांची जागा खालीं करून घ्यावयाची व आपली छावणी तेथें किल्ल्याच्या तोफांच्या टप्प्याच्या बाहेर ठोकावयाची हा त्याचा बेत. वड्याचें तेल वांग्यावर हाच त्या वेळीं न्याय होता. त्याची मुलगी मराठ्यांनीं नेली अशी त्याची समजूत करून देण्यांत आली होती आणि त्या समजुतीमुळें त्याला असें झालें होतें, कीं काय करूं आणि काय न करूं ! आपल्या खुद्द छावणींतून आपल्या खाशा स्वारीच्या ठिकाणावर मराठ्यांनीं हल्ला करून आपली पोरगी पळवून नेली, ही गोष्ट कोणाजवळ बोलण्याची सुद्धां त्याला साहजिक रीतीनेंच लाज वाटूं लागली. जयसिंगाकडे जासूद पाठवून त्यास ही गोष्ट कळविण्याचें त्याच्या मनांतही येईना. परंतु अन्यथा विचार करून पाहतां त्याला असेंही वाटलें, कीं आतां या भयंकर दुष्कृत्याबद्दल मराठ्यांवर जर आपल्याला सूड उगवावयाचा आहे, तर आपण बरोबर आणलेल्या सैन्यापैकीं बरेंचसें सैन्य आपल्या ताब्यांत एकवटून घेऊन हल्ला केला तरच तें शक्य. तेव्हां जयसिंगाला इकडील सर्व हकीकत कळवून कुमक मागितलीच पाहिजे. परंतु कुमकेच्या मागणीबरोबर आतांपर्यंत काय स्थिति झाली हेंही कळविलेंच पाहिजे. तें कळविण्याची तर इच्छा नाहीं. असा कांहीं तो मोठ्या पेंचांत पडला होता. परंतु तो

आपोआपच त्या पेंचांतून निघाला. इकडे काय हकीकती झाल्या त्या किरातसिंगानें आपल्या परीनें जयसिंगास सांगितल्याच होत्या. शिवाय आणखीही कोणाकोणाचे जासूद येऊन त्यांनीं बातम्या आणल्याच होत्या. तेव्हां काय करावयाचें तें जयसिंगानें आधींच ठरवून टाकिलें होतें. त्यानें आणखी बरीचशी कुमक पाठविण्याची तयारी केली होती व तो स्वतःही तिकडे जाण्यास सिद्ध झाला होता, यामुळें दिलेरखानाकडून जासूद पाठविण्याची अवश्यकता राहिली नव्हती. पुरंदरकडे कित्येक लोक, भिस्ती, रस्तेतोड करणारे, गोळीबार, हत्यारखाना आणि तोफा यांची दिलेरखानानें आधींच रवानगी केली होती आणि पाठीमागून तो स्वतःही निघाला. नंतर पुरंदरपासून सुमारें चार मैलांवर त्यानें आपली छावणी टाकली. एका बाजूस दाउदखानास बसविलें, दुसरी बाजू किरातसिंगाकडे सोंपविली. परंतु पुरंदर किल्ला ह्मणजे लहानशा टेंकडीवरील किल्ला नव्हे, तर आजूबाजूच्या सर्वच टेंकड्या किल्ल्याप्रमाणें बंदोबस्त करून टाकलेल्या! केवळ तट घातलेला नाहीं, अशी आजूबाजूस टेंकडीच नाहीं. अशी स्थिति असल्यामुळें पुरंदर किल्ल्याच्या जवळ राहून तो किल्ला घेणें, अशक्यच झालें होतें. परंतु आतां आपण कांहीं तरी केल्याखेरीज गत्यंतर नाहीं, कांहीं तरी जोर धरून एखादें तरी ठाणें अगर किल्ला हस्तगत करून घेतला पाहिजे असा विचार करून त्यानें असें ठरविलें, कीं जवळच असलेला रुद्रमाळ उर्फ वज्रगड यावर हल्ला करून तो नेटानें घ्यावयाचा. मराठ्यांनीं दिलेरखानाच्या हल्लीस पळवून नेलें हें त्यास बिलकुल खरें वाटत नव्हतें. परंतु दिलेरखानाची व त्याची भेट होतांच दिलेरखानानें ती हकीकत सांगून मराठ्यांवर शिव्यांचा भडिमार केला आणि आपण या लढाईत प्राण देऊं किंवा त्यांचा घेऊं, असे निकराचे शब्द उच्चारले, तेव्हां जयसिंगानें त्याचें समाधान करून सांगितलें, कीं "आठ दिवसांच्या आंत आपण तो किल्ला घेऊन टाकूं; त्याची आपल्यास काळजी नको. आपण आणखी मी दोघे जेथें अगदीं एकजुटीनें काम करतों आहोंत तेथें आतां या लोकांचा पाड काय लागणार!"

राजा जयसिंगानें लागलीच आपले लोक, कोण कोठें असावे, कोणी कोठें व्यवस्था ठेवावी यांबद्दल हुकूम सोडले आणि तुकड्या बसविल्या. दिलेरखानास पुरंदर व वज्रगड यांच्या दरम्यान बसविलें. त्याच्याबरोबर त्याचे भाचे हरिभान व उदेभान गौर असे होते, अफगाण स्वार होते. त्यांच्या पुढच्या बाजूस तुर्क ताजखान व तोफखाना होता. किरातसिंगाला तीन हजार सैन्य देऊन त्यानें पुरंदरच्या थोरल्या दरवाज्यापुढें बसविलें होतें. उजवे बाजूस राजा नरसिंग गौर, करण राठोर, नरवरचा राजा जगत्सिंग आणि सय्यद मकवल अलम या मंडळींनीं तळ दिला. पुरंदरच्या मागल्या बाजूस दाऊदखान, राजा रायसिंग राठोर, महमद सालीतारखान रामसिंहादा, शीरसिंग राठोर, राजसिंग गौर इत्यादि थोर थोर रजपूत व मुसलमान सरदार होते. त्याचप्रमाणें जेथें मुख्य तळ दिला होता, त्याच्या उजव्या बाजूस

रसूल बेग रोजभानी आणि त्याचे लोक होते. रुद्रमाळाच्यापुढें चतुर्भुज चौहाण आणि दिलेरखानाचे लोक होते. त्यांचे मागें मित्रसेन इंद्रमण बुंदेला इत्यादि मंडळी होती. राजा जयसिंगानें आपली छावणी उठवून रुद्रमाळ टेंकडीच्या अगदीं पायथ्याशीं नेऊन बसविली व त्याच्या शिपायांनीं आपले तंबू टेंकडीच्या बाजूबाजूनें दिले. तो सर्व छावण्यांतून स्वतः हिंडे, आपल्या सैन्यास उत्तेजन देई आणि वेढ्याचें काम चांगलें चाललें आहे कीं नाहीं हें पाही. प्रथम त्यानें आपल्या तोफा त्या टेंकडीवर चढविण्याची खटपट केली. अबदुल्लाखान नांवाची एक तोफ वर चढविण्यास तीन दिवस लागले, तेव्हां ती रुद्रमाळाच्या समोरच्या टेंकडीवर चढली. फत्तेलष्कर नांवाची दुसरी तोफ तेथें नेण्यास साडेतीन दिवस लागले. हाहेली नांवाची तिसरी तोफ मोठ्या कष्टानें वर चढविली गेली. अशा तीन तोफा जेव्हां समोर जाऊन बसल्या आणि त्यांचा भडिमार सुरू झाला, तेव्हां रुद्रमाळावरील लोक अगदीं भेदरून गेले. परंतु त्यांनीं १०दिवसपर्यंत चांगला टिकाव धरला. शेवटीं एके दिवशीं दिलेरखान आपली पोरगी मराठ्यांनीं नेली असून अद्यापि आपल्याला तिचा कोणाकडून पत्तासुद्धां लागला नाहीं, ह्मणून संतापलेला एकदम चढाव करून गेला. त्यानें विलक्षण धैर्य दाखविलें. मारीन किंवा मरेन असा मनाचा निश्चय करून तो त्या किल्ल्यावर चढून गेला आणि आश्चर्याची गोष्ट ही, कीं त्या चढावांत त्याची एकदम सरशी झाली. रसद बंद झाल्यामुळें वरचे लोक हवालदिल झाले होते. त्यांचा पुरवठा संपत आला होता. रसद लवकर येण्याची आशा अजीबाद तुटली होती. कारण सभोंवतालीं मोंगलांचा सेनासमूह इतका भयंकर पसरला होता, कीं त्यांतून एक मुंगीसुद्धां शिरकाव करून घेऊन वर किल्ल्यावर येईन ह्मणेल तर तिला तें शक्य नव्हतें, असें स्पष्ट दिसलें. अशा स्थितींत ते लोक निराश होतील तर त्यांत नवल काय ? ते निराश होऊन कसा तरी किल्ला बचावण्यासाठीं धडपड करीत असतां एकदम दिलेरखानानें हल्ला केला आणि लोकांचा पराभव करून त्यांस सैरावैरा पळण्यास लाविलें. त्या लोकांचे दिलेरखानानें हाल मांडले. त्याची इच्छा अशी, कीं त्यांनीं आपल्यास पुरंदर घेण्यास कांहीं तरी मदत करावी. रुद्रमाळावर कांहीं आपली मुलगी नाहीं, आपली मुलगी पुरंदरावरील लोकांनीं नेलेली आहे इतकी खात्री दिलेरखानास होती; परंतु रुद्रमाळ घेतला अशी पुरंदरावरील लोकांची खात्री झाली, कीं तेही हताश होतील, आपणांस शरण येतील किंवा त्यांच्या हताश होण्यामुळें आपणांस फार फायदा होईल. ते आपल्यास लवकर जिंकतां येतील असें त्यास वाटलें असावें. कसेंही असो, त्यानें रुद्रमाळावर फारच अल्प आयासानें आपलें निशाण रोंवून किल्ला पाडून घेतला. पहिला भाग काबीज करून बाले किल्ल्यापर्यंत घुसण्यास त्यास अर्थातच फार प्रयास पडले. लोक जरी अगदीं हवालदिल व हताश झाले होते, तरी त्यांनीं आपल्याकडून शत्रूंस जितका अड-

थळा करावयाचा तितका करण्याविषयीं शिकस्त केली. परंतु अखेरीस त्यांचा नाइलाज होऊन त्यांनीं हत्यारें व किल्ल्या खालीं ठेविल्या. वर सांगितलेंच आहे कीं त्यांनीं याप्रमाणें सर्वस्वीं शरण आल्यासारखें केलें तरी पण दिलेरखानानें त्यांस छळण्याचा उपक्रम चालविला. हें दिलेरखानाचें करणें जयसिंग राजाच्या कानावर जातें न जातें तों तोही त्या स्थानीं आला आणि त्याचें व दिलेरखानाचें एकीकडे बसून पुढें काय करावयाचें या विषयावर बोलणें झालें, तेव्हां राजा जयसिंग दिलेरखानास ह्मणतोः–"आपण शत्रूकडील लोकांना मोठ्या मानमरातबानं वागविलं तरच समोरच्या पुरंदर किल्ल्यावरले लोक आपणांस लवकर वश होतील, नाहीं तर कधीं होणार नाहींत. आपला हेतु कांहीं त्या लोकांना ठार मारण्याचा नाहीं किंवा त्यांचे हाल करण्याचा नाहीं. आपल्या हातीं किल्ला आला, त्यांनीं हत्यारं खालीं ठेवलीं, आणखीं काय पाहिजे ! जर आपण त्यांचा छळ करूं लागलों, तर लोक आपल्यावर चिडतील आणि मरेपर्यंत शरण ह्मणून येणार नाहींत. त्यांत काय मतलब आहे ? विनाकारण हत्या करण्यांत काय मतलब आहे ? तर या लोकांना आपण उलट चांगल्या तऱ्हेनें वागवून त्यांच्या पोटांत आपल्याविषयीं विश्वास उत्पन्न होईल असें करूं ह्मणजे दुसऱ्या ठिकाणच्या लोकांना आपल्याविषयीं गैरविश्वास उत्पन्न न होतां आपल्याला ते लवकर शरण येतील. रुद्रमाळचा किल्ला हा आपण पहिला किल्ला घेतला आहे तेव्हां तेथील लोकांना चांगल्या प्रकारें वागवूं."

दिलेरखानाला याप्रमाणें बोलून नंतर किल्ल्यावरील पराभूत लोकांस आपल्यापुढें आणून राजा जयसिंगानें त्यांचा मोठा मान करून त्यांस बहुमानाचे पोषाख दिले आणि सांगितलें कीं "तुह्मी इतर किल्ल्यांवरच्या लोकांना जर आपल्यासारखे लवकर शहाणे कराल, तर फार उत्तम होईल. विनाकारण माणसं मरायला नकोत. तुह्मी जा. आह्मी तुह्मांला मोकळे सोडतों. वाटेल त्या किल्ल्यावर जा. परंतु विनाकारण कोठेंही झुंज होईल अशी तजवीज करूं नका. झुंज झाली तर आह्मी भितों असं नाहीं; परंतु झुंज न होतां किल्ले–ठाणीं जितकीं आमच्या हातांत येतील तितकीं बरीं." अशीं मोठीं गोड बोलणीं बोलून त्यानें लोकांस खूष करून लेथून लावून दिलें. हें पहातांच दिलेरखानास वाईट वाटलें. त्याचे मनांत असें होतें, कीं हीं सर्व माणसें अडकावून ठेवावीं म्हणजे त्यांचा जीव वांचविण्यासाठीं पुरंदरचे मराठे आपणांस लवकर शरण येऊन आपली मुलगी आपल्याकडे पाठवून देतील. अशा प्रकारें त्या मंडळीस लावून दिल्यानंतर व रुद्रमाळ घेतल्यावर महाराष्ट्र पुनः काबीज करण्यास जणूं काय त्यांनीं आरंभच केला ! मोंगलांचें सैन्य आतां जें तेथें आलें आहे तें कांहीं स्वस्थ बसण्यास किंवा पराभव करून घेऊन परत जाण्यास आलें नाहीं अशी शिवाजी महाराजांची खात्री करावी हा त्यांनीं मुख्य हेतु धरला होता. अशी एकवार खात्री झाली ह्मणजे आपल्यास कोणत्याही प्रकारें

महाराष्ट्र काबीज करण्यास कष्ट पडणार नाहींत. शिवाजी महाराज लवकर आप-ल्याला शरण येतील, असा विचार करून दिलेरखानानें पुनः आपला मोर्चा पुरंदरकडे वळविला आणि जयसिंगानें महाराष्ट्रांत निरनिराळ्या भागांत हल्ले करण्यास कोणी कोणी कसा कसा उपक्रम करावा त्याची योजना केली. पुरंदरापुढें एक तुकडी बसविली आणि त्याच्या सर्व दिशांनीं वेढा दिला. तेवढ्यानें मोंगलांचें या खेपेचें सैन्य संपलें अशी समजूत शिवाजीची राहूं नये, दहा ठिकाणीं एकदम पसारा करून सगळ्या देशाची धूळधाण करण्याला आपलें सैन्य आलें आहे अशी त्याची व इतर लोकांची खात्री व्हावी, एवढ्याकरितां त्यांनीं पुरंदरच्या सभोंवतालीं पुरे इतकें सैन्य ठेवून बाकीच्या सैन्याच्या तुकड्या केल्या आणि त्या तुकड्यांस अशी सक्त ताकीद दिली, कीं प्रत्येकीनें ज्या ज्या प्रांतांत जावयाचें तेथें तेथें अगदीं धुमाकूळ उडवावा. शेत ह्मणूं नये, वाडी ह्मणूं नये, सत्यनाश करावा; आणि कोणीही लोक आपल्या गांवांतून निघून शिवाजीकडे जाऊं नयेत. शिवाजीनें जसा मोंगलांच्या प्रांतांत धुमाकूळ घातला, असा धुमाकूळ प्रत्येक तुकडीनें आपापल्या टापूंत घालावा, असा हुकूम करून त्यानें दाउदखान, राजा रायसिंग, शीर्झाखान, अमरसिंग, अचलसिंग वगैरे सरदारांचे ताब्यांत अगदीं शेलके, क्रूर व शूर लोक देऊन राजगड, रोहिडा, सिंहगड वगैरे प्रांतीं धुमाकूळ करण्यास त्यांस पाठविलें.

आडदांड लोकांस अशाप्रकारची परवानगी मिळाल्यानंतर आणखी काय पाहिजे? सैतानाचा भूतखाना त्यानें मोकळा सोडावा त्याप्रमाणेंच तें मुसलमानांचें व रजपूतांचें सैन्य मोकळें सुटलें आणि त्यानें लोकांवर नुसता कहर गुजराविला. घरें दारें सोडून लोक आपल्या जीवासाठीं धांवत सुटले. आपल्या संपत्तीचा किंवा कसलाही लोभ त्यांस राहिला नाहीं. उठावें, आपलीं माणसें घ्यावीं आणि पळत सुटावें हाच काय तो एक मार्ग राहिला. अशा स्थितींत अर्थातच त्या छळकांसही त्या दीन होऊन पळणाऱ्या लोकांचा पाठलाग करण्याची फार मौज वाटूं लागली. त्यांची संपत्ती टाकून ते पळत आहेत तेव्हां ती तर आपल्या हातांत आलीच. आतां त्यांचा पाठलाग करून त्यांचा छळ करावा. जे पडले, त्यांच्या बायका सांपडल्या ह्मणजे त्यांचे हाल करावे यांतच त्यांना फार आनंद वाटूं लागला. शेतवाड्या आणि वाडे घरें यांचा तर त्या लोकांनीं किती भयंकर नाश केला तें वर्णनसुद्धां करणें शक्य नाहीं. पुरंदरच्या सभोंवार पंचवीस तीस कोसांतली मनुष्यवस्ती पार नाहींशी झाली ह्मटलें तर मुळींही अतिशयोक्ति होणार नाहीं. सभोंवतालीं शत्रूंनीं काय प्रकार करून टाकला आहे हें पाहून पुरंदर किल्ल्यावरील लोकांचीं अंतःकरणें अगदीं दुभंगून गेलीं. सभोंवतालीं असणाऱ्या वस्तींत वरील लोकांच्याच नात्याचीं सर्व माणसें–अर्थात् किल्ल्यावरील प्रत्येक माणसास आपला कोणीना कोणी तरी नष्ट झाला असें दिसून आलें, आणि हाहाःकार उडाला. परंतु ते लोक असले विलक्षण वीर कीं त्यांच्यापैकीं एकानेंही असें मनांत आणलें नाहीं कीं आतां किल्ला

शत्रूच्या स्वाधीन करावा. किल्ल्यावरील प्रत्येक व्यक्तीचें प्रेत पडेपर्यंत किल्ला शत्रूच्या हातीं जातां कामा नये, शत्रू आंत शिरेल तेव्हां त्यास एकही जिवंत माणूस दिसणार नाहीं, त्यानें प्रेतें तुडवीत आंत यावें, असेंच प्रत्येकाचें म्हणणें पडलें आणि जो तो मरणास शरण जाऊं, शत्रूंस जाणार नाहीं, असें ह्मणूं लागला.

शत्रूंनीं असा भयंकर अनर्थ चालविला आहे हें पाहून मराठे नुसते अगदीं खिन्न होऊन स्वस्थ बसले होते असें नाहीं. वास्तविक पहातां मोगलांचा सेनासमुद्र इतका भयंकर होता, कीं त्याच्या नुसत्या दर्शनानें कोणीही तेव्हांच भयभीत व्हावयाचा; परंतु मराठ्यांचें तें ब्रीद्च नव्हे. 'मरूं तेव्हां हटूं' या ब्रीदाची त्यांनीं ध्वजा उभारलेली होती. तेव्हां आपापल्या सामर्थ्यानुरूप व कौशल्यानुरूप त्यांनीं अशा सेनासमुद्रासही क्षुब्ध करण्यास कमी केलें नाहीं.

वर सांगितलेंच आहे कीं मोगल सैन्याच्या तुकड्या तुकड्या करून त्या पुरंदर किल्ल्याच्या सभोंवार जयसिंगानें लावून ठेवल्या होत्या. या तुकड्यांवर एक एक दोन दोन मुख्य सरदारांचीही योजना केली होती. या प्रत्येक तुकडीवर किल्ल्यावरल्या लोकांनीं केव्हां केव्हां ऐन रात्रीच्या वेळीं छापा घालून फार त्रास दिला. कित्येक वेळां यापासून त्या तुकड्यांतील लोकांस फार त्रास झाला. कित्येक वेळां ते लोक चांगले सावध असल्यामुळें त्यांसीं मराठ्यांचाच खरपूस समाचार घेतला. असें परस्पर देवाण घेवाण चाललें होतें. परंतु एकंदरींत रुद्रमाळ घेतल्या वेळेपासून मोगलांची उमेद आणि मराठ्यांची उमेद यांस चढती उतरती कळा लागली होती. मराठ्यांस नाउमेदीला मोठें कारण झालें तें हें, कीं त्यांस कोठूनही कुमक येण्याचा संभव दिसेना. रुद्रमाळावरून पुरंदरावर व इतरत्र गुप्त रीतीनें लोकांस इकडून तिकडे जाण्याची व्यवस्था होती, परंतु तो रुद्रमाळ शत्रूच्या हातीं पडल्या कारणानें त्या वाटेचा कांहीं सुद्धां आतां उपयोग होणें शक्य नव्हतें. आणखीही कांहीं चोरवाटा होत्या, परंतु मोगल सैन्य सर्वत्र पसरल्यामुळें त्या चोरवाटांचीं तोंडेंही त्यांना नकळत त्यांच्याकडून बंद करण्यांत आलीं, यामुळें बाहेरचे मराठेही कुमक करण्यास जाण्याचे कामीं अगदीं हताश झाले. परंतु त्यांनीं शत्रूस जिकिरीस आणण्याचे कामीं जितका खटाटोप करावयाचा तितका केलाच.

एप्रिल महिन्याच्या प्रारंभास नेताजी पालकर यानें एक मोहीम केली व मोगलांच्या एका तुकडीस जर्जर करून पुरंदरास कुमक करण्याचा घाट घातला, परंतु दैवाची गति विचित्र ! त्या वेळीं—ते दिवस पावसाचे नसतां—एकाएकीं कांहीं वेळ पाऊस पडून नेताजीस आपला नेट थोडा थांबवावा लागला. इतक्यांत सुपें येथून एक मोगलांची तुकडी येऊन तिनें पालकराच्या तुकडीचा धुवा उडविला. पुनः मे महिन्याच्या अखेरीस कुतुबुद्दिनखान यानें उरवड्याच्या किल्ल्यावर मारा करून तेथें जमणाऱ्या मराठ्यांची त्रेधा उडविली. या कुतुबुद्दिनानें वाटेवरील

खेड्यांचा सत्यनाश केला. ज्या ज्या किल्ल्यावर मराठे जमण्याची खटपट करिताहेत असें कळलें, त्या त्या किल्ल्याभोंवतीं मोगलांनीं आपल्या सैन्याच्या तुकड्या पाठवून जेथलीं माणसें तेथें दाबून टाकलीं. सिंहगड, राजगड, रोहिडा, कुमारीगड हे किल्ले घेण्याची त्यांची तयारी नव्हती, तरी त्यांनीं त्या किल्ल्यांच्या आजूबाजूच्या खेड्यापाड्यांचा जितका नाश करणें शक्य तितका केला. खेडीं जाळलीं, घरें लुटलीं, गांवें उध्वस्त केलीं. सारांश, जितका ह्मणून लोकांस त्रास देणें शक्य तितका देण्यास त्यांनीं यत्किंचितूही कमी केलें नाहीं. एक वेळ जयसिंगास अशी बातमी लागली, कीं लोहगडावर शिवाजीमहाराज आपलें मोठें थोरलें सैन्य जमा करीत आहेत. असें सैन्य जर जमूं दिलें तर आपल्याला मोठी अडचण होईल हें जाणून लागलींच जयसिंगानें तेथें आपल्या सैन्याच्या दोन तुकड्या नेऊन लोहगडच्या दोन बाजूंनीं त्या तुकड्यांकडून चाल करविली. महाराजांची मंडळी तेथें जमत होती ही गोष्ट खरी होती. मोगल सैन्य आपल्यास उधळून टाकण्यास आलें हें कळण्याबरोबर मराठ्यांनीं त्या सैन्यावर हल्ला केला. ५०० स्वार व १००० शिबंदी मरणास सिद्ध होऊन पुढें झाले; परंतु हजारों रजपुतांपुढें त्यांचें कांहीं चालेना. मराठ्यांचे फार लोक कैदी झाले व गुरेंढोरें आणि घोडेही फार धरले गेले! लोहगांव, विशाळगड, तिकोना आणि टांकी या चार किल्ल्यांच्या वेढ्यांत असणारीं सर्व खेडीं अगदीं उजाड झालीं. मोगलांनीं मराठ्यांस एक सुद्धां बाजू आपला केंद्र करून जमाव करण्यास ठेवली नाहीं. बालेघांट व पैणघाट यांत अशी जागा राहिली नाहीं, कीं जी मोगलांनीं उजाड केल्याखेरीज ठेविली. मराठ्यांना असाच प्रकार करतां आला नसता असें नाहीं; परंतु आपलाच मुलूख आपणच उध्वस्त करण्याचें त्यांच्या चित्तास कसें येणार? तथापि जेथें आपल्या खेड्यापाड्यांस त्रास न होतां शत्रूला मात्र फार त्रास होईल असें त्यांस दिसलें, तेथें त्यांनीं रानांस आग लावून देऊन त्यांच्या पुढारण्यांत अडचणी आणल्या. परंतु त्या अडचणींचा फारच थोडा उपयोग झाला. मोगलांचा खराबा करावयाचा तितका त्यांनीं केला, तरी त्यांचा मुलूख कार्बीज करण्याच्या मार्गांत त्यांस नामोहरम करून स्वस्थ बसण्यास लावण्याइतका कांहीं नेट त्यांस करतां आला नाहीं. या सर्वांचें कारण केवळ एकच होतें. तें हें, कीं त्यांना कोठेंही एका ठिकाणीं जमून जोर करण्यास संधि ह्मणून सांपडूं द्यावयाची नाहीं असा मोगलांनीं जागेपणा राखला.

पुरंदरच्या सभोंवार सर्व प्रांतांत अशी स्थिति झाली यामुळें पुरंदर किल्ल्यावरील लोकांस स्वतःच्या कर्तबगारीवर भिस्त ठेवूनच आपलें संरक्षण करण्याची पाळी आली. त्यांनीं रात्रीं बेरात्रीं छापे घालण्याचा प्रथम प्रथम सपाटा चालविला, परंतु पुढें सगळ्या बाजूचे मोगल व रजपूत अगदीं जागृत राहूं लागल्या कारणानें त्यांच्या त्या छाप्यांपासून तादृश त्रास होईनासा झाला. यांनीं थोडी गडबड केली पुरे, कीं हीं माणसें एकदम सर्व उठून त्यांच्यावर

हल्ला करीत. इतकेंच नव्हे, तर त्यांच्या मागें लागून त्यांस जेरीस आणण्यास पहात. अशी स्थिति झाल्या कारणानें त्यांच्या हल्ल्यांतही आतां कांहीं राम राहिला नाहीं. अशा प्रकारानें सर्व बाजूंनीं नाडल्याप्रमाणें झाल्यामुळें मराठ्यांस एक प्रकारचा हताशपणा आला. या हताशपणानेंच आपला फायदा होईल असें जयसिंगानें मनांत पक्कें निश्चित केलें. गरिबांगुरिबांस आपल्या हेक्यानें विनाकारण त्रास होतो आहे, असें एकवार शिवाजीमहाराजांस कळलें, ह्मणजे ते हा सर्व प्रकार लवकर शेवटास नेतील अशी त्याच्या मनाची खात्री होती. कां कीं कोणत्याही कारणानें सर्व महाराष्ट्रभर अशा प्रकारचा त्रास गरीब लोकांस होण्यास आपण कारण होऊं नये ही त्यांची अत्यंत दृढ इच्छा. त्या इच्छेच्या आड जर सध्यांचा एकंदर प्रकार येतो आहे तर तो किती दिवस चालवावयाचा? अखेरीस आतां आपली सरशी होत नाहीं, जयसिंग राजाला जर आपण अंकित करून घेतलें नाहीं, तर आपल्याला आतां या झुंजेंत यश येणार नाहीं, तें राजा जयसिंग यासच जाणार, असें त्यांच्या मनानें आतां घेतलें. अशा वेळीं त्यांस नमून घेतल्याखेरीज दुसरा मार्ग नाहीं असें स्पष्टच दिसलें. अर्थात् त्यांचें मन फार खिन्न झालें हें सांगावयास नकोच. त्यांना झोंप नाहींशी झाली. अंगाची तगमग होऊं लागली. इतके दिवस अनर्थापात परिश्रम करून जी एवढी प्रचंड इमारत उभारली ती ढांसळूं पहाते. आपण बांधिलेलें मंदिर आपल्या डोळ्यांदेखत खालीं ओढलें जातें, याबद्दल त्यांस अतोनात वाईट वाटूं लागलें. आमचेच देशबंधू या मुसलमानांची नौकरी पतकरून आमच्यावर उठून आले. आह्मीं जें काय थोडेंसें स्वराज्य उभारलें तें पाहून दिल्लीकडे आपण आपलें स्वराज्य उभारण्याचा विचार करावयाचा तें सोडून देऊन आमचे हातपाय तोडण्यासाठीं यांनीं ह्मोरकेपणा पतकरून इकडे यावें हेंच त्यांस किती तरी वाईट वाटलें. परंतु त्या वाईट वाटण्याचा उपयोग काय? जयसिंग राजांची आतांपर्यंतची जी कीर्ति त्यांनीं ऐकली, त्या कीर्तीला अनुरूप अशीच कृति ते करणार. आपल्याला दाबून टाकून बादशहाजवळ आपली बडेजाव वाढविणार. आपल्याला त्यांच्याकडून मदत ह्मणून कधीं होणार नाहीं, असें शिवाजीमहाराजांस पक्कें दिसून आलें. परंतु निराशा आणि खिन्नता हीं शिवाजीमहाराजांना फार वेळपर्यंत आपल्या ताब्यांत कधींच ठेवूं शकलीं नाहींत. प्रसंग जसजसा अधिक बिकट, तसतशी त्यांची निश्चयबुद्धि अधिक उत्तेजित होत असे. त्यांच्या मनाचा असा निश्चय झाला, कीं एकवार आपण या राजा जयसिंगाची प्रत्यक्ष भेट घ्यावी आणि त्यांचें हें कृत्य किती अनिष्ट, किती वाईट आहे, आपल्यालाच काय, परंतु आपल्या एकंदर राष्ट्राला, लोकांना किती वाईट आहे. हें स्पष्ट त्यांच्या डोळ्यांपुढें मांडूं आणि त्यांचें मन आपल्याकडे वळलें तर पाहूं, असें त्यांच्या मनांत आलें. हा विचार त्यांच्या मनांत आला खरा, परंतु त्यांचेंच मन

त्यांना असेंही सांगत होतें, कीं या आपल्या करण्याचा या खेपेस कांहींसुद्धां उपयोग होणार नाहीं; तथापि प्रयत्न करावयाचा तो केव्हांही चुकूं नये. आपण प्रयत्न केला नाहीं आणि त्यामुळें आपलें फसलें, असें केव्हांही मनांत येतां कामा नये. जें काय करावयाचें तें करून मग जर एखाद्या गोष्टींत आपल्याला यश आलें नाहीं, तर त्याचा दोष आपलेकडे नाहीं असें तरी मनाला समाधान असतें. असा एकंदर विचार करून महाराजांनीं आपला वकील रघुनाथपंत यास जयसिंगाकडे पाठविलें. आपण असा सपाटा सुरू केला तर खात्रीनेंच शिवाजी आपल्याला शरण येईल असें जयसिंगानें अनुमान केलें होतें तें खरें ठरलें, याबद्दल त्यास फार आनंद झाला.

# प्रकरण १९ वें.

## किल्ल्यावर.

किरातसिंग आपल्याकडून दिलेरखानाची व जयसिंगाची मर्जी राखण्यासाठीं अत्यंत परिश्रम करीत होता. पुरंदर किल्ल्याला वेढा देणाऱ्या तुकड्यांपैकीं त्याची तुकडी अगदीं मुख्यांपैकींच होती आणि जर योगायोग आला, तर अखेरीस आपण स्वतःच पुरंदर पाडूं व आपलें निशाण आपल्या हातानें त्याजवर नेऊन रोवूं, अशी जबरदस्त महत्त्वाकांक्षा त्यास होती ! ही महत्त्वाकांक्षा ज्या मार्गानें तृप्त होईल तो मार्ग स्वीकारण्यास त्यानें मागें पुढें पाहिलें नसतें हें अगदीं उघड होतें.

दुसऱ्याची बरोबरी करण्याचे—आपल्याहून वरचढ अशा व्यक्तीशीं चढाओढ करण्याचे—मार्ग दोन असतात. एक चांगले लोक स्वीकारतात व दुसरा वाईट लोक स्वीकारतात. आपल्याहून श्रेष्ठ पदवीला पोंचलेल्या व्यक्तीशीं योग्य स्पर्धा करून त्याच्या बरोबरीच्या पदवीस जाण्याचा प्रयत्न करणें हा एक मार्ग. आणि त्या व्यक्तीलाच आपल्या हीन पदवीला आणून सोडण्यासाठीं धडपड करणें हा दुसरा मार्ग. किरातसिंगासारख्या व्यक्ति जोंपर्यंत शक्य, तोंपर्यंत आपण श्रेष्ठ पदवीला चढूं इच्छितात; परंतु आपण ज्याच्याशीं स्पर्धा करीत असतात, तो खरोखरी तितका श्रेष्ठ नाहींच; अपात्रीं श्रेष्ठपणा लोकांनीं दिलेला आहे—असें त्याच्याविषयीं लोकांत ध्वनित करितात. अपरोक्ष रीतीनें खरे श्रेष्ठ आपण अशी लोकांची समजूत व्हावी ह्मणून धडपड करीत असतात. किरातसिंगाची अशी महत्त्वाकांक्षा होती, कीं ' येन केन प्रकारेण ' आपण जयसिंगाची जागा पटकवावी. बादशहाचा जो काय विश्वास जयसिंगावर आहे, हा आपल्यावर ओढून घ्यावा आणि त्याला खालीं ओढावें. हें साधण्यासाठीं काय काय केलें पाहिजे या विचाराखेरीज दुसरा त्याच्या

मनांत विचारच घोळत नसे. आपण काय केलें ह्मणजे आपल्याला जयसिंगा-बद्दल बादशहाच्या मनांत वैषम्य उत्पन्न करतां येईल हा एक विचार त्याच्या डोक्यांत एकसारखा घोळत असे. जयसिंगापेक्षां आपण अ-धिक मर्दुमकी करूं शकणार नाहीं असें त्याचें मन अंतःस्थपणें जाणून होतें. जयसिंगापेक्षां आपण सर्व प्रकारें श्रेष्ठ आहों असें त्याच्या अंतरंगांत खचित वाटत नसे; परंतु अहोरात्र निदिध्यास करून त्यानें आपल्यास जणूं काय पढवणी चालू केली होती, कीं आपण आज जरी जयसिंगाची सर्व प्रकारें बरोबरी करूं शकलों नाहीं, तरी आपल्या त्याच्यांत कांहीं फारसा फरक नाहीं. आपण थोड्या प्रयत्नानें त्याच्यापेक्षां किती तरी पटीनें श्रेष्ठपणा संपादन करूं. जें काय आपणास पाहिजे तें "संधि" हें होय. संधि आली, कीं आपण त्याच्याही-पेक्षां श्रेष्ठ आहों आणि आपल्यावरच विश्वास टाकला पाहिजे, असें बादशहाच्या मनास भासवूं. अशी कांहीं चमत्कारिक स्थिति किरातसिंगाच्या मनांत झाली होती. नूर एल्‌ हुदाला शहाजाद्याकडे पाठवून दिल्यापासून तर त्याला असें झालें होतें, कीं आपण एक मोठें महत्कृत्य केलें. स्वतःच्या उत्कर्षास्तव एक मोठी पायरी चढलों. या आपल्या कृत्यामुळें शहाजादा अत्यंत संतुष्ट होईल आणि तो तसा संतुष्ट झाल्यास आपणास आज नाहीं उद्यां, कांहीं ना कांहीं तरी फार मोठा लाभ होईल. तो आपल्या त्या रजपूत शिपायांस व अबदुल्ला वगैरेंस नूर एल्‌ हुदा ईस जहाजाद्याकडे घेऊन जाण्यास व आपलें पत्र देण्यास सोडून आल्यानंतर, त्यास लागलीच रुद्रमाळ घेण्याच्या व त्यानंतर पुरंदर जेरीस आणण्यासाठीं वेढा घालून बसण्याच्या कामगिरींत गुंतून बसावें लागलें, यामुळें त्यास पहिले दोन चार दिवस दुसऱ्या कशाचा विचार करण्यास सांपडलेंच नाहीं. परंतु चार दिवस निघून गेल्यानंतर अद्यापि आपले लोक आपणास काय झालें काय नाहीं तें सांगण्यास कसे परतले नाहींत ? शहाजाद्यानें चार दिवस त्यांस येऊं दिलें नसलें तरी एखाद्या जासुदाच्या हातीं तरी काय प्रकार घडला तें कळविण्यास कांहीं हर-कत नव्हती. असें असतां कोणीही अद्यापि कसें आलें नाहीं ? असें मनांत वारंवार वारंवार येऊन त्याला मोठी अस्वस्थता झाली होती. तो हल्ल्याचें काम मोठ्या नेटानें करी. इतरांप्रमाणें आपणांवर मराठ्यांनीं गनिमी काव्यानें छापा घातला, तर आपण त्यांतून साफ बाहेर पडलें पाहिजे इतकेंच नव्हे, तर त्या छापा घाल-णाऱ्या मराठ्यांचाच धुव्वा उडवून त्यांस पीछेहाट करून पळून जाण्यास वाव सांपडूं देतां उपयोग नाहीं, असा एकसारखा हेतु मनांत जागृत ठेवून त्यानें आपलें काम चालविलें होतें, यामुळें पुरं-दरावरील लोकांनीं मधून मधून खालच्या लोकांची खराबी करण्यासाठीं कित्येक वेळां छापे घातले, आणि मोगलांची व रजपुतांची दाणादाण उडविली, तरी किरा-तसिंगाच्या तुकडीची दाणादाण कधींही उडाली नाहीं. एक वेळ त्याच्याही बाजूवर

मराठ्यांनीं छापा घातला होता; परंतु त्या वेळीं त्यांस स्वतःचाच खराबा करून घेऊन पुनः त्याच पावलीं किल्ल्यावर यःपलाय करावें लागलें. पुष्कळांचा—इतरांचा—खराबा मराठ्यांनीं अनेकवार केला, परंतु आपण आपला खराबा होऊं दिला नाहीं; उलट आपण त्यांचाच खराबा केला ही एक किरातसिंगास प्रौढी मारण्याला मोठी गोष्ट झाली होती.

चार दिवस, सहा दिवस, आठ दिवस झाले. रुद्रमाळ घेतल्यानंतर पुरंदरला वेढा देऊन स्वस्थ बसण्याची पाळी आली. तेव्हां किरातसिंगास आपल्या लोकांची विशेषच आठवण झाली. शहाजाद्यानें अद्यापि त्या मंडळीस सोडलें नाहीं, असें त्यास वाटेना. शहाजादा फार झालें, तर अब्दुल्ल्यास ठेवून घेईल. दुसऱ्या कोणास ठेवून घेण्याचें त्यास मुळींच प्रयोजन नाहीं. मग आपल्या लोकांपैकीं कोणीही अद्यापि कसा आला नाहीं ? त्यानें सरतेशेवटीं आपलीं दोन विश्वासाचीं माणसें शोधासाठीं ह्मणून पाठविण्याचा विचार केला व त्यांस रवाना केलें. आपण जी काय व्यवस्था करावयाची ती करून आल्यानंतर कांहीं तिसरीच गोष्ट झाली असेल हा त्यास संभव वाटलाच नाहीं. ज्या मराठ्या शिपायांच्याजवळ आपण पत्र दिलें, त्यांनीं कांहीं दगा केला असेल असें त्यास स्वप्नांतही वाटलें नाहीं. त्याच्या मनांत आतां मात्र शंका येऊं लागली, कीं इतकी आपली फार मोठी कामगिरी बजावल्यानंतर आपणापाशीं त्याबद्दल बक्षिशी मागण्यास ते इसम आल्याखेरीज कधीं रहावयाचे नाहींत असें असून ते आले कां नाहींत ? ते लबाड असतील, त्यांनीं आपल्यास ठकविलें असेल, ही या महाठकास कल्पना सुद्धां आली नाहीं ! आपल्या लोकांपैकीं कोणी आलें नाहीं, त्या दोघां मराठ्यांचाही ठावठिकाण नाहीं, यास काय ह्मणावें ? त्याच्या चित्ताची अतोनात तगमग चालू राहिली.

विश्वासाचीं दोन माणसें आपल्या लोकांच्या शोधासाठीं पाठविलीं होतीं त्यांचाही पत्ता नाहीं. त्यांसही एक दोन दिवस उशीर झाला. वास्तविक त्यांनीं घोडेदौड करून केव्हांच सगळें रान पालथें घालून परत यावें; परंतु ते आले नाहींत. मग किरातसिंगाच्या जिवाची अधिकच तगमग होऊं लागली. शेवटीं किरातसिंगानें आतां एकदां आपण स्वतः शोधाकरितां जाऊन येण्याचा विचार केला. आपण वेष बदलून हळूच जाऊन यावें. मात्र येथून कोठें गेल्याचें कोणास अगदीं कळूं नये, अशी त्यानें तजवीज केली.

तो अशा वेषांत हिंडत असतां वाटेंत त्यास रघुनाथपंतांच्या लव्याजम्याचा तळ पडलेला आढळला. रुद्रमाळ किल्ला शत्रूनें घेतला, सिंहगडही घेतला व आतां पुरंदरावर भयंकर मारा चालविला आहे. शिवाय जिकडे तिकडे धुमाकूळ माजवून गरीबगुरिबांचा भयंकर नाश होतो आहे, हें बरें नव्हे असें वाटून शिवाजीमहाराजांनीं आपला वकील जयसिंगाकडे पाठविला आहे, त्याचा हा तळ आहे हें कळतांच त्यानें

क्षणमात्र मनाशीं विचार
बेटें नशीब जोरावर आहे
त्यांचा एक छापा उपयोगी
कळूं न देतां तिला शहाजा
उत्तम उपयोग झाला. पुढें
नाहीं हें पहाण्यास बाहेर
ताच्या छावणींत शिरून कां
आहे, याची माहिती काढूं."
त्यानें केला आणि कशा प्रका
दम पुढें झाला व त्या छावणींतील एक
कडून जयसिंग राजांकडे वकील ह्मणून यायला
छावणी आहे काय ? "

तो मराठा उत्तर देण्यास प्रथम कचरला. किरातसिंग
ला व शेवटीं होकारार्थी त्यानें मान हालविली.

तेव्हां किरातसिंग हंसून त्यास म्हणतोः " भाई तूं काळ
त्यावर कांहीं तरी संकट आणण्यासाठीं मी हें विचारीत ना
करून घेण्यासाठींच जयसिंगराजे यांनीं मला पाठविलं आहे. त्य
सान्या मुलूखभर हिंडताहेत. पंडितांना शिवाजीनं जा ह्मणून निरोप दिला तेव्हा
जयसिंगांकडे वर्दी लागली. त्यांच्या मनाला शिवाजीची ही गोष्ट आवडली.
विनाकारण प्राणहानि करण्यापेक्षां शरण येऊन मुलूख त्यांच्या ताब्यांत द्यावा हाच
विचार पोक्त. तेव्हां मला त्यांनीं मुद्दाम इकडे पाठविलं, कीं पंतांना भेटून त्यांना
आश्वासन द्यावं. कोणत्याही प्रकारची शंका मनांत न आणतां पुढलं बोलणं चाल-
णं होईल अशी खातरजमा करून द्यावी; तर आपण शंका न घेतां पंतांना वर्दी
द्या, कीं जयसिंगराजे यांच्याकडून कोणी त्यांचे विश्वासांतला माणूस मुद्दाम आप-
ल्याला भेटायला आला आहे. "

किरातसिंगाची वाणी अगदीं मिठास. जें बोलेल तें अशा प्रकारें कीं कोणालाही
त्याच्याबद्दल मोह उत्पन्न व्हायचाच. त्याच्या या वर दिलेल्या भाषणानें त्या मरा-
ठ्या शिपायास बरें वाटलें आणि तो त्यास ह्मणालाः "असं असेल, तर मी
आतां आपली वर्दी देतों; परंतु आपण येथेंच उभे रहा. "

इतकें बोलून तो माणूस दुसऱ्या आपल्या सोबत्याशीं कांहीं कुजबुजून निघून
गेला. थोड्याच वेळांत तो परत आला आणि किरातसिंगास त्यानें आपल्या
बरोबर चलण्याविषयीं विनंति केली. किरातसिंग तयारच होता. तो त्याच्या
मागोमाग गेला. रघुनाथपंताची छावणी ह्मणजे कांहीं मोठी थोरली छावणी
नव्हती. पंताच्यासमोर किरातसिंगास तेव्हांच नेऊन उभें करण्यांत आलें. रघुनाथ-

नावर नेऊन बसविलें.
ाणि ह्मटलें: "आम्ही
त्यांना वर्दी लागून
ाठविलं याचं मोठं नवल
ालासुद्धां ठाऊक नव्हतं !"
! त्यांचे हेर कुठें नाहींत
त्यांना बातमी नाहीं असं
आला, आणि तो विचार
कडे नुसती दृष्टि दिल्याबरो-
ाहीं विलक्षण पुरुष आहे. पण काय !
हांच त्यांना सुचत नाहीं ! पुष्कळ लोकांनीं
ात आणाल तर अविंधांना या आर्यावर्तांतून तेव्हांच
च्यीं मनाला तें मुळींच येत नाहीं ! ते ह्मणतात ईश्वरी
नाहीं तर यांची आज दानत केवढी ! हे स्वराज्य स्थापन
भुमका उठूं द्या, यांच्या साहाय्याकरितां सगळे तरुण रजपूत
व त्यांच्या तलवारी आपापल्या म्यानांतून बाहेर येतील ! परंतु
नव्हे—स्वप्नांतसुद्धां हा विचार येत असेल असं दिसत नाहीं !"

किरातसिंग याप्रमाणें बोलत असतांना रघुनाथपंत त्याच्या चेहऱ्याकडे फार फार सूक्ष्म व अंतर्भेदी दृष्टीनें बघत होता. हा काय हेतूनें पहात असावा हें किरातसिंग तेव्हांच समजला. आणि हंसत हंसत त्यास ह्मणतो: "आपण मनांत अगदीं सुद्धां शंका धरूं नका. मी कांहीं हें सारं लबाडीनं बोलत नाहीं. लबाडी कशाक-रितां करायची ! काय आह्मांला या औरंगजेबाची सेवा करणं मनापासून आव-डतं ! ज्यानें आमचीं देवळं बाटवून त्यांच्या मशिदी केल्या, त्याची सेवा करावी असं आमच्या मनांत तरी कसं येणार ? परंतु करणार काय ! सगळा काळच तसा फिरला आहे ! जयसिंग राजांच्या जवळ ही गोष्ट काढली, तर ते हंसून उलट उगच उडवूं लागतात ! काय त्यांच्या मनानं घेतलं असेल, तें त्यांचं त्यांनाच माहीत ! ......"

इतकें बोलून तो मोठी सचिंत मुद्रा करून कांहीं वेळ थांबला. नंतर पुनः फार विश्वासाचा असा आवाज काढून ह्मणतो: "शिवाजीमहाराजांच्या कार्यांत विघ्न पाडायला तरी जाऊं नका. जाणारे जाताहेत, मरताहेत. तुह्मी कां विचाऱ्यांच्या पाठीस लागतां ? असं आह्मीं पुष्कळ त्यांना सुचवलं. परंतु तें ऐकून हे चेष्टा करून हंसतात. याच्यावेरीज कांहीं नाहीं. पाहूं आतां तुह्मी काय करतां तें ? माझी तर समजूत आहे, कीं आपल्याला सुद्धां ते वाटाण्याच्या अक्षता देऊन परत लावतील."

" पाहूं पाहूं काय ह्मणतां ? आह्मीं जर त्यांना आपल्या गोब्राह्मण प्रतिपालन धर्माची शपथ घातली, तर त्यांना कांहीं सुद्धां दिक्कत वाटायची नाहीं ? माझी तर समजूत अशी आहे कीं, माझ्या बोलण्यानं मी त्यांचं मन वळवीन. किती झालं तरी ते हिंदु आहेत. आमच्या महाराजांनीं येथें काय काय गोष्टी केल्या आहेत, प्रजेला किती सुख झालं आहे हें पाहिलं ऐकिलं ह्मणजे त्यांनाही मोठा आनंद होईल. "

" तुह्मी आपल्या मनाची तशी समजूत करून घ्या पाहिजे तर परंतु भरंवसा मात्र धरूं नका. त्यांना बादशहाच्या बादशहातीचा फैलाव करण्यापलीकडे कांहीं सुद्धां दिसत नाहीं. नाहीं तर आज एवढं रजपूत सैन्य हातांत आणखी स्वतःचं स्वराज्य स्थापन करायला त्यांना कांहीं तरी अवघड आहे काय ? पण नाहीं, तें त्यांना करणेंच नाहीं. त्यांच्या मनाचा कल त्या बाजूला जातच नाहीं. असा कांहीं चमत्कार आहे ! असो. आपण आपल्याकडून प्रयत्न करून तर पहा ! मला आतां आपल्याला एकच विनंति करायची आहे, कीं मी थोडा पुढें होऊन आपली व्यवस्था लावतों. आपण राजांच्या छावणीशीं येतां तों मी पुनः तेथें तयार आहेंच. "

रघुनाथपंतानें त्यास निरोप देतांच तो तेथून निघाला. आपल्याशींच आधीं पोटभर हंसला आणि ह्मणालाः—" एकूण आपलें नशीब जोरावार आहे खास. शहाजाद्याला नूर एलू हुदा मिळवून दिली. त्याच्या मर्जीबद्दल तर आतां शंकाच नको. तें बालंट मराठ्यांवर घालण्यालाही फार उत्तम संधि सांपडली. त्यांच्याचपैकीं एकाकडून तिला पोंचतं केलं ! आतां ही संधि तर सगळ्यांत बहारीची आहे. दिलेरखान आणखी राजे यांची दोघांची लठ्ठालठ्ठी लावून देऊन बादशहाकडे राजांचा जितका पाणउतारा होईल तितका करविण्याला फार उत्तम प्रसंग. रघुनाथपंत राजाकडे जाऊन पोंचण्यापूर्वींच आग लावून दिली पाहिजे. परंतु आपल्या लोकांची व्यवस्था काय ? पांचपन्नास माणसांपैकीं एकही इसम अजून परत येऊन आपल्याला भेटला नाहीं याचा अर्थ काय ? आतां त्यांचा शोध करण्यांत गुंतून आपला वेळ गमवावा तर आतां आलेली संधि वांया जाणार. न गमवावा तर आपण जो कार्यभाग केला त्याचें झालें काय त्याचा पत्ता लागला नाहीं. तथापि आतां त्या कार्यभागाच्या भानगडींत पडण्यांत तात्पर्य नाहीं. माणसें आज नाहीं उद्यां येतील. आतां पहिल्यानें दिलेरखानाकडे जायचें. "

असा विचार करून त्यानें आपला मोर्चा फिरविला आणि तो दिलेरखानाच्या छावणीकडे चालला. त्यास तेथें पोंचण्यास बराच अवकाश लागला. रात्र झाली; तरी ठरलेले परवलीचे शब्द उच्चारून त्यानें खानाच्या डेऱ्यापर्यंत मजल मारली. परंतु खान आपल्या जनान्याच्या तंबूंत आहे असें कळलें. तो थोडा वेळ स्तब्ध उभा राहिला. नंतर त्यानें पहारेकऱ्यास सांगितलें, शत्रूच्या हालचालीची फार महत्त्वाची बातमी लागली आहे, ती खानांच्या कानीं ताबडतोब पडलीच पाहिजे. नाहीं तर फार मोठा घात होईल. मी किरातसिंग आलों आहें एवढी वर्दी

दिलीस कशी तरी, तरी काम होईल ! नाहीं तर काय प्रसंग होईल याचा बिलकुल नेम नाहीं. पहारेकऱ्यास त्यानं इतकं निक्षून सांगितलें तेव्हां त्यानें वर्दी पोंचविण्याची खटपट करतों असें सांगितलें आणि तो तेथून आंतले बाजूस निघून गेला. थोडयाच वेळांत वर्दी पोंचली असावी असें दिसतें. कारण किरातसिंगास अमुक जागीं नेऊन बसविण्याविषयीं हुकूम झाला आहे अशी परत वर्दी आली. त्याप्रमाणें किरातसिंगास तेथें नेऊन बसविलें. बऱ्याच वेळानें दिलेरखान त्या जागीं आला. तो अर्धवट धुंदींत होता असें दिसलें. थोडासा त्रासलेलाही होता. किरातसिंगाकडे पाहून तो त्यास म्हणालाः " तुह्मीं एवढ्या रात्रीं काय बातमी आणली आहे ! माझ्या पोरीचा पत्ता लागला आहे काय ? "

" खानसाहेब, " किरातसिंग फार नम्रतेनें म्हणालाः " आपल्या कन्येविषयींची कांहीं बातमी मिळण्याइतकं माझं दैव थोर झालं नाहीं. त्याबद्दल मला किती खेद होतो आहे हें काय सांगूं ? पण आपल्याला मी एक दुसरीच भयंकर बातमी सांगायला आलों आहें. "

" बोला तर मग काय ती ? " खान त्रासून ओरडला.

" कांहीं तरी भयंकर फंद फितुर चालला आहे ! दुसरं काय ? "

" फंद फितुर ? कोण करतो आहे ? कोणीं सांगितलं ? "

" दुसरा कोण करणार ? शिवाजी. अफझुलखानाच्या बाबतींत जो प्रकार झाला, तो आपल्या बाबतींत करण्याचा विचार दिसतो, आणखी त्याला न जाणो फूसही असण्याचा संभव वाटतो. "

हे त्याचे शब्द ऐकण्याबरोबर दिलेरखान संतापून उठला आणि ह्मणतोः "फूस ? कोणाची फूस ? "

" दुसऱ्या कोणाची असणार ? " किरातसिंग अत्यंत कपटपूर्ण आवाजानें उद्गारला.

" काय ह्मणतां किरातसिंग, राजांची फूस असेल ? "

" तें मी काय सांगूं ? पण आपण अगदीं कूचकामाचे, आणि कर्तृत्वशक्ति खरी काय ती माझी असं बादशहाला दाखविण्याची ज्यांची इच्छा तेच अशी फूस देण्याला उद्युक्त होणार.

दिलेरखान कांहीं वेळ अगदीं स्तब्ध बसला. नंतर एकदम उसळून ह्मणतोः— " कशावरून ! कशावरून ? कशावरून ह्मणतोस ! "

" शिवाजीचा वकील मुकाट्या मुकाट्या येऊन मुलाखती घेतो. आपल्याला त्याचा गंधसुद्धां कळत नाहीं हें कशाचं चिन्ह ?

" काय ! शिवाजीचा वकील ? शिवाजीचा वकील येऊन मुलाखती झाल्या ? काय ह्मणतोस किरातसिंग ! माझी पोरगी—माझा जीव—त्या दरवडेखोरांनीं नेला

आणखी त्यांच्या वकिलाच्या मुलाखती हा राजा जयसिंग घेतो ! मुलाखतीला येणाऱ्या माणसाला पहिली अट ही घातली पाहिजे, कीं माझी पोरगी कुठें आहे ती आणा. मला वाटलं नाहीं राजा जयसिंग अशा मुलाखती घेत असेल असं ! वा ! वा ! एकूण...... "

" आपल्याला त्यांत आश्चर्य वाटत असेल. आह्मांला कांहीं सुद्धां वाटत नाहीं. '

आपण येथें असतांना, आपल्याला कांहींसुद्धां न कळूं देतां, शिवाजीच्या वकिलाशीं जयसिंगानें खलबतें करावीं, हा नुसता विचारच दिलेरखानास फार फार असह्य वाटला. न जाणों, आपला खून करण्याच्या कामींसुद्धां शिवाजीस उत्तेजन मिळेल, असाही भयंकर विचार दिलेरखानाच्या मनांत उद्भवला. एका जातीचे व एकाच धर्माचे हे दोघे एक होऊन आपल्यावर उठले, तर आपण त्यांचा प्रतिकार तरी काय करणार ? पण आजपर्यंतचा लौकिक कांहीं जयसिंग असें करील असें मनांत येण्यासारखा नव्हे, आणि आतां किरातसिंगासारखा माणूस प्रत्यक्ष पाहून येऊन आपणास सांगत आहे, तेव्हां हें आहे तरी काय ? असें त्यास होऊन गेलें. बादशहानें दिलेरखानास इकडे पाठविलें तें जयसिंगराजानें व त्यानें जोडीनें काम करून शिवाजीचा पुरा पाडाव करण्यासाठीं होय; परंतु तसें करण्याचें एकीकडेच राहून जयसिंग जर आपणास मारविण्याच्या कारस्थानास उत्तेजन देऊं लागला, तर आपण काय करणार ? आज किरातसिंगानें जर आपणास सावध केलें नसतें, तर असा कांहीं प्रकार घडला आहे, हें समजण्यास तरी किती दिवस लागले असते! न जाणों आपल्या जिवावर बेतावयाची ती बेतून अफझुलखानाप्रमाणें आपली स्थिति होऊनही गेली असती ! शिवाजी मोठा वस्ताद आहे. तो केव्हांच दुसऱ्यास भुरळ घालून आपल्या मनाप्रमाणें त्याच्याकडून करवितो आणि त्यास गोत्यांत घालतो. भुरळ घालून दुसऱ्याला अंकित करण्याचा विलक्षण गुण त्याच्या अंगीं पूर्णपणें बाणलेला आहे. त्याच्या वाणींत असा मिठासपणा भरलेला आहे, कीं त्याच्याशीं बोलणारास तो ह्मणेल त्यास होकारार्थी मान डोलविण्याची भुरळच पडते, असा कित्येकांचा स्वानुभव त्याचे कानीं आला होता. तेव्हां आज वकिलाचे मार्फत बोलणें करून उद्यां समक्ष मुलाखत घेईल आणि त्या मुलाखतींत एक ठरविल्याचा घाट घालील, अगदीं लाचारपणा दाखवील आणि शेवटीं विश्वासघात करून त्यांना नाहीं तर आपल्याला मारेकरी घालून किंवा स्वतःच मारेकरी बनून ठार करील, दुसरें तर कांहीं होणार नाहीं. जयसिंगराजांस हें कळत नाहीं असें थोडेंच आहे ! परंतु त्याच्या मिठास बोलण्यानें भुरळून जाऊन त्यांच्या मनानें त्याला मदत करण्याचेंच ठरविलें असेल, त्याखेरीज कांहीं त्याच्या वकिलाच्या मुलाखतीस सुरुवात झाली नसावी. मुलाखतीपूर्वी पत्रव्यवहार झाला असलाच पाहिजे. त्याखेरीज एकदम मुलाखतीला वकील येणार कसा ?

अशा प्रकारचे विचार दिलेरखानाच्या मनांत उभे राहून राजा जयसिंगाबद्दल त्याचें मन अगदीं कलुषित होऊन गेलें. तें मन कलुषित होण्यास आधीं तयारच होतें. दिलेरखानाची खरी इच्छा अशी, कीं आपल्या एकट्याला मुख्य सुभेदार नेमून बादशहानें पाठवावयाचें होतें. राजा जयसिंगाचें लोढणें गळ्यांत बिलकुल नको होतें. किंबहुना त्यानें आपल्या मतानें—हुकुमानें चालावें अशी व्यवस्था करून देण्यांत यावयास पाहिजे होती; परंतु बादशहानें अगदींच उलट केलें. मुख्य हुकमत राजा जयसिंगाची आणि आपण त्याचे ताबेदार ! किती झालें तरी बादशहाचा जानभाई तो ! त्यास ही ताबेदारी कशी मान्य होणार ? त्याची तगमग चालूच होती. तशांत हा प्रकार ! मग काय विचारतां !

वर सांगितल्याप्रमाणें तगमग चालली असतांच किरातसिंगानें वकिलाबद्दलची बातमी आणली. त्यानें अर्थात् वाटेल तसा मसाला लावून आपली बातमी गरमागरम केली ! इतकी, कीं त्याचे श्रोतेही बहुत गरमागरम झाले.

आपल्याला पाहिजे तशी उष्णता उत्पन्न झाली आहे हें पहातांच किरातसिंगास फार आनंद झाला हें उघडच आहे. उष्णतेनें थोडेंसें भडक्याचें रूप घ्यावें व भडका होऊन त्याचा वणवा बनावा ही त्याची उलट इच्छा. त्या इच्छेनें तो पुढें ह्मणतोः—"वकिलाची मुलाखत होऊन तींत काय ठरलें काय नाहीं हें ताबडतोब आपल्याला समजणं फार जरूर आहे. तेव्हां खानसाहेब त्याबद्दल काय तजवीज करणार ?"

"त्याबद्दल तजवीज ? त्याबद्दल तजवीज एवढीच, कीं आपण उठून जाऊन जयसिंगास विचारावयाचें, कीं हा प्रकार काय चालला आहे ?" दिलेरखानानें एकदम उत्तर दिलें.

तें ऐकून किरातसिंग गदगदां हंसला. नंतर ह्मणतोः—"आपण भोळे, आणखी ते बडे वस्ताद् असं मी ह्मणतों—मीच कशाला ? आपल्या फौजेंतला प्रत्येक माणूस असं ह्मणतो त्याचं कारण हेंच. आपण त्यांच्याकडे एकदम जाऊन जर असं कांहीं विचारलं, तर ते काय तुह्मांला 'हो असा प्रकार चालला आहे. आह्मी शिवाजीला फूस देतों आहोंत' असं ह्मणतील. अहो खानसाहेब, या गोष्टी मनांत ठेवायच्या असतात, जाऊन बोलून दाखवून विचारायच्या नसतात समजलांत ? आपण तितक्या लोभानं वागवितां ह्मणून अशा सलगीनें मी तरी बोलतों आहें. माझा विचार आपण घ्याल, तर जी गोष्ट आपल्यापासून त्यांनीं चोरून ठेवून चालविली आहे, ती गोष्ट आपल्याला कांहीं समजली नाहीं असं दाखवा व आपला एक हुशार हेर मात्र त्या दरबारांत—राजे जयसिंग यांच्या दरबारांत—त्यांचा तो दरबारच नाहीं तर काय ह्मणायचं !—पाठवून या. त्यानं क्षणोक्षणीं काय चाललं आहे, याचा विचारपूर्वक तपास ठेवून

इकडे बातम्या कळविल्या पाहिजेत. माणूस मात्र अशा दर्जाचा पाहिजे, कीं वेळीं प्रसंगीं जयसिंगराजांचा विश्वास त्याच्यावर बसून ते त्याला खडानूखडा गोष्टी सांगतील किंबहुना त्याची सल्ला विचारतील."

त्याचें तें बोलणें ऐकून दिलेरखान हंसला व ह्मणतोः-"तूं ह्मणतोस तशीं माणसं तरी आहेत कुठें ? तूं किंवा मीच गेलों तर तें जुळणार !"

"आपण जाऊन मुळींच कांहीं जुळणार नाहीं. आपल्या देखत कां कांहीं खल-बतं चालणार आहेत ? तशांत आपण त्यांच्या संनिध गेलां व त्यांच्या तावडींत सांपडलां ह्मणजे त्यांचं कामच झालं. शिवाय आमच्यासारखे चार नोकर आपल्या पदरीं असून आपण कां स्वतःचा बोज घालवितां ? मला आज्ञा द्यावी ह्मणजे मी एक अणुरेणु मात्र कांहीं इकडचं तिकडे-आपल्याला आगाऊ कळविल्याशिवाय होऊं देणार नाहीं. याबद्दल आपली खातरजमा मीं करायला पाहिजे असं थोडंच आहे. आपली फक्त आज्ञा पाहिजे. बाकी सारं मी करतों."

दिलेरखान थोडा वेळ स्वस्थ बसला. नंतर ह्मणतो, "माझ्या पोरीचा तपास लाव-ण्याची गोष्टही त्यानं काढूं नये हें फार आश्चर्य आहे ! माझ्या मनांत तर आतां असा विचार आहे, कीं तेथें जाऊन त्या वकिलाला एकदम बंदींत टाकून बजा-वावं, कीं तीन दिवसांत माझी पोरगी माझ्या स्वाधीन झाली नाहीं तर तुझं डोकं उडविलं ह्मणून समज. तूं आपल्या मालकाला काय सांगून पाठवायचं असेल तें पाठव. पण पोरगी आली पाहिजे." दिलेरखानाचें तें बोलणें ऐकून किरातसिंग कांहीं वेळ स्तब्ध बसला. नंतर म्हणतोः "हा विचार कांहीं यत्किंचित् सुद्धां वावगा नाहीं. विचार ठीक आहे, परंतु त्यांनीं ही आपली धमकी ऐकून उलट आपल्याला धमकी जर घातली, कीं आमच्या वकिलाच्या केंसाला धक्का लागला पुरे, आपल्या मुलीची काय विटंबना होईल आणि काय नाहीं याचा विचार करा, तर आपण काय करणार ? वकिलाच्या जिवाची शिवाजीला परवा काय ? एक वकील गेला दुसरा होईल. पण आपल्या मुलीबद्दल तसा का विचार आपण कराल ? आपला प्राण त्या मराठ्यांच्या ताब्यांत आहे, तोंपर्यंत तरी निदान आपण कांहीं करूं नये. काय काय चमत्कार होतात ते मी एकसारखे पाहून आपल्याला वर्दी देईन."

किरातसिंगाचें तें बोलणें दिलेरखानास अधिक सयुक्तिक दिसलें आणि तो एकदम, "ठीक आहे. तूं ह्मणतोस तसं कर. जा आणि या मुलाखतींचा काय काय चमत्कार होतो तो पाहून ये. मला कांहीं ह्यटल्या कांहीं सुद्धां कळूं न देतां इतक्यांत आपल्या दुष्मानाच्या वकिलाशीं बोलणीं लावायचं यांना असं कारण तरी कोणतं ? एकंदरींत तुह्मी हिंदू हिंदू एक होऊन केव्हां आमचा गळा कापाल याचा पत्ता नाहीं एवढी गोष्ट खरी."

किरानसिंग त्यावर एवढेंच ह्मणालाः " सगळेच हिंदू सारखे असतात असं नाहीं. तसं असतं तर मी आपल्याकडे ही बातमी द्यायला कां आलों असतों ? मुकाट्यानें काय व्हायचं तें होऊं दिलं असतं– "

" आगखी तूं करतो आहेस तें तरी त्याच मासल्याचं नाहीं ह्मणून कशावरून ? माझी तर अशी समजूत आहे, कीं माझी पोरगी मराठ्यांनीं नेली ती तुह्मां सर्वांच्या फुशीवांचून नेली नाहीं. " फारच गरिबीचें सोंग दाखवून किरातसिंग दिलेरखानास ह्मणतो: " खानसाहेब, हें आपण काय ह्मणतां हें ? आपल्या मनाला उद्वेग झाला आहे तेव्हां आपल्या मनांत असले विचार येणं अगदीं साहजिकच आहे. त्याचा विचार करण्यांत तात्पर्य नाहीं. मी आपल्याला सुचविल्याप्रमाणें जाऊं किंवा नको तें मला सांगा. मी तरी निदान आपल्याशीं फार इमानानं वागतों. आपण जा ह्मटल्याखेरीज मला आपली जागा सोडून जातां येत नाहीं. वास्तविक राजांच्या हुकमावांचून हलायचं नाहीं; परंतु आम्ही राजांपेक्षां आपल्यालाच विशेष मानतों. आपण खरे सुभेदार आणखी सरनोबत. "

" तोंडदेखलं बोलण्यानं फसणारा मी नाहीं. पण तूं जर ही कामगिरी करू ह्मणतोसच तर ठीक आहे, जा, पण काय कामाला आलों आहें ह्मणून ह्मणशील ?"

" त्याची आपल्याला काळजी नको. मी असा बहाणा करीन, कीं त्यांनीं फार उत्तम झालं असंच ते ह्मणतील. फक्त आपल्या आज्ञेवरून मी जागा सोडून आलों, एवढं त्यावर सांगतां आलं ह्मणजे झालं. दुसरं कांहींसुद्धां नको. "

" तुझा हेतु केवळ एवढाच असेल असं वाटत नाहीं; पण तूं तसं ह्मणतोसच, तर मीही होय ह्मणतों. " असें दिलेरखान त्यावर त्यास ह्मणाला. तें बोलणें ऐकून किरातसिंगास फार संताप आला; परंतु तसाच मूग गिळून पडल्या फळाची आज्ञा ह्मणून तो तेथून निघाला.

किरातसिंग अतिशय उद्योगी, दीर्घोद्योगी. एखादी गोष्ट त्यानें मनांत आणली कीं ती पार पाडण्यासाठीं कितीही भयंकर परिश्रम करण्याची अवश्यकता पडली तरी कधीं मागें ह्मणून घ्यायचा नाहीं किंवा कशाही अडचणींनीं नाउमेद व्हायचा नाहीं. स्वस्थपणा व सावकाशपणा जेवढा कार्यसाधनाला अवश्य तेवढाच धरावयाचा; बाकी स्वस्थपणा नाहीं. सर्व कामें धिमेपणानें परंतु तांतडीनें करून टाकायचीं हा त्याचा बाणा. दिलेरखानाच्या डेऱ्यावर वर सांगितल्याप्रमाणें ठराव करून तो निघाला, तो परत आपल्या ठाण्याकडेसुद्धां गेला नाहीं.

चढ्या घोड्यानिशीं तो प्रातःकाळच्या सुमारास राजे जयसिंग यांच्या छावणीपासून सुमारें एक कोसावर येऊन पोंचला, तों त्या घोड्यानें एकदम पुढें जाण्याच नाकारलें. घोडा एकसारखा चालणार तरी किती वेळ ? आपला यजमान आतां थांबेल, मग थांबेल, आतां विश्रांति घेईल, मग घेईल, अशी त्याच्या मनांत अनेक

वेळां आशा उत्पन्न झाली होती; परंतु ती आशा सफळ होण्याचें जेव्हां मुळींच चिन्ह दिसेना, तेव्हां त्यानें आपला मनोदय आपल्या मालकास कळविण्याचा निश्चय करून तो पुढें पाऊल टाकीनासा झाला. "एक कोसभरच जमीन उरली आहे. असं करूं नको, तेथें गेलों ह्मणजे तुला विश्रांति देऊं," असें प्रेमानें त्याच्या मालकानें त्यास विनविलें; परंतु घोड्याचा निश्चय कायम झालासें दिसलें. ज्या जागीं तो थांबला ती जागाही फार रमणीय होती. आंब्याची सुंदर राई. तींत एक लहानसा ओढा. त्या ओढ्याचें पाणी स्वच्छ शंखासारखें. तशांत आतां सूर्यबिंब अर्धवट वर येत असल्याकारणानें त्याचे कोमल किरण त्या पाण्यावर पडून त्याच्या स्वच्छ तेजस्वितेची जोड मिळवून देत होते. त्या प्रवाहाच्या मोहकतेनेंच त्या घोड्यास तेथें थांबण्याचा आग्रह धरावासें वाटलें असावें हें उघड होतें. घोड्याचा असा आग्रह पाहिला, तेव्हां त्याच्या मालकाचें मनही थोडेंसें मवाळलें.

---

# प्रकरण २० वें.

## सुप्रभातीं.

घोड्यानें याप्रमाणें पुढें जाण्याचें अगदींच नाकारल्यावर स्वारासही असें वाटूं लागलें, कीं त्याच्या इच्छेप्रमाणें आपणही थोडी विश्रांति घ्यावी. वस्तुतः पहातां तें स्थान व तो काळ हीं दोनही अशीं रमणीय होतीं, कीं कोणाही मनुष्याचें मन एकदम तल्लीन होऊन तो तेथें घटका चार घटका थांबावयाचाच; परंतु ज्याप्रमाणें चिखलानें गढूळ झालेल्या पाण्यांत कसलेंही प्रतिबिंब स्पष्ट दिसावयाचें नाहीं, त्याप्रमाणें पापविचारांनीं गढूळ झालेल्या मनांतही कसल्याही सुंदर व आकर्षक देखाव्याचें प्रतिबिंब पडावयाचें नाहीं. दुष्ट विचारांनीं भरलेल्या मनास स्वस्थता व स्वच्छता हीं दोनही नसावयाचीं. किरातसिंगाचें मन त्याच्या कुविचारांनीं व्याप्त व कलुषित केलेलें, त्यांत त्या रमणीय नदीप्रवाहाचा, त्या उदयोन्मुख बालरवीचा, सभोंवतालच्या टवटवीत वनश्रीचा किंवा त्यांत इकडून तिकडे करीत आपापले मंजूळ स्वर काढणाऱ्या पक्ष्यांचा प्रतिबिंबरूपानें प्रवेश होतो आहे कशाला? घोड्यानें जेव्हां पुढें जाण्याचें नाकारलेंच, तेव्हां स्वारी नाइलाजास्तव खालीं उतरली आणि एका झाडाखालीं गाशा टाकून त्याजवर स्वस्थ पडली! घोड्यास स्वच्छंदानें चरण्यासाठीं त्यानें सोडून दिलें होतें. त्याचें शरीर आणि मन आज एक दोन दिव-

सांच्या श्रमांनीं इतकें कांहीं श्रांत झालें होतें, कीं त्या झाडाखालीं गाशा टाकून पडण्याचा अवकाश कीं त्याला झोंप येण्याचा रंग दिसूं लागला. अशा वेळीं झोंप घेणें बरें नाहीं असें त्याचें मन त्याला सांगूं लागलें; परंतु झोंपेनें त्याचा पिच्छा पुरविण्याचें मनांत आणल्याप्रमाणें दिसलें. इतकें झालें तरी त्यानें तिला झाडून आपल्या पुढल्या कार्याकडे धांव घेतली असती; परंतु आपला "रणछोड" आतां चार घटका तरी निदान खोगीर पुनः चढवूं द्यावयाचा नाहीं, असें त्याला ठाऊक होतें; अर्थात् त्याला तो विचार दूर सारून झोंपेच्या स्वाधीन होणें प्राप्त झालें. सभोंवतालच्या वनश्रीचें प्रतिबिंब ज्याच्या मनांत उमटूं नये, त्याच्या डोळ्यांत तरी तें कशाला हवें ! असें वाटूनच जणूं काय निद्रेनें त्याचे डोळे झांकले आणि थोड्याच अवकाशांत त्याला पूर्ण आपल्या वश करून टाकलें.

त्याचा घोडा मात्र आपल्या धन्यास आपण आपल्या मर्जीप्रमाणें करावयास लावून चार घटका विश्रांति मिळविली आहे तिचा पूर्ण उपयोग घ्यावयाचा असा निश्चय करून इकडे तिकडे हिंडूं लागला. प्रथम बराच वेळ त्यानें चरण्याला आरंभ केला नाहीं. नुसतीच इकडून तिकडे भ्रमंती चालविली होती. नंतर एकाएकीं त्याच्या मनांत काय आलें, त्यानें नदीप्रवाहांत प्रवेश केला. प्रातःकाल होतांच स्नान करूं इच्छिणाऱ्या श्रोत्रियाप्रमाणें त्यानें स्नानाकरितांच तो प्रवेश केला असावा. नंतर थोडा वेळ जलसंचार केल्यानंतर एकवार सभोंवार पाहिलें. त्या स्नानानें त्याच्या कष्टी झालेल्या शरीरास व मनासही सुप्रसन्नता आली व लागलींच बाहेर येऊन सभोंवतालच्या प्रदेशांतील सुंदर हरळीवर तो यथेच्छ ताव मारूं लागला. त्याचा सर्व थकवा नाहींसा झाला; आणि त्यानें येथें थोड्या दूर्वा व हिरवेंचार गवत खावें, पुनः थोडें नुसतेंच हिंडत हिंडत पुढें जावें, आणखी कोठें दूर्वांचें बेट दिसलें, कीं त्यावर ताव मारावा, असा प्रकार चालविला. तो आतां अगदीं ताजा तवाना झाला. आणि मग मधून मधून त्या झाडाखालीं स्वस्थ पडलेल्या आपल्या मालकाकडे पाही, जणूं काय आपल्याप्रमाणें या सृष्टिदत्त सुखांचा उपभोग न घेतां हा असा निजला आहे याला काय ह्मणावें, असें वारंवार मनांत येऊन तो त्याजकडे पहातोसें दिसलें. किंवा आतां आपली विश्रांति पुष्कळ झाली, आपला धनी उठला कीं आपण त्याच्याजवळ जाऊन उभे राहूं, अशा विचारानेंही तो तसें पहात असावा. तो आपल्या धन्याचा फार इमानी असा नौकर असल्यामुळें कदाचित् आपल्या धन्यावर कांहीं संकट आल्यास आपली नजर त्याजवर असली पाहिजे असा विचार त्याच्या मनांत वारंवार येऊनही तो त्याजकडे पहात असावा.

याप्रमाणें तो घोडा आपल्या धन्यापासून फार दूर न जातां स्वच्छंदानें आहार विहार करीत असतां नदीतीराच्या जवळ एका ठिकाणीं आला. तेथें गोसावणींचा एक लहानसा संघ स्नानभजनादि क्रिया करण्यांत गुंतला होता. गोसावणी सुमारें सहा सात होत्या. तिघीचौघी स्नानासाठीं नदींत उतरल्या होत्या. दोघी स्नान

करून वर येऊन वस्त्र परिधान करीत होत्या. आणि एक तीरापासून बऱ्याच वर बसून सर्वांस लावण्यासाठीं चंदन तयार करीत होती. तिनें सर्वांस आसनें मांडून ठेवलेलीं होतीं आणि चंदन तयार करतां करतां ती तोंडानें सुंदर असें रामाचें पद हिंदी भाषेंत गात होती.

कहां गयो मेरा राम । नवजल मेघश्याम ॥
रामबिना नहीं निंदहि आवत । रामबिना नहीं प्रान जगावत ।
जलस्थल सून भयो धाम ॥ ध्रु० ॥
कौसल माता मनमें धुंडत । कौन पाप किया कुच ना देखत ।
घुमत बनबन बालक राम ॥ ध्रु० ॥

या स्त्रीनें वरील पद्य ह्मणण्यास-किंबहुना गुणगुणण्यास ह्मटलें तर विशेष ठीक दिसेल, कारण ती तें आपल्याशींच-अर्थात् फार मोठ्यानें नाहीं असें गात होती. इतक्यांत काय चमत्कार झाला पहा! वर सांगितलेला किरातसिंगाचा घोडा त्या ठिकाणीं आला. त्याच्या जवळ येण्यास आणि या स्त्रीनें आपल्या गाण्याची लकेर थोडी मोठ्यानें मारण्यास एकच गांठ पडली. त्याबरोबर जसा एखादा अगदीं अनपेक्षित अशा जागीं ओळखीचा-फार परिचयाचा-असा आवाज ऐकावा आणि मनुष्य एकदम स्तब्ध होऊन 'हें काय बरें' ह्मणून चपापून उभा राहतो, तद्वत् बरोबर त्या घोड्याची स्थिति झालेली दिसली. त्या मंजुळ स्वराच्या आकर्षणानें त्याचे कान आकर्षित झाले! असें तर ह्मणतां येत नाहीं; परंतु ते आकर्षित झाले याबद्दल तर कांहीं मुळींच शंका नव्हती. ते कान त्यानें लागलींच टौकारले आणि अत्यंत जाणीव दृष्टीनें तो त्या गाणाऱ्या मूर्तीकडे पाहूं लागला. त्यास कांहीं तरी स्मरल्याप्रमाणें झालें असावें. कारण तो नंतर एक एक पाऊल त्या स्त्रीच्या जवळ जवळ जाऊं लागला. अरण्यांत जाऊन कोणी सुंदर वाद्य वाजवून मंजुळ गाऊं लागलें तर त्याच्या भोंवतालीं हरिणें जमतात असें ह्मणतात, परंतु घोड्यासही मंजुळ स्वराचा मोह होतो असें कोठें ऐकिवांत नाहीं. आणि रणछोड एक एक पाऊल त्या स्त्रीच्या बाजूस टाकीत चालला असतां त्याला गाण्याच्या मोहापेक्षां त्या स्त्रीच्या मूर्तीचाच मोह फार पडला असावा असें दिसत होतें. त्यानें आपले ते पाणीदार डोळे त्या स्त्रीच्या चर्येकडे एकसारखे लावले होते. हा घोडा आपल्या कोमल स्वरामुळें आपल्याकडे येत असावा, असें तिच्या मनांतही आलें नाहीं. ती आपल्या गाण्याच्या नादांत तल्लीन होऊन हातांनीं चंदनाचा खल करीत होती. घोडा मात्र अगदीं एकसारखा टक लावून पहात तिच्या जवळ जवळ चालला होता. होतां होतां तो इतका नजीक आला, कीं त्याचें तोंड तिच्या खांद्याला लागण्याच्या बेतांत आलें. तेव्हां हें काय! ह्मणून तिनें वर पाहिलें. तों त्याच्याकडे तिचीही दृष्टि गेली. त्याबरोबर कोण रणछोड! बेटा तूं इकडे कोणीकडे? तुझा यजमान कोठें आहे? असें तिनें ह्मणून त्याच्या खांद्यावर हात टाकला. त्या स्त्रीस

पहाण्याबरोबर त्या घोड्यासही फार आनंद झालेला त्याच्या चर्येवर अत्यंत स्पष्ट दिसत होता. त्यानें एक पाऊल पुढें घातलें. आपलें नाक त्या स्त्रीच्या गालाला लावलें आणि मग डोकें खालीं करून तें तिच्या खांद्याला किंचित् घासलें. त्याच्या या सर्व कृतीवरून स्पष्ट असें दिसलें, कीं त्याला जर वाचा असती, तर त्यानें तिच्या द्वारें आपल्या मनांतील आनंद स्पष्टपणें बोलून दाखविला असता. परंतु वाचे-व्यतिरिक्त जितक्या प्रकारांनीं ह्मणून आपला आनंद व्यक्त करून दाखविणें शक्य असेल, तितक्या प्रकारांनीं त्यानें तो दाखविला. त्याच्या डोळ्यांतून आनंदाश्रु स्पष्टपणें वाहूं लागले. तें पाहून त्या स्त्रीसही फार आनंद झाला. ती उठून उभी राहिली. तिनें त्याच्या सर्वांगावरून हात फिरविला व बेटा रणछोड ! तूं किती तरी रोडलास ! असें फार प्रेमानें ह्मणून त्याच्या पाठीवर थोपटलें. रणछोड तीन तीनदां आपलें मस्तक त्या स्त्रीच्या अंगास घाशी आणि आपला यजमान जेथें निजला होता तिकडे पाही. या स्त्रीचें लक्ष्य त्या जागेकडे जावें अशा बुद्धीनेंच त्याचें तें करणें असावें असें दिसलें. शेवटीं तर त्यानें तिचा पदर आपल्या दांतांत धरून तिला त्या बाजूकडे चलण्याबद्दल जणूं काय विनंति चालविली होती. असा प्रकार चालला असतां, त्या स्त्रीचेंही चित्त द्रवून त्याचें पाणी होऊन डोळ्यांतून अश्रु येऊं लागले. तिनें एकवार तो घोडा दाखवीत होता त्या दिशेकडे पाहिलें. दूर एका झाडाखालीं एक मनुष्य निजला आहे असें कोणासही दिसलें असतें; परंतु प्रेमबद्ध चित्तें नेत्रांकडून अगदीं दूर असलेल्याही आप्ताला तेव्हांच ओळखवितात. त्यांतून तें प्रेमबद्ध चित्त–परंतु जाऊं द्या. नुसतें तत्त्वज्ञान सांगण्यांत काय अर्थ आहे ? त्या स्त्रीनें वर सांगितल्याप्रमाणें त्या घोड्याच्या प्रेमळ व्यापारांनीं दाखविलेल्या जागेकडे–निद्रित व्यक्तीकडेही–पाहून एक दीर्घ उसासा टाकला. इतका वेळ थांबविण्यासाठीं प्रयत्न केले ते व्यर्थ जाऊन प्रेमाश्रू बाहेर पडलेच, ते तिनें पुसले आणि पुनः त्या घोड्याच्या पाठीवर थोपटून ती त्यास ह्मणतेः " रणछोड, तुला तरी त्यानें अजून आपल्या-जवळ कायम ठेवलं आहे हें आश्चर्यच आहे. एखादा अरबस्तानांतला नाहीं तर तुर्कस्थानांतला घोडा बादशहानें दिला ह्मणून तुला एखाद्या भाडोत्री घोडीं हांक-णाराला देऊन टाकायचा ! ठीक. ठीक. तूं आपला तरी इमानी रहा. रणछो-डास त्या स्त्रीचें भाषण जणूं काय समजलेंच. त्यानें मान हलवून आपल्या यजमानाच्या दिशेकडे पाहिलें. नंतर पुनः त्या स्त्रीकडे पाहिलें. आणि पुनः त्या स्त्रीचा पदर दांतांनीं ओढून आपण तिकडे जाऊं लागला. परंतु ती स्त्री तेथून हलेना. शेवटीं त्या घोड्यास थोपटून त्याला उद्देशून ह्मणतेः " बाबारे, एकदां निश्चय करून निघालें ती निघालें. जें आमच्या कुळांत कोणीं केलं नाहीं, तें या मूर्खानं करून सगळ्या कुळाला अत्यंत मोठा कलंक लाविला. त्याला जयसिंगासारख्याचं उदाहरण बरं वाटलं. भीमसिंगराजसिंहासारख्यांचं उदाह-

रण-प्रत्यक्ष घरचं ब्रीद--पटलं नाहीं. त्या कुलांगाराचं मुख पहाण्याला मला कशाला आग्रह करतोस ? तूं मुका प्राणी, नाहीं तर तुला सुद्धां अशा माणसाची सेवा सोडून माझ्या या गोसावणींच्या संघासारख्या संघाजवळ रहा ह्मणून सांगितलं असतं. जा. तूं आतां जा. मीही आतां आपल्या मैत्रिणींना लवकर येथून निघून चलण्याचा आग्रह करतें; नाहीं तर न जाणों माझी प्रतिज्ञा मोडण्याला मला मोह पडेल ! " असें ह्मणून पुनः तिनें आपले अश्रु पुसून तोंड नदीच्या तीरीं आपल्या मैत्रिणी होत्या त्यांच्याकडे केलें. इतका वेळ त्या आपापल्या स्नानाच्या नादांत होत्या त्यांचें लक्ष कांहीं इकडे गेलें नाहीं; परंतु हिनें त्यांच्याकडे तोंड फिरविण्याला व त्यांनीं हिच्याकडे पहाण्याला एकच गांठ पडली. हा कोणाचा तरी सुंदर उमदा घोडा माता रणदेवीजवळ उभा असून त्याच्या पाठीवर तिनें हात ठेविला आहे असें पाहण्याबरोबर त्यांसही फार आश्चर्य वाटलें. त्या आपापसांत हा काय प्रकार आहे ! असें विचारूं लागल्या. स्नान करीत असलेल्या मैत्रिणीसुद्धां त्यांच्याजवळ आल्या. एक तर तत्काल बाकीच्यांस ह्मणाली, " मी ह्मटलें नाहीं कीं माता रणदेवी कांहीं आपल्यासारखी भुकेभंगाल आणखी त्रैलोक्य कंगाल नाहीं. ती कोणा तरी थोरा मोठ्या शूराची स्त्री कांहीं आपल्या मुलाबाळांसंबंधानं विरक्त होऊन तीर्थयात्रेला आपल्या बरोबर हिंडते आहे ! ती एखाद्या वृद्ध मातेप्रमाणं आपली काळजी घेते. जणूं काय आपण तिच्या लेंकीच आहोंत, असा तिचा आपल्या ठिकाणीं जीव दिसतो तो योग्य कुळांतल्या माणसांखेरीज दिसायचा नाहीं. "

तें ऐकून दुसरी तिला ह्मणते " खरी गोष्ट. कौसल्या माई, माता रणदेवी आपल्याला आपली हकीकत सांगत नाहीं. कधीं गोष्ट काढली, तर " सांगेन एखादे दिवशीं " असं ह्मणून वेळ मारून नेते. पण एक दिवस आपण तिला तिची हकीकत विचारून घेतलीच पाहिजे. पण हा घोड्याचा प्रकार काय आहे बरं ! "

सर्वजणी त्या घोड्याकडे व माता रणदेवी इजकडे पाहूं लागल्या.

इकडे माता रणदेवी तीन तीनदां त्या घोड्याच्या पाठीवर थापटी व दूर झाडाखालीं निजलेल्या किरातसिंगाकडे पाही. तिला एक दोन वेळां असें वाटलें, कीं त्या मुक्या जनावरानें सुचविल्याप्रमाणें आपण किरातसिंगाच्या जवळ जावें आणि त्यास एकदां डोळे भरून पहावें. तिचे पायही तिकडे जाण्यास उतावीळ झाल्याप्रमाणें दिसत होते. परंतु त्या पायांस व मनासही ती आवरून धरीत होती हें अगदीं उघड होतें. माता रणदेवी ही फार वृद्ध नव्हे व फार तरुण नव्हे अशी पोक्त वयाची होती. तिचें स्वरूप फार मोहक. अंगकांति स्वभावतः फार तेजस्वी आणि त्यांत तपश्चरणानें तिच्या मुखावर विशेषच प्रकारचें तेज दिसूं लागलें होतें. ज्या रामाच्या भजनांत ती सदासर्वदां निमग्न असे व राममातेच्या शोकाचें पद नेहमीं ह्मणत असे; त्या कौसल्येची धीरोदात्त मूर्ति जशी असावी, अशी

# प्रकरण २१ वें.

## माता रणदेवीचें चरित्र.

आपला तो गोसावणींचा लहानसा संघ बरोबर घेऊन माता रणदेवी तेथून चालली होती खरी, परंतु तिच्या मनाची स्थिति त्या वेळीं फार विलक्षण झाली होती. ती पुढें चालली होती, परंतु ज्याप्रमाणें तो घोडा आपल्या यजमानाकडे जात असतांना एकसारखा तिच्याकडे वळून वळून पहात होता, त्याचप्रमाणें हीही त्या घोड्याकडे व त्याच्या यजमानाकडे वळून वळून पहात होती; मध्येंच ती क्षण-मात्र थांबे, मध्येंच दीर्घ उसासा टाकी आणि आतां पुनः माघारी पहावयाचें नाहीं असा दृढनिश्चय करून पुढें चाले. तिच्या बरोबरीच्या तिच्या मैत्रिणी तिची ही स्थिति पाहून फार चकित झाल्या होत्या. त्यांच्यापैकीं एक दोघींच्या मनांत माता रणदेवीस हा आज नवीनच प्रकार काय आहे तो आह्माला सांगा असें ह्मणावें असें सुद्धां आलें; परंतु आपल्यास सांगण्याजोगें असेल तें माता रणदेवी योग्य प्रसंगीं आपणांस सांगेल; आपण तिला याप्रसंगीं विनाकारण प्रश्न विचारून त्रास देऊं नये असा पुनः विचार करून त्यांनीं मनोनिग्रह केला. आपली माताजी कंगाल स्थितींत जन्मून आपल्याप्रमाणें गोसावीण झालेली नाहीं. ती मूळची फार थोर घराण्यांतली असून कांहीं कारणानें वैराग्य होऊन घरादाराचा परित्याग करून या मार्गाला लागली असावी असा त्या सगळ्या जणींचा पूर्ण समज झाला होताच. त्याला या आतांच्या प्रसंगानें फार पुष्टी मिळाली. कोणातरी वीराचा घोडा तिच्याजवळ येऊन अगदीं प्रेमानें तिच्या खांद्याला त्यानें आपलें डोकें घासलें; यावरून हा घोडा तिच्या पूर्वपरिचयाचा असला पाहिजे आणि ही कोणा-तरी वीर कुलांतलीच असली पाहिजे असा त्यांचा पूर्ण ग्रह झाला. आतांपर्यंत त्यांच्या मनांत जो संशय होता तो आतां साधार झाला असें ह्मणण्यास मुळींच हरकत नाहीं. आतांपर्यंत त्यांच्या मनांत तिच्याविषयीं फार पूज्यबुद्धि होती ती यामुळें अधिक वाढली, असें ह्मणण्यांत तात्पर्य नाहीं, कारण मूळची तिच्याविषयीं त्यांच्या मनांत इतकी पूर्ण भक्ति होती, कीं तींत आतां कांहीं वाढ होईल हें संभ-वनीयच नव्हतें.

माता रणदेवी याप्रमाणें मागें वळून पहातां पहातां इतक्या दूर गेली, कीं तिला तो घोडा व त्या झाडाखालीं निजलेला तो रजपूत वीर मुळींच दिसेनासा झाला, तेव्हां तिनें मान वळवून पहाण्याचें अर्थातच सोडून दिलें. बाह्यदृष्टि वळवून पहा-ण्याचें जरी बंद करितां आलें, तरी अंतर्दृष्टीवर कोणाचा दाब बसतो? तिच्या अंतर्द-

ष्टीपुढें एकसारखा तो देखावा उभा होताच. तो कांहीं केल्या दूर सारतां येईना. होतां होतां त्या देखाव्याच्या अनुसंधानानें आणखी पूर्वीचेही देखावे, आपल्या पूर्व-चरितांतील देखावे तिच्या अंतर्दृष्टीपुढें दिसूं लागले आणि आपण रस्त्यानें चाललों आहों ह्याचें तिला पूर्णपणें विस्मरण झालें. एखाद्या यंत्रानें जशी एखादी मोठी थोरली पुतळी चालावी, त्याचप्रमाणें ती चालली होती. तिची बाह्यदृष्टि कशावर तरी, कोठें तरी होती. बाह्यदृष्टीच्या कृतीला अंतर्दृष्टीची स्फूर्ति नसली तर बाह्यसृष्टि कशी शून्य होते याचा अनुभव प्रत्येकास आहे. मनाच्या दृष्टीपुढें आलेल्या देखाव्यांचे देखावे पहाण्यांत ती व्यग्र झालेली असली ह्मणजे बाह्यदृ-ष्टीपुढें—नेत्रांपुढें असलेले देखावे दिसत नाहींत, पाहिल्याचें स्मरतही नाहीं. हा अनु-भव कोणाला नाहीं ? तीच स्थिति या वेळीं माता रणदेवीची झाली होती. ती आपल्या मैत्रिणींच्या मागें केवळ पावलांपुढें पावलें टाकीत चालली होती. होतां होतां तिच्या नेत्रांवाटें अश्रु वाहूं लागले. इतका वेळ हे अश्रु तिनें फार मोठ्या निग्रहानें दाबून धरले होते; परंतु आतां यापुढें ते दबले जाईनात. ती आज-पर्यंत अशा करुण स्थितींत आपल्या मैत्रिणींस कधींही दिसली नव्हती. तेव्हां आज त्यांनाही तिच्याबद्दल फार आश्चर्य वाटलें व करुणा आली. शेवटीं कौसल्ये-च्यानें राहवेना. ती अत्यंत आदरानें माता रणदेवीजवळ आली व तिला ह्मणते, "माताजी, आपलें मन फार उद्विग्न झालें आहे, तर आपण आतां पुढें चालूं नये. आपल्याला काय कोठेंही उतरलें तरी सारखेंच. मघांच्या जागेपासून आपण बऱ्याच लांब आलों. येथून हा गांवही जवळ दिसतो आहे. हें फार सुंदर असें वडाचें झाड आहे. याच्याखालीं आपण आतां उन्हाची वेळ काढूं. आपल्याला या वृक्षाच्या शीतळ छायेनें फार समाधान होईल. शांति येईल."

इतकें बोलून कौसल्येनें तिला त्या झाडाखालीं नेलेंच. माता रणदेवीला आतां स्वतःचें विचारबळ कांहीं राहिलें नव्हतें. ती कौसल्येनें नेलें तेथें गेली. कौसल्येनें लागलींच त्या वडाच्या झाडाच्या पानांचा एक लहानसा झुबका काढला व त्यानें तिनें बरीचशी जागा झाडून साफ करून तेथें एक व्याघ्रचर्म टाकलें. त्या व्याघ्रचर्मावर माता रणदेवी जाऊन बसली. आतांपर्यंत तें व्याघ्रचर्म एका गोसा-वणीनें आपल्या कांखेंत गुंडाळून घेतलेलें होतें. तें चर्म फार मोठें होतें. तें पसर-ण्याबरोबर माता रणदेवीच्या मनांत कांहीं विशेषच विचार—उद्वेग उत्पन्न करणारे विचार आले असावेत असें दिसलें. ती त्या चर्मावर बसली खरी, परंतु फार दीर्घ असा उसासा टाकून बसली.

ती बसल्यानंतर कौसल्या तिला म्हणालीः "माताजी, आपलं चित्त फार उद्विग्न झालं आहे. आपण आतां स्नान केलं आहे. आपण आपली स्मरणी घेऊन स्वस्थपणें जप करीत बसा. स्थान फार रमणीय आहे. ही अनसूया आपल्याजवळ बसेल. आम्ही या गांवांत जाऊन नित्याप्रमाणें कांहीं आहारसामग्री घेऊन

येतों. माता रणदेवी कांहीं एक बोलली नाहीं. तिनें नुसती मान हलवून आपली अनुमति दाखविली. कौसल्येनें अनसूयेला हळूच कांहीं सांगितलें आणि बाकीच्या सर्वजणींस घेऊन ती तेथून निघून गेली.

कौसल्येनें म्हटल्याप्रमाणें तें स्थान खरोखरीच फार सुंदर होतें. याच ठिकाणीं एक मोठा थोरला ओढा नदीला येऊन मिळाला होता आणि त्या दोन प्रवाहांच्या दरम्यान दुबेळकींत घनदाट छायेचे किती तरी वृक्ष होते. या वृक्षांत हा वडाचा वृक्ष फार मोठा होता. आतां सूर्यनारायण बराच वर आला होता त्याच्या उन्हाचा ताप होऊं लागला होता. परंतु ज्या ठिकाणीं कौसल्येनें माता रणदेवीला आणून बसविलें होतें, त्या ठिकाणीं त्याचा ताप अणुमात्र भासण्याचा संभव नव्हता. कौसल्येनें झाडून काढून त्याजवर व्याघ्रचर्म पसरल्यावर त्याजवर बसेपर्यंत रणदेवीस सृष्टिशोभा दिसलीच नाहीं. आतांपर्यंत यंत्रानें चाललेली सुंदर पुतळी जणूं काय यंत्रानेंच आणून बसविली असें दिसलें. परंतु थोड्याच वेळांत त्या तेथल्या शीतलपणानें तिचें मस्तक शांत झालें व ती सभोंवार पाहूं लागली, तो नदी व ओढा यांचा संगम पाहून तर रणदेवीस फारच कौतुक वाटलें असावें. या ठिकाणीं नदी चांगल्या एखाद्या प्रौढ, प्रशांत, स्त्रीप्रमाणें धीर व स्थिरगतीनें वाहत होती. ओढा मात्र अगदीं क्षुद्र, उनाड व गडबड्या पोराप्रमाणें खळखळाट करीत जणूं काय नाइलाज म्हणून नदीकडे धांव घेत होता. थोडासा नदींत शिरला नाहीं तों मागें मुरडल्याप्रमाणें करून गत्यंतर नाहीं म्हणून तेथेंच राहिला असावा असें दिसलें. रणदेवी ज्या वृक्षाखालीं बसली होती त्या वृक्षापासून हा नदीच्या व ओढ्याच्या संगमाचा रमणीय देखावा अगदीं जवळ होता, यामुळें तिचें चित्त लवकरच तिकडे गेलें आणि एखाद्या मातेची अवज्ञा करून तिच्यावर रागावून दूर गेलेलें उनाड पोर पुनः नाइलाजास्तव त्या मातेच्या चरणाशीं यावें, तशीच या नदीची व ओढ्याची स्थिति आहे असें तिच्या मनांत आलें. आपल्या मनांत जो विचार अतिशय उत्कटपणें संचार करीत असेल, त्याचें प्रतिबिंब आपणांस बाह्यसृष्टींत दिसतें हा अनुभव पुष्कळांना आहे. तोच अनुभव या वेळीं माता रणदेवी घेत होती. एकसारखा तो देखावा पाहून पाहून तिला थोडें थोडें समाधान वाटून तिच्या चित्तास शांति वाटूं लागली असावी असें अनसूयेसही वाटलें. पूर्वींची ती चिंताव्यग्रता व उद्विग्नता हीं आतां तिच्या मुखावरून बऱ्याच अंशांनीं दूर झालीं; ज्या व्याघ्रचर्मावर ती बसली होती, त्या व्याघ्रचर्माकडे पाहून प्रथमतः तिच्या मनास जी उद्विग्नता आली होती, ती उद्विग्नता आतां अगदीं नाहींशी झाली आणि ती अनसूयेस म्हणाली: " अनसूये, आज माझी ही सारी चमत्कारिक वागणूक पाहून तुम्हांला फार आश्चर्य वाटलें असेल नव्हे ! वाटलंच पाहिजे. हें काय आहे हें समजून

घेण्याचीही तुह्माला उत्कंठा झाली असेल, परंतु ती उत्कंठा तृप्त करण्याला माझा पूर्वीचा सगळा इतिहास तुम्हांला सांगायला पाहिजे. पण आतां यापुढें मी तो तुमच्यापासून लपवून ठेवणार नाहीं. कौसल्या, द्रौपदी, जानकी या सगळ्याजणी आल्या म्हणजे मी तुम्हांला सांगेन. मनांत सांठवून ठेवलेलें दुःख तरी एकदां बाहेर काढून टाकलें, कीं मनाची शांति होते. आणखी तुमच्यासारख्या जिवाला जीव देणाऱ्या मैत्रिणींपेक्षां असें दुःख सांगायला आणखी उत्तम पात्र तें कोण असणार? माझ्या चरित्राची कहाणी ऐकलीत, कीं माझ्यासारखी दुर्दैवी स्त्री या जगांत दुसरी कोणी नाहीं, हें तुह्मांला समजून येईल. मी आपल्या कुळाच्या ब्रीदाला विसरून जर वारा येईल तशी पाठ देण्याला कबूल झालें असतें, तर आजला...... परंतु तो विचार तरी कशाला? ज्या सच्चिद्घन रामचंद्राच्या वंशांतल्या एका घराण्याची मी मुख्य होतें, त्या घराण्याला कलंक लागलेला पहाण्यापेक्षां आपण संसारपरित्याग करणें बरें असें माझ्या मनानें घेतलें. आणखी मी या एका व्याघ्रचर्मानिशीं आणि नेसल्या व धुतलेल्या पातळानिशीं बाहेर पडलें. स्त्रियांना सगळ्यांत विलक्षण मोह जो असावयाचा तो मोह मी मोठ्या कष्टानें दूर सारून वनवास पतकरिला. गृहानंद सोडून परमानंद पतकरितांना मला काय कष्ट झाले असतील ते मलाच माहिती. असो, परंतु ती सगळी हकीकत मी तुम्हांला सांगणार आहें.

रणदेवीचें तें भाषण ऐकून अनसूयेस फार आनंद झाला व ती रणदेवीस ह्मणाली, " माताजी, आपण कोणी तरी थोर कुळांतील खानदानीच्या घराण्यांतील आहांत याबद्दल आमच्या मनाला शंकाच नव्हती. आह्मी एकमेकींनीं आपापसांत यासंबंधानें अनेक प्रसंगीं भाषण करून हें ठरविलें होतें. आपल्याला एकवार आपली हकीकत विचारावी असाही आमचा विचार अनेक वेळां झाला; परंतु आपल्याला आमच्या विचारण्यापासून गतगोष्टी आठवून त्रास होईल हें मनांत येऊन आह्मीं कधीं आपल्याला प्रश्न विचारले नाहींत. माताजी, आपण आमच्या लहानशा संघांत आल्या दिवसापासून आह्माला खरोखर असें वाटतें आहे, कीं ही कोणी तरी महापुण्यवति स्त्री आमच्यावर अनुग्रह करण्याकरितांच आमच्या संघांत आली आहे. आपल्या पुण्याईनें आह्माला प्रवासांत कधीं त्रास झाला नाहीं, पोटापाण्याची व्यवस्था कशी होईल? अशी काळजीसुद्धां वाटत नाहीं. आपण आह्माला त्या प्रभू रामचंद्राच्या कष्टी झालेल्या मातेप्रमाणें वाटतां आणखी काय सांगूं! "

माता रणदेवी शून्य कर्णांनीं तें तिचें बोलणें ऐकत होती. तिचें मन ती जें चरित्र त्यांस सांगणार होती, त्या पूर्वचरित्राच्या पर्यालोचनांत लागलीच गढून गेलें असावें असें दिसलें. यामुळें अनसूयेनें मग आपलें बोलणें थांबविलें. ती त्या धीर प्रशांत चर्येकडे पहात सुख अनुभवीत होती आणि माताजी आपल्यास काय सांगेल बरें, याबद्दल तर्क करीत होती!

थोड्याच वेळांत त्या तिच्या मैत्रिणी गांवांत कांहीं फळें वगैरे आणण्यासाठीं

गेल्या होत्या त्या परत आल्या. त्या परत येण्याच्या सुमारास माता रणदेवी हिची चित्तवृत्ति अगदीं शांत झाली होती. तिला तिची पूर्ववृत्ति आली होती. तें पहाण्याबरोबर द्रौपदी, कौसल्या वगैरेंस फार समाधान वाटलें. आपण तिला येथें आणून बसविलें, यामुळें हा समाधानकारक परिणाम झाला असें कौसल्येस वाटलें. कौसल्येस पहाण्याबरोबर अनसूयेसही फार आनंद झाला व ती एकदम कौसल्येस म्हणाली: " कौसल्यामाई, माताजी आज आपल्याला आपला सर्व वृत्तांत सांगणार आहेत. तर लौकर या. आपण आपले फराळ करून त्यांच्या जवळ बसूं. "

हें अनसूयामाईचें भाषण ऐकतांच सर्वांच्या चर्येवर आनंद दिसूं लागला आणि त्यांनीं फराळाचें काय आणलें होतें, तें तेथें ठेवून त्यांनीं नदीकांठीं हस्तपादादि प्रक्षालनाकरितां धांव मारिली ! थोड्याच वेळांत माता रणदेवीही तेथें गेली. तिनें आपले हात पाय धुवून पुनः स्नान केलें. नंतर सर्वांनीं शुचिर्भूतपणें फलाहार केला. माताजीचें चरित्र ऐकण्याला सर्वजणी फार उत्सुक दिसल्या. इतके दिवस आपण ज्या गोष्टीची वांछा धरली होती, ती आज सफल होते आहे असें त्या सर्वांस वाटलें. फलाहार वगैरे होऊन मंडळी एकत्र बसली, तेव्हां कौसल्यामाई माताजीस ह्मणते:

" माताजी, आपण कांहीं आमच्यासारख्या त्रिकाल कंगाल खचित नाहीं. मूळच्या श्रीमंत कुळांतल्या असून केवळ कांहीं कारणानें वैताग येऊन वैराग घेतला, हा आमचा तर्क खात्रीनें खरा ठरला पाहिजे. आज आपण आमची आपलें चरित्र ऐकण्याची इच्छा तृप्त करणार, तेव्हां आतां आमचा तर्क किती खरा ठरतो हें पाहूं ... ... ...

अनसूया मध्येंच ह्मणाली, " तो तर्क खरा ठरलाच. माताजीनीं माझ्यापाशीं तो तर्क खरा आहे असें केव्हांच कबूल केलें आहे. माताजी थोर अशा एका रजपूत कुळांतील असून केवळ कांहीं कारणानें वैराग घेऊन आपल्या "—

द्रौपदी तितक्यांत ह्मणते, " माताजींच्या तोंडूनच आतां आह्माला काय तें ऐकूं दे. तूं कशाला सांगतेस ! तुझें चरित्र ऐकण्याच्या वेळीं तें तुझ्याच कडून सर्व ऐकून घेऊं. "

हें द्रौपदीमाईचें बोलणें ऐकून सर्व जणी हंसल्या. नंतर एखाद्या प्रेमळ मातेच्या सभोंवताली जशा तिच्या मुली जमतात आणि तिचें भाषण ऐकण्यासाठीं उत्कंठित होऊन तिच्याकडे डोळे लावून बसतात, त्याप्रमाणें त्या सर्वजणी प्रेमलपणें तिच्याभोंवतीं बसल्या.

त्यांच्याकडे पाहून माता रणदेवीस फार समाधान झालें व ती धीरगंभीर वाणीनें ह्मणाली, " मैत्रिणींनो, रजपुतान्यांत ......... "

माता रणदेवी पुढें कांहीं बोलणार तों कौसल्यामाई एकदम दूर हात करून ह्मणाली

" माताजी ! माताजी ! हा भरधांव सुटलेला घोडा पहा ! हा आपल्याच अंगावर येतो आहे कीं काय ? उठा ! उठा ! आलाच "

कौसल्यामाईंचे हे घाबरून उच्चारलेले शब्द ऐकतांच सर्वजणी उठल्या व तिनें ज्या बाजूला हात केला होता तिकडे पाहूं लागल्या. पाहतात, तों खरोखरीच वर स्वार असलेला एक घोडा अतिशय भरधांव असा आपल्या त्या झाडाच्याच बाजूला येत आहे. तो घोडा त्या स्वारास अगदीं अनावर झालेला असला पाहिजे हें उघड दिसलें. हा इकडेच येत असलेला घोडा मघाशीं माता रणदेवीजवळ आलेलाच होय असें कौसल्येस व इतरांस वाटलें. माता रणदेवीनें त्याच्याकडे पहातांच " तोच तो रणछोड " अशाबद्दल तिची खात्री झाली ! आणि हा कितीही भरधांव आला तरी आपल्याला पाहतांच थबकेल असें तिला पक्कें वाटलें. किंबहुना आपल्याजवळ येण्यासाठींच तो इतका भरधांव निघाला असावा असाही तिला संशय आला. आपल्यास आपल्या यजमानाकडे नेण्याचा प्रयत्न केला, परंतु तो मुळींच साध्य झाला नाहीं, तेव्हां आतां आपल्या यजमानाला इकडे आणावें अशी मनांत योजना करून यानें इकडे धांव घेतली असावी असा तर्क तिनें केला.

घोडा जों जों जवळ आला तों तों अर्थातच त्यांस तो व त्याच्यावरील स्वार यांचा कसा झगडा चालला आहे हें स्पष्ट दिसलें. त्याच्यावरील स्वाराची फारच त्रेधा उडाली असावी. कारण तो दांत ओंठ खाऊंन त्या घोड्यास आवरून धरण्याचा प्रयत्न करीत होता. परंतु घोड्याची दृष्टि एकसारखी पुढें असून तो आपलें सगळें बळ एकवटून तो भरधांव निघाला होता. येतां येतां एकदम तो त्या झाडापाशीं आला आणि तेथें थबकला. आपलाच तर्क खरा हें रणदेवीस तेव्हांच दिसलें. घोडा इतक्या झपाट्यानें येऊन तेथें थबकला कीं, त्याच्या धक्क्यानें माताजी कदाचित् पडेल, ह्मणून तिला कौसल्येनें व द्रौपदीनें मागें ओढलें; परंतु आपल्या धक्क्यानें माताजीस त्रास होऊं नये अशी काळजी यांच्यापेक्षां आपल्यास दुसपट अधिक आहे असें दाखविण्यासाठीं तो घोडा तिच्या अगदीं जवळ येऊन थबकून उभा राहिला. तो थबकतांच त्यास त्या गोसावणींनीं हाच मघाचा—आपल्या माताजींशीं लडिवाळपणा करणार घोडा—हें ओळखलें व हा आणखी काय चमत्कार आहे ह्मणून त्या आश्चर्यानें पाहूं लागल्या.

इकडे घोडा थबकतांच त्याच्या पाठीवरील स्वारानें एकदम खालीं उडी टाकली. आपला घोडा तसाच भरधांव निघाला असता आणि या बायांच्या अंगावर गेला असता, तर काय भयंकर अपघात झाला असता वगैरे गोष्टी साहजिकपणें अशा स्वाराच्या मनांत यावयाच्या, आणि त्यानें घोड्याला चुचकारून हलकेच दूर नेऊन उभें करावयाचें. त्याचप्रमाणें या मंडळीजवळ येऊन " मोठी परमेश्वरी कृपा झाली, आपल्याला कांहीं दुखापत झाली नाहीं, असें बोलावयाचें.

परंतु आमचे किरातसिंग त्यापैकीं नव्हते. हा घोडा रणछोड व त्यावरील स्वार किरातसिंग हें वाचकांनीं आतां जाणलेंच असेल !

घोडा थबकतांच किरातसिंग एकदम संतापानें खाली उतरला व या बिचाऱ्या बायांकडे ढुंकूनही न पहातां एकदम त्या आपल्या घोड्याच्या आयाळीस हिसका देऊन व एक चपराक लगावून ह्मणतो, " अरे बेईमान, बेवकूब, तुला वेळवखत कांहीं समजतो का ? सकाळीं तूं असाच हट्ट करून मला तेथें मुक्काम करण्याला लावलंस. थकला असशील, तुझा तरी जीव आहे असें ह्मणून मी तुझा हट्ट चालूं दिला. मीही विश्रांति घेण्यासाठीं पडलों. आतां पुनः उठलों, तूंही ताजातवाना झालास ह्मणून वाटेला लागण्यासाठीं तयारी करून स्वारी केली तों नादान तूं माझी वाट सोडून देऊन भलत्याच वाटेला लागलास. मी माघारी वळवायला लागलों तर अनावर झालास ! तुला काय वाटलें, तुझ्या मर्जीवर मी आतां आपले सगळे बेत ठेवणार होय, ( आणखी एक ठोंसा नाकावर लगावून ) तूं जुना घोडा—मोठा इमानी ह्मणून तुला ठेवला इतके दिवस. पण तूं जर असा बेइमानपणा करूं लाग-शील, तर तुझा मुलाहिजा ठेवीन काच ? एकाद्या भाडेकऱ्याला विकून टाकीन ..."

किरातसिंगाचें हें बोलणें गोसावणी—मुख्यतः माता रणदेवी अगदीं लक्ष्य लावून शांतपणें ऐकून घेत होती. त्या घोड्याला दुसरा ठोसा केवळ वर्मीं लागल्याप्रमाणेंच झालें. त्याच्या नाकपुड्यांतून रक्त येऊं लागलें आणि एखाद्याला घेरी घेऊन तो जसा पडतो, तसा रणछोड एकदम खालीं पडला. त्याबरोबर मात्र किरातसिंग थोडा चपापला. आपण संतापाच्या भरांत हें काय केलें ? असें त्याच्या मनांत येऊन त्यास बरेंच वाईटही वाटलें असावें असें दिसलें. तो त्याच्याजवळ गेला. परंतु त्याच्या आधींच माता रणदेवी त्याच्याजवळ जाऊन तिनें त्याचे डोळे धरले होते व कौसल्या व अनसूया यांना पाणी आणण्यास सांगि-तलें होतें. पाणी जवळच होतें. त्यांनीं दोन लोटे भरून आणले. आणि माताजीनें त्या घोड्याच्या तोंडावर तें पाणी मारलें. तें संपतें तों दुसऱ्या दोघींनीं आणखी पाणी आणलें. किरातसिंग नुसता आपल्या कृतीचा परिणाम पहात दगडाच्या पुतळ्यासारखा उभा राहिला ! माताजी त्या घोड्याला शुद्धीवर आणण्यासाठीं धडपड करीत होती. तिच्याकडे त्याचें लक्ष्यही गेलेंसें दिसलें नाहीं. घो-ड्याची त्याला फार चांगली माहिती असल्याकारणानें आपल्या कृतीचा परिणाम फार अनिष्ट होणार आहे, घोडा आतां उठत नाहीं हें त्यास तेव्हांच दिसून आलें, त्यामुळें तो त्या गोसावणीस म्हणालाः " कां बायांनो उगीच धडपड करतां ? तो घोडा कांहीं आतां उठायचा नाहीं. त्याच्या वर्मीं ठोंसा लागला. पण मी तरी काय करूं ? माझें कोण घाईचें काम, आणखी हा तर केवळ हट्टानें भडकला. त्याचाही वृद्धापकाळ झाला आहे ह्मणा तेव्हां आतां तो टाकूनच द्यायला पाहिजे होता. त्याच्या नशि-बांत असा मृत्यु होता ! "

त्याचें तें बोलणें ऐकून माता रणदेवी अत्यंत संतप्त झाली. ती लाल झाली. तिनें एकवार किरातसिंगाकडे क्रुद्ध दृष्टीनें पाहिलें; परंतु तितक्यांत त्या मुक्या जनावरानें मानेला एक हिसडा देऊन ती उचलून तिच्या हातावर टाकली आणि प्राण सोडला!

तें पहाण्याबरोबर किरातसिंग लागलीच ह्मणालाः "मी ह्मटलें नाहीं तुह्मांला कीं तुमची खटपट व्यर्थ आहे ह्मणून ! तो मरायचाच होता. आतां तुह्मी नदींत जाऊन आपली वस्त्रें धुवा. मीही आपल्या कामाला जातों."

तें त्याचें बोलणें ऐकून माताजीच्या संतप्त ओंठावर कांहीं तरी शापशब्द आलेले दिसले; परंतु ते तिनें तसेच दाबले ! किरातसिंगानें आपलीं शस्त्रें तेवढीं घेतलीं आणि तो तेथून चालता झाला.

---

# प्रकरण २२ वें.

## किरातसिंग जातो.

आपल्या त्या घोड्यास याप्रमाणें निष्ठुरपणानें मारून त्याच्या प्रेताची वास्तपुस्त करण्याचा विचार सुद्धां न करितां तेथून तातडीनें निघून जाणाऱ्या किरातसिंगाकडे पहात माता रणदेवी चांगली पाच घटका उभी राहिली. ज्यानें आपल्याला रणांगणांत व मृगयेंत आपल्या पाठीवर वाहून अनेक वेळां आपल्या चापल्यानें संकटांतूनही सोडविलें, त्या घोड्याचें प्रेत अशा प्रकारें रानांत कोल्ह्या गिधाडांनीं फाडफाडून खाण्यासाठीं टाकून देऊन निःशंकपणें जाणारा माणूस खरा क्षत्रियच नव्हे. आपल्या हातानें त्यास मृत्यु आला ह्मणून या वेळीं यास किती तरी दुःख व्हावयास पाहिजे होतें; परंतु दुःख झाल्याचें यत्किंचित् सुद्धा चिन्ह त्याच्या चर्येवर किंवा वर्तनांत दिसलें नाहीं ! उलट आपल्याला तांतडीनें जिकडे जावयाचें होतें तिकडे न नेतां यानें आपणास इकडे आणून वेळ गमाविल्यामुळें जो त्यास संताप आलेला होता, तोच शेवटपर्यंत कायम होता असें त्याच्या त्या वर्तनावरून स्पष्टपणें दिसून आलें. किरातसिंग अगदीं दृष्टिआड होईपर्यंत माता रणदेवी त्याच्याकडे पहात होती; परंतु तो जो तांतडीनें निघाला, त्यानें एकवार चुकून सुद्धां मागें वळून आपल्या त्या घोड्याकडे किंवा जिच्या हातावर खांद्यावर मान टाकून त्यानें प्राण सोडला त्या तापसीकडे पाहिलें नाहीं. तो तांतडीनेंच निघून गेला. तो पार दृष्टिआड झाल्यानंतर माता रणदेवी एक दीर्घ निःश्वास सोडून त्या मृत अश्वाकडे पाहूं लागली; नंतर आपल्याशींच ह्मणतेः "बेटा रणछोड, तुझ्या नशिबीं असें मरण यावेंना ! आपल्या धन्याच्या हातून कांहीं तरी पौरुषाचें कृत्य करवीत असतांना शत्रूच्या शस्त्रानें मरतास आणि मग कोल्ह्या गिधाडांनीं खाण्या-

साठीं तुझें प्रेत पडलें असतें तर त्यांत कांहींच खेद वाटण्याला कारण नसतें; पण केवळ तूं माझ्या ठिकाणच्या प्रेमामुळें आपल्या धन्यास घेऊन इकडे आलास, मला पाहिल्याबरोबर जसा तुला विलक्षण आनंद झाला तसाच तुझ्या धन्यालाही होईल असें तुला वाटलें त्याबद्दल तुझ्या धन्याच्या हातून तुला अशा प्रकारानें आणखी माझ्या देखत मरण यावें, या दुर्दैवाला ह्मणावें तरी काय ? असो, पण ज्यानें मला–सुद्धां ओळखलें नाहीं, एक वेळ शंकित दृष्टीनें मजकडे पाहिलें सुद्धां नाहीं, त्यानें तुझी अशा प्रकारें विल्हेवाट लाविली याबद्दल वाईट वाटण्याचें किंवा नवल तरी वाटण्याचें काय कारण ? पण बाबा, तुला स्वर्ग मिळाल्याखेरीज राहणार नाहीं. तूं आपलें–आपल्या ब्रीदाला योग्य असें कर्म केलेंस. मी आतां तुझ्या नांवानें पुनः एकदां स्नान करतें, तिळांजळि देतें, आणखी येथून जातें. आणखी मी काय करणार ? ”

असें ह्मणून तिनें आपले ते अश्रु गाळणारे डोळे पदरानें पुसले. तिच्या मैत्रिणी हा एकंदर प्रकार आहे तरी काय असें वाटून चकित होऊन तिच्याकडे व त्या घोड्याकडे स्तब्ध दृष्टीनें पहात होत्या. पुढें ती स्नानाकरितां प्रवाहाजवळ गेली तेव्हां त्याही गेल्या. त्यांनीं तिचें स्नान होण्याबरोबर तिचें शुभ्र वस्त्र धुवून वाळविलें. तोंपर्यंत ती पुनः त्या अश्वाच्या प्रेताकडे पहात व मधून मधून दीर्घ निःश्वास सोडीत बसली होती. वस्त्र वाळतांक्षणींच आतां येथेंही आपल्यास बसवेंसें वाटत नाहीं, ह्मणून ती तेथून उठली व पुनः एकदां तिनें त्या अश्वाकडे निरखून प्रेमपूर्ण दृष्टीनें पाहिलें. “ जा. जा. स्वर्गद्वार तुझ्याकडे खुलें आहे ! ” असें एकवार ह्मटलें, आणि तेथून ती आपल्या मैत्रिणींस घेऊन निघून गेली ! तें रमणीय स्थान तशा उन्हाच्या वेळीं सोडून जाणें तिला अगदीं जिवावर आलें; परंतु जेथें आपल्या देखत नरानें पशूप्रमाणें आणि पशूनें नराप्रमाणें वर्तन केलें, तेथें त्या पशूचें प्रेत पहात कसें बसवणार ?

इकडे किरातसिंग आपलीं शस्त्रास्त्रें घेऊन निघाला, तो मागें वळून सुद्धां न पहातां तडक चालला. आपण ज्या कार्याकरितां चाललों होतों, त्यांत विनाकारण व्याघात करणाऱ्या त्या घोड्याचा मृत्यु झाला तरी त्यास त्याचें कांहीं वाईट वाटलें नाहीं. कांहीं माणसें अशा कोटींतलीं असतात, कीं त्यांना साध्य हेतु सिद्ध करण्यापलीकडे कांहीं सुद्धां दिसत नाहीं. आपण त्या सिद्धीसाठीं जीं साधनें योजतों तीं बरीं कीं वाईट याचा विचार त्यांना कांहीं कधीं सुचत नाहीं. आपला हेतु सिद्ध करीत असतां मार्गांत विघ्नें आलीं कीं तीं दूर सारावयाचीं. तीं विघ्नें आणणारा आपल्या प्राणास प्राण देणारा मित्र असला तरी त्याचें सुद्धां निर्दलन करण्यास ते कधीं मागें घ्यावयाचे नाहींत. किरातसिंग या कोटींतील होता हें आतां येथें सांगावयास नकोच. एक कोस जमीन राहिली होती ती आपण सकाळींच जर घोड्याच्या हट्टाला दूर सारून आक्रमली असती तर इतका उशीर झाला

नसता; परंतु आपल्याला भलताच विचार आला, आणि आपण झोंप घेतली. याबद्दल काय तें त्याला वाईट वाटलें. घोड्याचें काय ? आपण कोणत्याही छावणींत गेलों कीं दुसरें घोडें मिळेल असा विचार करीत तो उग्लेली जमीन पायींच आक्रमीत होता. होतां होतां तो जयसिंग राजांच्या छावणीशीं आला. तेव्हां, त्याला फार समाधान झालें. आतां आपण काय करावयाचें ? काय बोलावयाचें ? यासंबंधानें त्याचा विचार सुरू झाला. छावणीजवळ येतो तों त्याला कित्येकांनीं ओळखलें आणि हा असा पायीं कसा ? घोडा गेला कोठें असे प्रश्न विचारण्याच्या मुद्रेनें ते त्याजकडे पाहूं लागले. ज्यांची व त्याची बोलण्याइतकी ओळख होती त्यांनीं त्यास त्यासंबंधानें प्रश्न विचारले. कित्येकांस त्यानें उत्तरें दिलीं. त्यांत असें सांगितलें कीं मिर्झा राजांकडे फार जरूरीचें काम आहे. त्यासाठीं इकडे आलों जलदी येण्यासाठीं घोडा फार जोरानें पिटाळला तेव्हां तो छातींत फुटून चक्कर येऊन पडून मेला. त्यास तसाच टाकून पायीं आलों. मिर्झा राजाच्या छावणींत जाऊन त्यांच्या शमियानाच्या जवळपर्यंत पोंचल्यानंतर वर्दी तांतडीनें पोंचविण्यांत आली. राजांनींही तावडतोब त्यास मुलाखतीस बोलाविलें. तेथें जाण्याबरोबर त्यानें बहाण्यास सुरुवात केली.

" महाराणेसाहेब, आपण जर मला परत जाण्याची परवानगी द्याल, तर मी आपला फार ऋणी होईन. आपल्याला ही पायपिटीची नौकरी व्हायची नाहीं. माझा उमदा आणखी सच्चा घोडा या पटिमारीनें मेला. आतां हें सगळें आयुधांचें ओझें घेऊन पायीं आलों. बरें, कामगिरी तरी कांहीं शूरत्वाची आहे का ? शत्रूला तोंड देण्याची कामगिरी असती तर कर्तबगारी करून आपल्या कुळाचं नांव तरी राखलं असतं पण तसंही नाहीं. खांसाहेबांनीं कुठें ऐकलं कीं आपल्याकडे शिवाजीकडून कोणी पंडित वकील ह्मणून येऊन आपलीं त्यांचीं कांहीं बोलणीं चाललीं आहेत. तेव्हां आह्मांला बोलावून आणून कामगिरी सांगितली कीं तिकडे काय प्रकार चालला आहे तो पाहून या ! आतां ही कामगिरी आह्मीं करावी का ? सांगा. आपण सांगत असलां तर करतों ! पण हें काय हें ? ... ... ...

तें ऐकून मिर्झा राजे हंसले आणखी ' हो ! हो ! धीरे धीरे घ्या ' " आह्मांला कांहीं हा प्रसंग अगदीं नवा नाहीं. आतांपर्यंत असे प्रसंग कितीक आले होते. त्यांना कोणीं जुमानलें ? तर आतां या तुमच्या प्रसंगाला भिणार आहें ! बोलूनचालून त्यांनीं आमच्यावर नजर ठेवण्याकरितांच आपली नेमणूक बादशहाकडून करून घेतली आहे तर ते वाटेल त्या तऱ्हेनें आपली कामगिरी बजावणारच. त्यांत आह्मांला आश्चर्य कांहीं वाटत नाहीं. .........

" महाराणेसाहेब, आपल्याला आश्चर्य न वाटो, पण आह्मांला त्यांनीं अशा प्रकारचीं कामें करायला लावावें, आणि आह्मीं तीं करावीं काय ? मी त्यांना ताडकन् उत्तर देऊन मोकळा होणार होतों; परंतु आपण काय ह्मणाल हा विचार मनांत

येऊन गप्प बसलों. आणि आपल्या समोर येऊन एकदां आपल्याला पुनः सगळी कथा सांगावी असा हेतु धरला. नाहीं तर अशी लाचारीची कामगिरी मी कधीं कधीं तरी पतकरीन काय ? त्यापेक्षां पोटांत कांटे कां नाहीं भरले ? आह्मी माणसें आपलीं. आणखी आपल्यावर नजर ठेवून आपल्याकडील बातमी त्या मुसंड्याला सांगायची कामगिरी तो आह्माला सांगतो. आह्मी ती मुकाट्यानें ऐकतों आणखी."

"बाबारे," मिर्झा राजे त्यास मध्येंच ह्मणाले: "इतका अगदीं काव्हल्यासारखें करूं नकोस. तूं अजून तरुण आहेस. तुझ्या अंगांत रक्त फार ताजें आहे. आमच्या वयाला येईपर्यंत आणखी कितीक प्रसंगांतून तरी तुला जावें लागणार आहे. तूं असें कां करतोस ! तुला आमच्यावर नजर ठेवायला त्यांनीं पाठविलें आहेना ! ठीक आहे. रहा इथें आणखी ठेव नजर. तुला तरी राज्यकारस्थानाचे धडे पाहिजेच आहेत कीं नाहीं ! हा एक त्यांतलाच धडा आहे. दर क्षणाला संतापून काय होणार ! सगळें कांहीं धिम्मेपणानें सोसलें पाहिजे. एखादी गोष्ट आपल्या मर्जीविरुद्ध असली तरी ती होऊं दिली पाहिजे. राजनीति आणि मुत्सद्दीपणा यांतच आहे."

"राजनीति आणखी मुत्सद्दीपणा ह्मणजे लबाडी आणि खोडसाळपणा, कपट, नीचपणा–असेंच जर असेल तर मला ती नको, आणि तो मुत्सद्दीपणाही नको. जातों मी आपल्या जहागिरीवर आणखी बसतों स्वस्थ भगवान् एकलिंगजींचें स्मरण करीत. जें काय करायचें तें शूरपणानें आणखी सरळपणानें कां करूं नये ? आपल्याला खोडसाळपणा चिलकुल व्हायचा नाहीं आणखी त्याचा धडाही पण नको !"

हें बोलणें बोलतांना किरातसिंगाची चर्या इतकी कांहीं विलक्षण झाली, कीं राजे जयसिंग यांस त्याचें मोठें कौतुक वाटलें. नंतर त्यांनीं त्याच्या पाठीवर थाप मारून त्यास ह्मटलें: "आस्ते. आस्ते. बच्चा. जरा एकदम इतका भडकूं नकोस. तुला पुष्कळ त्यांनीं सांगितलें, पण तुझ्या मनांत जर तसें कांहीं करावयाचें नाहीं तर तुला तें करायला भाग कोण पाडणार आहे ?"

"मग मला आपल्यापासून दूर करूं नका. आपल्या छावणींत आपल्याजवळ ठेऊन काय कामगिरी करून घ्यावयाची असेल ती घ्या. आपण कामगिरी करून घेण्यांत काय वाटेल ती आज्ञा केली तरी ती अगदीं शिरसावंद्य आहे. पण त्यांनीं असला हुकूम मला द्यायचा, कीं आपल्याकडे काय चालतें तिकडे नजर ठेव आणखी गुप्तपणें मला काय तें कळवीत जा. हें फार फार वाईट. मी तें कधीं करणार नाहीं. एक वेळ आपण जर अशी कामगिरी मला सांगितली तर मला कबूल आहे. मी ती करीन, पण त्या दिलेरखानानें आणखी आपल्या बाबतींत अशी कामगिरी करायला हुकूम करायचा याला काय ह्मणावें. ? आणखी आपण म्हणत होतां, कीं तो कांहीं असा नाहींन् तसा नाहीं. राणेसाहेब, आम्हीं अगदीं तरुण, आपण या कामांत वृद्ध झालां. तेव्हां आपल्याला आह्मी कांहीं ह्मणायचें

ह्मणजे वेडेपणाच आहे. पण क्षमा करा. आह्मी सगळे तरुण पिढीचे रजपुत आपापसांत बोलूं लागलों, म्हणजे असेंच म्हणत असतों, कीं आपण फार भोळे आहां. बादशहापासून तों तहत दिलेरखानासारख्या सरदारापर्यंत कोणाच्या देखील हिकमती काय आहेत हें आपल्या लक्ष्यांत येत नाहीं. आपल्या मर्जीविरुद्ध त्यांना जातां येत नाहीं. कारण सगळा राजपुताना आपल्या मुठींत आहे. आमच्या-सारख्या हजारों नव्हे लाखों तरुणांच्या तलवारी आपल्या शब्दामुळें म्यानांत बसल्या आहेत. नाहीं तर केव्हांच मोगलांच्या उरांत गेल्या असत्या. ही गोष्ट त्यांना धड-धडीत दिसत आहे ह्मणून तर ते आपल्याला एवढे वचकतात. पण त्यांना कांहीं आपल्याबद्दलचा धाक बरा वाटतो आहे. वेळ प्रसंग पडला तर ते कधीं काय कर-तील ह्याचा नेम नाहीं. त्यांच्या इतके बेइमान, कृतघ्न तेच. परंतु आपल्या तें लक्ष्यांत येत नाहीं. त्याला काय करावें ! आह्मां तरुण पिढीच्या लोकांना आपल्या-बद्दल किती वाईट वाटतें ! आपण जर नुसता एक शब्द उचारला तर आपल्याला बादशहाचें तख्त मिळेल; पण आपण तसा कांहीं प्रकार मनांत आणून प्रयत्न करायचा टाकून इकडे या बिचाऱ्या शिवाजीसारख्या मोगलांचें राज्य नष्ट करण्यासाठीं धडपड करणाऱ्या वीराला दडपून टाकण्यासाठीं आमच्यासारख्यांचीं सैन्येंचीं सैन्यें घेऊन येतां याबद्दल खरोखर आमच्या वयाची मंडळी नांवें ठेवतात. बरें, इतकें आपण करून तरी आपल्यावर बादशहाचा आणखी त्याच्या हस्तकांचा विश्वास आहे का ? बादशहा बाह्यतः आपल्याला सेनाधीश करून इकडे पाठवितो; पण आपल्याबरोबर एक जातभाई आपल्यावर नजर ठेवण्याच्या कामासाठीं देतो ! ते जातभाई आपल्या गोटांत फितुरी करण्यासाठीं आह्मांला फोडायला पहातात ! तेव्हां एकंदर आहे ती मौज आहे कीं नाहीं. राणाजी, आजपर्यंत मी आ-पल्या देखत असें कांहीं बोललों नाहीं. आपली अमर्यादा कधीं केली नाहीं. पण आज आतां काय असेल तें असो माझें डोकें अगदीं बिघडून गेलें. मला कांहीं सुचेनासें झालें. ज्यांना आम्ही पूज्य मानतों, त्यांच्यावर नजर ठेवून फितुरी करण्याचें काम सांगण्यापर्यंत मजल जेव्हां दिलेरखानानें आणली, तेव्हां आतां मर्यादा नाहींशी झाली, आणखी माझ्या तोंडून सगळें निघालें ! "

किरातसिंगाचें हें सगळें बोलणें इतक्या आवेशाचें व मनःपूर्वक दिसलें कीं राजा जयसिंगास त्याचें फार कौतुक वाटलें. तो त्याच्याकडे फार सूक्ष्म दृष्टीनें पाहूं लागला. याच्या मनांत आपल्याविषयीं इतके भक्तिमय विचार असतील अशी कल्पना सुद्धां त्यास नव्हती. इतकेंच नव्हे, तर मोगलांविषयीं त्याचे मनांत असा दीर्घद्वेष असावा याबद्दलही त्यास कल्पना नव्हती. जसे चार इतर तरुण लोक बादशहाच्या दरबारीं आपली बढती व्हावी ह्मणून इच्छा करून त्या इच्छेच्या सिद्धीसाठीं परिश्रम करीत असतील, त्यांतलाच हा एक पण ज़रा अधिक हुशार आणि शूर असें आपलें त्यास वाटत होतें. परंतु आजच्या त्याच्या या भाषणानें

अर्थात् आतां प.

पत्रद्वारानेंच दिलेरखानाकडे पाठविल्या

...हा. मात्र आतां पत्रें फारच संभाळून अगदीं गुप्तपणें पा...
माझ्याकडून अशीं पत्रें जातात अशी जर का एकदां मिर्झाराजांस
आली, तर त्याचा परिणाम काय होईल आणि काय नाहीं. आपला थोडक
सगळा बोजवार होईल आणि पुनः दोनही पक्षांच्या जवळ अन्नु र
नाहीं. तेव्हां जें काय करणें तें फारच सावधगिरीनें केलें पाहिजे.
विचार करून त्यानें दिलेरखानाकडे आपली बातमी पाठविण्याचें
कूच केलें. आपण असे असे इकडे आलों आहों आणि मिर्झा राजांच्या
शिरून सर्व कांहीं काढतों आहों, अधिक उणें कळविण्याजोगें कांहीं कळेल,
जरूर कळवीन, असें त्यानें एकवार गुप्तपणें कळविलें मात्र. परंतु तेवढें क
त्यानंतर केव्हांही त्यानें दिलेरखानाशीं पत्रव्यवहार करण्याचें धाडस केलें
यास आपलेंच भांडवल फुटण्याचें भय वाटलें. एकदोन वेळां तर त्यास अशी
सुद्धां आली कीं, आपल्यावर राजे जयसिंग यांची नजर असावी अशी त्यास
आल्या दिवसापासून त्याला असें वाटूं लागलें कीं, आपण मिर्झा राजांस जि
भोळे समजतों तितके ते नाहींत इतकेंच नव्हे, तर आपल्या बोलण्यावर त
भरंवसा बसल्याचें जें दाखविलें तें कृत्रिम असून आपण लबाडीनें येथें अ
आहों, आपणही कांहींतरी कारस्थानांत आहों, अशी त्यांस जबरदस्त शंका अ
आहे असें कांहीं कांहीं वेळच्या त्यांच्या भाषणांवरून व वर्तनावरून दिसलें. अ
त्याला फार भय वाटलें. जोंपर्यंत त्याला आपण यास फसविलें असें वाटत
तोंपर्यंत तो अगदीं निर्धास्त होता. परंतु आपण फसवलें कीं आपण फसलों
शंका येण्यास कारणें झाल्याबरोबर त्याचा निर्धास्तपणा कोणीकडच्या कोण
गेला. आपण यास जाळ्यांत घालण्यास पहात होतों परंतु आपणच जाळ
पडलों. असें वाटूं लागण्याबरोबर त्याचें धाबें दणाणलें.

---

# प्रकरण २३ वें.

## मुरार बाजी.

पुरंदराचा किल्लेदार मुरार बाजी यानें आपलेकडून शिकस्त केली, त्यानें दिलेर-खानाच्या सैन्यावर कोण्या प्रकारें छापे घातले आणि कोण्या प्रकारें मोगल सैन्यास छळलें याचें दिग्दर्शन मागील एका प्रकरणांत झालेंच आहे. मराठ्यांनीं मोगल सन्याची रसद अजीबाद बंद केली, परंतु मोगल लोकांनीं असा जबरदस्त वेढा दिला असतांही वरच्या लोकांस दाण्याची कधींच कमतरता पडली नाहीं. पुरंदर किल्ल्यांत ज्यांचीं तोंडें आहेत असे गुप्त भुयारमार्ग किती होते, याची कल्पना सुद्धां मोगलांस नव्हती. आपण जंगी वेढा देऊन बसलों आहों, आतां या लोकांना आपला दाणागोटा किती दिवस पुरा पडणार आहे? असें त्यांस वाटून ते आज किल्ला पडेल, उद्यां पडेल असें ह्मणत बसले होते. शेवटीं मागें एका प्रकरणांत सांगितल्याप्र-माणें त्यांनीं शेजारचा रुद्रमाळ किल्ला घेतला. व तेथून पुरंदरावर भडिमार चाल-विला. परंतु त्याचाही फारसा उपयोग झाला नाहीं. हा किल्ला या वेळीं महाडचे मुरार बाजी देशपांडे नाडकर यांचे ताब्यांत होता. या पुरुषानें या किल्ल्याच्या संरक्षणार्थ जे प्रयत्न केले त्यांचें येथें वर्णन करून सांगणें अवश्य आहे. परंतु तो ऐतिहासिक भाग असल्यामुळें आह्मी आपल्या भाषेंत न सांगतां त्यांच्याच एका ज्ञातिबंधूनीं लिहिलेल्या चरित्राचा उतारा देतों.

या महावीराचा जन्म बाजी मुरार नाडकर यांच्या उदरीं शके १५३८ सालीं झाला. याचे पूर्वज पूर्वीं महाडास राहत असत. बाजी मुरार प्रभु हे विंजापूर येथील सरदार चंद्रराव मोरे यांच्या पथकांत चाकरी करीत असत. यांनीं स्वामि-सेवेचीं कित्येक महत्त्वाचीं कामें काळजीपूर्वक शेवटास नेऊन बादशहाची कृपा संपादन केली होती. दिल्लीच्या बादशहाशीं विजापूरकरांस वेळोंवेळीं जी टक्कर द्यावी लागली, त्यांत बाजी प्रभु यांनीं आपली कामगिरी फारच उत्तम रीतीनें बजाविली; त्यावरून अदिलशहा बादशहानें बाजी प्रभूस ‘ उमराव ’ असा किताब देऊन, सरंजामानिशीं हुजुरास ठेवून घेतलें व बाजी प्रभूचे ज्येष्ठ चिरंजीव जे मुरार बाजी, यांस चंद्ररावाच्या पथकांतील नोकरीवर शके १५५९ मध्यें दाखल केलें. मुरार बाजीनें पण चंद्ररावाच्या आश्रयास राहून पराक्रमाचीं बरींच कामें केलीं होतीं.

शके १५६४ मध्यें शिवाजीमहाराजांनीं जावळी परगण्यावर स्वारी केली त्या समयीं चंद्रराव मोरे यांच्यातर्फे या सरदारानें शिवाजीमहाराजांच्या लष्करास

' पळतां भुई थोडी ' अशांतली स्थिति करून सोडली होती. महाराजांनीं या प्रभु-वीराचा पराक्रम कर्णोपकर्णीं अगोदरच ऐकिला होता. आणि त्यांत आपल्या लष्कराची मुरार बाजीनें नासधूस उडविली; ही हकीकत ऐकतांच, ' हा प्रभुवीर महाराष्ट्र राज्यसंस्थापनेच्या कामांत विशेष उपयोगास येण्यासारखा आहे ' असें महाराजांस वाटल्यावरून त्यांनीं ' मुरार बाजी अनुकूल होईल अशा रीतीचा प्रयत्न कळेल त्या रीतीनें करावा ' असा सक्त हुकूम सोडला होता.

चंद्रराव मोरे व शिवाजीमहाराज यांचें पूर्वीचें वैमनस्य होतेंच; त्यांत हेंही एक कारण मिळतांच चंद्रराव मोरे यांजवर मोठ्या युक्तीनें स्वारी केली व त्यांस जीवें मारिलें. त्यांचे बंधु कृष्णराव यांस त्यांच्या बंधूसह छत्रपति शिवाजीमहाराजांच्या लष्करानें पकडून त्यांना ठार मारण्याची धमकी दिली. मुरार बाजीच्या पूर्वजांवर मोऱ्यांच्या वडिलांनीं अतोनात उपकार केले होते. त्याचें स्मरण परंपरेनें मुरारजी प्रभूस होतेंच. आपल्या धन्यावर हा आलेला प्रसंग हरप्रयत्नानें टाळणें अथवा त्यांतून मोरे यांची सुटका करणें हें मुरारजीस इष्टच होतें. मुरारजीनें आपल्या लष्कराची जमवाजमव करून लढाई दिली; परंतु तींत त्याला हतवीर्यच व्हावें लागलें.

कृष्णराव मोरे यांस मोरोपंत पिंगळे यांनीं व खुद्द महाराजांनीं ठार मारण्याची धमकी दिली. व कृष्णरावास त्यांनीं सांगितलें कीं, ' तुह्मांस जर जीवदान पाहिजे असेल तर, मुरार बाजी यानें आपल्या लष्करासह आमची नोकरी आमरणांत करावी. यास कबूल नसाल तर तुह्मास मारणें इष्ट आहे. ' ही अनिउग्र अट पाहून कृष्णरावास फारच वाईट वाटलें. त्यांनीं मुरार बाजीस बोलावून आणून त्याकडून ही गोष्ट कबूल करविली. आपल्या धन्याचे पंचप्राण ज्या रीतीनें वांचतील तो मार्ग मुरारजीस स्वीकारावा लागला. मुरारजी प्रभूनें छत्रपतींची मागणी कृष्णराव मोरे यांच्या सांगण्यावरून कबूल केली व तो आपल्या दोनशें लोकांनिशीं शिवाजीमहाराजांच्या चाकरीस राहिला. ज्याचे एकदां दास बनलों त्याची सेवा प्राणाकडे न पहातां करणें, हा मुरार बाजीचा बाणा असल्यानें, ज्या मोहिमेवर मुरारजी जाई तेथें यशच यावें; त्यामुळें शिवप्रभु या प्रभु–सरदाराची योजना तशाच महत्त्वाच्या कामावर करीत असत. धन्याचे प्राण वांचविण्याकरितां अथवा पूर्वजांवर केलेला उपकार स्मरून, स्वतः परक्याचे दास बनणारे असे पुरुष फारच विरळा असतात. मुरारजी स्वतः एकटा शिवाजीमहाराजांकडे न येतां, आपल्या सर्व भ्रातृवर्गासह त्यानें छत्रपतींची नोकरी पतकरली होती.

रुद्रमाळच्या किल्ल्यावर या सरदारानें अवरंगजेबाच्या दिलेरखानाशीं टक्कर देऊन त्यास पिटाळून लाविलें, तोंच पोलादपूर येथील येसाजी हे आपल्या सांथीदारांसह येथें येऊन त्यांनीं ' दिलेरखानाचा रोख पुरंदराकडे जाण्याचा आहे ' असें सांगितलें. त्यावरून या सरदारानें रुद्रमाळच्या किल्ल्याचा बंदोबस्त यथास्थित

केला व बाबाजी बोआजींच्या अतुल पराक्रमाप्रमाणें आपणही स्वामिकार्य करून स्वामींच्या मनास आल्हाद द्यावा, अशी इच्छा या प्रभु–सरदारास उत्पन्न झाली. 'पाहिजे तसें होवो, हा देह स्वामिकार्यार्थ खर्च करून, मराठी राज्याचा पाया मजबूद करायचा व या नोडग्या मुसुंड्यांचें कांहींही चालू द्यायचें नाहीं,' असा मुरार बाजीचा कृतसंकल्प होता. "ज्या मुसलमानांनीं आमच्या महाडावर अनेक वेळां हल्ले करून, गरीब लोकांस लुबाडिलें व निरपराधी कुलांगनांच्या अब्रूवर हात टाकण्यास सोडिलें नाहीं, त्यांचा समाचार घेण्याचा सुसमय श्रीशिवप्रभूच्या प्रतापानें अनायासेंच आला आहे. मुसलमान लोकांचे प्रयत्न आमचें मराठी राज्य बुडविण्याकरितां चालले आहेत काय ? श्रीशिवप्रभूच्या कृपेनें या दिलेरखानाचा मी खात्रीनें शिरच्छेद करून मोगल सैन्याची दैना उडविल्यावांचून सोडणार नाहीं. मोगलांच्या त्या हट्टी स्वभावाचा सूड उगविण्याची वेळ जवळ आली आहे. या वेळीं मला माझें खरें कर्तव्य बजाविण्याचा सुसमय ईश्वरानें आणिला आहे. माझ्या या शरीराचें कांहीं का होईना; पण या वेळीं मी त्या दिलेरखानाचा चांगला समाचार घेतों. हीच माझी प्रतिज्ञा. रुद्रमाळच्या किल्ल्याखालीं बाबाजी बोआजी यांनीं तुझ्या लष्कराचा फन्ना उडविला; त्याचें तुला विस्मरण झालें काय ? तूं आपला मुसलमानी स्वभाव अद्यापि सोडीत नाहींसना ? नको सोडूं. तूं पुरंदरावर हल्ला करच व मी पण तुझ्या पाठिमागें हात धुवून लागतों. आमच्या प्रभुवीरांच्या अंगीं क्षात्रतेज किती वसत असतें, तें बाजी प्रभु देशपांडे हिरडस मावळचे यांनीं व बाबाजी बोआजी देशपांडे या दोन सरदारांनीं आपल्या शिपाईगिरीची जशी शर्थ करून सोडिली व आपले प्राण धारतीर्थीं खर्ची घातले आणि प्रभूपासून प्रसाद मिळविला, तसा पराक्रम या कोंकण्या मुरार बाजीच्यानें होणार नाहीं काय ? आह्मी कोंकणे लोक केवळ भात खाऊनच राहतों, असा आमच्यावर देशावरील लोकांचा आरोप आहे, तो आज मी खात्रीनें लयास पोंचविणार. या दिलेरखानाचा कीं, ज्यानें आमच्या प्रभु–सरदारांपैकीं, दोन बलाढ्य वीरांचा वध केला आणि शिवप्रभूच्या मोठ्या लष्कराचा फन्ना उडविला, त्याचा सूड उगविणें हेंच माझें खरें काम आहे. माझ्या या शरीराचे शत्रूनें यद्यपि तुकडे उडविले तथापि हरकत नाहीं." असें ह्मणून त्यानें आपल्या सैन्यासह शिवप्रभूच्या आज्ञेची अपेक्षा न ठेवितां, आपला मोर्चा पुरंदराकडे वळविला.

मोगलांच्या लष्करास रस्त्यांत अन्न व पाणी मिळूं नये अशा प्रकारची व्यवथा मुरार बाजीनें अगोदरच करून ठेविली होती. पुरंदरापासून तीन कोशांवर दिलेरखानानें आपला तळ दिला होता. या मुसलमानांचा बसल्या जागीं नाश करण्याची युक्ति मुरार बाजीनें योजिली. आपलें सर्व लष्कर ताबडतोब किल्ल्यावर चढ्वून दिलें व तें व्यवस्थेशीर राहील अशी योजना करून, स्वतः मोगली लष्करांतील शिपायाचा वेश धारण केला. मुसलमानी लष्करांत कोण कोण नोकर

' पळतां भुई थोडी ' अशांतली स्थिति करून सोडली होती. महाराजांनीं या प्रभु-वीराचा पराक्रम कर्णोपकर्णीं अगोदरच ऐकिला होता. आणि त्यांत आपल्या लष्कराची मुरार बाजीनें नासधूस उडविली; ही हकीकत ऐकतांच, ' हा प्रभुवीर महाराष्ट्र राज्यसंस्थापनेच्या कामांत विशेष उपयोगास येण्यासारखा आहे ' असें महाराजांस वाटल्यावरून त्यांनीं ' मुरार बाजी अनुकूल होईल अशा रीतीचा प्रयत्न कळेल त्या रीतीनें करावा ' असा सक्त हुकूम सोडला होता.

चंद्रराव मोरे व शिवाजीमहाराज यांचें पूर्वींचें वैमनस्य होतेंच; त्यांत हेंही एक कारण मिळतांच चंद्रराव मोरे यांजवर मोठ्या युक्तीनें स्वारी केली व त्यांस जीवें मारिलें. त्यांचे बंधु कृष्णराव यांस त्यांच्या बंधूसह छत्रपति शिवाजीमहाराजांच्या लष्करानें पकडून त्यांना ठार मारण्याची धमकी दिली. मुरार बाजीच्या पूर्वजांवर मोऱ्यांच्या वडिलांनीं अतोनात उपकार केले होते. त्याचें स्मरण परंपरेनें मुरारजी प्रभूस होतेंच. आपल्या धन्यावर हा आलेला प्रसंग हरप्रयत्नानें टाळणें अथवा त्यांतून मोरे यांची सुटका करणें हें मुरारजीस इष्टच होतें. मुरारजीनें आपल्या लष्कराची जमवाजमव करून लढाई दिली; परंतु तींत त्याला हतवीर्यच व्हावें लागलें.

कृष्णराव मोरे यांस मोरोपंत पिंगळे यांनीं व खुद्द महाराजांनीं ठार मारण्याची धमकी दिली. व कृष्णरावास त्यांनीं सांगितलें कीं, ' तुह्मांस जर जीवदान पाहिजे असेल तर, मुरार बाजी यानें आपल्या लष्करासह आमची नोकरी आमरणान्त करावी. यास कबूल नसाल तर तुह्मास मारणें इष्ट आहे. ' ही अतिउग्र अट पाहून कृष्णरावास फारच वाईट वाटलें. त्यांनीं मुरार बाजीस बोलावून आणून त्याकडून ही गोष्ट कबूल करविली. आपल्या धन्याचे पंचप्राण ज्या रीतीनें वांचतील तो मार्ग मुरारजीस स्वीकारावा लागला. मुरारजी प्रभूनें छत्रपतीची मागणी कृष्णराव मोरे यांच्या सांगण्यावरून कबूल केली व तो आपल्या दोनशें लोकांनिशीं शिवाजी-महाराजांच्या चाकरीस राहिला. ज्याचे एकदां दास बनलों त्याची सेवा प्राणाकडे न पहातां करणें, हा मुरार बाजीचा बाणा असल्यानें, ज्या मोहिमेवर मुरारजी जाई तेथें यशच यावें; त्यामुळें शिवप्रभु या प्रभु-सरदाराची योजना तशाच महत्त्वाच्या कामावर करीत असत. धन्याचे प्राण वांचविण्याकरितां अथवा पूर्वजांवर केलेला उपकार स्मरून, स्वतः परक्याचे दास बनणारे असे पुरुष फारच विरळा असतात. मुरारजी स्वतः एकटा शिवाजीमहाराजांकडे न येतां, आपल्या सर्व भ्रातृवर्गासह त्यानें छत्रपतीची नोकरी पतकरली होती.

रुद्रमाळच्या किल्ल्यावर या सरदारानें अवरंगजेबाच्या दिलेरखानाशीं टक्कर देऊन त्यास पिटाळून लाविलें, तोंच पोलादपूर येथील येसाजी हे आपल्या सांथी-दारांसह येथें येऊन त्यांनीं ' दिलेरखानाचा रोंख पुरंदराकडे जाण्याचा आहे ' असें सांगितलें. त्यावरून या सरदारानें रुद्रमाळच्या किल्ल्याचा बंदोबस्त यथास्थित

केला व बाबाजी बोआजींच्या अतुल पराक्रमाप्रमाणें आपणही स्वामिकार्य करून स्वामींच्या मनास आल्हाद द्यावा, अशी इच्छा या प्रभु-सरदारास उत्पन्न झाली. ' पाहिजे तसें होवो, हा देह स्वामिकार्यार्थ खर्च करून, मराठी राज्याचा पाया मजबूद करायचा व या नोडग्या मुसुंड्यांचें कांहींही चालू द्यायचें नाहीं, ' असा मुरार बाजीचा कृतसंकल्प होता. " ज्या मुसलमानांनीं आमच्या महाडावर अनेक वेळां हल्ले करून, गरीब लोकांस लुबाडिलें व निरपराधी कुलांगनांच्या अब्रूवर हात टाकण्यास सोडिलें नाहीं, त्यांचा समाचार घेण्याचा सुसमय श्रीशिवप्रभूच्या प्रतापानें अनायासेंच आला आहे. मुसलमान लोकांचे प्रयत्न आमचें मराठी राज्य बुडविण्याकरितां चालले आहेत काय ? श्रीशिवप्रभूच्या कृपेनें या दिलेरखानाचा मी खात्रीनें शिरच्छेद करून मोंगल सैन्याची दैना उडविल्यावांचून सोडणार नाहीं. मोंगलांच्या त्या हट्टी स्वभावाचा सूड उगविण्याची वेळ जवळ आली आहे. या वेळीं मला माझें खरें कर्तव्य बजाविण्याचा सुसमय ईश्वरानें आणिला आहे. माझ्या या शरीराचें कांहीं का होईना; पण या वेळीं मी त्या दिलेरखानाचा चांगला समाचार घेतों. हीच माझी प्रतिज्ञा. रुद्रमाळच्या किल्ल्याखालीं बाबाजी बोआजी यांनीं तुझ्या लष्कराचा फन्ना उडविला; त्याचें तुला विस्मरण झालें काय ? तूं आपला मुसलमानी स्वभाव अद्यापि सोडीत नाहींसना ? नको सोडूं. तूं पुरंदरावर हल्ला करच व मी पण तुझ्या पाठिमागें हात धुवून लागतों. आमच्या प्रभुवीरांच्या अंगीं क्षात्रतेज किती वसत असतें, तें बाजी प्रभु देशपांडे हिरडस मावळचे यांनीं व बाबाजी बोआजी देशपांडे या दोन सरदारांनीं आपल्या शिपाईगिरीची जशी शर्थ करून सोडिली व आपले प्राण धारतीर्थीं खर्चीं घातले आणि प्रभूपासून प्रसाद मिळविला, तसा पराक्रम या कोंकण्या मुरार बाजीच्यानें होणार नाहीं काय ? आम्ही कोंकणे लोक केवळ भात खाऊनच राहतों, असा आमच्यावर देशावरील लोकांचा आरोप आहे, तो आज मी खात्रीनें लयास पोंचविणार. या दिलेरखानाचा कीं, ज्यानें आमच्या प्रभु-सरदारांपैकीं, दोन बलाढ्य वीरांचा वध केला आणि शिवप्रभूच्या मोठ्या लष्कराचा फन्ना उडविला, त्याचा सूड उगविणें हेंच माझें खरें काम आहे. माझ्या या शरीराचे शत्रूनें यद्यपि तुकडे उडविले तथापि हरकत नाहीं. " असें ह्मणून त्यानें आपल्या सैन्यासह शिवप्रभूच्या आज्ञेची अपेक्षा न ठेवितां, आपला मोर्चा पुरंदराकडे वळविला.

मोगलांच्या लष्करास रस्त्यांत अन्न व पाणी मिळूं नये अशा प्रकारची व्यवथा मुरार बाजीनें अगोदरच करून ठेविली होती. पुरंदरापासून तीन कोशांवर दिलेरखानानें आपला तळ दिला होता. या मुसलमानांचा बसल्या जागीं नाश करण्याची युक्ति मुरार बाजीनें योजिली. आपलें सर्व लष्कर ताबडतोब किल्ल्यावर चढवून दिलें व तें व्यवस्थेशीर राहील अशी योजना करून, स्वतः मोगली लष्करांतील शिपायाचा वेश धारण केला. मुसलमानी लष्करांत कोण कोण नोकर

आहेत, त्याची मोजदाद नसल्यामुळें मुरार बाजीस आपली युक्ति शेवटास नेण्यास एके प्रकारची मदतच झाली. मोगली लष्करांत आपला प्रवेश बराच झाला असें पाहून, एके दिवशीं संधि साधून दिलेरखानाचा दारूगोळा एकदम पेटवून दिला व मुरार बाजी हा आपल्या लष्करांत येऊन दाखल झाला. जयसिंगानें 'तूं मराठ्यांशीं लढूं नकोस. कोणते वेळीं पेंचांत धरून हे मराठे शिपाई व मावळेगडी नाश करतील त्याचा नियम नाहीं' असें दिलेरखानास अगोदरच सांगून ठेविलें होतें. त्याचें स्मरण होऊन खानास फारच वाईट वाटलें! दारूगोळ्याचा एकदम नाश झालेला पाहून, आपल्या लष्करांत या मराठे लोकांनीं फितूर केला अशी त्याला महत्त्वाकांक्षा आली; त्यामुळें दिलेरखानानें आपल्या फौजेपैकीं बऱ्याच लोकांचीं डोकीं मारण्यास त्या वेळीं मागें पुढें पाहिलें नाहीं! बरेच लोक या तडाख्यांत सांपडून मारले गेले. रागाची शांतता झाल्यावर ही स्वारी जरा ठिकाणावर आली व आतां पुढें काय करावें त्याचा विचार करूं लागली. 'मराठे लोक महाकपटी, त्यांनीं हरप्रयत्न करून माझ्या दारूगोळ्याचा नाश केला. आतां यश मिळण्याची आशा कालत्रयीं ठेवतां येणार नाहीं. मिरझा जयसिंग यांनीं मला अगोदर सुचवून ठेविलें होतें, तें कांहीं खोटें नव्हे. असो; आलेली वेळ हरप्रयत्नानें शेवटास नेली पाहिजे. या मराठे लोकांनीं बादशाही इमारत हालवून खिळखिळी करण्याच्या बेतास आणिली, त्यांचा सूड उगविण्याकरितां मी जर आलों आहें, तर हतवीर्य होऊन कपाळावर हात ठेवून बसण्यांत काय अर्थ आहे! पाहिजे तसले भयंकर प्रसंग माझ्यावर आले; तथापि मी या मराठे लोकांस हार म्हणून जाणार नाहीं.' असा दृढनिश्चय करून त्यानें मिरझा जयसिंग राजे यांच्या लष्करांतील खपापुरता दारूगोळा आणविला व औरंगाबादेहून पण दारूगोळा लवकर येईल, अशी त्यानें मागणी केली. आपल्या हतवीर्य झालेल्या लष्करास खानानें बराच धीर दिला व पुरंदरावर हल्ला करण्याचा त्यानें घाट घातला.

किल्ल्यास जाण्याचे सर्व रस्ते मोगली फौजेनें अडवून धरिले; त्यामुळें लोकांचें जाणें येणें एकदम बंद पडलें. चोरवाटा मात्र खानास धरतां आल्या नाहींत. त्या मार्गांनीं अन्नसामुग्री व लागेल तें सामान मुरार बाजीस किल्ल्यावर चढवितां येई. दारूगोळा व दुसरे अत्यावश्यकतेचे लढाईस लागणारे जिन्नस, यांचा शिवप्रभूनें या किल्ल्यावर अगोदरच सांठा करून ठेविला असल्याकारणानें, मुरार बाजीस खानानें केलेल्या प्रतिबंधाबद्दल काडीइतकेंही वाईट न वाटतां, उलटें स्फुरणच चढलें. तो शत्रूशीं सामना करण्यास उद्युक्त झाला. बोलण्यांत व तसाच शौर्य दाखविण्यांतही तो पटाईत असल्यामुळें, त्यानें आपल्या लष्कराच्या अंगीं वीरश्रीचा संचार होईल, असा यत्न चालविला. शत्रूशीं सामना करण्यास आपली फौज तयार झाली हें पाहून त्याला विशेषच स्फुरण चढलें. त्यानें किल्ल्यावरून तोफांचा भडिमार एकदम सुरू

केला. मुत्सद्दीगिरी लढवून शत्रूस पेंचांत आणण्याचा अंतःस्थ क्रम पण त्यानें सुरूच ठेविला होता. तसेंच किल्ल्याच्या सोंडेवरून व माच्यांवरून मोठमोठे दगड लोटून देऊन, शत्रूच्या सैन्याचा अधःपात उडविण्याचा पण त्यानें परोक्ष रीतीनें सपाटा चालविलाच होता. किल्ल्यावर येण्याचे सर्व मार्ग त्यानें रस्त्यावर मोठमोठे दगड टाकून व कित्येक स्थळीं मोठमोठे खाडे खणून बंद करून टाकले. एक मार्ग मात्र मोकळा ठेविला व तेथून त्यानें आपल्या लष्कराचा मारा चालविला.

वर येण्यास मार्ग नाहीं व एकाच मार्गावरून हा चालविलेला मारा; यामुळें मोगली फौजेचा बराच नाश झाला. नाक्यानाक्यावर त्यानें आपले लोक उभे करून ठेविलेच होते. मार्ग बंद केला असूनही कदाचित् शत्रूचे लोक वर चढून येण्याचा प्रयत्न करतील तर त्यांचा त्या नाक्यावरील लोकांनीं चांगलाच सत्कार करावा, अशा हेतूनें मुरार प्रभूनें अगोदरच उत्तम प्रकारचा बंदोबस्त करून ठेविला होता, त्यामुळें मोगली फौजेवर एकदम तुटून पडण्याचा त्यानें निश्चय केला. दरवाज्यावर आपल्या फौजेपैकीं अर्धे लोक ठेवून त्यांचें आधिपत्य आपले बंधु शंकराजी बाजी सभासद यांस दिलें व अर्धें लष्कर आपल्याबरोबर घेऊन स्वतः मुरार बाजी ' हरहर महादेव ' करून लढण्यास तयार झाला. त्यानें मुसलमानी फौजेवर हल्ला चालविला. किल्ल्यावरूनच मराठे लोक लढत आहेत, त्यामुळें ते खालीं उतरणार नाहींत असें मोगली फौजेस वाटलें होतें आणि ह्मणूनच या वेळीं शत्रूकडील सैन्यांत अव्यवस्थितपणा दिसून येत होता. मुरार बाजीनें एकदम हल्ला केल्याकारणानें मोगली फौजेची चोहींकडे दाणादाण उडून गेली; इतकेंच नाहीं तर कित्येक पठाण लोकांस तर ' पळतां भुई थोडी ' अशांतली स्थिति झाली.

दिलेरखानानें आपल्या लष्कराची पुनः जमवाजमव करून लढाईस सुरुवात केली. मुरार बाजीनें थोडक्याच लोकांनिशीं येऊन आपल्या लोकांची दाणादाण उडवून दिली, याचें त्याला मोठें आश्चर्य वाटलें. मातीचे मोठमोठे ढीग रचून, त्यावर खानानें आपल्या तोफा चढविल्या व तेथून किल्ल्यावर मारा सुरू केला मुरार बाजीजवळ लष्कर थोडें असूनही, त्यानें शत्रूला किल्ल्यावर चढूं दिलें नाहीं. किल्ल्याच्या दरवाज्यावर तानाजी शिव प्रभु व शंकराजी बाजी प्रभु सभासद यांस पांचशें मावळे लोकांनिशीं ठेवून आपण स्वतः खानाच्या लष्करावर चालून गेला होता. दोन्ही सैन्यांत हातघाई सुरू झाली. दोन प्रहरपर्यंत याप्रमाणें नेटाची लढाई झाली. मोगल सैन्य मागें हटत चाललें. मुरार बाजी आपल्या पन्नास लोकांनिशीं दिलेरखानाच्या तंबूजवळ चालून गेला. ' दिलेरखानाचा पक्का सूड उगवीन तेव्हांच राहीन ' ी मुरार बाजीनें किल्ल्यावरून उतरते वेळीं प्रतिज्ञा केली होती. ती सत्य ाचा समय नजीक आला, हें पाहून मुरार बाजीस विशेष स्फुरण चढलें.

त्यानें आपलें युद्धकौशल्य खानास उत्तम प्रकारानें दाखविलें. या अफाट मोगली लष्करास न जुमानतां हा मुरार बाजी येथपर्यंत येऊन पोंचला, याबद्दल खानास मोठें आश्चर्य वाटलें. 'हे मराठे लोक खरोखर वीरसिंह होत' असें त्यानें जयसिंगाच्या मुखें जें ऐकिलें होतें, त्याची सत्यता त्यास विशेष वाटली. खानानें मुरार बाजीच्या अंगचें खरें क्षात्रतेज पाहून, लीनतेनें ह्मटलें कीं, 'मुरारजी, तूं लढूं नकोस. तुझा अतुल पराक्रम पाहून मी फार खुष झालों आहें. तुला मी आश्वासनपत्र देतों. तूं आमच्या लष्करांत सामील हो. तुझ्याकरितां बादशहाकडे मीं शिफारस करून तुला दक्षणप्रांताचा बादशाही सुभा बनवीन. यांत काडीइतकेंही अंतर होणार नाहीं. तूं शस्त्र खालीं ठेवून मी सांगतों तें ऐक.' हे शब्द ऐकून मुरार बाजीच्या तळपायाची आग मस्तकास गेली. इतकेंच नाहीं तर त्यानें मोठ्या त्वेषानें खानाची निर्भर्त्सना केली व ह्मटलें कीं, 'तुह्मी तुरुकडे, तुमचं आश्वासनपत्र घेऊन मला काय करायचं आहे! मरून खस्त होईन, परंतु तुमचा दास होणार नाहीं. तुमचं तुरकड्यांचं नांव सुद्धां घेऊं नये अशी माझी मनोदेवता मला सांगत आहे. तुह्मीं पाहिजे तितके लढलां व माझ्या फौजेचा नाश केला, तथापि मी खात्रीनें सांगतों, कीं या देहांत पंचप्राण आहेत, तोंपर्यंत तर तुमचं वास्तव्य या किल्ल्यावर कालत्रयीं होणार नाहीं.' हें भाषण ऐकून खानास अतिशय त्वेष आला. तो स्वतः लढण्यास उद्युक्त होऊन मुरार बाजीवर चालून आला. खान स्वतः लढूं लागला, हें पाहून त्याच्या लष्करासही स्फुरण चढलें व त्यांनीं एकदम हल्ला केला. या वेळेस मुरार बाजीचे बरेच लोक जखमी झाले व कित्येक मेलेही. याच संधींत मुरार बाजीची ढाल तुटली. त्यामुळें त्यानें आपल्या हातास शेला गुंडाळून त्याजवर शत्रूकडील घाव झेलून घेतले! अशा भयंकर स्थितींत बचाव करणें हें अत्यंत कठिण आहे. 'मारीन किंवा मरेन' अशी या प्रभुवीराची प्रतिज्ञा असल्यामुळें मुरार बाजी हतवीर्य न होतां लढूं लागला. या लढाईत खानाच्या अंगावर पण एक वार या सरदारानें करण्यास सोडिलें नाहीं. मुरार बाजीचा हा पराक्रम पाहून खानही जिवावर उदार होऊन त्यांनीं एकदम उठावणी केली. या उठावणींत खानाचा बाण लागून मुरार बाजीचें शीर उडालें व नुसतें कबंध लढूं लागलें. यासंबंधानें अशी एक आख्यायिका कोंकणांत चालू आहे, कीं मुरार बाजीच्या नुसत्या कबंधानें तीनशें मुसलमानांची कत्तल उडविली!!!

मुरार बाजीचें शिर तुटण्यापूर्वी त्यानें आपल्यापैकीं लोकांस सांगून ठेविलें होतें, कीं 'माझ्या शरीराचे शत्रूनें यद्यपि तुकडे उडविले, तथापि ते सर्व तुकडे तुह्मीं माझ्या या ढालीमध्यें भरून, प्रभुचरणीं सादर करा व शिवप्रभूस माझा शेवटचा निरोप असा सांगा, कीं 'पराक्रमी शूर पुरुषांचा संग्रह आपल्या पदरीं मोठा आहेच. हिंदु लोकांस यवनांच्या जाचांतून सोडविण्याचा आपण जो प्रयत्न चालू आहे, तो तसाच अव्याहत चालू ठेवाल अशी मला मोठी आशा आहे. माझे

आपल्या सेवेंत तत्पर रहातील. असा आपण त्यांस माझा शेवटचा निरोप सांगावा. असा त्यानें आपला हेतुपूर्वक निरोप स्वामीकडे पाठविला होता.

सेवकांनीं तें मुरार बाजीचें शव व शरीराचे उडालेले तुकडे ढालींत भरून, रायगडास शिवाजीमहाराजांच्या पुढें नेले. या विश्वासू व स्वामीभक्त प्रभुवीराचा शेवटचा निरोप पण त्या लोकांनीं महाराजांस सांगितला. शत्रूशीं मुरार प्रभूनें केलेली उग्र प्रतिज्ञा, त्याची मुत्सद्दीगिरी, खरें क्षात्रतेज व खरी स्वामीभक्ति हे गुण शिव प्रभूच्या पुढें मूर्तिमंत उभे राहिल्यामुळें, महाराजांस मोठेंच दुःख झालें. ' मुरार बाजी होता ह्मणून पुरंदराचें संरक्षण झालें. ' असें ह्मणून त्या ढालींतील मांसखंडांस शिवप्रभूनें अश्रुस्नान घातलें.

मुरार बाजी पडला हें पाहून दिलेरखानानें पुरंदरावर हल्ला चढविला; परंतु ते जीवावर उदार झालेले मराठे लोक, आपला नायक गेला असतांही न डगमगतां शत्रूशीं त्यांनीं सामना करण्यास मागें पुढें पाहिलें नाहीं. शेवटीं दिलेरखानाचा निरुपाय झाला असें पाहून, जयसिंगानें किल्ला घेण्याच्या भरीस पडण्यांत अर्थ नाहीं, असें सांगितल्यावरून लढाई बंद झाली व मराठे लोक विजयी झाले. पुढें हा किल्ला महाराजांनीं स्वसंतोषें मोगलांच्या स्वाधीन केला.

शिवप्रभूनें मुरार बाजीच्या मुलांलेंकरांस बोलावून आणिलें व त्यांना पालखी व पोषाख बक्षीस दिला; इतकेंच नाहीं तर मुठे खोऱ्यांतील उरवडें वगैरे दोन गांव इनाम करून दिले असें ह्मणतात.

---

# प्रकरण २४ वें.

## स्वप्न.

शिवाजीमहाराज एकटेच राजगडावर आपल्या एकांतस्थळीं विचार करीत बसले होते. कांहीं अनिष्ट बातमी नुकतीच त्यांस कळलेली होती; त्याच बातमीवर त्यांचा विचार चाललेला होता. आपण या खेपेस कितीही धडपड केली तरी आपल्याला यश येणार नाहीं. आपल्याला पड घ्यावी लागणार असा विचार त्यांचे मनांत वारंवार उभा राही. तो मनांतून दूर व्हावा, त्यानें आपणास भिववून सोडूं नये, निराशा उत्पन्न करूं नये ह्मणून महाराजांनीं त्याचें अनेक वेळां अनेक तऱ्हांनीं निवारण केलें; परंतु तो कांहीं केल्या मनांतून जाईना. तशांत पुरंदराच्या पाडावानें तर त्यांत फार भर पडली. आपला सगळा खटाटोप व्यर्थ जाणार काय? आपण येथवर रचीत आणलेली इमारत एकदम ढांसळून पडणार कीं काय?

असा प्रश्न एकसारखा त्यांच्या मनाला त्रास देत होता, तो कांहीं केल्या त्यांच्या मनांतून जाईना. शेवटीं ते मोठा थोरला उसासा टाकून आपल्याशींच ह्मणतातः " आपण आपल्याकडून कांहीं युक्त्या करून या जयसिंगाला आपल्याकडे वळवून घेण्याचा यत्न केला, तर त्या यत्नांत सिद्धि येईल हें शक्यच दिसत नाहीं. आधीं सर्वस्वीं शरण या, मग तहाचें बोलणें किंवा दुसऱ्या कांहीं गोष्टींचें बोलणें लावायचें असेल तें लावा, परंतु नुसतें तहाचें बोलणें ऐकायला आणखी दुसरें कांहीं ऐकायला आपल्याला फुरसदच नाहीं असें त्यानें निखालस उत्तर दिलें. हा उन्मत्तपणा अर्थातूच बादशाही विश्वासामुळें चालतो. आणि आमच्यासारख्याला तो मुकाट्यानें सहन करण्यापलीकडे दुसरा कांहींच मार्ग नाहीं. परंतु अशी स्थिति आली, तरी आपण डगमगतां कामा नये. धीर धरून काय प्रसंग पडला आहे त्यास तोंड दिलें पाहिजे. " असा त्यांनीं निश्चय केला आणि आतां पुढें काय करावयाचें याचा विचार चालविला. शत्रूच्या गोटांत जाऊन त्याच्याकडील हालहवाल काढून येऊन सांगतों असा चंग बांधून गेलेली मंडळी अद्यापि परत आली नाहीं तेव्हां याचा तरी काय शोध करावा ! ते कधीं आपल्यापासून दूर रहावयाचे नाहींत; परंतु अद्यापि त्यांचा पत्ता नाहीं हेंही एक त्यांच्या काळजीला कारण झालें होतें. आणि प्रस्तुत प्रसंगीं इतर सर्व विचारांबरोबर ह्याही एक चिंताविचार त्यांच्या मनांत एकसारखा येत होता. त्यांनीं आपल्या त्या माणसांचें काय झालें याच्या शोधाकरितां पुष्कळ खटाटोप केला, परंतु ते कोठें गेले आणि त्यांस शत्रूनें पकडलें किंवा काय याचा कांहींच उलगडा होईना. एकंदरींत सर्व बाजूंनीं आतां आपण माघार घेतली पाहिजे असा प्रसंग आला आहे कीं काय असें त्यांस वाटूं लागलें. असा प्रसंग आला असल्यास आपण काय करावें ? एकदम तहाचें बोलणें लावावें तर जयसिंग तें कबूल करीत नाहीं. सर्व प्रकारें आपण शरण आलों असें ह्मणून सुद्धां निभणार नाहीं. सर्व मुलूख त्यांच्या स्वाधीन करावा लागेल, असेंही त्यांचे मनांत आलें. अशा स्थितींत त्यांस कांहीं सुचेनासें झालें. आणि असें कांहीं सुचेनासें झालें ह्मणजे ते आपल्या एकांत स्थलीं जाऊन बसत. त्याप्रमाणें ते बसले होते. रघुनाथपंडित स्वतः अद्यापि परत आले नव्हते, परंतु जयसिंगराजांची व आपली प्रथम भेट झाली तेव्हां जो प्रकार झाला तो त्यांनीं मुद्दाम लिहून जासुदाबरोबर थैली पाठविली होती. ती थैली त्यांनीं नुकतीच वाचली होती. मुरार बाजीनें एवढा पराक्रम करूनही पुरंदर शत्रूच्या स्वाधीन करावा लागला हें दुर्वृत्तही त्यांस नुकतेंच समजलें होतें. पुरंदर पडल्याच्या बातमीनें त्यांचें मन इतकें खिन्न झालें नसतें, परंतु रघुनाथपंडितांच्या पत्रानें ती खिन्नता फार वाढविली. अशा स्थितींत त्यांचा नेहमींचा प्रघात असा असे, कीं आई भवानीला शरण जाऊन तिचे चरण धरावयाचे. तसें केलें, कीं

त्यांस बहुतकरून योग्य तो दृष्टांत व्हावयाचा आणि त्या दृष्टांताच्या द्वारें जें हितकारक व कल्याणकारक तेंच करण्याविषयींची स्फूर्ति व्हावयाची अशी त्यांची श्रद्धा असे. त्याप्रमाणें आतां करण्याचा त्यांचा विचार होता. त्यांनीं तो पंताकडून आलेला कागद मान्याच्या ओळी सोडून एकवार आपल्याशींच वाचला.

" आज्ञा घेऊन चरण सोडून आलों तों वाटेंत जें काय दिसलें त्यावरूनच अशी वृत्ति झाली, कीं राजे मिर्झा हे पूर्ण निश्चय करून इकडे आले आहेत, त्या निश्चयाचा भंग होणें अगदीं कठिण. वाटेंत कोणी एक रजपूत शिपाई भेटला त्यानें भाषण केलें त्याजवरून असें दिसलें, कीं आजपर्यंत अनेक प्रसंगीं बादशहाची सेवा केली, त्या सेवेला मागें सारील अशा प्रकारची सेवा केली असें बादशहाच्या प्रत्ययीं आणून देऊन आपली लढाई करावयाची असा मनसोबा राजे यांनीं दृढ धरिला आहे. तहाचें बोलणें लावावयाचें झाल्यास सर्व मुलखाची मालकी आपली, असें ठरवून घेऊन लाचारीस आणून नंतर काय करणें तें करावयाचें. मी राजांच्या छावणीशीं जातांच वर्दी पोंचते न पोंचते तों निरोप आला, कीं सर्व मुलूख दरोबस्त सोडला. आतां आमची अशी एक यवभरही जागा नाहीं असें कबूल करण्याचें ठरलें असें कळलें तर पुढें आपले आमचे भेटीचा योग आणण्याचा विचार पाहूं. तोंपावेतों तो विचार मनीं सुद्धां धरूं नये. असा निरोप येतां मनास विषाद वाटला जे स्वामीस काय कळवावें ? समक्ष भेट घेऊन दोन शब्द बोलते तर खुलासा करण्यास सवड तरी लाभती; परंतु त्या बाबतींत बोल बोलूं देईनात. रुमालानें हात बांधून आधीं शरण यावें. सर्व किल्ले व ठाणीं यांवरील दरोबस्त आपले पहारे काढून आमचे बादशाही पहारे बसवूं द्यावे, तर पुढें तह वगैरेसंबंधानें काय बोलणें बोलावयाचें तें बोलण्याविषयीं पाहूं, असा त्यांचा मोठा कडेकोट मनसोबा दिसतो. अशा स्थितींत भाषण तरी काय करणार आणि भाषणाचा उपयोग कसा होणार? अशाविषयीं मी मोठ्या काळजींत पडलों आहें. आपलेकडील कोणी इसम हेर ह्मणून पकडून ठेविले आहेत असेंही कानीं आलें आहे. इसम कोण असावे त्याचा पत्ता अद्यापि लागला नाहीं. शोधांत आहे. काम मोठें कठिण आहे; परंतु कांहीं तरी मुलूख सोडून आमिष दाखविल्याखेरीज वळेल असा रंग दिसत नाहीं. समक्ष पडलियावर आमचा मनसोबा कळवितों तो ध्यानीं आणोन मग पुढें काय तें सांगावें असा निरोप पाठविला असतां समक्ष गांठीचे आधीं सर्व मुलूख मोकळा केला पाहिजे हीच अट आहे. असा उलट निरोप आला, तेव्हां आतां काय करावें कांहीं सुचत नाहीं. पुनः एकवार प्रयत्न करून पाहूं असें ह्मणतों; परंतु एकंदरींत यशाचा रंग दिसत नाहीं. चित्तास परम खेद होतो, कीं अविंधांची नौकरी करून गोब्राह्मणांच्या प्रतिपालकाचे कामीं विघ्न करण्याविषयीं राजांनीं इतकें उत्सुक असावें याला काय ह्मणावें ? अधिकोत्तर होईल तें पुढें कळवीतच आहें. सेवेसी विश्रुत होय. "

अशा प्रकारचें तें पत्र वाचून महाराजांस फार वाईट वाटलें, तर त्यांत नवल नाहीं हें उघडच आहे. महाराजांस असें झालें, कीं आपण आतां काय करावें ! आतां आई जगदंबेच्या दर्शनास जाऊन तेथें तिच्या चरणापाशीं आज्ञा मागावयाची असा त्यांनीं निश्चय केला व त्या निश्चयान्वयें ते प्रतापगडास जाण्याच्या विचारास लागले. शिवाजीमहाराजांनीं एखादा निश्चय केला, कीं तो अंमलांत आणण्यास त्यांस यत्किंचितूही वेळ लागत नसे. त्यांचे मनांत तो विचार येतांच ते उठले व लागलींच त्यांनीं नेहमीं आपल्या बरोबर जाणाऱ्यांस हुकूम सोडले. त्यांचेबरोबर नेहमीं चार माणसें असत. तीं चारही अर्थातच ताबडतोब तयार झालीं. तेथें काय घोड्यावर स्वार होण्याचा अवकाश ! स्वाऱ्या लागलीच निघाल्या. वाटेनें त्यांनीं आपल्याबरोबरच्या माणसांशीं एक शब्दसुद्धां भाषण केलें नाहीं. अलीकडे अलीकडे त्यांची मंडळी त्यांस असें बजावी, कीं आपण एकटे किंवा थोड्या मंडळीस बरोबर घेऊन कोठें जाऊं नये. न जाणों काय प्रसंग येतो आणि काय नाहीं. एखादे वेळीं मोगल सैन्याच्या एखाद्या टोळीनें जर आपणास कोठें पाहिलें तर काय होईल ! आपणांस त्यांनीं घेरलें तर सर्व कांहीं संपलें. मग राहिलें काय ! जें काय करण्यासाठीं ह्मणून ते आले आहेत, तेंच आयतें साधलें असें झालें. तेव्हां सध्यांच्या प्रसंगीं आपण जितकें हिंडणें फिरणें कमी कराल तेवढें चांगलें. परंतु शिवाजीमहाराज या त्यांच्या बोलण्याकडे कधीं लक्ष्य देत नसत. उलट ते असें ह्मणत कीं 'माझी मंडळी संकटांत पडली ह्मणजे मी पूर्वीं जसा वाटेल तें धाडस करून त्यांना सोडवण्याला धांवत असें त्याप्रमाणें आतां मला होत नाहीं याबद्दल फार दुःख होतें.' असें, ह्मणून ते एकदम काय जें करावयाला उद्युक्त होत असतील तें करीत असत. आज त्याचप्रमाणें त्यांनीं आपल्या लोकांस उत्तर दिलें आणि नेहमींप्रमाणें आपल्या त्या बरोबरच्या लोकांस घेऊन ते चालूं लागले.

राजगडापासून प्रतापगडापर्यंत जातांना त्यांनीं जे अनेक प्रकार पाहिले त्या प्रकारांनीं त्यांचे मनास फार उद्वेग झाला. सभोंवार किती खेडीं उध्वस्त झालीं होतीं ! किती शेतांचा पार विध्वंस झाला होता ! एकंदर सृष्टि किती उदास झाली होती !

महाराजांची चित्तवृत्ति अत्यंत उदास झाली. आपण ज्याकरितां इतके कष्ट करितों तें शुद्ध तरी आहे काय अशी त्यांच्या मनास शंका आली. इतका सगळीकडे नाश होतो आहे, हजारों लोकांचे प्राण बळी पडताहेत, हजारों घरें उध्वस्त होताहेत हजारों कुटुंबें दुःखांत बुडताहेत, असल्या प्रकारच्या या लढाया मी मारतों आहें, परंतु हें सारें ज्या हेतूनें, ज्या आशेनें मीं आरंभिलें आहे, ज्या हेतूनें एवढ्या हत्येकडे मी कानाडोळा करतों आहें, तो हेतु तर पूर्ण होण्याचा रंग दिसत नाहीं. त्याला आमचीं आमचींच माणसें आड येतात. ज्या मोगलांच्या जुलुमांतून आपल्या लो-

कांना सोडवण्याला मी एवढी खटपट करतों आहें तो आमच्यावर आणून त्याचा कहर करणारे कोण आहेत? तर आमचींच माणसें. ज्यांनीं आपापल्या परीनें त्या जुलुमाचें जूं झुगारून दिलें पाहिजे, तेंच तें जूं आपलें मोठें भूषण ह्मणून धारण करून आमच्यासारख्यांना आपल्या पंक्तीला नेण्याला धडपड करताहेत! काय हा चमत्कारिक, विपरीत काळ आहे! हे जसवंतसिंग झाले, जयसिंग झाले, यांनीं मुसलमानांचें राज्य फैलावण्यासाठीं धडपड करून जे त्याचा फैलाव होऊं नये ह्मणून खटपट करिताहेत त्यांना दडपून टाकण्यासाठीं प्राण टाकावे या विचित्र स्थितीला ह्मणावें तरी काय? यांच्या अंगांत कुवत नाहीं ह्मणावें, तर यांच्या कुवतीवरच तर बादशहाची सारी भिस्त! यांना मनुष्यबळ नाहीं ह्मणावें, तर हा सेनासमुद्र—हें सारें मोगलांचें सैन्य ह्मणजे कोण आहेत? यांत बादशहाच्या जातीचे, त्याचे भाईबंद असे किती निघतील! हे स्वतः आमचे, यांचे सैन्यांतले लोक आमचे, ज्या गोष्टीकरितां आह्मी इतकी धडपड करतों ती गोष्ट कांहीं यांना इष्ट नाहीं असें नाहीं. ती जितकी मला इष्ट वाटते, तितकी यांनाही इष्ट वाटत असेल यांत शंकाच नाहीं. स्वतः आपण बादशहा होण्याचें मनांत आणलें तरी यांना अशक्य नाहीं. पण स्वतः या धर्मछळ करणाऱ्या औरंगजेबापुढें माना वांकवून आमच्या मानेवर पाय देण्यासाठीं हे प्रतिज्ञा करून इकडे येतात, आणि असा धुमाकूळ करितात याला काय ह्मणावें? याबद्दल यांच्या मनाला कांहींच कसें वाटत नाहीं? जें फार मोठें दूषण असें मला वाटतें तेंच यांना फार मोठें भूषण वाटून हे अंगावर धारण करितात, तेव्हां दैवाची गति विचित्र ह्मणून स्वस्थ बसावें. दुसरें काय? पण हे स्वस्थ तरी कोठें बसूं देतात? हे अलमगीरचें जूं आपल्या मानेवर घेऊन दुसऱ्यांचीही मान त्या जुंवाखालीं देण्याच्या प्रतिज्ञा करून धडपड करितात. कोणीकडे दक्षिण, कोणीकडे दिल्ली. परंतु नसत्या गोष्टींचा अभिमान धरून इकडे येऊन आह्मांला आपल्यासारखे होण्याची धडपड करताहेत, याचें फार नवल वाटतें. यांना आतां टाळणार कसे? न टाळावे, तर हे असेच धुमाकूळ माजवीत रहाणार. कधीं सोडणार नाहींत. आतांपर्यंत अनेक विघ्नें आलीं तीं आई भवानीनें पार केलीं. सर्व गोष्टींत यश दिलें. जें करावयाला गेलों त्यांत अपयश आलें नाहीं. पण या खेपेचा रंग बरोबर दिसत नाहीं. एकामागून एक अशींच चिन्हें दिसताहेत, कीं आपल्याला माघार घ्यावी लागणार. समजा घेतली, तर ती जाणार तरी कोठवर? जें काय आतांपर्यंत केलें, त्या साऱ्यावर विरजण पडणार? पुनः पहिले पाढे पढो पंचावन असें होणार? कीं पुनः पाढे पढण्याचीच पंचाईत पडणार?

या प्रकारचे मनाला अत्यंत उद्वेग उत्पन्न करणारे विचार महाराजांच्या मनांत आज या प्रसंगीं वावरूं लागले. त्यांना पुढचा रस्ता साफ दिसेना. दूरच्या प्रवासास निघावें आणि अर्ध्या वाटेंतच मोठें थोरलें वावटळ सुटून सगळें आकाश काळ्याभोर ढगांनीं व्यापून सूर्यप्रकाशाची तिरीप सुद्धां कोठें दिसूं नये; अर्थात् दूर पाऊल टा-

कावयाचें तें कोठें पडतें आहे याच्याबद्दल मनांत भीति वाटत रहावी, तसाच या वेळीं प्रकार झाला आहे असें त्यांस स्पष्ट दिसलें; पण आशा कोठें सुटली आहे! आशा-विद्युल्लतेनें थोडथोड्या प्रकाशलहरी माराव्या आणि चार पावलें पुढें जाण्यास उमेद यावी. तसाच प्रकार चालला होता. या प्रकारानें किती निभणार? ढग नाहींसे होऊन पुनः प्रकाश पडण्याचा संभव तरी किती जवळ अगर लांब आहे हें तरी एकदां आई भवानीच्या समीप जाऊन पाहून घ्यावें, त्याखेरिज आतां उपाय नाहीं, असें मनाला पक्कें वाटून स्वारी चालली होती.

प्रतापगडाचें भव्य स्वरूप नजरेस येण्याबरोबर त्यांस एके प्रकारें समाधान वाटलें. मनावरचें ओझें दूर झालें. गडावर जाऊन ते जगदंबेच्या समोर गेले. त्यांचे बरोबर असलेल्या माणसांत त्यांचे लेखक महास्वामीभक्त बाळाजी आवजी हे बरोबर होतेच. त्यांस त्यांनीं बाहेर बसवून नित्याप्रमाणें खूण झाली, कीं आपण आंत येऊन काय उच्चार होतील ते टिपून घ्यावे म्हणून सांगून ठेविलें. भवानीमातेच्या आज्ञेकरितां महाराज भवानीच्या सन्निध जात. तेव्हां दोन प्रकार असत. एक प्रकार असा होता, कीं नुसतें भवानीपुढें बसून तिच्याकडे अचल दृष्टि देऊन पहातां पहातां तादात्म्य करून घेऊन काय शब्द निघतील ते चिटणिसाकडून टिपून घ्यावयाचे. याप्रकारें जेव्हां अंबासंचार होई, तेव्हां दुसरे कोणी जवळ असलें तरी हरकत नसे; परंतु जेव्हां प्रसंग फार दुर्धर असें महाराजांस वाटत असे; तेव्हां ते भवानीमंदिरांत अगदीं एकटे जात. मंदिराचीं कपाटें लावून घेत. नंतर आपल्या अंगावरलीं वस्त्रें उतरून हस्तपादादि प्रक्षालन करून आपली तलवार जिला भवानीप्रमाणेंच ते वंद्य व पूज्य मानीत ती उघडी करून आपल्या बाजूला हाताच्या आटोक्यांत येईशी ठेवीत. मग जगदंबेच्या अगदीं जवळ जाऊन बसत. बसतां बसतां त्यांस गुंगी आल्याप्रमाणें होई. डोळे आपोआप मिटत आणि त्यांचें मस्तक अगदीं सहजपणें अंबेच्या चरणीं लीन होऊन ते डोकें टेंकीत. क्वचित् पूर्ण लय लागून त्यांस अगदीं गाढ निद्राही लागे व त्या निद्रेंत काय ते दृष्टांत-स्वप्नदृष्टांत-होत. या स्वप्नदृष्टांतांत ते केव्हां केव्हां मोठ्यानें बोलत. तसें बोलणें सुरू झालें, कीं चिटणिसांनीं कपाटें उघडून येऊन बसून काय शब्द कानीं पडतील ते टांचावयाचे व महाराज जागृत होऊन अंबाचरणांपासून उठले, कीं त्यांस ते शब्द वाचून दाखवावयाचे. असे शब्द वाचून दाखविले, कीं महाराजांच्या समाधि अवस्थेंत त्यांस जें दिसलें असेल, त्याच्या अनुषंगानें ते आपले स्वतः अर्थ लावीत. त्या शब्दांचा दुसऱ्या कोणासही अर्थ लागत नसे. आजच्या प्रसंगीं जिजाबाईसाहेब या प्रतापगडावरच होत्या, तेव्हां महाराज प्रथम जिजाबाईसाहेबांच्या सन्निध गेले व त्यांस त्यांनीं आपण अंबेच्या चरणीं पडून समाधि लावणार म्हणून सांगितलें. प्रसंग दुर्धर होता तेव्हां तसें केलेंच पाहिजे हें जिजाबाईसाहेबांस दिसतच होतें. त्यांनीं आशीर्वाद दिला. नंतर महाराज शुचिर्भूत होऊन

एकटेच मंदिरांत गेले. भवानी तलवार तिच्या म्यानांतून काढून त्यांनीं हाता-त्या आटोक्यांत ठेविली आणि तोंडानें कांहीं बीजमंत्र ह्मणत ह्मणत ते अंबेच्या चरणीं लीन झाले. त्यांची समाधि गाढ लागली आणि त्या समाधींत त्यांस भवानीनें दृष्टांत दिला. स्वप्नांत भावि सर्व प्रकार दर्शित केला. तें स्वप्न त्यांनीं पुढें जिजाबाईसाहेबांपाशीं निवेदन केलें. त्याचें वर्णन थोडक्यांत येथें वाचकांस देतों.

महाराजांस असें दिसलें, कीं आपण फार घनघोर अशा अरण्यांत शिरलों आहों. तेथें प्रचंड वादळ सुटलें आहे. असलें प्रचंड, कीं त्या अरण्यांतला वृक्षनू वृक्ष तर काय, परंतु झुडुपनू झुडूप अगदीं हादरून जमीनदोस्त होत चाललें आहे. अर्थातच त्या सर्व झाडाझुडुपांच्या आश्रयानें राहिलेल्या गरीब हरिणांची आणि इतर असंख्य गरीब प्राण्यांची फार भयंकर त्रेधा उडून गेली. कोणीकडे गेलों असतां या भयंकर संकटांतून आपण सुरक्षित राहूं हें त्यांस समजेना. आणि तीं घाबरून सैरावैरा धांवूं लागलीं. इतक्यांत त्या रानांतले वाघ लांडगे वगैरे हिंस्र पशूही उठले. इतरांबरोबर त्यांस वादळापासून फार भय वाटतच होतें. परंतु त्यांतल्या त्यांनीं गरीब प्राण्यांचा विनाकारण संहार आरंभला. स्वतःच्या जीवाचें रक्षण करतां करतां गरीब प्राण्यांच्या जीवांचे विनाकारण बळी घेण्याचा सपाटा त्यांनीं चालविला. या सपाट्यांत अर्थातच कित्येक प्राणी मेले. आणि बाकीच्यांची त्रेधा उडाली. हा सर्व प्रकार फक्त महाराज काय ते पहात होते. दुसरा कोणी मनुष्य प्राणी तेथें नव्हता. महाराजांच्या स्वतःच्या जीवाला धोका होताच. परंतु त्या निरुपद्रवी प्राण्यांचा असा हा दुहेरी संहार चाललेला पाहून त्यांस अगदीं भडभडून आलें. इतक्यांत काय चमत्कार झाला. एक लहानसा गाईचा कळप असाच अगदीं घाबरून गेलेला असा तेथें आला. तो गाईचा कळप थरथरा कांपत होता. त्या कळपांत आतां पांच सहा वाघ व दहा बारा लांडगे शिरले व त्यांचा त्यांनीं फन्ना सुरू केला. तें दृष्टीस पडतांच महाराजांस देहभान राहिलें नाहीं. ते एकदम आपली तलवार उपसून पुढें सरसावले. आणि आपल्या जिवाकडे मुळींच न पहातां त्यांनीं त्या गाईचें संरक्षण करण्यासाठीं धांव घेतली. हा वीर पुरुष एकदम कोण आला आणि काय करतो आहे याचें आश्चर्य वाटून ते हिंस्रपशु एकदम स्तब्ध झाले, त्यांपैकीं कित्येकांचा महाराजांनीं पूर्ण समाचार घेतला, एक भला थोरला पटाईत वाघ ठार केला व एक लांडगा तोडला. कित्येक वाघ व लांडगे तेथून पळून गेले. इतक्यांत वादळही बरेंच शांत झालें. तर आकाशांतील ढग नाहींसे होत चालले. आकाश निवळत चाललें. होतां होतां रात्र उलगडली. दिशा प्रसन्न झाल्या. आणि सूर्याचा उदय होऊन जिकडे तिकडे शांत रमणीय दिसूं लागलें. परंतु ही स्थिति फार वेळ टिकली नाहीं. पुनः पहिल्याहीपेक्षां जोराचें वादळ होतें कीं काय असा रंग दिसूं लागला. पुनः आकाशांत ढग गोळा होऊं लागले. सूर्यनारायण देदीप्यमान असा आकाशांत तळपत असतां त्याची

कांति ग्रस्त होते कीं काय असें वाटूं लागलें. एखाद्या सत्पुरुषाला नीच पुरुषांनीं वेष्टिल्याप्रमाणें सूर्यनारायणाच्या सभोंवार ढगांनीं वेढा घातला. त्याच्या मुखावर मात्र ते अद्यापि आले नव्हते. अंधार अधिकाधिक वाढत चालला. शेवटीं सूर्य-नारायणासही मेघांनीं झांकलें. तो दिसेनासा झाला. पुनः हिंस्रपशु आपापल्या गुहांतून बाहेर आले. हरिणादिकांसारखे गरीब प्राणी सैरावैरा धांवूं लागले व त्यांच्यामागें वाघ, लांडगे, अस्वलें वगैरे पशु लागले. पुनः सर्व सृष्टीचें रूप अगदीं उदासवाणें झालें. महाराज हा सर्व देखावा एकटेच पहात होते. त्यांचें अंतःकरण पुनः दयेनें उचंबळूं लागलें. इतक्यांत पुनः गाईचा एक कळप दृष्टीस पडला. त्या कळपांत एक सिंह आणि एक वाघ शिरला असून त्यांनीं त्या गाईचा संहार सुरू केला. महाराजांस अर्थातच आतां रहावेना. तेव्हां त्यांनीं पुनः आपली समशेर उपसली व ते त्या कळपांत शिरले. त्यांनीं आपली समशेर चालू केली. परंतु तितक्यांत सिंहानें व वाघानें त्यांच्यावर मोर्चा फिरविला. आणि काय चमत्कार महाराज पहातात, तों त्यांची समशेर कोणीकडे गेली. त्यांचेजवळ एकही आयुध राहिलें नाहीं. आपलीं हत्यारें ते शोधूं लागले तों वाघानें त्यांचा एक बाहु व सिंहानें दुसरा बाहु पकडला. आणि त्यास लांब ओढीत नेलें.

---

# प्रकरण २५ वें.

## स्वप्न व त्यानंतर.

वास्तविक म्हटलें म्हणजे ते दोघे प्राणी आपापसांत भांडून त्यांनीं महाराजांच्या अंगाचे वाभाडे काढावयाचे. त्याप्रमाणें वाघाचा हेतुही दिसला; परंतु सिंहाचा हेतु तसा दिसला नाहीं. त्यानें महाराजांस ओढून दूर एका गुहेंत नेलें. वाघाचें कांहीं चाललें नाहीं. त्या गुहेंत दुसरा एक वृद्ध वाघ मध्यभागीं बसला असून त्याच्या सभोंवतालीं बरेचसे वाघ, कांहीं लांडगे व कांहीं सिंह असे बसले होते. या मनुष्याला त्या वाघानें व सिंहानें ओढून आणलें असें पहाण्याबरोबर त्या दरबारांत एकदम मोठा जयघोष व हर्षमर्ष झाला. ज्यांना त्या आनंदांत मिळूं नये असें वाटून जे स्वस्थ बसले, असे पांच चार सिंहच असले तर असतील. अद्यापि सूर्यप्रकाश अगदीं लुप्तच होऊन राहिला होता. अर्थात् सर्व प्रकार त्या प्रलयांधकारांत चाललेला होता. या मनुष्यास पाहून त्या वृद्ध व्याघ्रासही फार संतोष

झाला असें दिसलें. परंतु त्याच्या चेहेऱ्यावर त्याची यत्किंचितही छटा दिसून आली नाहीं. त्यानें त्या मनुष्यास आणणाऱ्या व्याघ्राकडे व सिंहाकडे शाबासकी दिल्याच्या दृष्टीनें एकवार पाहिलें आणि 'या माणसास मानमरातबानें वागवा पण नजरकैदेंत ठेवा' असा एकदम हुकूम दिला. तो हुकूम ऐकून सर्वांस मोठा अचंबा वाटला; परंतु एक शब्द उच्चारण्याचें कोणाचें धैर्य होणार होतें! लागलींच हुकूम अंमलांत आला. महाराजांस पुनः त्या पूर्वींच्याच सिंहानें हळूच कांहीं आश्वासन दिलें आणि ते दाराबाहेर पडले. परंतु त्या आश्वासनाचा कांहीं उपयोग झाला नाहीं. महाराजांस एका गुहेंत नेऊन ठेविलें आणि तिच्या दाराशीं कितीतरी वाघ व कोल्हे पहाऱ्यावर बसविले. मग काय विचारतां! महाराजांस फार खेद झाला. आपण या वाघांच्या व सिंहांच्या तावडींत सांपडलों, तेव्हांच थोडा बहुत दंगा करून निसटून गेलों असतों म्हणजे येथपर्यंत पल्लाच आला नसता. परंतु आतां काय करणार! महाराज मोठ्या विवंचनेंत पडले व त्या समाधिस्थितींतल्या स्वप्नांत त्यांना असें वाटलें, कीं आपण आपल्या परिपाठाप्रमाणें अंबेला शरण जाऊन तिचा धांवा करावा. त्याप्रमाणें त्यांनीं केलें, तों त्या स्वप्नांत त्यांची पुनः समाधि लागली व तींत त्यांनीं असें पाहिलें, कीं आकाश निरभ्र होण्याच्या मार्गाला लागलें. सूर्याला वेढणाऱ्या ढगांनीं आपलें वेष्टण कमी केलें. त्याचें मुखपटल अगदीं स्वच्छ व तेजस्वी दिसूं लागलें. थोड्याच वेळांत आकाश अगदीं स्वच्छ दिसूं लागलें. ढगाचा नायनाट झालाला दिसला. सूर्य पुनः महातेजस्वी दिसूं लागून जिकडे तिकडे आनंदच आनंद होऊन गेला. सूर्याचें खग्रास ग्रहण सुटलें ह्मणजे जसा सगळ्या चराचर सृष्टीला आनंदच आनंद होऊन जातो, त्याप्रमाणें यावेळीं झालें. पुन्हा भवानीमातेच्या चरणापाशीं आपण येऊन पडून राहिलों आहों, माता आपल्यास हातांनीं उचलून आपल्या मस्तकावर हात ठेवून "वत्सा, तूं जो कांहीं प्रकार पाहिलास, असा प्रकार झालाच पाहिजे असा नेमानेम आहे. त्यांत तुला जी कांहीं भ्रांति आहे तीही दूर होईल. तूं चिंता करूं नको. जो प्रकार पाहिलास तो नीट ध्यानांत धरून त्याचा आपल्या मनाशींच अर्थ कर." असें ह्मणाली. नंतर बराच वेळ गेला. नेहमींपेक्षां आज महाराजांना फारच वेळ लागला असें पाहून चिटणिसांनीं कपाट ढकलून पाहिलें तों अद्यापि महाराज अंबेच्या चरणावर डोकें टेंकूनच पडले आहेत. महाराजांची समाधि फारच गाढ लागली आहे. आतां आपण येथें बसलें पाहिजे ह्मणून ते दूर जेथें बसावयाचें तेथें बसले आणि लक्ष्य लावून महाराजांकडे पाहूं लागले. परंतु महाराजांची चर्या मुळींच दिसत नसल्यामुळें त्यांस कांहींही विशेष दिसलें नाहीं. महाराजांस आज कांहीं तरी विशेष दृष्टांत होत असावा असें स्पष्ट दिसून आलें; अर्थात् आपणास बरेंच कांहीं तरी टिपून घ्यावें लागेल असेंही त्यांस वाटलें. ह्मणून ते चित्त देऊन ऐकूं लागले. परंतु कांहीं नाहीं. किती-

ही कान देऊन बसलें तरी काय उपयोग ? कांहीं नाहीं. शेवटीं हा प्रकार आहे तरी काय हें त्यांचें त्यांस समजेना. इतका वेळ महाराज कधींच असे पडून नसत. चिटणिसांच्या भक्तिमय अंतःकरणांत असेंही वाटलें कीं न जाणों कांहीं अपघात तर झाला नाहीं ? त्यांनीं जवळ जाऊन पुनः कान देऊन पाहिलें तों कांहीं नाहीं. समाधि लागली आहे तशीच लागली आहे. त्यांनीं आणखी कांहीं वेळ जाऊं दिला आणि शेवटीं जिजाबाईसाहेब यांना बोलावण्याच्या विचारास लागले. ते जिजाबाईसाहेबांकडे जाऊन त्यांनीं त्यांस चाललेला प्रकार निवेदन केला. जिजाबाईसाहेबांसही फार आश्चर्य वाटलें. त्या लागलींच भवानीमंदिरांत गेल्या. महाराजांच्या जवळ गेल्या. त्यांनीं लवून कानोसा घेतला. कांहीं हाल नाहीं चाल नाहीं कीं श्वासोच्छ्वाससुद्धां नाहीं. त्याही थोड्या घाबरल्या. नंतर ह्मणाल्याः ‘कांहीं तरी विशेष दृष्टांत होत असेल, त्या-खेरीज असा प्रकार व्हायचा नाहीं. काय प्रकार आहे तो मी पहातें. थोडा वेळ वाट पाहूं. ’ परंतु त्या माउलीला धीर कोठला निघावयाला ! ती पुनः पुनः वांकून पाही. आपली इतकी चाहूल असूनही जेव्हां कांहीं जागृति येत नाहीं, तेव्हां आतां आपण हात लाऊन हांक मारून पाहिलेंच पाहिजे असें तिच्या मनानें घेतलें व त्या पुढें झाल्या. त्यांनीं महाराजांच्या मस्तकास हात लाविला. अगदीं तोच क्षण त्याच क्षणीं महाराजांच्या समाधींतही अंबा भवानी आपल्या पीठावरून खालीं तरून त्यांच्याजवळ येऊन त्यांच्या मस्तकावर हात ठेऊन त्यांस वर सांगितल्या-प्रमाणें आश्वासन व आशीर्वचन देत होती. जिजाबाईसाहेबांचा प्रत्यक्ष हात राजांच्या मस्तकावर होता आणि त्यांस दृष्टांतांत अंबा भवानीनें आपला हात त्यांच्या मस्तकावर ठेविला आहे असें स्पष्ट भासत होतें.

असा प्रकार झाल्यानंतर—प्रत्यक्ष आपल्या मातेचा व दृष्टांतांत जगाच्या जननीचा असे दोनही हात मस्तकावर असतांनाच—महाराजांची समाधि उघडली. त्यांनीं नेत्र उघडले तों आपली आई आपल्यासमोर उभी असून तिनें आपल्या मस्तकावर हात ठेवला आहे असें त्यांच्या दृष्टीस पडलें. दृष्टांतांत पाहिलेल्या प्रकारामुळें आलेली खिन्नता एकदम नाहींशी झाली आणि ते आपल्या मातुःश्रीच्या त्या तेजस्वी, प्रेमपूर्ण व धीरोदात्त मुखाकडे पाहून किंचित् हंसले. त्यांस फारच संतोष झाला आणि ते एकदम ह्मणालेः “ आईसाहेब, जें जगदंबेनं दृष्टांत देऊन केलं तें आपण आतां प्रत्यक्ष करतां आहां. उगीच नाहीं आह्मी आपल्याला ... पण तें मी कशाला बोलूं ? आज कांहीं शब्दांचा उच्चार झाला काय चिटणीस ? मला नाहीं वाटत झाला असावासं. ”

“ नाहीं. आजच्यासारखी स्तब्ध समाधि कधींच आह्मांला दिसली नाहीं. एक शब्द सुद्धां महाराजांच्या मुखांतून निघाला नाहीं. मी आल्यापासून तर कांहीं नाहीं. महाराजांनीं नुसता उसासा टाकला नाहीं, मग शब्दाची गोष्ट कुठली !

मग महाराजांना दृष्टांत काय झाला असेल तो खरा. प्रसंग तर मोठा बिकट आला आहे. त्यांतून पार पाडण्याला अंबाबाई समर्थ आहेच. "

महाराज त्यावर कांहीं वेळ कांहीं बोलले नाहींत. नंतर आपल्या मातुःश्रीकडे पाहून ह्मणतातः " आईसाहेब, आजचा जो काय दृष्टांत झाला तो समग्र आपल्याला सांगितला, कीं काय स्थिति आहे ती आपल्याला समजेल. चिटणिसालाही समजायला कांहीं हरकत नाहीं. पण माझ्या मनाची स्थिति कांहीं चमत्कारिक झाली आहे. मीं जें जें काय पाहिलें तें तें आपल्याला सांगतों. मग त्याचा अर्थ आपण तेव्हांच बसवाल. "

इतकें बोलून वर सांगितल्याप्रमाणें आपल्या समाधिस्थितींत जें काय नजरेस पडलें तें सर्व त्यांनीं जिजाबाईसाहेबांस निवेदन केलें. त्यांनीं तें ऐकलें आणि त्या स्तब्ध बसल्या. बराच वेळ गेला तेव्हां त्या ह्मणतातः " बाळा शिवाजी, प्रसंग तर मोठा दुर्धर आहे. पण या दृष्टांताचा अर्थ काय ? काय तुला हे दोघे —हा जयसिंग आणखी हा दिलीर—त्या स्वप्नांतल्या दृष्टांतांतल्या सिंहाप्रमाणें आणखी वाघाप्रमाणें धरून ओढीत नेणार ? कुठें नेणार ? जो काय मला अर्थ सुचतो तो हाच. दुसरा कांहीं नाहीं. हे तुझा जिकडे तिकडे पराभव करणार. ज्यांचें आजपर्यंत तूं रक्षण केलेंस त्यांना हे अगदीं त्राही त्राही करून सोडणार. त्यांना आतां हे लोक छळणार. सगळा देश उजाड करणार आणखी हें सगळें तुझ्या देखत घडून तुला शेवटीं ते कैद करणार. हा या सगळ्याचा अर्थ दिसतो. याहून दुसरा अर्थ कांहीं नाहीं."

जिजाबाईसाहेबांचें हें बोलणें चाललें असतां महाराज सचिंतपणें नुसतें त्यांचें भाषण ऐकून घेत होते. त्यांस स्वतःस त्यांत कांहीं सुचेनासें झालें असावें असें दिसलें. जिजाबाईसाहेबांनीं जो अर्थ केला, याखेरीज दुसरा अर्थच संभवत नव्हता. आणि त्यामुळें या अर्थाप्रमाणें होणार अशाबद्दल त्यांच्या मनास खात्री वाटून त्यांस फार वाईट वाटूं लागलें. इतके दिवसपर्यंत आपण जें स्वराज्यमंदिर बांधीत बांधीत आणलें त्याला आतां शिखर लावण्याची संधि आलेली, आणखी या संधीला तें मंदिरच ढांसळण्याची भीति उत्पन्न व्हावी ? छे. छे. हा प्रकार कांहीं चांगला नाहीं. आपण हा प्रकार होऊं देतांच उपयोगी नाहीं. आपण कांहीं तरी करून या जयसिंगाला एकवार गांठून त्याचें मन वळविलें पाहिजे. कितीही झालें तरी तो हिंदू आहे. वेद प्रमाण धरणारा आहे. गोवधाचा द्वेष्टा आहे. तो आपल्या भाषणाच्या आवाक्यांत जर का एकदां आला, तर आपलें कामच झालें. असा माणूस सांपडला, आणि निसटून गेला असा प्रसंगच कधीं आला नाहीं. तेव्हां त्याच्याकडे पुन्हां पंडितांना पाठवून पुन्हां भेटीची इच्छा त्याला दर्शवावी. ह्मणजे पुनः कदाचित् बीं रुजलें तर रुजेल. असा विचार त्यांच्या

मनांत येऊन तो आपल्या मातुःश्रीजवळ त्यांनीं सांगितला. त्यांनाही तो विचार पसंत पडला. परंतु तो सिद्दीस जाण्याबद्दल त्यांस फारच शंका वाटूं लागली. बाळाजी आवजी मध्यें हळूंच महाराजांस ह्मणतात, "सरकार, आपण उभयतांनीं अर्थ केला तो अक्षरशः बरोबर आहे. पण पंतांना पाठवून त्यांच्यापासून कांहीं उपयोग होईल असं वाटत नाहीं. आपल्याला आतांपर्यंत ज्या बातम्या आल्या आहेत, त्या बातम्यांवरून पहातां कोणत्याही बाबतींत आपलं ह्मणणं ऐकायचं नाहीं असा जयसिंगाचा निश्चय दिसतो आहे. तो अशी प्रतिज्ञा करून आला आहे, कीं विजापूर किंवा मोगल या दोघांच्या अमलांतला जेवढा ह्मणून प्रांत आपण स्वराज्याला सामील केला आहे, तेवढा सगळा प्रांत ताब्यांत घ्यायचा, आपल्या वडिलोपार्जित जहागिरा आणखी इनामं खालसा करायचीं आणि मग आपल्याला गिरफदार करून दिल्लीला घेऊन जायचं. यांतलं एक रतिभर कांहीं कमी होऊं द्यायचं नाहीं. बादशहाच्यापुढें आपल्याला नेऊन उभें केल्यानंतर मग तो काय वाटेल तें आपलं करो. पण त्याला भलतं सलतं कांहीं एक करूं द्यायचं नाहीं अशी ते आपल्या बोलण्यांत खात्री देताहेत. जणूं काय बादशहा अलमगीर यांच्या सूत्रांनीं हलणारं कळसुत्री बाहुलं आहे. आपल्याला बादशहाच्या समोर नेऊन उभं करीपर्यंत ठीक आहे; परंतु आपल्याला त्या दुष्टानं एकदां गिरफदार केलेल्या स्थितींत पाहिलं ह्मणजे त्याला असं होईल कीं मी यांना काय करूं आणखी काय न करूं. मग तो यांना एक क्षणभर तरी विचारील काय ! आपल्यावर बादशहाचा मोठा विश्वास ह्मणून हे उड्या मारताहेत, पण बादशहाला पाहिजे तें काम साधलं ह्मणजे तो यांना आपल्या बाबतींत एका शब्दानं सुद्धां विचारायचा नाहीं. मग जे काय आपले हाल करायचे, ते निराळ्या माणसांकडून वाटेल तसे करवील. सोडायचा नाहीं. याचा आपण विचार करून जयसिंगराजाशीं काय बोलणं लावायचं तें लावावं. आपल्याला गिरफदार करण्याला त्याला सोपं जाईल अशाच अटी तो घालील. आमच्या बातमीदारानं आणलेल्या बातमीवरून तर असं दिसतं कीं तो आपला सगळा मुलूख आपल्या स्वाधीन करावा आणखी आपण रुमालांनीं हात बांधून त्याच्यापुढें जावं......... "

महाराजांनीं बाळाजीस पुढें बोलूं दिलें नाहीं. " चिटणीस, तो आपल्या मनांत काय वाटेल तें मांडे खावो. पण आपण थोडेच त्याला ते करून घालणार आहों. आपला जो धुडगूस चालला आहे तो चालायचाच. त्यांतल्या त्यांत जर त्याला आपल्या जाळ्यांत अडकवायलाच सांपडला तर पहायचं. तो आह्मांला गिरफदार करून नेणार, पण आपण झालं पाहिजे तेव्हां तो करणार कीं आं- ... च्छा एवढीच कीं त्याला एकदां समक्ष भेटून त्याच्याशीं चार गोष्टी ... याच्या मनांत आपला हेतु भरवून द्यावा. चिटणीस, यांच्या-

सारख्या माणसाला आमचा हेतु फार चांगला समजेल, आणखी त्यानंतर तो हेतु धरला तर आणखी हो काय पाहिजे. जें आह्मी इकडे करतों आहोंत तेंच तो तिकडे करायला लागला, तर हे मोगल—हा अलमगीर—क्षणभर तरी गादीवर ठरेल का ? पण नाहीं. त्याला कशी ती बुद्धिच नाहीं. त्याला वाटतं आहे आपण आपल्या मानेवर जें जूं घेतलं आहे, तें तर भूषण ह्मणून आपल्या खांद्याडोक्या-वर मिरवावं आणखी इतरांनीं कोणी आपल्याला नांवं ठेवूं नयेत ह्मणून आपण दुसऱ्यांनाही त्या सोन्याच्या जुंवाखालीं दडपून आणावं. ती त्याची वेडगळ, आ-त्मघाताची इच्छा काढून टाकली पाहिजे. ती गेली तरच आपल्या ह्मणण्याप्रमाणं त्याचा आपल्याला उपयोग होईल. मला फार फार वाटतं, वारंवार वाटतं कीं, आपण एकदां हिंदुस्थानांत जाऊन गुप्त वेषानं हिंडून यावं. आणखी लोकांचीं—या असल्या लोकांचीं—मनं या मार्गाकडे—स्वराज्यस्थापण्याकडे—वळवावीं. जसा हा ससेमिरा इकडे आहे तसा तिकडे त्या अलमगिराच्या मागें पांच सात रजपुतांचा ससेमिरा पाहिजे. तो लावायला युक्ति काय करावी ? हा विचार अहोरात्र माझ्या मनाला त्रास देतो आहे. ". असें महाराज ह्मणाले.

" दुसऱ्याच्या मागें ससेमिरा लावण्याच्या गोष्टी चार दिवस आतां विसरून आपल्या पाठीमागें हा ससेमिरा लागला आहे तो कसा काढायचा याचा विचार केला पाहिजेना ! " जिजाबाईसाहेबांनीं शिवाजीमहाराजांस ह्मटलें.

" त्या अलमगिराच्या मागें ससेमिरा लावतां आला तर आपल्या मागला हा ससेमिरा केव्हांच निघेल. आणखी पुनः लागणारही नाहीं. यामुळें माझ्या मनांत तो विचार वारंवार येतो. बाकी आपला हा ससेमिरा काढण्याचा खटाटोप चाल-लाच आहे. असा किल्ला नाहीं कीं प्रांत नाहीं कीं भले लोक एकदम यांच्या स्वाधीन होतील. शेंदोनशें इसम तरी आपल्या तलवारीनें शत्रूंचे हजार पांचशें जीव ठार केल्याशिवाय आपल्या जागा सोडणार नाहींत. तेव्हां त्या गोष्टीचा कांहीं विचार नको. जो विचार पाहिजे, तो मी ह्मणतों आहें त्याच गोष्टींचा पाहिजे. कोणीकडून तरी या जयसिंगाला मथवला पाहिजे. त्याला जर मथवायला सांपडला तर आपल्या इच्छेप्रमाणें पुष्कळ गोष्टी होतील. जर त्यानें आमची भेट घेण्याचें कबूल केलें, तर त्यांचें मन आपण खास वळवूं. पण काय चमत्कार आहे, तो ह्मणतो, अमूक अमूक गोष्टी कबूल झाल्या, अमूक अमूक प्रांत खालीं करून दिले, तर पुढें कशाच्याही संबंधानें बोलण्याचालण्याच्या गोष्टी. भेटण्याच्या गोष्टी तर त्याच्या-ही पलीकडे. अस्सलापेक्षां नक्कलच फार विचित्र असते. खुद्द अलमगीर सुद्धां इतके आढेवेढे घेऊन निश्चयानें वागेल कीं नाहीं याची शंका वाटते. पण याचें दुसरें भाषण नाहीं. सगळें मंदिर ढांसळ्यावर—सगळें स्वराज्य नष्ट झाल्यावर—आण-खी काय राहिलें ? मग याच्याशीं तह कसला ? आणखी बोलणीं

कसलीं ? कांहीं हरकत नाहीं. अजूनही यांतून कांहीं तरी मार्ग काढूं. पण आजच्या दृष्टांतांतही आशा करण्याजोगें कांहीं नाहीं. ''

" कां बरं नाहीं. ? '' जिजाबाईसाहेब ह्मणाल्या, " अरे बाबा, तुला काय असं वाटतं, कीं सगळ्या गोष्टी अगदीं नेहमीं आपल्या इच्छेप्रमाणंच झाल्या पाहिजेत ? आणखी त्या कशा होतील ? कधीं आपल्या इच्छेप्रमाणं होतील, कधीं नाहीं होणार. पण मात्र आपल्याला जसा पाहिजे तसा होणार. तूंच पहा बरं. तुला जो दृष्टांत झाला त्यांत तुला काय दिसलं ? वादळं झालीं, तुफानं झालीं, ढगांनीं सूर्य अगदीं झांकला गेला, तुला कैद करून नेलं, कैदेंत ठेवलं, पण शेवटीं काय झालं ? तूं कैदेंतून सुटलास, ढग वितळून गेले, वादळ शांत झालं, प्राणी स्वस्थ झाले, आणखी पुनः सूर्य पहिल्याप्रमाणंच तळपूं लागला. आणखी काय पाहिजे ? नेहमीं आपल्या मनाप्रमाणं व्हायला पाहिजे असं वाटत नाहीं कोणाला ? जसं तुला वाटतं तसंच त्या जयसिंगाला वाटतं, तसंच औरंगजेबालाय् वाटतं. आपण जसं आई जगदंबे-जवळ मागतों कीं आमच्या इच्छेप्रमाणंच कर, तसंच तेही आपल्या देवाजवळ मागतात. मग कधीं त्यांचाही संतोष होतो, कधीं आपलाही होतो. जेव्हां आह्मांला संतोष होतो तेव्हां त्यांस वाईट वाटतं. जेव्हां त्यांना संतोष होतो, तेव्हां आह्मांला वाईट वाटतं. असं चालायचंच. पण आई जगदंबेनं आपल्याला शेवटीं काय होणार हें सांगितलंच आहे. दाखवूनच दिलं आहे. आणखी काय पाहिजे ? ''

" शेवटीं ? शेवटीं ह्मणजे केव्हां ? सगळ्या स्वराज्याच्या मंदिराचं वाटोळं झाल्या-वर पुनः अशी घडी बसेल बरं ? कधीं बसणार नाहीं. कशी बसेल ? ''

" शिवबा, आज तूं विलक्षणच निराश झालेला दिसतो आहेस, आणखी आई-बद्दली तुझी श्रद्धाही थोडी.......... ''

" छे. छे. छे. आईसाहेब, असं आपण स्वप्नांत सुद्धां आणूं नका. अंबाबाई आणखी समर्थ यांच्या ठिकाणची माझी श्रद्धा अणुभरसुद्धां कधीं कमी होणार नाहीं. त्यांच्यावरली माझी श्रद्धा हें तर सगळ्या स्वराज्याचं मूळ...... ''

इतक्यांत एक धीरगंभीर अशा वाणीनें उच्चारलेलें वाक्य त्या तिघांच्याही कानीं पडलें.

तें वाक्य हें:—

"आणि ह्मणूनच कितीही संकटं आलीं आणखी कितीही पड घ्यावी लागली तरी शेवटीं तुझा विजय. ''

वाक्य कानीं पडतांच त्यांनीं जिकडून शब्द आला तिकडे पाहिलें व तीं तिघें आश्चर्यचकित झालीं.

---

# प्रकरण २६ वें.

## समर्थ.

ज्या पवित्र व सुप्रसन्न मुखांतून ती धीरगंभीर वाणी बाहेर पडली, त्या मुखाचें दर्शन होतांक्षणींच तीं तिघेंही एकदम उठलीं व एकामागून एक त्यांनीं त्या विभूती-पुढें मोठ्या श्रद्धेनें दंडवतें घातलीं. अगदीं अनपेक्षितपणें असा दर्शनलाभ होईल ही कल्पनाही त्यांस नव्हती. अर्थातच तितक्या मानानें त्यांस अत्यानंद झाला. समर्थांनीं त्यांस मोठ्या सुप्रसन्न मनानें व हंसत मुखानें आशीर्वाद दिले आणि तेथें मांडून ठेविलेल्या व्यासपीठावर स्वारी बसली. किती वेळ तरी आनंदाच्या व सुखाच्या अतिरेकामुळें कोणासच कांहीं बोलवेना. शिवाजीमहाराज आपल्या विशाल नेत्रांनीं समर्थांकडे एकसारखे पहात होते. आपण ऐन संकटांत असतां आपल्याला धीर देण्यासाठीं गुरुमहाराजांची स्वारी धांवून आली आणि आपली विचारपूस केली तेव्हां हाही एक चमत्कारच ह्मणावयाचा असें त्यांस पक्कें वाटलें. बाकी दोघांची परस्पर भावना तशीच असल्यामुळें त्यांच्या मनोमय साक्षी पटल्यास त्यांत मुळींच नवल नाहीं.

थोडीशी स्वस्थता झाल्यानंतर समर्थ एकदम महाराजांस ह्मणाले, "शिवबा, तूं इतका खिन्न होऊं नको. बाबारे, ज्याला मोठें थोरलें मंदिर बांधायचें, त्याला केव्हां तरी पड ही घ्यावी लागणारच. नेहमींच अंगबळानें काम निभत नाहीं. शत्रु जोरावर आहे, तर त्याच्या तंत्रानेंही घेण्याला कमी करूं नये. जयसिंग ज्या रीतीनें तह करण्याच्या अटी घालतो, तशा अटी कबूल करायलाही हरकत नाहीं. चाललेला संहार हिताचा होणार नाहीं. तर तो संहार बंद होण्यासाठीं त्याचें ह्मणणें ऐकून घेऊन आपलें कार्य साध. आपण काय करतों आहोंत हें जयसिंगास समजत नाहीं. त्याला समजून घेण्याची इच्छाही नाहीं. तर त्याच्याप्रमाणें होऊं दे. तो ज्या कार्याकरितां आला तें कार्य केलें असें समाधान त्याला मिळाल्याखेरीज तो राहणार नाहीं. सूर्य एवढा तेजस्वी, परंतु त्याला सुद्धां उदयास्त आहे. त्याला ग्रहण आहे. त्याचा तेजोभंग आहे. तर आपल्यासारख्या पामरांची कथा काय? जसा वारा येईल तशी पाठ वळविली पाहिजे. आपला हेतु मात्र विसरतां कामा नये. एवढें लक्षांत ठेवलें ह्मणजे झालें. तूं जयसिंगाची भेट घेऊन त्याचें मन वळविण्याचा कितीही अट्टाहास केलास तरी तो तुला बाधायचा नाहीं. तुझा नाश व्हावा ही त्याची बुद्धि नाहीं. त्याची बुद्धि एवढीच, कीं आपण जी प्रतिज्ञा करून आलों ती पूर्ण करायची. त्याला जर कांहीं आपलें ऐकण्याची बुद्धि झाली, तर ती आज

होणार नाहीं आपली प्रतिज्ञा पुरती झाली असें एकदां त्याच्या मनाला पक्कें वाटलें ह्मणजे मग तो कोणनेंही बोलणें ऐकायचें असलें तर ऐकेल. तोंपर्यंतचा सगळा खटाटोप व्यर्थ आहे. तेव्हां तूं खिन्नता टाकून दे. असें कां होतें, आपल्या मनाप्रमाणें आपल्या विचाराप्रमाणें त्याचें मन व विचार हीं कां नाहींत? असें ह्मणून आपलें मन खट्टू करून घेण्यांत कांहीं तात्पर्य नाहीं. भगवान् दाशरथी रामासारख्याला जर वनवास चुकला नाहीं तर तो आपणास तरी कसा चुकणार? कधीं चुकायचा नाहीं.जें काय घडतें तें आपल्या बऱ्याकरितांच घडतें अशी दृढ श्रद्धा मनांत धरून पुढें काय करायचें तें करीत जावें. आई जगदंबेनें तुला स्वप्नांच्या द्वारानें जें सुचविलें तें अगदीं चुकायचें नाहीं. तेव्हां आतां जास्तीकमती विचार न करतां तूं आपल्या सांगितल्याप्रमाणें पुढच्या विचाराला लाग. मीही आतां तीर्थाटनाला निघून जाणार आहें. कांहीं दिवसपर्यंत आतां पुन्हां तुझी आमची भेट होणार नाहीं. तीर्थाटन करीत हिंडावें अशी एकाएकीं स्फूर्ति झाली. आह्मांला स्फूर्ति ह्मणजे आज्ञाच. ती आज्ञा एकदां झाली, कीं मग क्षणभर सुद्धां अवकाश नाहीं. माझ्याबरोबर मी कोणासही घेणार नाहीं. मी केव्हां नाहींसा होईन याचा नेम नाहीं. पण तुला मात्र सांगितल्यावांचून कोठें अदृश्य होणार नाहीं. येथून निघण्यापूर्वी जर ज्याला त्याला आमचा बेत कळला, तर हजार माणसांची यात्रा जमा होणार आणखी मग थाटानें आमची स्वारी निघणार—पण आह्मांला तें मुळींच कर्तव्य नाहीं. आह्मी जेथें जाऊं तोच आमचा मठ. रामाची उपासना जितकी विस्तृत होईल तितकी करावयाची. हा हेतु धरून तीर्थें आणि क्षेत्रें आह्मी हिंडणार......"

"काय? आपण कांहीं लवाजमा बरोबर नेणार नाहीं. छे. छे. छे. थोडी तरी शिबंदी आपण आपल्या संरक्षणाकरितां घेतली पाहिजेच. तसा मी आपल्याला कसा जाऊं देणार?" शिवाजीमहाराज आश्चर्यचकित होऊन एकदम ह्मणाले.

त्याबरोबर समर्थांची स्वारी एकदम गद्गद हंसली. व आशीर्वाद दिल्याप्रमाणें हात वर धरून ह्मणतातः—

"बाबारे, आमच्या संरक्षणाची काळजी कोण वाहणार? तो भगवान् दाशरथी राम. त्याच्याखेरीज कोणी काळजी वाहण्याला समर्थ नाहीं. तेव्हां तूं या वेडांत कां शिरतोस? आह्मी स्वच्छंदी प्राणी वाटेल त्या वेळीं वाटेल तिकडे जाणार. पुढच्याक्षणीं काय करणार त्याची दाद याक्षणीं सुद्धां आह्मांला नाहीं. आणखी आह्मांला रे शिबंदीन् शिपाई कसले! आम्ही आतां वर्ष दोन वर्षं अज्ञातवासांत काढणार. तीर्थयात्रा करणार. जिथें जाऊं तिथें मठ स्थापूं. वाटेल तितके दिवस तिथेंच रघुनाथाची सेवा करूं. पुढें जाऊं. वाटली लहर तर परत येऊं नाहीं तर बद्रीनारायणाला जाऊन तिथूनच प्रयाण करूं. तें कांहीं असो, पण आता रघुवीराची आज्ञा झाली आहे खरी, कीं आतां तीर्थयात्रा केल्या पाहिजेत. तेव्हां निघण्यापूर्वीं तुला एकदां भेटावं, आई जगदंबेचं दर्शन घ्यावं आणखी तुझ्या मनाची खिन्नता

वाळवून तुलाही दोन धीराच्या गोष्टी सांगाव्या ह्मणून इकडे आलों. तूं यत्किंचित् काळजी करूं नको. चार दिवस पड घेऊन चाललं पाहिजे. तशी पड घेतली तर आज थोडं नुकसान आहे. पण शेवटीं कांहीं नुकसान नाहीं. शेवटीं आपल्या सगळ्यांच्या इच्छेप्रमाणंच सगळ्या गोष्टी घडून येणार आहेत. अगदीं काळजी नको. जयासिंगाच्या ह्मणण्याप्रमाणं गोष्टी झाल्या पाहिजेत असा नेमानेम दिसतो आहे. तर त्या नेमानेमाच्या आड तरी आपण येऊन कसं चालणार?"

इतकें बोलून समर्थ जणूं काय या प्रश्नाच्या उत्तराची वाट पाहण्याच्या मिषानें स्तब्धपणें महाराजांकडे पहात बसले. महाराजही आपल्या मनांत विचार करीत बसले. नंतर समर्थांस ह्मणतात:—

"आपण तीर्थयात्रेला जाणार ह्मणजे आमच्या सर्व कार्यांत आह्मांला यश देणारी देवताच आह्मांला सोडून जाणार ह्मणायची. असो. आपण सांगाल त्याच्या बाहेर मी नाहीं. जो प्रसंग होईल तो पार पाडलाच पाहिजे. अंबाबाईचा दृष्टांतही मला असाच झाला आहे. स्वप्न पाहिलें त्याचाही अर्थ असाच होतो, कीं आपण आतां व्यर्थ धडपड करतां कामा नये. करून उपयोगही नाहीं. पंतांच्या मार्फत आतां असाच उपक्रम करायचा ह्मणायचा, कीं ते ह्मणतील त्या अटी कबूल करून तह. पण आपण तीर्थयात्रेला जाणार याबद्दल मनाला फारच खिन्नता वाटते आहे. आपण जवळ आहांत एवढ्या विचारानें मनाला किती तरी धीर वाटे. महिन्या महिन्यांत, दोन दोन महिन्यांत जरी दर्शनाचा योग आला नाहीं, तरी मनाला खात्री अशी असे, कीं जेव्हां मनांत येईल तेव्हां जाऊन दर्शन घेऊन आपलें मन मोकळें करायला हरकत नाहीं. पण आतां आपणच इथून जाणार तेव्हां काय करणार?"

"शिवबा, अरे तुझी माझी भेट व्हायची नाहीं एवढ्याकरितां का तूं मला तीर्थाटनाला जाऊं नको ह्मणणार? (किंचित् हंसून) आणखी तुलाही तीर्थाटनाचा प्रसंग येणार नाहीं ह्मणून कशावरून? पुढें काय होईल त्याचा विचार करण्याची प्रत्यक्ष जरूरी पडल्याखेरीज विनाकारण चिंता करून मनाला त्रास करून घेऊं नये, जें तूर्त आलें आहे त्याच्याकडे लक्ष्य दे आणखी आपलें काम भागीव. तुझ्या कार्यांत तुला शेवटीं यश येणार याबद्दल आह्मांला कांहीं शंका नाहीं. दाशरथी रामाची कशी दृष्टी तुजवर आहे तेव्हां तो तुला सगळ्या कामांत पूर्णपणानें यशस्वी करील. चार दिवस त्याला वनवास भोगावा लागला तसा तुलाही लागला ह्मणून काय हरकत आहे? तुझ्यासारख्या विभूतींना गृहवास आणखी वनवास दोनही सारखींच असलीं पाहिजेत. आतां पुरे झालें. जास्त विचार करून वेळ घालविण्यांत कांहीं अर्थ नाहीं."

समर्थांचें बोलणें थोडें निक्षून असें होतें. तें ऐकतांक्षणीं जिजाबाईसाहेब—(आतांपर्यंत त्या एक शब्दही बोलल्या नव्हत्या.) मध्येंच ह्मणल्या, "विनाकारण

वेळ घालवील कोण ? पण इतके दिवसांचा सगळा खटाटोप व्यर्थ होण्याची पाळी आलीशी दिसली, तर मनाला खेद कसा नाहीं होणार ? त्या समर्थ रघुनाथाला तरी आमच्या कार्यांत विघ्नं आलेलीं कशीं पहाववतात ? अंबाबाई दृष्टांत देऊन संकटं सुचविते ती संकटं येऊंच का देते ? असं सुद्धां जर मनांत आलं घटकाभर तर त्यांत नवल काय? महाराज आज दोन महिने झाले, स्वस्थपणानं सुखाचा घास सुद्धां माझ्या शिवबानं खाल्ला नाहीं. त्यांत आतां आणखी हीं तहाचीं बोलणीं सुरू करायचीं म्हणजे किती बरं नामुष्कीचं काम वाटावं त्याला ? पण आपली सल्ला तीच, अंबाबाई दृष्टांतांत सुचवते तेंच, तेव्हां दुसरा मार्ग काय? आपण सांगाल तसं करायचं. आपण तीर्थयात्रेला जाणार तर ही एकदां व्यवस्था लागल्यावर तरी जा."

समर्थ पुनः हंसले आणि म्हणतात, "मातेचें अंतःकरण असेंच कळवळायचें. आमचें सुद्धां कळवळतें. जिजाबाई, जसा तुझा तसाच माझाही शिवबा आहे. तो सर्व गोष्टींत निष्णात आहे. त्याला तशी बुद्धि होईलच. तुला आणखी मला—दोघांनाही-त्याबद्दल काळजी नको. पंत फार मोठा मुत्सद्दी. त्याच्या नजरेंतून कांहीं सुद्धां चुकायचें नाहीं. त्याच्या बोलण्यांत रसवंती फार. त्याच्या बोलण्यापलीकडे जावें असें जयसिंगाला वाटायचें नाहीं. पण त्याच्याबरोबर तो दिलेरखान आहे तो करील त्याच्याबाहेर जयसिंग जाणार नाहीं हें लक्ष्यांत ठेवलें पाहिजे. तें कांहीं असो. पण तुला त्याची काळजी नको. माझ्या श्रीसमर्थ रामाला वनवास भोगावा लागला, तरी पण शेवटीं जसें त्याला यश आलें तसेंच शिवबाला यश येईल. वनवासाला भिऊन काय होणार? आम्ही तीर्थयात्रेला गेलों किंवा आणखी कोठें गेलों म्हणून काय होणार ? आमचें चित्त सगळें शिवबाजवळ आणखी शिवबानें आरंभलेल्या कार्यांत. पुनःपुनः आम्ही सांगतों, कीं किती जरी संकटें आलीं तरी शेवटीं त्याला पूर्ण यश येणार हा आमचा पूर्ण आशीर्वाद आहे. येतों आतां."

इतकें बोलून त्यांनीं शिवाजीमहाराजांच्या मस्तकावर हात ठेवला. एकवेळ त्याच्याकडे व जिजाबाईकडे पाहून हंसले आणि पहातां पहातां जसे आले तसे गेले.

शिवाजीमहाराज व जिजाबाईसाहेब त्यानंतर कांहीं वेळ त्याचसंबंधानें बोलत होतीं. त्या भाषणांत त्यांचा कांहीं विचार ठरला आणि महाराज तेथून राजगडाकडे निघून गेले. तहाचें बोलणें लावण्यापलीकडे कांहींच आतां दुसरा मार्ग राहिला नाहीं. पंत आधीं एकवार जयसिंगाकडे गेले होतेच, परंतु त्यानें त्यांना मोठ्या आदरानें व शिष्टाचारानें असें सांगितलें, कीं दगाफटका होण्याचें भय आम्हाला पूर्णपणें वाटतें; तेव्हां शिवाजी महाराजांच्या इमानाबद्दल खात्री दिली पाहिजे. पंतानीं त्याची नानाप्रकारांनीं खात्री करण्याचा यत्न केला,अफझुलखानाच्या संबंधांत महाराजांकडून कांहीं सुद्धां आधीं दगा झाला नाहीं. असें नानाप्रकारांनीं सांगितलें; परंतु त्या लोकांच्या मनानें एकदां निराळें घेतलें तें बदलणेंच शक्य नाहींसें झालें. त्याला इलाज काय होता ? रघुनाथपंतांनीं आपली सगळी रसवंती उपयोगून पा-

हिली; परंतु कांहीं उपयोग होईना. जयसिंग ह्मणे जुन्या जहागिरी आणखी नवीनें कांबीज केलेला मुलूख, सगळे किल्ले, ... आमच्या स्वधीन करून रुमालानें हात बांधून आमच्यापुढें शिवाजी आला, तर आह्मी तहाची गोष्ट बोलूं, नाहीं तर चाललें आहे हें ठीक आहे.

वास्तविक पहातां मोगल लढण्याला फार उत्सुक होते असें नाहीं. त्यांचेंही कांम आतां अगदीं जेरीला आलें होतें. परंतु त्यांचें बळ दांडगें असल्यामुळें त्यांनीं त्याची दिक्कत आहे असें दाखविलें नाहीं. त्यांनीं मराठ्यांच्या मुलखाचा सत्यनाश चालविला होता; यामुळें जसे शिवाजीमहाराज उद्विग्न झाले होते, तसेच मराठ्यांनीं नाना प्रकारांनीं छळ चालविला व धुमाकूळ उडविला यामुळें जयसिंग व दिलेरखान दोघेही अगदीं उद्विग्न झाले होते. त्यांनाही असें वाटतच होतें, कीं आपला शत्रु जर तह करण्यास उत्सुक होईल, तर फार चांगलें होईल. पुष्कळसें आपलें व थोडेंसें त्याचें असें ऐकून आपण काय आपल्यांला साधावयाचें तें साधून घेऊं असा त्यांचा विचार झाला होता. ते केवळ वाटच पहात होते असेंही ह्मटलें तरी चालेल. परंतु त्यांतल्या त्यांत दिलेरखानाला अशी इच्छा, कीं आपल्याला विचारून काय करणें तें केलें पाहिजे. अशी एकंदर स्थिति होती.

तह केल्याखेरिज गत्यंतरच नाहीं ह्मणून महाराजांनीं तहाची गोष्ट कबूल केली हें उघडच आहे. त्यांनीं पंतांस जयसिंगाकडे पाठविलें. त्याच्या आधीं काय काय कलमांवर तहाचें बोलणें लावावयाचें वगैरे सांगितलें होतेंच. पंत गेल्याचें मागील एका प्रकरणांत वाचकांस कळलें आहेच. ते जाऊन पोंचले. त्यांची व जयसिंगाची मुलाखत झाली. त्या वेळच्या बोलण्यावरून पंतांस जयसिंगाबद्दल जें काय वाटलें तें पंतांनीं महाराजांस लिहून कळविलें. मात्र महाराजांवर आपला विश्वास नाहीं अशासंबंधाचें जयसिंगाचें बोलणें त्यांनीं महाराजांस कळविलें नाहीं. तें पत्र सविस्तर असलेमुळें येथें त्यांतील बराच भाग देतों. या पत्रावरून पंतांचे व जयसिंगाचे दरम्यान झालेला प्रकार स्पष्ट समजेल.

"आपली आज्ञा घेऊन चरणापासोन येथें आलों. रंग पहातां राजे मोठे करारी. त्यांशीं तह केलेविणा गति नाहीं ऐसाच अजमास दिसतो. पितृभ्रातृघातकाची नौकरी करून त्याची बडीजाव वाढविणेविषयीं दिक्कत न वाटे. ऐसियास पुढें बोलणें लावणें मनास मोठें दिक् होऊन गेलें. परंतु काळावर नजर देवोन हातोन काय होय तें पाहावें ह्मणोन गोष्ट केली जे: 'आपण हिंदु वेदवेदांग, स्मृतिपुराणधर्मी, सूर्यवंशी, क्षत्रिय, गुरुतल्पगामी, चंद्रोपासक, अविंधाची, पताका घेऊन जिकडे जिकडे संहार करतां हें कैसें उचित होय ? येणें अधर्म वाढेल

कीं धर्म. क्षत्रिय कुलाचे आपण दीपक अधर्म पसरवूं पाहणाऱ्या विधर्म्यांची विजयपताका स्कंधावरी घे‌ऊन मुलुखगिरी चालवितां, कुराणानें पुराणाची जागा घेऊन गोवध बंद व्हावा म्हणून भगवी धर्मपताका घेऊन वेदधर्म वाढवूं झटणारांशीं वैर करतां हें काय? ऐसें थोडें खोचोन परंतु मर्यादेनें बोलिलों, तेव्हां हंसले व मजकडे पाहोन म्हणाले. ऐशिया बोलण्यानें कार्यभाग होणार नाहीं. जे दिवशीं अविंधास कुर्णीस केला व मनसबदारी पत्करिली, ते दिवशीं त्याचा सर्व विचार झाला. त्यासी आज इतुकीं वरुषें गेलीं. अविंधाचे अन्नावरी पिंड वाढविला. त्याचे भ्रातृपितृघाताचे पातकांत वांटेकरी जालों. आतां काय राहिलें? तरी ऐशिया बोलण्यानें मन वळेल हें आशा सोडून पुढें काय बोलणें तें बोलिजे. ऐसा स्पष्ट जबाब ऐकोन थोडें थक्क झालों. वेदधर्माची कांहीं चाड वाटत असेल ऐसें वाटत होतें व त्याचे बलावर आपला विचार मनांत भरवितां येईल ऐशी आशा धरली; परंतु एक घाय दोन ठाय ऐसा जबाब मिळतांच स्वस्थ बसणें भाग पडलें. मग पुनः विचारिलें जे, आपला मनसोबा ऐसा आहे तरी रायांनीं काय करावें? त्यांनीं जबाब दिला जे, रायांनीं दरोबस्त सारा मुलूख आमचे स्वाधीन करावा. काय किल्ले व मुलुख आम्ही ठेवूं ते आपले समजावे. बादशहा अलमगीर याची नौकरी पतकरावी. ऐसें होत असलियास पुढें बोलणें बोलावें. नाहीं पक्षीं आलिया वाटेनें परत जावें. जें चाललें आहे तें चालवून धाय धाय करायास लावून गिरफदार करून दिल्लीस घेऊन जाऊं. मुलूख बंदोबस्ती जारीनें करूं.' ऐसें निकराचें बोलणें ऐकून चमत्कार वाटला जे. वेदधर्मी राजा वेदधर्मी राजासी कैद करोन अविंधास कुर्णीस करावयास गिरफदार करून नेणियांत पुरुषार्थ मानतो. ऐसें बोलोनही दाखविलें, तरी पालथिया घड्यावरी पाणी ओतलेप्रमाणें झालें. पुढें बोलिलों जे मुलूख उजाड होत चालला तो बचावणेसाठीं तह करण्यास राजे कबूल आहेत. तह करणें तो कोणते शर्तीवर व कलमें कोणतीं तें सर्व कळविलियास विचार करूं. तें ऐकोन ते ह्मणाले जे, बहुत कलमें घालून रायासी छळणेचा मनसोबा नाहीं. कलमें थोडीं आहेत. तीं सांगितलीं तीं ऐसीं:—

१. पादशहाच्या मुलुखांतील दरोबस्त किल्ले व त्या किल्ल्याचे घेऱ्यांतील सर्व मुलूख ताबडतोब सोडून देणें. ऐसे किल्ले सत्तावीस. त्यांचा बी तपशील.

२. सुमारें बारा किल्ले त्या मुलुखासकट रायांनीं बादशहाची जहागीर ह्मणून उपभोगास ठेवणें; परंतु कागदोपत्रीं बादशहातीचा शिक्का पाहिजे. ऐसा मुलूख दहा लक्षांचा सोडूं.

३. संभाजी राजे यांचे नांवें मनसबदारी मिळेल. ती पांच हजारी असेल.

४. विजापुरकरांचे मुलुखांतील चौथाई, सरदेशमूखी आजतागाईत जैसी घेतली तैशी घ्यावी. व त्याबद्दल एक कोटि चाळीस लक्ष नजराणा हप्तियाहप्तिआनीं बादशहासी द्यावा.

हीं कलमें ऐकिलीं तेव्हां वाटलें जे, केवळ छळणूक करून बादशहाचा बडिवार वाढविणेचा मनसुबा नाहीं. कांहीं तरी भूतदया वसते आहे. कलमें आवर्जून सांगितलीं यावरी विनंति केली जे, केवळ बाराच किल्ले वर्जून बाकी सारे किल्ले व मुलूख घेणेंविषयींचा आग्रह धरणें रास्त नव्हे. बादशहातीचे नौकर म्हणोन म्हणवून घेतलियावर सर्व मुलूख रायाचे ताबिआंत राहिला तरी तो बादशहाचाच होय. रायाचा नोहे. जैसे आपण व खानसाहेब बादशाही हुकुमाचा अंमल चालवितां, तैसेच राजेही अंमल चालवितील ऐसें बोलिलों. परी मानेसें दिसलें नाहीं. उपरीं सर्व बोलणें लिहितों व जैसें उत्तर येई तैसें कळवितों. ऐसें बोलोन डेरिआवरी गेलों व जासुदाहातीं हें पत्र चरणासंनिध पाठवीत असें. ”

# प्रकरण २७ वें.

## दिलेरखान.

दिलेरखान आपले डेऱ्यांत बसला होता. इतक्यांत किरातसिंग आल्याची वर्दी त्यास त्याच्या छडीदारांनीं दिली. किरातसिंगास लागलीच आंत बोलावण्याविषयीं हुकूम सुटला. आणि किरातसिंग आंत आला. रीतीप्रमाणें—चार लोकांच्या रीती-

प्रमाणें नव्हे—त्यानें खानास कुर्निसा केला व दूर बैठकीच्या सतरंजीच्या टोंकावर बसतां बसतां एकदम म्हणतो: "खाविंद, जसा आपण तर्क केला होता, तसा अगदीं बरोबर कारभार झाला. पंतांची भेट राजांनीं घेतली. घटका अर्धीघटका खलबत झालें आणि लढाई बंद करून तह करायचा असें ठरविलें. कलमें ठरलीं. मुलूख ठरला. सर्व कांहीं ठरलें आहे. परंतु आपली कन्या या चोर मराठ्यांनीं नेली त्याबद्दल कांहीं उल्लेख केला नाहीं. फक्त आपल्याला सांगितल्यानंतर कायम समजावें असे उद्गार काढले. बाकी सर्व लिहिणेंपुसणेंही झालें आहे. तेव्हां हा प्रकार काय आहे. आपण म्हणजे कोणी नव्हे. तेव्हां सर्व करणें संवरणें काय तें आपल्या हातीं आहे. असें दाखविण्याचा जो आपला घाट यानीं घातला आहे याचा हेतु काय याचा विचार आपण केला पाहिजे कीं नको ! तह तरी काय केला आहे तो पहा. आपणास एक एक कलमें कळलीं तर आपण थक्क होऊन जाल. आपण म्हणालां तेंच खरें. हिंदू हिंदूला मिळणारच. त्यांत कांहींसुद्धां चूक नाहीं. पण ज्याची नोकरी करायची म्हणून आपण शपथ वाहिली त्याच्याशीं मात्रागनिमीपणा करूं नये. माझें दुसरें कांहीं म्हणणें नाहीं. मी मुद्दाम त्यांचेकडे जाऊन डोळ्यावर झिल्या ओढून मुकाट्यानें सारा प्रकार ऐकला व पाहिला. आपण यांत आहांत, आपल्याल अजीबाद धाब्यावर बसाबितां येत नाहीं म्हणून आपला विचार घेण्याचें सोंग केलें परंतु शक्य असतें, तर आपल्याला त्यांनीं खुशाल दूर सारून केव्हांच तह करून एव्हांना परत जाण्याचा विचार करते. पण आपणाला कांहीं त्यांचे हाताखालीं पाठविलें नाहीं. जसे ते तसेच आपण. दोघांनाही सारखा अधिकार देऊन पातशहानें आपणास इकडे पाठविलें असें असून आपल्याशीं तहाचें बोलणें होऊं नये याचें मोठें आश्चर्य वाटलें, तर त्यांत नवल काय ! आपला मान यानीं राखला पाहिजे. आधीं आपल्याजवळ आपली मुलगी या लुच्चांनीं पळविली त्याबद्दल कांहीं तरी बोलायला पाहिजे असतां तसें कांहींच झालें नाहीं. याचा तरी विचार व्हावा. नाहीं तर आपण साधेभोळे आहां तेव्हां कांहीं तरी सांगून आपल्या मनाजोगें करून दाखवितां येईल. मला आपली काळजी वाटून मी आपल्याकडे सांगण्यास आलों. मग आपण मला काय म्हणाल तें म्हणा. उगीच चऱ्हाट लावल्याची माफी असावी." दिलेरखान त्याचें बोलणें ऐकून घेत होता. त्यास मध्यंतरीं बोलण्याला किरातसिंगानें वावच ठेविली नाहीं. यामुळें त्यानें ऐकण्यापलीकडे दुसरें कांहींच काम केलें नाहीं.

किरातसिंगाचें बोलणें संपल्यावर तो त्यास एवढेंच म्हणाला, कीं तह जरी त्यांनीं केला, तरी त्याला माझी अनुमति घेतल्याखेरीज त्यांना कागद तिकडे पाठवितां येणार नाहींत. त्याची काळजी नको. त्यांचें त्यांचें बोलणें कांहीं जरी झालें असलें तरी अलमगिराला जें पत्र जावयाचें त्याच्यावर दस्कत आमचें दोघांचें पाहिजे असें मीं एकदां निक्षून सांगितलें आहे. त्यांत वांक होऊं देणार नाहीं. पाहूं

काय होतें तें. तह तह तरी काय करणार तो पाहूं. वास्तविक दरवडेखोराशीं तह कसला ? तो काय राजा आहे का बादशहा आहे, का आहे तरी काय. त्याच्याशीं तह कसला ! गिरफदार करून दिल्लीस नेऊन अटकावून टाकला पाहिजे. आणखी इकडे सगळ्या मुलुखाला कोणी सुभेदार नेमून ठेविला पाहिजे. आपण तर असेंच बादशहाला लिहिणार. या माणसाशीं तह कसला.

बस् बस् बस् बस्, खानसाहेब, मी जरी फाजील प्रसंग करून बोलणें बोलतों आहें याच्याबद्दल माफी असावी. पण आपलें बोलणें अक्षरशः खरें आहे. अगदीं अक्षरशः खरें आहे यांत बिलकुल अंदेशा नाहीं. चार दिवस दरवडेखोरी करून मुलूख आपल्या ताब्यांत आणला ह्मणजे काय राजा बनतो कोणी ! असा जर राजेपणा सोपा असेल, तर जो तो राजाच झाला असता कीं, पण या शिवाजीचा कोण बडेजाव ? त्याच्याशीं ह्मणे तह. आणखी तो राजे जयसिंग करणार ! ही तऱ्हा तरी काय ? आपल्याला मी इत्थंभूत हकीकत सांगितली, तर आपल्याला अंदेशा आल्याखेरीज कधीं राहणार नाहीं. परंतु आपल्याला काय विचारायचें आहे ? असें त्यांचें मन. जसे चार आमच्यासारखे शिपाई आले आहेत, तसेच आपण त्यांच्या हाताखालीं मदतीला म्हणून बादशहाच्या हुकुमानें आलां आहां. ही त्यांच्या मनानें आपली किंमत आहे. मी चार दिवस राहून जो एकंदर प्रकार पाहिला आणखीं जीं भाषणें ऐकलीं तेवढ्यावरून माझी खात्री झाली. अहो तो शिवाजीचा वकीलसुद्धां तीनतीनदां मधून मधून ह्मणे "पण खानसाहेबांना हें कलम पसंत पडेलना ?" तर त्यावर राजे जयसिंगानें म्हणावें "त्यांचा काय संबंध हो ! त्यांला विचारायचें काय ? सगळा अधिकार माझा आहे. माझ्या मनाचा निश्चय झाला, कीं संपलें सगळें. ते काय ह्मणतील आणखी दुसरा कोणी काय ह्मणेल याचा विचारसुद्धां तुम्ही मध्यें काढूं नका." काय हें ! असा प्रकार जर पावलोपावलीं आपल्यासंबंधानें त्यांच्याजवळ होऊं लागला, तर त्यांच्या मनांत तुमच्याबद्दल काय आदर राहणार. सगळा अखत्यार माझा. मी करीन ती पूर्वदिशा, दुसऱ्या कोणाचा कांहीं संबंध नाहीं, असल्या प्रकारचे उद्गार क्षणोक्षणीं जर त्यांच्या कानीं पडले, तर आपल्या हातून कांहीं अडथळा होईल, आणखी आपल्या कामांत मोडता येईल ही कल्पना तरी कोणाला कशी यावी ! असो जाऊं द्या. आम्ही काय ! आम्ही आपलेही नौकर, त्यांचेही नौकर, हुकुमाचे बंदे. आपण सांगाल तोही आम्हांला हुकूम आणखी ते सांगतील तोही हुकूम; तेव्हां आपणास झाली हकीकत कळविण्यापलीकडे आमचा संबंध काय ? आपण मानला तर पुष्कळ आहे. नाहीं तर कांहींतरी चोमडेपणा करून चुगली करून आपणांत फसवितों आहें असें आपल्याला वाटत असेल तर त्यांत नवल नाहीं. पण कांहीं कारणानें आमचा ओढा आपल्याकडे जास्त आहे. राजे आमचे खरे, पण आम्हांला पाण्यांत पाहतात.

आपले दर्ज्यास कोणी चढूं नये अशी त्यांचे मनाची बुद्धि. तेव्हां आह्मांला हें त्यांचें करणें पसंत कसें पडावें ? आपला स्वभाव तसा नाहीं. आपल्यापुढें कोणीही गुण दाखविले, तर आपण त्याच्या गुणाचें चीज करतां. यामुळें सगळ्या या फौजेंत आपल्याविषयीं ज्याला त्याला फार आदर वाटतो. आपल्या पश्चात् लोक आपली किती स्तुति करतात, तीं आपण जर ऐकली तर आपल्याला माझें ह्मणणें किती खरें आहे हें समजेल, नाहींतर कसें समजणार ? आह्मांला तरी निदान आपण फार अधिक फार जवळचे वाटतां आणखी त्यामुळें आपणांस आह्मीं सर्व कांहीं मनोभावानें सांगतों. आपल्याला जर कांहीं आपलेपणा दाखवावयाचा असला तर ही वेळ आहे. नाहींतर राजे आपल्या मनाला वाटेल तें करून आपल्याला होस हो करण्याला लावतील.

" मला नाहीं वाटत जयसिंग मला असा इतका लवचिक समजत असेल असं. त्याची पक्की खात्री असली पाहिजे कीं, मी कांहीं त्याच्या हातांत केवळ बाहुलें होऊन राहणार नाहीं. छे. बिलकुल नाहीं. मला आजपर्यंत तर तसा अनुभव नाहीं. बाकी आतां पुढें पाहूं. मला विचारायला तर येणार आहेना काय तह व्हावयाचा आहे आणखी कसा व्हावयाचा आहे तो ? "

" विचारायला ह्मणजे काय ? आपण त्यांत अमुक नको, तमूक नको असं ह्मणाल तर कोणी ऐकेल का ह्मणतां ? छे. बिलकुल नाहीं. कोणीं ऐकणार नाहीं. एखादी गोष्ट केल्यावर नुसती जशी सांगावयाची तशी आपली आपल्याला सांगणार. याच्यापलीकडे काय आहे ? "

' किरातसिंग, तूं हें म्हणतो आहेस तरी काय ? आजपर्यंत तूं इतका अगदीं स्पष्टपणानं माझ्याशीं कधीं बोलला नाहींस. पण आज स्पष्टपणाची कमाल केली आहेस '

" ज्या गोष्टीबद्दल माणसाला पुरी खात्री असते, त्याच गोष्टी माणूस अगदीं स्पष्टपणानें बोलतो. दुसऱ्या कशाला बोलेल ? आणखी राजेसाहेबांच्या मागें त्यांच्या विरुद्ध मी इतका स्पष्ट आपल्याशीं बोलायला आलों तेव्हां माझ्या मनांत आपल्याविषयीं काय आदर आहे हें तरी स्पष्ट समजेल. आपण त्याचा विचार करा."

त्याचें तें बोलणें ऐकून दिलेरखान कांहीं वेळ स्तब्ध बसला व म्हणतो:—" काय म्हणतोस ? माझ्या मुलीसंबंधानें कांहींसुद्धां चौकशी राजांनीं केली नाहीं ? माझी समजूत अशी होती, कीं या दरवडेखोरांनीं तिला पुरंदरावर ठेवली होती, परंतु परंदर आमच्या हातीं देऊन ते चालते झाले तेव्हां कोपरानूकोपरा शोधून काढला — तिचा पत्ता नाहीं. राजांकडून त्या किल्यावरल्या लोकांना विचारलं तर त्याचं उत्तर ती मंडळी असं देते कीं, मराठ्यांचे हात परस्त्रीच्या स्पर्शानं कधींही विटाळायचे नाहींत. त्या लोकांना पकडून राखेचे तोबरे देऊन त्याची पुसतपास केली पाहिजे असं सुचविलं तर तशी मुळींच जरूर नाहीं. त्यांनीं बेगमेला नेली नसावी

अशी माझी खात्री आहे असा जबाब मला मिळाला. तेव्हांपासूनच माझ्या मनाला शंका वाटते आहे, पण ते वडील. त्यांच्यापुढें कांहीं बोलतां येत नाहीं......"

"मी तरी आतांपर्यंत आपल्यापुढं तेंच सांगतों आहें, कीं आपल्याला त्यांच्यापुढं बोलतां येणार नाहीं. ते वाटेल तसा तह करून टाकतील. आपण हो ह्मणा असा आपल्याला निरोप येईल. फार झालं तर आपली समक्ष मुलाखत घेऊन आपल्या बोलण्यानं आपल्याला गार करतील.आणखी काय माझं ह्मणणं आहे? कांहीं नाहीं. बेगमसाहेबांचा पत्ता इतक्यांतल्या इतक्यांत लागूं नये. आणखी मराठ्यांचा त्यांत कांहीं संबंध नाहीं असं त्यांनीं आपणास सांगून आपण हूं ह्मणावं यापेक्षां आतां आपल्या भोळेपणाला आणखी पुरावा काय पाहिजे. मी फार स्पष्टपणानं बोलतों आहें याबद्दल माफी मागतों. पण वस्तुस्थिति अशी आहे. आपणच असा विचार करा. बेगमसाहेबांना नाहींसं करण्यांत जर मराठ्यांचं अंग नाहीं, तर आहे कोणाचं ? बेगमसाहेबांना आपल्याचपैकीं कोणी तरी नेल्या असतील–नाहीं तर त्याच आपण होऊन कोठें तरी गेल्या असतील. याखेरीज दुसरं व्हावं काय ? आपल्यापैकीं तर कोणाची छाती नाहीं. त्या होऊन कोठें जाणार नाहींत. पण त्यांची वाट व्हावी काय ? आपणच विचार करा. मराठ्यांना पाठिशीं घालण्यापलीकडे यांत कांहीं दुसरं मला तर दिसत नाहीं. मला पक्कं दिसतं आहे, कीं मी आज फार फाजीलपणानं बोलतों आहें. बेगमसाहेबांचं नुसतं नांव घेणं ह्मणजे देखील वेडगळपणा आणखी धाडस; मी आज त्यांच्यासंबंधानं वाटेल तसं बोलतों आहें. पण कां बोलतों आहें ? केवळ त्यांच्या नाहींसं होण्यानं मन फार उद्विग्न व त्वेषयुक्त झालं आहे ह्मणून. त्या पुरंदरावरले लोक एकवार पकडून आणून त्यांना जेरीस आणा बरं ह्मणजे सांगतात कीं नाहीं सगळ्या गोष्टी भडाभड तें पहा. अहो मुसलमानांची मुलगी ना ? होईना नाहींशी ! आणखी आपणच् केवळ थंड बसलां आहां याचं मला फार आश्चर्य वाटतं. पहा बोआ आपल्याला जर त्याबद्दल कांहीं वाटत नाहीं, तर मी तरी काय म्हणून एवढा अट्टहास करावा. पण मला रहावत नाहीं. मी आणखी एकदां आपल्याला निक्षून सांगतों कीं आपली कन्या या मराठ्यांनीं कोठें तरी नेऊन पोंचविली आहे. कोठें नेऊन पोंचवली असेल त्याचा मला पत्ताही लागण्याचा संभव आहे. पण मी आतां तें आपल्याला उच्चारून दाखवीत नाहीं. ज्या गोष्टीबद्दल आपली खात्री नाहीं नुसती शंका आहे, त्या बोलून दाखविण्यांत तात्पर्य नाहीं म्हणून गप्प बसतों."

"कां ? कां ?" दिलेरखान, अत्यंत काळजीनें ह्मणतो "शंका असली तरी ती कां सांगूं नये ! अलबत सांगितलीच पाहिजे. सांग काय तुझी शंका आहे, ती. ती मला कळल्याखेरीज मी तरी काय करणार ?"

"सांगेन, आपला हुकूमच असेल, तर सांगेन.पण माझी विनंति एवढीच आहे, कीं ती शंका खरी ठरली नाहीं तर मला दोष देऊं नये. खरी ठरली तर मी ती

शंका काढली असा उच्चार कांहीं करूं नका. खरं पुसाल तर नहाची मजल कोठपर्यंत आली आहे ती हकीकत आणखी ही माझी शंका आपल्याला कळविण्यासाठींच मी एवढ्या तांतडीनं आलों, पण इथं आलों आणखी असं वाटायला लागलं, कीं मी आपल्याला शंका सांगितली आणखी आपण पुरावा मागायला लागलां तर मी पुरावा कुठला देऊं. माझी नुसती शंका आहे. अशी शंका कां आली त्याचीं कारणंही सांगतां येतील; परंतु जास्ती कांहीं आपण विचारलं तर मी काय सांगणार ! "

" मी कांहीं विचारणार नाहीं. तूं सांग काय ती तुझी शंका. "

" मी सांगेन, पण मी आपल्याला एक प्रश्न विचारला, तर आपल्याला राग नाहींना येणार !"

" वाटेल तें विचार. मला कांहीं राग येणार नाहीं. असं काय राग येण्याजोगं तुझ्या विचारण्यांत असणार आहे ! "

"विचार ह्मणतां, तर विचारतों. परंतु मनाला कसंसंच वाटतं. पण करतोंच हिय्या. शहाजाद्याचं कधीं लक्ष्य आपल्या......कधीं दिल्लींत किंवा आग्र्यांत असतांना............ "

किरातसिंगानें हा प्रश्न विचारतांक्षणीं दिलेरखानाच्या चर्येवर एकदम कांहीं स्मरल्याप्रमाणें विकार दिसूं लागला. एखाद्याच्या मनांत एखादी गोष्ट एकदम येऊन जसा प्रकाश पडावा आणि त्याची चेहऱ्यावर खुलावट दिसावी तशीच त्याच्या चेहऱ्यावर दिसूं लागली. त्याच्या मनांत कांहीं संबंधांत एकदम प्रकाश पडला. आणि तो एकदम किरातसिंगाचे अंगावर ओरडल्याप्रमाणें करून म्हणाला. काय ह्मणतोस? माझी पोरगी शहाजाद्याकडे नेली असेल ! बोल, बोल. हीच तुझी शंका कीं नाहीं ? ही शंका घेण्याला कारण काय ? दिलेरखान असा त्वेषानें बोलूं लागला तें पाहून घाबरण्याच्या ऐवजीं किरातसिंग खूष झालेलाच दिसला. एखादी इष्ट गोष्ट आपल्या मनाप्रमाणें तंतोतंत घडली असं पाहिलें ह्मणजे जसें एखाद्याला समाधान होतें. तसें समाधान किरातसिंगास झाल्याप्रमाणें त्याची चर्या दिसूं लागली. दिलेरखान अशा प्रकारें अंगावर आला,तरी किरातसिंग स्तब्धपणें कांहीं वेळ बसला आणि मग ह्मणतो, ' होय. माझी शंका हीच. आणखी ही शंका येण्याला कारण काय असावयाचं आहे ! मराठे आणखी शहाजादा यांचा मिलाफ आहे हेंच कारण. शहाजाद्याला या मराठ्यांनीं फितुर केला. बादशहाच्या विरुद्ध वाटेल तशी बंडाळी केली, तरी त्याबद्दल शासन तर लांबच राहिलं पण उलट उत्तेजन दिलं. या गोष्टी काय कोणी कोणाला सांगायला पाहिजेत ! इतकी फूस ज्या शहाजाद्यानें यांना दिली, त्याला खूष ठेवण्यासाठीं जर एखादी [illegible]शी नजर—त्याला जी जरूरीनें पाहिजे आहे अशी नजर—पाठवण्याचा प्रसंग [illegible]धला तर त्यांत नवल काय !' शहाजाद्याला किती आनंद झाला असेल ! ज्या

गोष्टीकरितां त्यानं दिल्लीस इतके प्रयत्न केले, परंतु मुळींच सिद्धी मिळाली नाहीं. तीच गोष्ट इथें इतक्या अंतरावर चालत येऊन आपल्या गळ्यांत कोणी बांधली तर हर्षवायु होईल त्यांत नवल काय ? आपण विचार करा. या मराठ्यांनीं तेवढा डाव साधून जर शहाजाद्याचं काम केलं, तर त्यांत मागें पुढें फायद्याचंच कलम आहे ह्मणून त्यांनीं तसं केलं. पण हा सारा माझा तर्क आहे.तर्कापेक्षां त्यांत अधिक कांहीं-सुद्धां नाहीं. आतां हा तर्क खरा का खोटा याचा आपणच विचार करा. माझी मनोदेवता मला अगदीं खास असं सांगते, कीं मराठ्यांनीं बेगमेला नेण्याचं दुसरं कांहीं कारण नाहीं. इतकंच नाहीं, पण मला असं खात्रीनं वाटतं, कीं त्यांनीं तिला तिकडे नेऊन पोंचविली, त्यांची काय छाती आहे आपल्याच जवळ तिला ठेवा॰यची ? आपण त्याबद्दल अगदीं सुद्धां शंका ठेवूं नका."

किरातसिंग याप्रमाणें बोलत असतां दिलेरखान अगदीं स्वस्थपणें ऐकून घेत होता असें दिसलें. त्याचें चित्त दुसऱ्या कांहीं विचारांत मग्न होतें ह्मणून ह्मणा किंवा पूर्वीच्या कांहीं गोष्टींचें त्यांना स्मरण होत होतें ह्मणून ह्मणा, पण तो मध्यें एक शब्दही बोलला नाहीं. बराच वेळ अशा प्रकारें गेल्यानंतर तो एकदम किरातसिंगास ह्मणतो. "काय ह्मणतोस ? माझी लाडकी नूर–एल्–हुदा शहाजाद्याला नजराणा ह्मणून या मराठ्यांनीं पाठविली. आणखी शहाजाद्यानं ठेवून घेतली. अरे शहाजाद्या मुअझिमा, जी गोष्ट, आज दोन वर्षांपूर्वीं तूं धन्यासाठीं अगदीं अटोकाट परिश्रम केलेस पण मीं तुझं कांहीं मी चालूं दिलें नाहीं ती गोष्ट आज अशा युक्तिनं तूं साधलीस अं ? हें सारं ऐकून माझ्या अंगाचा अतोनात संताप झाला आहे. पण काय करणार ? हा जर दुसरा कोणी असता; तर त्याला पकडून सुळीं देऊन त्यांचीं पाळं मुळं खणून टाकलीं असतीं पण हा पडला शहाजादा; नजाणों कांहीं प्रसंग होऊन बादशहासुद्धां व्हायचा. आणखी तसा जर झाला तर दांत ठेवून आमचींच पाळंमुळं खणून काढायचा ! या अल्ला या रहिमान ! ही काय गोष्ट मी ऐकतों ! माझी लाडकी नूर–एल्–हुदा ही काय या शहाजाद्याच्या जनान्यांत या मराठ्यांनीं नेऊन घातली ? तसें जर असेल तर आतां यांचं पारिपत्य तरी मी काय करणार ? मुकाट्या बसण्याची पाळी आली....... "

"काय ? काय ह्मणतां खानसाहेब, " किरातसिंग मध्येंच आश्चर्यचकित मुद्रा करून ओरडून म्हणाला " आपण मुकाट्यानें बसणार. मग, आपल्या पोटीं आल्याचें फळ तरी काय ? आपल्या कन्येचा असा उपमर्द ज्यांनीं केला, त्यांचें शासन करण्याचं जर आपल्या हातून होत नाहीं. तर काय होणार ? मग मीं हें सारं आपल्याजवळ सांगितलं तरी कशाला ? खानसाहेब माझी चूक झाली. माझी शंका खोटी. या मराठ्यांशीं तह करून आपण त्यांना बक्षीस द्या. त्या सगळ्यांना सन्मानानं बोलावून त्यांचा बडेजाव करा. जयसिंग राजे जें काय करताहेत, त्याच्याही पलीकडे आपण जा. ते तह करताहेत. त्यांत

त्यांनीं कलमं घातलीं आहेत त्याच्यापेक्षां अगदीं सोपीं कलमं घाला. सगळा मुलूख त्यांना सोडून द्या. उगीच कटकट कशाला—अरे पण मी हा काय आज बरळत सुटलों आहें. माझी अक्कल कुठं गेली ? माझा दर्जा मी असा कसा विसरलों. खानसाहेब, मी आपला सर्वस्वीं अपराधी आहें. मी आपला दर्जा विसरून आपली पदवी विसरून भलताच अधिकार मीं आपल्याकडे घेतला. केवढी माझी चूक. आपण त्या चुकीबद्दल मला दंड करण्याचं सोडून इतकी अद्वातद्वा बडबड करूं दिली हा तुमचा मोठेपणा. पण मी मुर्खानें तसं करावं का काय ? खानसाहेब, मी बोललों हें आपण सारं विसरून जावं. जणूंकाय मी आपल्याला राजाकडे तहाचीं बोलणीं काय चाललीं आहेत आणखी आपली पदवी ते काय समजतात इत्यादि गोष्टी त्यांनीं सांगितल्याच नाहींत असं आपण समजा, आपली मुलगी नाहींशी झाली त्याबद्दलचा माझा तर्क, तिच्याबद्दल शोध करण्याच्या कामांतली राजांची अनास्था आणखी हयगय हीं मी आपल्याला सांगितलीं तीं आपलीं उगीच. त्यांत कांहीं अर्थ नाहीं असं समजून चालावं. आणखी तें मी काय सांगूं ? घेतों आतां आपली रजा. आपण कधीं कांहीं कामगिरीवर म:गून घेतलंत तर माझ्या हातून जें काय होईल तें करायला मी तयार आहें आपला हुकूम होईल त्याप्रमाणें. आपली इच्छा असली तर आपण मला हुकूम द्यावे. नाहींपेक्षां आमची नोकरी चालली आहे ती आहेच."

दिलेरखान त्या वेळीं आपल्या उद्विग्न अशा विचारांत गर्क होता. यामुळें त्याला ही चर्पट पंजरी पुरतीशी ऐकूंही गेली नाहीं, कांकीं त्याचें लक्षच तिकडे गेलें नव्हतें. किरातसिंग बडबडत असतां त्याचें चित्त दुसऱ्याच कोणत्या विचारांत गढलें होतें. किरातसिंगाची बडबड थांबल्यानंतर दिलेरखान झोंपेंतून जागा झाल्याप्रमाणें दचकून मानावर आल्याप्रमाणें होऊन म्हणतोः—किरातसिंग, तहाबिहाची ही गोष्ट असूं दे. पण तूं नूर-एल्-हुदाला शहाजाद्याच्या जनान्यांत मराठ्यांनीं नेऊन घातली याबद्दल काय तुला खरी खरी माहिती असेल ती मला सांगशील तर ठीक होईल." परंतु किरातसिंग त्यांस ताबडतोब म्हणालाः- ' पुरावा तर माझ्याजवळ कांहीं नाहीं हें मीं आपणास आधींच सांगितलं. जें काय मला सांगायजोगं होतं तें सारं मी आपणाजवळ सांगितलं. आतां अधिक सांगण्याजोगं माझ्याजवळ तर कांहीं नाहीं आणखी काय सांगूं. माझ्या मनाची एवढी पक्की खात्री कीं, शहाजाद्याकडे या मराठ्यांनीं बेगमेला नेऊन पावती केली. खात्री कशी झाली हें सांगायला येतं तर आणखी काय पाहिजे होतं. पण मला सांगयला येत नाहीं म्हणून त्यांत अर्थ नाहीं असं मात्र आपण समजूं नका. मी याच्याहीपेक्षां एक गोष्ट जास्त बोललों असतों, परंतु माझी जीभ चालत नाहीं. धजत नाहीं. मनांत वारंवार येतं पण एवढ्या माणसाबद्दल बोलावं कसं ?

' कोण मोठा माणूस, आणखी बोलायलों जीभ धजतं नाहीं ! "

"खानसाहेब, काय चमत्कार असेल तो असो. जितक्या गोष्टी मी अगदीं बोलणार नाहीं असा निश्चय करून आलों, तितक्या सगळ्या गोष्टी आपण माझ्या तोंडून काढून घेतां आहां. आपल्या अंगीं गुणच असा दिसतो, कीं आपल्या पुढं जो माणुस येईल, तो आपलं मन उघडं करून दाखवील. आतां एवढी तरी गोष्ट आपण मला विचारूं नये. बाकी आपण आग्रहच धरला तर माझा काय पाड लागणार ? मी पटकन सांगून टाकीन. पण आपण विचारलं नाहीं तर बरं."

"तें कांहीं नाहीं. खानसाहेब एकदम उसळून म्हणाले "तुला आतां मी एकही गोष्ट मागं ठेवूं देणार नाहीं. बोलच काय, आहे तें बोल. अगदीं संकोच करायचं कारण नाहीं."

"संकोच मी केला नसता ह्मणा, पण मी म्हणतों तो कशावरून ? त्याला आधार काय ? असं जर मला विचारलंत तर मी काय उत्तर देणार ? "मी कांहीं विचारीत नाहीं मग तर झालं. अगदीं कांहीं विचारीत नाहीं. पण काय आहे तें सांग.

"मोठी अडचण आहे बोवा. पण आपला हुकूम कसा तोडूं. सांग तो तर, सरकार, शहाजाद्यांकडे बेगम जाण्याला मराठे केवळ कारण झाले, पण जयसिंग राजाच्या फुशीवांचून किंबहुना त्यांच्या सांगणीवांचून हें झालें नाहीं. जसा अलमगीर आपल्यावर लोभ करितात तसाच लोभ पुढल्याही पिढीचा हवाना ? तेवढ्याकरितां काय पाहिजे तें करावं !"

दिलेरखान थक्क झाला.

---

# प्रकरण २८ वें.

## दोघांची भेट.

असा एखादा विषारी सर्प एखाद्याला दंश करून आपल्या दंशाचा काय परिणाम झाला हें जाणण्याकरितां आपण घेतलेल्या बळीकडे सूक्ष्म दृष्टीनें पहातो व आपल्याला पाहिजे तसा परिणाम झाला नसावा, आपलें काम अर्धवट टाकूं नये आपल्या शत्रूस पुरा चित करून टाकावा तरच आपलें संरक्षण होणार असें मनांत आणून पुनः दंशावर दंश करतो, तीच अवस्था किरातसिंगानें चालविली होती. एक एक गोष्ट मोठ्या शिताफीनें, मुत्सद्दीपणानें व अचूकपणानें काढून तिचा परिणाम झाला ह्मणजे मग दुसरी काढावयाची असा त्याचा क्रम चालला होता हें वाचकांच्या नजरेस आलें असेलच. एखाद्यास जहरानें मारावयाचें तर

खरें; परंतु आपणे मारलें असें कोणास कळूं तर द्यावयाचें नाहीं असा दुष्ट हेतु धारण करणारा माणूस त्या जहाराचे घुटके जसे फार सूक्ष्म प्रमाणानें देत जातो—हेतु हा कीं, आपणास हे जहाराचे घुटके पाजले जात आहेत असें त्या पिणारासही समजूं नये—तसाच प्रकार किरातसिंगानें चालविला होता. दिलेरखानाचें मन जयसिंगाविरुद्ध व शिवाजीविरुद्ध जितकें दूषित होईल तितकें केलें असतां आपला डाव साधेल अशी त्याची समजूत. जयसिंगाची जागा मिळण्यास जयसिंगास खालीं ओढण्याखेरीज दुसरा मार्गच नव्हे असें त्याचे मनानें घेतलेलें.

आपली मुलगी एकाएकीं नाहींशी झाली, ती खरोखरीच मुअज्जिमाकडे गेली काय ? तिला शहाजाद्याकडे पाठवून देऊन त्याची मर्जी संपादण्याचा हा नीच मार्ग जयसिंगानें काढला काय असे विचार त्याच्या मनांत उद्भवून व ते विचार खोल मुळें धरून क्षणोक्षणीं त्याला अशी खात्री वाटूं लागली कीं, किरातसिंग सांगतो त्या सर्व हकीकती खऱ्या असल्या पाहिजेत. मुअज्जिमाचें लक्ष आपल्या पोरीवर आहे हें त्यास पूर्वीपासून माहितीं. आणि त्यांत हा प्रसंग. तेव्हां त्याला किरातसिंगाचें बोलणें खरें वाटलें तर त्यांत नवल नाहीं.

आपणं दिलेला हा शेवटला घुटका चांगला पचला. आतां आणखी एक घुटका द्यायला हरकत बिलकुल नाहीं असें दिसतांच किरातसिंग त्यास पुढें ह्मणतोः "सरकार, मी ह्मणतों याला पुरावे मी देऊं किती ! आणखी पहाल किती ? आपण चांगले डोळे उघडून शांतपणें आणखी श्रद्धेनें पहाल व ऐकाल, तर आपल्याला पुराव्याच्या राशी देईन राशी ! माझ्या मनाची तर अगदीं बालंबाल खात्री झाली आहे, कीं जयसिंगराजे शिवाजीचा पुरा मोड कधीं करणार नाहींत. बादशहानें आपल्याला पाठविलें आहे, तर जेमतेम थातुरमातुर करून पानावर पान ठेवून मोठें यश मिळविलें अशी बढाई मारून आपली हिंदुस्थानची वाट धरावयाची. एकदां आपण मोठेपणा मिळवून निसटल्यावर पुनः मग त्यानें दुप्पट जोरानें आपलें नासाडीचें आणखी मोंगलाच्या राज्याचे वाभाडे काढण्याचें काम सुरू केलें तर केलें ! मी ह्मणतों याच्या खरेपणाबद्दल मी एक फार उत्तम पुरावा देतों.—शिवाजीचे हेर आमच्या सैन्यांतून नानाप्रकारचीं सोंगें घेऊन लागेल तसे सैरावैरा हिंडतात. कित्येक चाणाक्ष लोकांनीं त्यांस ओळखून राजांस कळविलें, त्यांच्या स्वाधीनही केलें, परंतु काय झालें ? इतर कोणाचे जर हेर असे सांपडते, तर राजांनीं तेव्हांच हत्तीच्या पायाखालीं दिले असते. आतांपर्यंत काय आपल्याला त्यांचा अनुभव नाहीं ! परंतु शिवाजीचे दोन हेर पकडले आहेत. ते हेर ह्मणजे कोणी तरी सामान्य लोकही नाहींत. अगदीं शिवाजीचे डावे उजवे हात आहेत, पण असे हेर पकडले आहेत तेव्हां त्यांचें पुढें काय करायचें? त्यांना दंड काय करायचा? शिक्षा काय करायची ? याबद्दल कांहीं तरी विचार पूस आपल्याकडे ? उलट त्या लोकांना आपल्या खासगी डेन्याजवळ तंबु डेरा देऊन त्यांत ठेवलें आहे. बोला आपल्याला कांहीं आहे का

माहिती सरकार ? आपल्याला खोटें वाटत असेल तर करा चौकशी आणखी पहा मी ह्मणतों याचें प्रत्यंतर. त्या हेरांपैकीं एक तर त्यांचा खुद्द सरदार आणखी दुसरा त्यांच्या गुरूचा शिष्य. गुरुभाऊच ह्मणायचा ! वास्तविक त्यांना सोडूनच द्यायचें; पण सोडून न देतां त्यांची उत्तम व्यवस्था ठेवून आपल्या नजीक ठेवलें आहे. याचें मला सुद्धां आश्चर्य वाटतें. इतक्या सगळ्या गोष्टी होतात आपल्याला न कळत, तर आपला मुलाहिजा तो काय राहिला ? जे हे दोघे हेर पकडून ठेवलेले आहेत, त्यांच्याचकडून बेगमसाहेबांची रवानगी करवली असावी. कारण, मला ज्यानें ही अर्धवट बातमी सांगितली, तो असें ह्मणत होता, कीं दोन मराठे सरदार होते त्यांनीं कोणी तरी एक गोषांतली स्त्री शहाजाद्याकडे पोंचती केली. मला जितक्या बातम्या लागल्या त्या सगळ्या मीं आपल्याला सांगितल्या. आतां एकच बातमी सांगायची आहे, ती अशी आहे, कीं आपण ती ऐकल्याबरोबर आपली संशयनिवृत्तिच होईल ? ती बातमी एवढीच, कीं त्या स्त्रीचें रक्षण करण्याला तिच्याबरोबर पांचपन्नास रजपूत शिपाई होते. "

त्याचा हा शेवटला फटकारा रामबाणच होता. तो ऐकण्याबरोबर इतका वेळ अगदीं स्तब्ध बसलेला दिलेरखान एकदम किरातसिंगास ह्मणतोः

" ऐ हयूवान् ! तूं मला हें सांगतो आहेस तरी काय ? माझी मुलगी मराठ्यांच्याकडून पळवून आपले लोक बरोबर देऊन शहाजाद्याकडे पोंचती केली ? माझी मुलगी ? "

" तें आतां मी काय सांगूं ? माझ्या बातमीदारानें मला एवढें खास सांगितलें, कीं बरोबर पांचपन्नास रजपूत आणखी दोन मराठे सरदार अशी एक स्त्री गेल्या दहापांच दिवसांत औरंगाबादेस शहाजाद्याकडे गेली, याबद्दल तर मुळींच शंका नाहीं. आतां ती कोण होती, हें आपण तर्कानें काढा. दुसरें काय सांगूं ? माझा तर्क मीं आपल्याला सांगितला. जर मीं प्रत्यक्ष पाहिलें असतें, तर आपल्याला नुसते तर्क सांगायला आलों नसतों. बेगमसाहेबांना सोडवून आणून आपल्या पुढें उभें केलें असतें तरी एक, नाहीं तर तसा प्रयत्न करण्यांत मेलों तरी असतों एक. नुसतें तोंड दाखवायला आलोंच नसतों. आतां आणखी काय सांगूं ? जें काय सांगायचें तें सगळें सांगितलें. आपल्या चित्ताला येईल तें खरें. मला आतां आज्ञा होईल तर मी आपल्या जागीं जाऊन बसतों. पुढें काय काय चमत्कार होतील ते आपल्याला दिसतीलच. आपण कांहीं विचार कराल तर पहा. "

दिलेरखानाचें लक्ष्य त्याच्या बोलण्याकडे अगदीं प्रारंभीं काय असेल तेवढेंच. परंतु पुढें त्याचें मन दुसऱ्याच कांहीं विषयाकडे गुंतलें असावें. त्याचे डोळे वटारल्यासारखे दिसूं लागले. तो आपल्या वरच्या दांतांनीं आपला खालचा ओंठ चावीत राहिला. दृष्टी कोणीकडे लागली होती हें समजणें कठिण होतें. किती वेळ झाला, त्याची वृत्ति अशीच राहिली. ही त्याची वृत्ति पाहून किरातसिंगास अत्यंत

आनंद झाला. एखादा साधु पुरुष आपल्या नडाख्यांत सांपडला ह्मणजे दुष्टाला जसा परमानंद होतो, तसा परमानंद त्यास झाल्याचें त्याच्या चर्येवरून स्पष्ट दिसत होतें.

वर सांगितल्याप्रमाणें तटस्थ व चमत्कारिक वृत्तींत बराच वेळ गेल्यानंतर दिलेरखान एकदम किरातसिंगास ह्मणतोः " मग आतां मीं काय करावें असें तुझ्या मनांत आहे ? मला तर बाबा कांहीं सुचत नाहीं. जयसिंगराजे कांहीं माझ्याशीं असें कपट करील ही कल्पना मला नव्हती; पण त्यांत नवल काय ? ज्यांनीं स्वार्थासाठीं आपलें कुळ बाटविलें, त्यांनीं जर स्नेही ह्मणून दुसऱ्याचा घात केला तर त्यांत नवल काय ? त्यांनीं विश्वासघात केला, तर त्यांत नवल नाहीं. आपण त्यांच्यावर विश्वास टाकला, तर तें मात्र नवल खरें. असो. आतां काय उपयोग ? मीं आपल्या मनाशीं पुष्कळ विचार केला, कीं आतां आपल्याला काय करायला येईल, परंतु कांहींच सुचत नाहीं. मीं जर आतां अधिक उणी गडबड करीन, तर मला तरी कांहीं संकटांत हे घालणार नाहींत ह्मणून कशावरून ? इकडून शहाजादा अनुकूल; इकडून शिवाजी मथवलेला; आमचे लोक तर त्यांच्याच ताब्यांतले; तेव्हां आपण काय करणार ? "

किरातसिंगास त्याच्या त्या बोलण्याचें फारच आश्चर्य वाटलें. दिलेरखान इतका कच्चा असेल आणि आपल्या सांगण्याचा त्याच्या मनावर असा विपरीत परिणाम होईल ही त्यास कल्पना सुद्धां नव्हती. त्याला असें वाटलें, कीं आपल्या सांगण्यानें तो फार चिडून जाऊन जयसिंगाची खोडकी मोडण्याचे उपाय शोधूं लागेल. आपली मुलगी त्यानें पळवून शहाजाद्याच्या घरांत घातली हें ऐकण्यांतगोचर त्याच्या अंगाचा अगदीं भडका उडेल आणि राजा जयसिंग यास खाऊं का डसूं असें त्याला होऊन जाईल; परंतु पहातों तों अगदींच विचित्र आणि अनपेक्षित असा परिणाम झाला. तथापि तोही कांहीं केवळ अनिष्ट परिणाम नव्हे, त्याचाही आपल्याला नानाप्रकारांनीं उपयोग करतां येईल, असें त्यानें शेवटीं आपल्याशींच ह्मणून समाधान करून घेण्याचा विचार केला व नंतर ह्मणाला " सरकार, आपणच असें ह्मटल्यावर आमच्यासारख्यांनीं काय करावें ? पहा, जे आपल्याला सुचेल तें आतां करा. आपण मनांत आणलें, तर एक पाऊलभर सुद्धां आपल्याला विचारल्याखेरीज राजांचें चालायचें नाहीं. आतां तह वगैरे कांहीं झालें तरी आपल्याला कळल्याखेरीज ते राहायचे नाहींत. त्यांत ते चुकायचे नाहींत. आपण कांहीं जरी काढलेत तरी होस हो ह्मणतील आणखी शेवटीं आपल्या मनांत जें असेल तेंच करून सोडतील ! "

" बरें आहे, बरें आहे, पाहूं आतां तें तरी कसें होतें तें. हिंदूला हिंदू मिळून जाऊन बादशहातीला धाब्यावर बसवतील ह्मणून बादशहाला भय वाटून त्यानें मला याच्याबरोबर पाठविलें आणखी यानें आतांपर्यंत मोठी मास्त दाखवून मला

फसविलें. माझी मुलगी पळवून नेली आणखी शहाजाद्याकडे पोंचविली हा मात्र सगळ्यांत चमत्कार खरा. आतां याचा सूड मी कसा उगवूं ? उगवीन. उगवीन केव्हां तरी खचित उगवीन. तूं जा आतां. मला या वेळीं कांहीं सुचत नाहीं. माझ्या अंगाचा भडका झाला आहे. मी वेडा होईन कीं काय असें मला भय पडलें आहे. आतांपर्यंत अशी स्थिति होती, कीं माझा राग एकट्या मराठ्यांवर होता. एकदां शिवाजी जर सामन्याला आला, तर त्याला मी आपला हात दाखवीन. परंतु तसा प्रसंग येईपर्यंत नुसत्या गप्पा मारण्यांत काय अर्थ आहे ? किरातसिंग, मीं मागें एकदां तुला सांगितलेंच, कीं केवळ माझी मानहानि होते, मला जयसिंग विचारीत नाहीं, मला अगदीं त्यानें तुच्छ केलें आहे, आणखी त्यामुळें तुला फार वाईट वाटून तूं माझ्याकडे येऊन नाना प्रकारच्या बातम्या सांगतोस हें कांहीं मला खरें वाटत नाहीं. या सगळ्या तुझ्या करण्याला दुसरा कांहीं तरी हेतु खचित आहे ! इतका वेळ मीं आपलें मुकाट्यानें ऐकून घेतलें, मला तें कळायला हवेंच होतें, पण तुझ्यावर माझा जरा खरा खरा विश्वास पटायला पाहिजे असेल तर मला माझी नूर अल्हुदा खरोखरीच औरंगाबादेस शहाजाद्याच्या जनान्यांत पाठविली गेली कीं काय तें सांग. ती जर तशी गेली असली तर .........बोल. बोल. तुझे तर्क नकोत नुसते. खरोखर तिला तिथें पोंचवलें आहे कीं काय सांग."

इतका वेळ आपण इतक्या तऱ्हेनें बोललों, आणि शेवटीं हा गृहस्थ माझा तुझ्यावर विश्वास नाहीं असेंच ह्मणतो हें पहातांच, किरातसिंगास अतोनात वाईट वाटलें व रागही आला. परंतु ज्याला आपलें काम साधावयाचें असेल त्याला राग गिळावा लागतो आणि हंसण्यावारी वेळ मारून न्यावी लागते. निगरगट्टपणा पतकरावा लागतो. या न्यायास अनुसरून त्यानें आपला राग गिळून हंसून ह्मटलें, "आपण कांहीं जरी ह्मटलें, कितीही अविश्वास दाखविला तरी आपली पाठ सोडून मला कांहीं जातां येत नाहीं. कारण त्यांच्या विरुद्ध मीं आपल्याजवळ वाटेल तें– खरं तेंच– येऊन सांगितलें. हें आपण त्यांच्याजवळ बोललां ह्मणजे माझा निकालच झाला ! तेव्हां आतां कृपा करून मला आपल्यापासून तरी दूर करूं नका. निदान मीं ज्या गोष्टी सांगितल्या या खऱ्या किंवा खोट्या याची पुरी चौकशी करून त्या खोट्या ठरेपर्यंत तरी राजे जयसिंग यांच्याकडे माझ्याबद्दल–मीं काय सांगितलें याच्याबद्दल– कांहीं बोलूं नका. मीं सांगितलेली प्रत्येक गोष्ट अगदीं खरी आहे. दोघां मराठ्यांना बरोबर देऊन पांच पन्नास रजपूत शिपाई संरक्षणार्थ पाठवून अशा थाटानें बेगमसाहेबांस शहाजाद्याकडे पाठविलें. त्या औरंगाबादेपर्यंत गेल्या हें अगदीं खरें. पुनः आपण विचारायचें सुद्धां आतां कारण नाहीं. आपल्याला जर कोणीं कांहीं निराळें सांगितलें तर तें खरें करून घ्या ह्मणजे झालें. मग माझ्यावर आपला विश्वास नसला तरी चालेल. पण सापसाप ह्मणून भुई झोडपीत सुटण्यांत कांहीं तात्पर्य नाहीं. माझें मीं कर्तव्य केलें. आपल्या नजरेस आलें नाहीं, माझें नशीब !

आपल्याला कदाचित् जर माझा खरेपणा पुढें प्रत्ययाला आला तर माझें स्मरण होऊं द्या. तेव्हां जरी स्मरणानें आपण मला जवळ बोलावलेंत तरी मला त्यांत समाधान आहे. मीं जें सांगितलें तें सारें खोटें आहे, असें आपल्या प्रत्ययाला आलें तर आपण जयासिंगांना माझें सगळें बोलणें सांगून त्याचा निकाल करा. मला तोफेच्या तोंडीं द्या! आणखी काय सांगूं बोला! मी किती वेळ तरी—एक प्रहराच्या वर झाला असेल, तेंच तेंच तेंच बोलून आपल्याला कंटाळा आणला आहे. मी आतां जातों."

किरातसिंगाचें हें बोलणें चाललें असतां पुनः दिलेरखान आपल्याशींच कांहीं विचार करीत होता. जयसिंगानें आपली मुलगी पळवून शहाजाद्याच्या जनान्यांत पोंचविली, ही गोष्ट त्याला खरी वाटेना आणि खरी असावी असें क्वचित् मनांत आलें, तर फार त्वेष येई व खेद होई. शहाजायाकडे जर तिला यांनीं पोंचविलें असलें, तर दुसरी एक पंचाईत त्यांस आली. त्याबद्दल फार ओरड करूनही उपयोग नाहीं. फार ओरड आरड केली, तर शहाजाद्याचा राग होऊन बादशहा तर कोणाचा कड घेईल कोण जाणे! तेव्हां आपल्याला उघडपणें त्याबद्दलही विशेष कांहीं करतां येणार नाहीं. किरातसिंगानें प्रथम शंका ह्मणून जी गोष्ट सांगितलीन् ती पुढें स्पष्टपणें अशी अशी गोष्ट झाली ह्मणून तो सांगूं लागला! तेव्हां आतां शंकेचें रूपही त्याला राहिलें नाहीं. अर्थात् तो ह्मणतो तें अगदीं खरेंच असलें पाहिजे. अशा स्थितींत आपण आतां काय करावें त्याला कांहीं सुचेना.

हा त्याच्या मनाचा घोंटाळा आपल्याला हितावह आहे कीं अहितावह आहे हें किरातसिंगास समजेना. नूर अलहुदा हिला शहाजाद्याच्या जनान्यांत पोंचविण्याची जी काय योजना त्यानें केली होती, ती योजना पूर्णपणें अंमलांत आली आणि बेगम तेथें अडकली अशी त्याला पक्की खात्री वाटत होती. त्या खात्रीच्या जोरावर त्यानें वर सांगितलेला सर्व व्यूह रचिला. दोन मराठ्यांस दोन मराठे, रजपूत लोकांस रजपूत लोक, आणखी काय पाहिजे? आणखी जी योजना केली, ती अमलांत आली नाहीं. आपण औरंगाबादेच्या नजीकपर्यंत बेगमेस पोंचविलें, परंतु आपल्या पुढल्या बेताप्रमाणें ती औरंगाबादेस न जातां दुसऱ्या कोठें तरी नेली गेली हें त्याच्या स्वप्नींही नव्हतें. त्याच्या समजुतीप्रमाणें तो वस्तुस्थितीचें वर्णन करून सांगत होता. मात्र त्यांत जें त्याचें स्वतःचें अंग होतें तें त्यानें जयसिंगावर ढकलून दिलें.

दिलेरखानास त्याचें तेंच तेंच बोलणें ऐकण्याचा शेवटीं कंटाळा आला व त्यानें त्यास खरोखरीच निरोप देण्याचें मनांत आणलें. परंतु पुनः त्याला वाटलें या माणसाचा आपण उपमर्द करतों हें बरें नव्हे. याच्यापासून आपल्यास फायदा करून घेतां येईल. याला आपल्या हातांत ठेवणें जरूर आहे.

असा विचार करून त्यानें त्यास पुनः ह्मटलें, " आतां पुढें आपण काय करावें

याचा विचार करण्यास मला कांहीं सुचत नाहीं. करितां आतां आपण स्वस्थ व्हा. विश्रांति घ्या व सकाळीं मग आपण पुनः भेटून मग काय विचार करायचा तो करूं. कांहीं तरी तोड ही निघालीच पाहिजे. आपण कांहीं सोप्या तऱ्हेनें सर्व गोष्टी होऊं देणार नाहीं. ज्या कांहीं गोष्टी घडल्या आहेत त्याबद्दल सूड घेतलाच पाहिजे. तो कसा घ्यायचा हें आपल्या दोघांच्या विचारानें ठरवूं. तहाचा विचार जर इतक्या पल्ल्यापर्यंत आला आहे, तर निदान मला नुसतें विचारण्याला तरी राजे कधीं कमी करणार नाहींत. त्यांनीं विचारलें ह्मणजे मी काय बोलायचें काय नाहीं त्याचा विचार ठरवून ठेवला पाहिजे. "

मीं जें सांगितलें त्याच्यावर तुमचा विश्वासच नसला तर माझा उपयोग तरी काय होणार आपल्याला ! मी सुचवीन त्या गोष्टींवर तरी आपला भरंवसा कसा बसणार ? तेव्हां मी आपल्याला उगीच शिणवूं कशाला ! हें बोलणें अर्थातच फार खोंचून होतें.

दिलेरखान त्यावर कांहीं बोलला नाहीं. तो जागचा उठला आणि अंतःपुरांत जाण्याचा विचार दाखवूं लागला. किरातसिंगाच्या मनांत आणखी कांहीं बोलायाचें होतें, परंतु त्यानेंही आंखडतें घेतलें व तो " मी आपल्या जागीं जातों. याउपर आपला निरोप आला तरच येईन, नाहीं तर पुनः मी इकडे येणार सुद्धां नाहीं. आपल्याकडून आमंत्रण आलें, कीं मी आपल्या सेवेला तयार आहे. जें काय मला सांगायचें तें मीं सांगितलें. आतां आपण इथें रहाण्याचा आग्रह कांहीं करूं नये. "

असें ह्मणून किरातसिंग उठून जाऊं लागला. दिलेरखानानें त्यास नको होय कांहींच ह्मटलें नाहीं. किरातसिंगास तें थोडेंसें चमत्कारिक वाटलें. परंतु नुसतें चमत्कारिक वाटून उपयोग काय ? त्याला आपल्या ह्मटल्याप्रमाणें करणें भाग पडलें व तो तेथून निघून गेला.

---

# प्रकरण २९ वें.

## तहाचें बोलणें.

किरातसिंग निघून गेला तरी दिलेरखान किती वेळ अगदीं स्तब्ध व विचारमग्न असा एकांतांत बसला होता. आपण जें काय ऐकलें तें सर्व स्वप्नांत ऐकलें, कीं जागेपणीं ऐकलें याचाच त्याला बोध होईना. त्यानें किती वेळां तरी उसासे टाकले, किती वेळां दांतओंठ खाल्ले, तो किती वेळां कपालाला आंठ्या घालून त्या

आपल्या बसल्या जागींच मागें तक्क्यावर पडला. त्याला कांहीं तरी निश्चय करा-वयास पाहिजे होता आणि तो निश्चय कांहीं होईना. जयसिंगराजे आपल्याशीं अशा प्रकारें वागतील, ही कल्पनाच त्याच्या मनांत अजून कायमचा धर धरीना. किरातसिंगानें विषबीजाची पेरणी केली, तेव्हां ती चांगली झाली असा घटकाभर रंग दिसला. परंतु तो रंग कच्चाच पडला. त्याला पक्केपणा येईना. आपल्याला कळलेली ही बातमी नक्की आहे, कीं आपलें व राजा जयसिंग यांचें वांकडे यावें या हेतूनें या किरातसिंगानें आपल्याला कांहीं तरी सांगितलें, याचासुद्धां त्याच्या मनांत मोठा वानवाच झाला. शेवटीं त्याच्या मनानें असा विचार केला, कीं आपण औरं-गाबादेस कोणी तरी एखादी लवंडी पाठवून शिताफीनें आपली नूर अल हुदा तेथें आहे काय? शहाजाद्याच्या जनान्यांत ती आहे काय याची माहिती आणवावी. जर ती तेथें असेल तर तिला भेटून सारी खरी हकीकत काय ती सहज समजेल. तेव्हां अशा नाजूक मार्गानेंच आतां आपण बातमी काढली तर शक्य आहे. नाहींपेक्षा आडदांडपणाचा कांहीं एक उपयोग होणार नाहीं. आपली मुलगी एखाद्या सामान्य माणसाच्या जनान्यांत घातली गेली आहे असें जर त्याला कळतें, किंबहुना खुद्द राजांनीं आपल्या जनान्यांत ठेविली आहे असें जरी त्यास कोणी सांगतें, तरी त्यानें तडकाफडकी जाऊन त्याच्या घरावर अगर छावणीवर अचानक छापा घालून आपण ऐकलेल्या बातमींत तथ्य आहे कीं नाहीं हें तेव्हांच पाहून तथ्य निघो वा न निघो त्याचें तळपट उडविलें असतें; परंतु शहाजाद्याच्या संबंधांत तसें कांहींच शक्य नव्हतें, यामुळें त्याचा नाइलाज होता. शहाजाद्याच्या मनांत आपल्या पोरीविषयींची आसक्ति फार होती हें त्यास दिल्लीपासून माहीत होतें. आपली आसक्ति शहाजाद्यानें स्पष्टपणें दिलेरखानास दर्शविलीही होती; परंतु बादशहाच्या मुलाला तख्त मिळण्याचा संभव. त्याला आपली मुलगी द्यावी हा त्याचा अंतःस्थ हेतु, यामुळें औरंगजेबाच्या मुलाचें आपल्या मुलीवर लक्ष्य आहे हें ऐकून जरी त्यास समाधान वाटलें, तरी पण त्याला ती आपण द्यावी असें त्याच्या मनांत अर्थातूच येईना. आणि ज्या प्रकारानें त्यानें तिला आतां नेलें त्या प्रकाराचा तर त्यास सर्वथा राग आला हें अगदींच साहजिक होय. एखाद्या राज-पुत्राशीं आपल्या मुलीचें लग्न लावून देणें ही गोष्ट निराळी, आणि त्यानें तिला उपटून नेऊन आपल्या जनान्यांत घालणें हें निराळें.

वर सांगितल्याप्रमाणें विचार करून त्यानें आपल्या जनान्यांतील एका लवंडीला बोलावून आणून तिला अगदीं विश्वस्तपणें सर्व हकीकत सांगितली व काय वाटेल तें करून सर्व हकीकत काढून आण ह्मणून बजावलें. तिला बक्षि-साची आशाही दाखविली. तिच्या बरोबर तिच्या मदतीला एक हबशी गुलाम तिच्या संरक्षणाकरितां दिला. त्यांनीं वाटेल तो बहाणा करावा. वाटेल तो उपाय योजावा आणि काम करून यावें. त्या लवंडीनें तें काम मोठ्या उत्सुकतेनें पतक-

रिलें आणि तिच्या पसंतीनेंच तिला एक हबशीही देण्यांत आला. ती व तो आपल्या कामाला लागलीं. याप्रमाणें हीं दोन माणसें गेल्यावर दिलेरखानाचें मन किंचित् शांत झालें आणि मग दुसऱ्या विचारांकडे लागण्यास तें मोकळें झालें. जयसिंगानें आपणाशीं कपट केलें, तर आपणही आतां त्याच्याशीं तशाच प्रकारानें वागूं. त्याखेरीज त्याला आपलें खरें स्वरूप काय आहे तें कळणार नाहीं. ज्यांनीं आपल्या बहिणी मुसलमान बादशहाला व शहाजाद्यांना दिल्या, त्यांनीं दुसऱ्याच्या मुली अशा प्रकारें देण्याला मागेंपुढें पाहिलें नाहीं, यांत आपल्याला आश्चर्य तें कशाला वाटायला पाहिजे? असा सुद्धां विचार त्या वेळीं त्याच्या मनांत आल्याखेरीज राहिला नाहीं. त्या वेळीं त्यानें आपल्या मनाचा जो काय विचार करावयाचा तो करून एकदां मनाला शांति आणली. आणि मग आपल्याला जर तहाविषयीं काय करावयाचें असें विचारलें तर आपण उत्तर काय द्यायचें याबद्दल मनांत विचार चालविला. परंतु असा विचार म्हणजे एकदां एक निश्चय करून शांत केलेल्या मनास पुनः प्रक्षुब्ध करण्याप्रमाणेंच होणार आहे. तेव्हां वेळ येईल, तेव्हां काय सुचेल तें पाहूं असें म्हणून त्यानें तो विचार दूर सारला आणि झोंप आली तर पहावी म्हणून खटाटोप करूं लागला. होतां होतां त्याच्या त्या अत्यंत शिणलेल्या मस्तकास आतां अगदीं अवश्य झालेल्या निद्रेनें त्याजवर कृपा केली. त्याचे डोळे आपोआप झांपडल्याप्रमाणें मिटूं लागले आणि तो बसल्या जागींच पडून घोरूं लागला. आजपर्यंत अशा प्रकारें त्यास झोंप लागली नव्हती. तो तसाच तेथें पडल्यानंतर त्यास कोणीं उठविलें नाहीं. त्या झोंपेंत त्यास स्वप्नें पडून शिवाजी, राजा जयसिंग, नूर अल हुदा, किरातसिंग वगैरे मंडळी दिसली काय? कोण जाणें!

दुसरे दिवशीं सूर्य किती तरी वर आल्यानंतर खान जागा झाला, परंतु आपलें डोकें भ्रमण होत असल्यासारखें त्याचें त्यासच वाटूं लागलें. तेच तेच विचार वारंवार मनांत येऊं लागले. त्यानें आपले नित्यविधि उरकले आणि तो स्वस्थ बसला असतां जयसिंगराजाकडून हरकारा आला असल्याबद्दल वर्दी आली. त्यानें ताबडतोब त्यास आंत बोलविलें. हरकऱ्यानें कुर्निसा केला व दिलेरखानापुढें थैली टाकली. ती त्यानें घेतली, फोडली, उघडली व वाचण्यास सुरुवात केली. त्यांत ही सर्व हकीकत फार सरळपणें लिहिली होती. "आपल्या पराक्रमानें घाबरून—आपल्या एकंदर व्यवस्थेला व दराऱ्याला भिऊन शिवाजी तह करण्याच्या गोष्टी सांगूं लागला आहे. सगळे किल्ले व सगळा मुलूख आमचे ताब्यांत दिल्याखेरीज तहाचीं नुसतीं बोलणींसुद्धां बोलण्यास मी तयार नाहीं असें मीं त्याला उत्तर दिलें आहे. त्याच्याकडून एक पंडित आला होता, त्याची मीं भेट घेतली व त्याला हा मजकूर स्पष्ट सांगितला. रंग असा दिसतो आहे, कीं बादशहाचाच काय परंतु मूळचा आपला जहागिरीचा सुद्धां सर्व मुलूख शिवाजी आपल्या ताब्यांत

देऊन आपल्यापुढें हात जोडून येईल. आतां आपल्यापुढें टिकाव निघणें कठिण किंबहुना अगदीं अशक्य, अशी त्याची खात्री झाली आहे. मी जितकें शक्य तितकें ओढून धरतोंच आहें, परंतु आपल्या बेतांत आलासा वाटला ह्मणजे आपण सैल सोडावें आणि तह करण्यास कबूल व्हावें असें मला वाटतें. तरी आपल्या संमतीवांचून कांहींही कर्तव्य नाहीं, ह्मणून हें आपणांस कळवीत आहें. मी जें काय सांगितलें, तें आपल्या राजास पंतानें लिहून कळविलें आहे. कदाचित् तो स्वतःही परत जाऊन इकडली हालहवाल सांगेल. त्याच्या मनावर असा परिणाम झाला आहे, कीं आतां हे महाराष्ट्रांतला किल्लान् किल्ला पाहून आपल्या बादशहाचें निशाण तेथें लावल्याखेरीज अगदीं रहात नाहींत. आपल्याकडून नम्रता दाखविली जाऊन जर तहाचें बोलणें झालें नाहीं, तर सगळ्या मुलखाचा सत्यनाश झालाच म्हणून समजावा, अशी त्याची पक्की खात्री झाली आहे. त्यानें माझी मुलाखत घेण्याची इच्छा दाखवितांच मी मुलाखतीस येण्याची परवानगी दिली. माझा हेतु एवढाच होता, कीं आमचा एकंदर पसारा आणखी तयारी पाहून त्यानें आपल्या मालकाज-वळ त्याचें वर्णन करून सांगावें म्हणजे जर कांहीं अणुरेणुभर रग राहिली असेल तर ती सुद्धां नाहींशी होऊन त्यानें लागलींच वठणीस यावें. आतांपर्यंत झालेली ही हकीकत आपणास कळविली आहे. आणखी जी काय घडेल ती कळवीन. शेवटीं जें काय ठरवावयाचें तें आपणांसमक्षच ठरवूं. आपण दोघे मिळून बादश-हाला आश्वासन देऊन आलों, कीं शिवाजीला आपला बंदा बनविल्याखेरीज रहात नाहीं. त्याप्रमाणें कांहीं तरी होईल, आणखी कांहीं तरी झालें असें ह्मणण्याला कांहीं हरकत नाहीं." राजा जयसिंगानें दिलेरखानाकडे जें पत्र पाठविलें तें कांहीं कोठें उपलब्ध नाहीं, ह्मणून त्यानें ज्या मजकुराचें पत्र पाठविलें असें ऐकिवांत आहे, त्या मजकुराचा गोषवारा वर दिला आहे.

तें पत्र वाचतांच दिलेरखानानें ताडकन् त्याच्या थैलांसकट तें दूर फेंकून दिलें. ज्या हरकाऱ्यानें ती थैली आणली, तो आपल्या पुढें उभा आहे याचेंसुद्धां त्याला भान राहिलें नाहीं. आपण सर्व कांहीं करायचें, बोलायचें तें बोलून आणि ठरवायचें तें ठरवून मागाहून उगीच सारवण घालण्यासाठीं हें पत्र आपल्याकडे पाठविलें आहे. तह करतों, तूं अमूक ह्मण, तूं तमूक ह्मण, असें त्याला आधींच पढवून ठेवलें असेल. त्यानें तसें ह्मणावें, नव्हे लिहूनही द्यावें आणि आपण जय पावलों, आपली फत्ते झाली, शिवाजीचें राज्य मोडलें अशा हुलकावण्या उठवून आपण येथून चालतें व्हावें. मग पुनः आयतेंच त्याला मोकळवन मिळून पुनः आपला धु-माकूळ घालायला संधि मिळावी. हा सगळा या कारस्थानाचा हेतु दिसतो आहे. हिंदु हिंदु एक होऊन बादशहाला फसवायला पहात आहेत. पण आपण अगदीं डोळ्यांत तेल घालून बसलें पाहिजे. या शिवाजीला गिरफदार करून बादशहाचा बंदा गुलाम म्हणून त्याच्या पुढें मुजरा करण्यास नेलें आणिं तेथें त्याची थोडीबहुत नाचक्की

केली तरच खरें. नुसता तह करून त्याच्यापासून रगळे किल्ले, आणखी सगळा मुलूख घेतला एवढें सोंग करून पुनः त्यानें भराभर ते आपल्या ताब्यांत घेण्यासाठीं त्याला मोकळा सोडून आपण आग्र्याची वाट धरण्यांत कांहीं अर्थ नाहीं असें त्याच्या मनास पक्कें वाटलें. परंतु आपल्या मनांत काय आहे हें आपण आतांच जयसिंग राजास कळवावें, कीं असेंच घोंगट घालून ऐनवेळेपर्यंत बसावें, याचा त्याच्या मनांत निर्णय होईना. एकदां वाटे, कीं एकदम त्याला आपला मनोदय कळवावा. एकदां वाटे आतां कांहींसुद्धां लिहूं नये. शेवटपर्यंत काय काय मौजा होतात त्या पहाव्या आणखी मग आपण काय करावयाचें तें एकदम करावें. शेवटीं आतां कांहीं करूं नये, आतां अगदीं साधेपणा आणखी स्वस्थपणा धरावा, आणखी मग एकदम ऐनवेळीं गळा धरावा असाच त्यानें बेत कायम केला.

इकडे किरातसिंग त्याच्यापासून जो निघाला, तो आपल्या ठिकाणीं जाऊन आतां कांहीं वेळ स्वस्थ बसावें, जी आपण आतांपर्यंत दगदग केली, तिची फलश्रुति तरी काय झाली ? याचा विचार करावा, त्याचप्रमाणें पुढें तरी आपण आतां काय करावें याचाही आपल्या मनाशीं विचार करावा, असें त्याच्या मनांत आलें. झाली ही दगदग कांहीं थोडी थोडकी नव्हती. त्याच्यासारखा खटाटोपी माणूस तोच ह्मणूनच त्याला ती उरकली, दुसरा एखादा असता, तर तो त्या दगदगींत पडता कशाला ? जयसिंगानें प्रथम त्याला जें काम व ठिकाण आंखून दिलें, तेथें आतां जावें आणि पुढें काय काय चमत्कार होतात ते पहावे असा त्याचा विचार झाला. परंतु दिलेरखानाला आपण जितक्या तऱ्हेनें आपल्या मुठींत आणूं असें आपल्याला वाटलें होतें, तितक्या तऱ्हेनें तो कांहीं येण्याचा संभव नाहीं. जयसिंगानें तुझी मुलगी शहाजाद्याला दिली असें त्याच्या चित्तांत भिनवून द्यावयाचा आपला यत्न जितका सफळ व्हावा तितका झाला नाहीं. तेवढा जर झाला असता, तर फार बहार झाली असती. परंतु त्याच्या मठ्ठ डोक्यांत त्या बीजाचें आरोपण जितक्या लवकर होईलसें वाटलें तितक्या लवकर तें झालें नाहीं. उलट त्याला आपला थोडासा रागच आला. त्यानें आपल्याला मोठ्या आग्रहानें ठेवून घ्यावयाचें, प्रत्येक बाबतींत, पावलोपावलीं आपल्याला विचारावयाला पाहिजे, आपल्यावांचून त्याचें कांहीं चालत नाहीं असें झालें पाहिजे, ही जी त्याची उमेद होती, ती अजीबाद जरी नाहीं, तरी बऱ्याचशा प्रमाणानें खचली. आणि यामुळें त्याला असें वाटलें, कीं आतां कांहीं तरी विशेष कारण झाल्यांवांचून किंवा विशेष आशा करण्याला कारण दिसल्याखेरीज उगीच आपल्या जागचें हलावयाचें नाहीं. एकदां त्याला असें वाटलें, कीं आपण जयसिंगाकडे जाऊन त्याला दिलेरखानाचें मन तुझ्याविषयीं किती कलुषित झालें आहे, आणखी तो तुझ्याविषयीं किती वाईट तऱ्हेनें बोलतो हें सांगून टाकावें. पुनः असें वाटलें, कीं एवढ्याचकरितां जाण्यांत कांहीं अर्थ नाहीं. जावयाचें तर कांहीं तरी जबरदस्त व्यूह रचला पाहिजे. निदान आपल्याला त्यानें सर्व

बाबती सांगून आपला अभिप्राय घ्यावा, अशी तरी कांहीं शक्कल योजावी. पण ती शक्कल त्याला या वेळीं सुचेना. तेव्हां कांहीं वेळ स्वकार्यांत स्वस्थानीं स्वस्थ बसावें असाच विचार त्यानें कायम केला.

इकडे महाराजांस रघुनाथपंतांनीं सर्व सविस्तर हकीकती कळविल्यानंतर अखेर महाराजांनींही कांहीं अटी आपल्या बाजूकडून सांगितल्या. त्या नाहीं होय म्हणतां ह्मणतां राजा जयसिंग यानें कबूल केल्या. तहाच्या कलमांचा मसुदा दिलेरखानाकडे पाठवितों व त्याची अनुमति घेऊन काय तें कळवितों असें महाराजांस सांगण्यांत आलें. परंतु राजा जयसिंगानें पुनः विचार केला कीं न जाणों दिलेरखानानें उगीच मध्यें कांहीं दुटें घातलें तर त्यापेक्षां तहाचीं कलमें आपण ठरविलीं आहेत, तींच कायम ठेवून फक्त शिवाजीच्या व आपल्या प्रत्यक्ष मुलाखतीच्या वेळीं त्याला येथें बोलवावें. ह्मणजे तोंडावर तो नाहीं होय न म्हणतां सर्व ठीक जमेल. असा विचार करून राजा जयसिंगानें दिलेरखानास असें कळविलें कीं आपल्या भेटीस शिवाजी येऊन तह करण्याविषयीं विनंति करणार आहे तेव्हां आपल्या छावणींत त्यास मी घेऊन येऊं किंवा कसें तें कळवावें. आपलें येथें यावें असा निरोप आल्यास तिकडेच मीही येऊन समक्ष बसून काय ठरवावयाचें तें ठरवूं.

हा निरोप जातांच दिलेरखानास असें वाटलें, कीं राजा जयसिंग केवळ आपल्याला अगदींच बाजूला ठेवून कामें करतो असें नाहीं. परंतु एकदम कोणत्याही गोष्टीला आपण कबूल होतां कामा नये. असें मनांत येऊन त्यानें राजा जयसिंगास निरोप पाठविला, कीं तह करावयाचा तो बादशहास सर्व अटी कळवून त्याच्या अनुमतीवांचून करूं नये. सर्व कलमें लिहून तीं बादशहाकडे पाठवावीं. बादशहानें रुकार दिला कीं मग त्यावर सह्या व्हाव्या. राजा जयसिंगास अर्थातच या ह्मणण्याला ना ह्मणतां येणें शक्य नव्हतें. परंतु त्यानें एवढेंच सुचविलें कीं आपण व मी समक्ष बसून शिवाजीस बोलावूं व सर्व अटी ठरवूं. त्या अटी ठरल्या ह्मणजे आपली व त्याची लढाई चालली आहे ती बंद करून विजापुराचा नायनाट करण्याचें जें दुसरें काम तें करावयाला लागण्यास मोकळीक झाली. विजापूर जिंकून घेण्याच्या कामीं आपण शिवाजीची मदत मागूं ती त्यानें मनःपूर्वक केली नाहीं तर तह मोडला असें धरूं. तहाच्या अटी बादशहाकडे लिहून पाठवावयाच्या व त्याच्याकडून पसंती आली ह्मणजेच तो खरा तह झाला, तोंपर्यंत संधि झाला यामुळें लढाई मात्र तहकूब ठेवण्यांत आली असें धरावयाचें.

# प्रकरण ३० वें.

## एक मधला प्रसंग.

आपण इत ःया तऱ्हेनें कबूल आहों असें राजा जयसिंगास कळविलें असतांही राजा फार ओढून धरतो आहे, आपल्याला धाकदपट करतो आहे, हें पाहून महाराजांस फार वाईट वाटलें, उद्वेग झाला आणि ते आपल्याशींच विचार करीत राहिले. विचार करतां करतां त्यांनीं असें ठरविलें, कीं जयसिंगानें फारच ओढून धरलें, तर आतां आपण विजापुरकरांशीं एकचित्त करण्याच्या उद्योगास लागावें, विजापूरकरांशीं एकचित्त झालें तर त्यांचें आणि आपलें दोघांचेंही संरक्षण होईल. दोघांनीं एकदिलानें दोन्हींकडून त्रास देण्यास सुरुवात केली, तर बादशाही सैन्य काय करणार आहे ? दोघांशीं एकदम लढाई करीत राहून दोघांना एकदम चित करणें महाकर्म कठिण आहे. विजापुरकरांनाही आज मदतीची जरूर आहे. आपल्यालाही तशी जरूर आहे. दोघांना चेपून टाकण्याचा या मोगलांचा कावा जर मोडावयाचा असेल तर तो दोघांचें संगनमत झाल्यानें होईल.—निदान असें संगनमत झाल्याचें किंवा असें संगनमत होण्यासाठीं खटपट सुरू झाल्याचें—राजाच्या व दिलेरखानाच्या कानीं गेल्यानेंच तो आपल्याशीं तह घडवून आणण्यास सिद्ध होईल, असें महाराजांचें अनुमान झालें. लागलींच त्यांनीं तसा उपक्रम करण्याची योजना केली, आणि तशी योजना होत आहे अशी बातमी राजाच्या व दिलेरखानाच्या कानीं जाईल अशी तजवीज काय करावी याही विचारास ते लागले.

परंतु त्यांस तो विचार पार पाडण्यास फारसे सायास पडले नाहींत. एक अगदींच आगंतुक असें साधन त्यांच्या मार्गांत आलें. महाराजांनीं विजापुरकरांकडे बोलणें लावण्यासाठीं एक विश्वासू वकील पाठविण्याची व्यवस्था केल्यानंतर दोन चार दिवसांनीं आपल्या विश्वस्त मंडळीशीं बोलत बसले असतां खालून वर्दी आली, कीं राजे जयसिंग यांचेकडून त्यांचे चिरंजीव किरातसिंग हे आपल्या भेटीसाठीं आले आहेत. तें ऐकतांच प्रथम सर्व मंडळींना आश्चर्य तर वाटलेंच! कारण राजे जयसिंग यांस किरातसिंग या नांवाचा तरुण व चतुर आणि शूर असा मुलगा आहे हें सर्वांस माहीत होतें. परंतु तो आपल्यास भेटण्यास येईल ही कांहीं कल्पना त्यांस कधीं आली नाहीं. येण्याचा संभवही नव्हता. आपल्या तर्फे भाषण करण्यास आपले पंडित असतां मुद्दाम आपल्या चिरंजिवास मजकडे पाठविण्याचा हेतु काय असावा ? परंतु ती वेळ नुसते प्रश्न करीत बसण्याची नव्हे हें उघडच

होतें. महाराजांनीं लागलीच आपल्याकडून एक दोन मंडळी व अशा व्यक्तींच्या स्वागतास योग्य असा लवाजमा पाठवून त्यांस गडावर आणण्याची तजवीज केली. सामोऱ्या गेलेल्या मंडळीनें किरातसिंगास व त्याच्या बरोबरीच्या मंडळीस वर आणलें. महाराज बसले होते तेथें येतांच तेथें बसलेल्यांपैकीं कोणा तरी इसमास पाहून किरातसिंग दचकला असें दिसलें व तो एकसारखा त्या विवक्षित व्यक्तीकडे वारंवार पहात राहिला. परंतु आपल्या मनाची कांहीं चलबिचल झाली आहे असें कोणास दिसतां कामा नये असा विचार करूनच की काय त्यानें आपल्या मुद्रेवर शांति आणून आपलें सगळें लक्ष्य महाराजांकडे लाविलें. मधूनमधून मात्र त्या दुसऱ्या व्यक्तीकडे त्याचे डोळे आपोआप जात. त्याही व्यक्तीचे डोळे याच्याकडे लागत. किरातसिंगाचें रीतीप्रमाणें स्वागत झाल्यानंतर महाराजांनीं सहजच प्रश्न विचारला, " मज गरिबाच्या भेटीसाठीं मुद्दाम राजांनीं पाठविलें, तेव्हां राजांच्या मनांत कांहीं बरेपणा आला असावा. आमचे हेतु सफल करावे अशी इच्छा उत्पन्न झाली असल्यास मोठाच अनुग्रह झाला ह्मणायचा. "

किरातसिंगानें प्रथम नुसत्या माना डोलविल्या. नंतर बराच वेळ स्तब्ध बसला. नंतर कांहीं वेळानें ह्मणतो: " आपल्यापैकीं कोणीही येथें असूं नये अशी इच्छा आहे. बोलणें फार विश्वासाचें बोलायचें आहे. तरी तेवढी तजवीज करावी......"

महाराजांनीं तें बोलणें ऐकून क्षणभर विचार केला आणि ह्मटलें, " इथें जी मंडळी बसली आहे, त्यांत आमच्या विश्वासांत घेतां येत नाहीं असा एकही कोणी नाहीं. जी गोष्ट आपण त्यांच्यासमोर बोलणार नाहीं, ती आह्मी पाठीमागून तरी त्यांस सांगणारच. आमचा सगळा जीव ह्मणजे ही मंडळी. फक्त हा भालदार वगैरे मंडळी बाहेर लावून देतों. आपल्याला काय बोलायचें असेल त्याबद्दल मुळींच संकोच बाळगण्याचें कारण नाहीं. मला सांगितलें तें या चार मंडळींना कळल्याखेरीज कधीं रहायचेंच नाहीं. "

तें ऐकतांच किरातसिंगानें आपल्या भुंवया वर चढविल्या. क्षणमात्र तो कांहीं बोलला नाहीं. नंतर ह्मणतो: " असें जरी असलें, तरी मला जें बोलायचें आहे तें आपल्याखेरीज दुसऱ्या कोणाच्या कानीं निदान माझ्या तोंडून निघतांना तरी जाऊं नये असें वाटतें. तेव्हां आपण एकटे फार झालें तर—आपल्या जिवाला धोका येईल अशी शंका वाटत असली तर—आणखी एक कोणी तरी जवळ असूं द्या. बाकी आह्मी कांहीं दगाई करण्याच्या बेतानें आलों नाहीं; सगाई करण्याच्याच विचारानें आलों आहों. तेव्हां आपल्याला जसें योग्य वाटेल तसें करा. "

महाराज तें ऐकून किंचित् हंसले. नंतर ह्मणतात: " आपण एकटे येऊन मला भेटतां आहां, यांतच आपण दगाई करण्याच्या विचारानें आलां नाहीं हें स्पष्ट दिसतें आहे. आपली इच्छा आहे, तर मी सगळ्यांना दूर जाण्याला सांगतों. परंतु आपलें माझें बोलणें झाल्यावर तरी मी त्यांना सर्व हकीकत सांगणारच. "

किरातसिंगानें पुनः कपाळाला आंठ्या घातल्या, आणि ज्या एका इसमाकडे पाहून तो प्रथम थोडा दचकला होता, त्याच्याकडे पुनः त्यानें पाहिलें.' इतक्यांत महाराजांच्या सांगण्यावरून सर्व मंडळी तेथून उठून गेली. महाराज एकटेच व किरातसिंग एकटाच राहिला. तेव्हां तो अगदीं विश्वासाचा आवाज काढून ह्मणतोः "आपले पंत आणखी आमचे वडील या दोघांत जें बोलणें झालें तें मला समजलें. पंतांची आणखी माझी जर आधीं गांठ पडती, तर मी त्यांना काय बोलावें आणि काय बोलूं नये तें सांगितलें असतें. अहो, हीं ह्मातारीं माणसें, बादशहाच्या हुकुमाबाहेर एक रेंसभर जायचीं नाहींत. तेव्हां त्यांच्याजवळ बादशहाच्या विरुद्ध गोष्टी काढून काय उपयोगी. आह्मांला बादशहाच्याबद्दल अतोनात तिटकारा, पण त्यांना त्यांच्याबद्दल देवासारखी पूज्यबुद्धि. या गोष्टीला काय करावें? आमचा जीव नुसता तडफडतो आहे, कीं यांनीं या बादशहाच्या, गोब्राह्मण घातकाच्या, वेदधर्मछळकाच्या सेवेंत आपलें उत्तर वय तरी घालवूं नये. पण छे. त्यांच्या कुठें तें मनांत येतें आहे. त्यांना दुसरें कांहीं दिसत नाहीं. आपल्या वडिलांवरून आपल्याला अनुभव असेलच. तेव्हां मी आणखी कशाला बोलायला पाहिजे? माझ्या हातून जर आपल्याला कांहीं साहाय्य होणें शक्य असतें, तर मी आपल्याला असें साहाय्य केलें असतें, कीं मोगल हे रहातात कसे? आमचे हे असे विचार आहेत, कीं कांहीं त्यांच्या कानीं गेलेले नाहींत असें नाहीं. त्यांना खडान्‌खडा सगळी माहिती आहे. पण आह्मांला ते मूर्ख समजतात. आमची तर इच्छा अशी, कीं कांहींना कांहीं तरी करून औरंगजेबाची हड्डी नरम करावी. आज आमच्या वडिलांचें असें कांहीं वजन आहे, कीं ते जर उलटले, तर सगळ्या मोगल बादशहातीचे तुकडे तुकडे होतील. नांवसुद्धां रहाणार नाहीं. सगळ्या भरतखंडावर हिंदुपद बादशाही होईल. याचा आपण विचार करा असें आह्मीं त्यांना एकदां दोनदां सुचविलेंसुद्धां, पण "मूर्ख," अशी पदवी आम्हांला देऊन त्यांनीं नुसतें हंसण्यावारी घालविलें. तेव्हां आपल्याकडून तसें बोलणें झालें तरी काय उपयोग होणार आहे याचा आपणच विचार करा. आपल्या पंतांना त्यांनीं हाच जबाब दिला, असें मी ऐकतों. मग काय खरें असेल तें निराळें. आमच्याजवळ ते यासंबंधानें कधीं कांहीं बोलत नाहींत. या मोगलांचा आम्हांला असा त्वेष येतो, कीं काय सांगूं? पण यांच्यामुळें आह्मांला त्यांची सेवा करावी लागते. आपल्या किल्ल्यावर हल्ला करण्याचे हुकूम झाले, कीं असें वाटतें, कीं अगदीं त्याच्या उलट करावें. आपल्याला सगळ्या बातम्या द्याव्या आणखी आपल्याला येऊन मिळावें. दुसरा विचार मनांत येत नाहीं. आतां आणखी काय बोलूं? सांगा. पण सगळ्या गोष्टी आपल्या इच्छेप्रमाणें होतात कुठें?"

किरातसिंग याप्रमाणें बोलत असतां महाराज शांतपणें ऐकत होते. तो थोडासा

थांबला, तेव्हां त्यास म्हणाले: " तुमच्यासारख्या तरुण मंडळीवर आमची भिस्त. वडील मंडळीला नुसतीं नांवें ठेऊन काय उपयोग ? त्यांच्या मनाला ज्या गोष्टी योग्य त्या त्यांनीं केल्या. आतां तुमच्या मनाला योग्य वाटतात त्या करा. त्यांच्या मनाविरुद्ध गोष्टी कराव्या लागतील, ह्मणून मागें घेऊन काय होणार ? आपण आपल्या वयाची आणखी मंडळी जुळवा. त्यांच्याकडून काय शक्य तें करवा. नुसतें आम्हांला येऊन मिळावेंसें वाटतें असें आह्मांला सांगून काय उपयोग ? तुह्मींच तर आमच्या मुलुखाचा नाश आरंभिला आहे. जिकडे तिकडे उध्वस्त, उजाड दिसूं लागलें, हजारों लोक धाय धाय करून रडताहेत, याचें पाप कोणाच्या शिरावर ? तुमच्या—तुमच्या तरुण माणसांच्या ! बाबांनो, ह्मातारीं माणसें अमुक करीत नाहींत, तमुक करीत नाहींत त्यामुळें असें झालें, तसें झालें असें हळहळत आणखी विव्हळत बसून कांहीं उपयोग आहे का ? माझ्या इतक्या दिवसांच्या अनुभवानें मला चांगलें समजून आलें आहे, कीं वडील माणसांना—गेल्या पिढीच्या माणसांना—नांवें ठेवण्यापलीकडे जाण्याला कांहीं तरुण मंडळी तयार नाहीं. तुमच्यासारख्यांनीं मनांत आणलें, तर सैन्य तुमच्या ताब्यांत राहील का ह्मातान्यांच्या ताब्यांत राहील ? आपण जयसिंग राजांचे चिरंजीव ह्मणतां, आणखी माझ्याकडे इतकें बोलायला आलां हेंच विशेष आहे. पण नुसतें माझ्याकडे येऊन उपयोग काय ? कांहीं तरी तुमच्या—तुमच्या हातूनच होऊं द्या. " महाराज हें बोलताहेत यांतला मुद्दा काय हें त्या किरातसिंगाच्या लक्ष्यांत येईना. तो तें त्यांचें बोलणें ऐकून बावळ्याप्रमाणें पाहूं लागला. तेव्हां महाराज त्यास ह्मणतातः " अहो, आपण येथें आलां ते आपल्या वडिलांकडून आलां ह्मणून आपण सांगितलें, मग त्यांचा कांहीं निरोप आहे कीं ... ... ... "

" छे. छे. छे. त्यांचा निरोप नाहीं आणखी कांहीं नाहीं. मी आल्याबद्दल कोणी हेरानें कांहीं बातमी त्यांच्याकडे देऊं नये ह्मणून त्या हेरांना चकविण्यासाठीं वडिलांकडूनच आलों असा निरोप पाठविला. वास्तविक मी चोरून आलों आहें. हेतु हा, कीं आपलें दर्शन व्हावें. आपल्या तोंडून दोन उपदेशाच्या गोष्टी ऐकाव्या. दक्षिणेंत आल्यापासून ही लालसा उत्पन्न झालेली, कीं आपली मूर्ति एकदां दिसावी, जें आपण केलें तें करण्याचा आपल्यापासून धडा घ्यावा, याव्यतिरिक्त आपल्याकडे येण्याचा दुसरा कांहीं उद्देश नाहीं. आणखी आपल्याला जर कांहीं साहाय्य झालें तर करावें. तेव्हां आपण कांहीं आह्मांला सांगावें. दुसरें कांहीं नाहीं. "

पुनः महाराज स्वस्थ बसले. तेव्हां किरातसिंग आपल्या पुढें ह्मणतोः " महाराज, आमच्या या बोलण्याचें आपल्याला हंसूं येणें अगदीं साहजिक आहे. पण आपण विचार करा, कीं आह्मी आपल्यासारख्यांकडे नाहीं यायचें तर यायचें तरी कोणाकडे ? आह्मीं तिकडल्या तिकडे पुष्कळ गोष्टी करायला पाहिजेत,

परंतु आमच्या हातून कांहीं झालें नाहीं ही गोष्ट खरी, पण तेवढ्यावरून आपण आमचा तिरस्कार करूं नये. आमच्या मनांत आपल्याविषयीं अत्यंत आदर आहे. आपल्याला आह्मी देव समजतों. समजा, कीं उद्यां आपण दिलेरखानाच्या किंवा माझ्या वडिलांच्या तडाक्यांत सांपडलां, आणखी त्यांनीं आपल्या जिवावर प्रसंग आणला, तर माझ्यासारखे शंभर रजपुतांचे बच्चे आपल्याला सोडवायला धांवतील. यांत एक काडीभर शंका धरूं नका. दिलेरखानाला भराभर जय मिळत नाहींत यांतलें इंगित काय ? यांतलें इंगित आमच्यासारखे जे तरुण आहेत, त्यांची त्याला खरी खरी मदत नाहीं. त्याची मुलगी मराठ्यांनीं पकडून नेली, आम्हांला सगळ्यांना आनंद झाला ! हल्लीं ती कायशी ह्मणे त्यांनीं शहाजाद्याला दिली. "

तें ऐकून शिवाजीमहाराजांनीं कपाळाला आढ्या घातल्या व त्याच्याकडे संकुचित नेत्रांनीं पहात ह्मटलें: " काय म्हणतां ? दिलेरखानाची मुलगी मराठ्यांनीं नेली, आणखी शहाजाद्याला दिली ! हें कोणीं तुह्मांला सांगितलें ? "

" आमच्या सगळ्या छावणींत हीच बातमी आहे. तीवरून तर मी बोलतों आहें. तेव्हां कांहीं जरी असलें, तरी माझ्या बोलण्याचा उद्देश एवढाच, कीं आह्मांला कोणाला त्याबद्दल बिलकुल वाईट वाटत नाहीं. जो तो असें ह्मणतो आहे, कीं मराठ्यांनीं उत्तम केलें ! तो दिलेरखान मोठा खाष्ट दुष्ट. त्याच्या मनांतून आपलें आणखी आमच्या वडिलांचें एकचित्त होऊं नये. आपला सर्वस्वी नाश व्हावा असें आहे. तो जर कबूल होईल तर हा सगळा बखेडा आतां मिटेल. आमचे वडील एकदां ह्मणालेच मुळीं, कीं या दिलेरखानाचा कांटा जर मध्यें नसता, तर केव्हांच मी या मोहिमेचें थातुरमातुर करून येथून निघून गेलों असतों. शिवाजीला जिंकून, त्याचा सगळा मुलूख घेतला. कांहीं आतां राहिलें नाहीं. तो अगदीं आतां डोकें वर करणार नाहीं, असें तसें लिहून पाठवून आपण येथून निघून जावें आणखी पुनः याला काय धुमाकूळ घालायचा तो घालायला मार्ग मोकळा करून द्यावा; पण या दिलेरखानापुढें त्यांचें कांहीं चालायचें नाहीं. त्याला सगळ्या गोष्टी आपल्या तंत्राप्रमाणें चालायला पाहिजे आहेत. त्याला नाहींसा करायचेंची जर कांहीं युक्ति आपण काढली तर सारें कांहीं जुळून येणार आहे. नाहीं तर अफझुलखानाप्रमाणें आपल्याला तो त्रास देईल. तो तसा खाष्ट आहे. हिंदू ह्मटला, कीं त्याची तळपायाची आग मस्तकाला पोंचते. कांहीं जुळण्याजोगें असलें तर पहा. मला वाटतें असें जर आपण कांहीं साधलें, तर आमच्या वडिलांना सुद्धां फार आनंद होईल. त्यांना कांहीं कमी त्याचा त्रास ..."

" किरातसिंग, आपण हें सगळें बोलतां हें ठीक आहे; पण खरें पुसाल तर आपल्या येण्याचा खरा हेतु काय हें अद्यापि मला समजलें नाहीं. दिलेरखान फार वस्ताद आहे. त्याच्या नादीं लागण्यांत कांहीं तात्पर्य नाहीं. एकतंत्रांत जें चाललें

आहे तेंच ठीक आहे. त्यांतून आह्मीं आतां निश्चय केला आहे, कीं आपले वडील जर ऐकत नसतील तर विजापुरकरांशीं सख्य करायचें आणि त्यांच्या एकत्र सैन्यानें आपल्याशीं टक्कर द्यायची. आपल्या वडिलांकडे तहाचें बोलणें लावलें त्यांत जर सिद्धि आली नाहीं, तर आह्मांला दुसरा मार्ग नाहीं. विजापुरकरांकडे बोलणें लावण्यासाठीं माणसें गेलीं सुद्धां ! "

तें ऐकून किरातसिंगानें फार आश्चर्यचकित झाल्याप्रमाणें चेहरा केला ! आणि म्हणतोः " काय म्हणतां ! आपण विजापुरकरांकडे बोलणें लावायला माणसें पाठविलीं ! त्यांची व आपली एकी करून तुम्ही बादशाही सैन्याशीं लढणार ! तो तरी मुसलमानचना ! "

" हो. मुसलमान खरा. आम्हीं आजपर्यंत त्याच्याशीं वैर केलें हेंही खरें, परंतु अजीबाद आपला नाश करणारा एका बाजूला, आणखी आपल्याला जगूं देणारा दुसऱ्या बाजूला अशी स्थिति झाली, तर जो आपल्याला जगूं देईल, आणखी आपण जगण्यासाठीं धडपड करीत असेल, त्याच्याशीं संगनमत करावें दुसरें काय ! याच हेतूनें आम्हीं आपला हा मार्ग धरला. तुह्मी आह्मांला जगूं देत असलां तर तशा तहाच्या अटी आल्या पाहिजेत. आम्हांला समूळ गिळंकृत करण्याच्या अटी आपण घालूं लागलां तर आम्हीं कबूल करण्यांत अर्थ तरी काय ! आह्मी विजापुरकरांशीं एकी करून दोघेंही एकदिलानें तुमच्याशीं लढूं, नाहीं तरी तुम्ही दोघांवर तिळांजलि घेऊन उठलांच आहां. मग धडपड करून तरी पहावें काय होईल तें. आह्मीं माणसें पाठविलीं, आणखी बहुतकरून आमची एकी होईल. पहिल्यानें आह्मीं तुमच्या वडिलांकडे पंतांना पाठविलें, कीं बोआ तुह्मीं आह्माला साहाय्य करावें, निदान आह्मांला पारिपत्य केल्याचें उगीच थातुरमातुर करून चालतें व्हावें. पण त्यांचा कल तसा दिसत नाहीं. त्यांना बादशहापुढें आपली प्रौढी मारून आमचा सत्यानाश करून टाकायला पाहिजे. त्यांना पुष्कळ तऱ्हांनीं पंतांनीं आमचा हेतु सांगितला. आह्मांला यश ह्मणजे आपल्याला यश, आपल्या धर्माला यश असें सांगितलें, पण ते कुठें ऐकताहेत ! मग आह्मी आपल्या इच्छेप्रमाणें करतों. यांत आपल्याला वावगें वाटतें ? "

" वावगें ! " किरातसिंग थोडा बावरल्यासारखा होऊन ह्मणतोः " वावगें-वावगें कांहीं नाहीं. पण शिवाजीमहाराज विजापुरकरांशीं एकमत करतील हें शक्य वाटलें नव्हतें. "

किरातसिंग त्यावर कांहीं विशेष बोलला नाहीं. लागलीच उठून ह्मणालाः—

" मी ज्या हेतूनें आलों तो माझा हेतु सफळ झाला. आपलें दर्शन झालें. आपल्याशीं भाषणही करण्यास मिळालें. आतां मी येतों. "

महाराजांनीं त्यास कांहीं वेळ रहाण्याचा आग्रह केला; परंतु तो राहीना. निघून गेला.

तो निघून गेल्यावर एक मराठा सरदार ज्याच्याकडे किरातसिंग वारंवार पहात असे, तो महाराजांजवळ येऊन म्हणतो, "महाराज, हा जयसिंगराजाचा मुलगा किरातसिंग, नव्हे–

पण पुढचें पुढें.

---

# प्रकरण ३१ वें.

## काम झालें.

किरातसिंग गेल्यानंतर महाराजांच्या कानांत त्यांच्या एका सरदारानें कांहीं सांगितलें, तेव्हां महाराज थोडेसे चकित झाले; परंतु लागलीच ह्मणतातः "तें कांहीं असलें, तरी हरकत नाहीं. त्याच्या येण्यानें आपलें काम झालें. आतां पुढें काय होतें तें पहावें. आपण विजापूरकरांशीं संगनमत करणार, एवढें जयसिंगाच्या कानीं गेलें, कीं अर्धा कार्यभाग नव्हे पंधरा आणे कार्यभाग झाला."

महाराजांच्या या ह्मणण्याप्रमाणें खरोखरीच पुढें स्थिति झाली. किरातसिंगानें जयसिंगाच्या किरातसिंग नांवाच्या मुलाचें नांव घेऊन महाराजांपर्यंत मजल मारली. त्याचा हेतु फार निराळा होता. दिलेरखानाच्या मुलीची आपण जी व्यवस्था लावण्याचा खटाटोप केला, ती व्यवस्था लागली किंवा नाहीं हें त्यास कळेना; तेव्हां मराठ्यांच्या छावणींत जाऊन शोध करून कांहीं माहिती लागली तर पहावी. शिवाय तहाविषयीं बरीच धडपड चालली आहे ती कोठपर्यंत आली आहे, याचीही बातमी लागली तर पहावी असाही त्याच्या मनाचा उद्देश होता. परंतु त्याच्या उद्देशांपैकीं एकाबद्दलही समाधानकारक असें वर्तमान त्याला मिळालें नाहीं. जें मिळालें तें विजापुरकरांकडे महाराज बोलणें लावीत आहेत हें होय. परंतु तें कांहीं त्याला थोडें होतें असें नाहीं. दिलेरखानाचे कान फुंकण्यास आपल्यास पुष्कळच साधन झालें असें त्यास वाटलें व तो तडक दिलेरखानाकडे गेला. तेथें गेल्यावर त्यानें होईल तितकी खटपट करून दिलेरखानाची भेट घेतली व त्यास ह्मटलें: "आतां एक नवीन डाव मांडला जातो आहे. राजानीं आपला मुलगा किरातसिंग शिवाजीकडे पाठवून त्याच्याकडून कांहीं तरी नवीन हूल उठविण्याचा खटाटोप आरंभला आहे. माझ्या बातमीदारानें मला बरोबर बातमी दिली आहे. मी असें ऐकतों, कीं 'तुह्मी तह करीत असलां तर ठीक; नाहीं तर मी विजापूरकरांशीं मिलाफ करून तुमच्याशीं जोडीनें लढूं. मग काय होईल तें पाहूं. तुह्मी किती पुरवतां!' असें आपल्याला ह्मणण्याबद्दल शिवाजीला

आग्रह चालला आहे. आपल्याच छावणींतून असली सल्ला त्याला मिळूं लागली मग आणखी काय पाहिजे ? या सल्ल्याप्रमाणें शिवाजीकडून विजापूरकरांकडे बोलणेंही सुरू झालें आहे असें मला कळतें. तेव्हां आपण आतां स्वस्थ किती बसणार ? आपल्या जागीं मी असतों, तर साफ जयसिंगाला बाजूला ठेवून पुढें झालों असतों, आणखी एकदम दहा वीस किल्ले पाडून घेतले असते. परंतु आपल्याला असें वाटतें, कीं जयसिंगाला दुखवूं नये. पण जयसिंग आपल्या डोळ्यांत धूळ टाकतो आहे तिकडे आपलें लक्ष्य जात नाहीं. तेव्हां शिवाजीचें आणखी विजापूरकरांचें बोलणें सुरू होण्याच्या आंत एकदां त्याला वठणीला आणण्याची तजवीज करा. आहे काय त्याच्या अंगांत आतां ? आपण असें दुबळ्यासारखें बसलों आहोंत असें त्याला वाटून चुकलें आहे ह्मणून तो अशा गमजा करतो आहे. मला आपण एक रात्र अधिकार द्या. एका रात्रींत वीस बावीस किल्ले हस्तगत करून घेऊन शिवाजीला गिरफदार करून आपल्यापुढें आणतों कीं नाहीं पहा. पण काय चमत्कार आहे पहा, आपणही कांहीं करीत नाहीं, आह्मांलाही कांहीं करूं देत नाहीं; आणि जयसिंगाचे मात्र डाव वाटेल तसे साधताहेत. रोज कांहीं ना कांहीं तरी थैली बादशहाकडे जाते आहे. मग काय गुप्त गोष्टी बनवून लिहितो बिचारा तें त्याचें त्याला माहीत."

"काय ! रोज बादशहाला थैली जाते !" दिलेरखानानें त्यास मोठ्यानें विचारलें. "मला कळल्याखेरीज थैली जाईल कशी ! "

दिलेरखानाचें तें भाषण ऐकतांच किरातसिंग फार उपरोधिक असें व विकट हास्य हंसला. तो जर चार शब्द बोलून दिलेरखानाची निर्भर्त्सना करता तर दिलेरखानास इतकें वाईट वाटतें ना. परंतु या हंसण्यानें मर्मच्छेद झाल्याप्रमाणें त्याला दुःख झालें व राग आला. तो झांकण्यासाठीं तो किरातसिंगास ह्मणतो: "उठल्या सुटल्या तूं माझ्याकडे येऊन अशा प्रकारचीं बोलणीं बोलतोस, तेव्हां तुझ्या मनांत आहे काय ? तुझ्या मनांत जयसिंगराजांचें व माझें वैमनस्य यावें असें दिसतें आहे, दुसरी तर कांहीं कल्पना होत नाहीं. पण हेंच जर तुझ्या या खटाटोपाचें रहस्य असेल, तर तुझी लवकरच निराशा होईल. तुझ्या सांगण्यानें माझें मन जयसिंगराजांबद्दल कलुषित होणें शक्य नाहीं. मीं त्याबद्दल पुष्कळ विचार केला आहे........ "

"खानसाहेब, माझ्या नुसत्या सांगण्यानें कांहीं नकोच व्हायला; पण माझ्या सांगण्याचा आपण विचार करून खरें काय आहे तें तर पहाल ? काय चमत्कार आहे ! आपल्यासारख्यांनीं असें ह्मटलें म्हणजे एकदां असें वाटतें, कीं आपण आपलें आपली आज्ञा घेऊन स्वदेशीं परत जावें. कांहीं त्रास नकोन् कटकट नको. जाऊं मी ! आपण देतां परवानगी ! "

दिलेरखान नुसता हंसला. त्यानें कांहीं उत्तर दिलें नाहीं. किरातसिंगानें त्यावर

म्हटलें: " माझी आपल्याला एवढीच विनंति आहे, कीं तह करवा, त्या शिवाजीला सगळ्या सवलती द्या, पण तुम्ही द्या. तुम्ही कोणी नव्हे, तुम्हांला कांहीं विचारायचला नको असा जो प्रकार चालला तो होऊं देऊं नका. शिवाजीला लाचार करून त्याच्याकडून म्हणाल त्या अटी कबूल करून घेण्याचें काम आपण साधा. आणखी आपला जीव कीं प्राण अशी मुलगी नेण्याबद्दल शासन केल्याचें श्रेय आपण घ्या, दुसरें कांहीं ह्मणणें नाहीं. आपल्याला राजांबरोबर बादशहानें दिलें आहे तें उगीच नव्हे असें आपण मनांत बाळगा. आपण गप्प बसत गेलां, राजे बेलाशक चेपीत गेले, हें कांहीं बरें का ?"

किरातसिंगाचें तेंच तेंच तेंच तेंच बोलणें ऐकून दिलेरखान अगदीं कंटाळला. जयसिंगावर कांहीं तरी राग झाल्या कारणानें हा इकडे येऊन असें बोलतो असें त्याच्या मनानें पूर्णपणें घेतलें आणि त्यामुळें किरातसिंगास जो परिणाम नको होता तो परिणाम त्याच्या मनावर त्यामुळें झाला असें दिसलें. तो किरातसिंगास कांहीं बोलला नाहीं. त्यानें आतां अधिक न बोलतां जावें असें त्यास अन्य मार्गानें सुचविलें. त्याचें चित्त ठिकाणावर नव्हतें, पोरीच्या शोधाकरितां पाठविलेल्या मंडळीकडून अद्यापि कांहीं कळलें नाहीं, हेंच त्याला चमत्कारिक वाटूं लागलें होतें. किरातसिंग उमजला. आपण आतां आणखी येथें बसण्यांत तात्पर्य नाहीं, असें त्यानेंही ताडलें व तो तेथून निघून गेला. त्यास कांहीं सुचेनासें झालें. दिलेरखानाला स्वतःचें मत बिलकुल नाहीं, याबद्दल त्याची खात्री झाली. इतका वेळ आपण मनराखणी केली व तींत आपल्याला यश आलें असें वाटलें तें अगदीं चुकीचें, असें त्याला वाटलें. पुनः तो आपल्या स्थळीं गेला. त्याला बावरल्यासारखें झालें.

परंतु त्यास स्वस्थ कोठें बसवतें ? त्यास असें वाटलें, कीं आपण आता राजा जयसिंगाकडेही जावें आणि तेथें काय हालहवाल आहे त्याचा शोध करावा. त्याप्रमाणें तो उठला आणि राजा जयसिंगाच्या छावणींत गेला. तेथें पोंचून त्यानें राजाची गांठ घेतली. त्यास पहाण्याबरोबर जयसिंगाला थोडासा राग आला असावा असें स्पष्ट दिसलें. आपल्या येण्यानें कांहीं फायदा होण्याऐवजीं हें काय लचांड झालें असें मनांत येऊन त्याला फार वाईट वाटलें. परंतु तो अशा तशा गोष्टींनीं आपला हिरमोड करून घेणारा माणूस नव्हता. त्यानें लागलीच राजांस म्हटलें, " आपण मला नेमून दिलेलें ठिकाण सोडून मी वारंवार इकडे तिकडे हिंडतों याबद्दल आपल्याला राग येतोसा दिसतो. पण मी काय करूं ? नुसतें तळ देऊन बसणें मला फार कंटाळवाणें झालें आहे, यामुळें मी आपल्या लोकांना आपल्या जागीं सावध रहाण्याची ताकीद देतों. मधून मधून कांहीं तरी खोटीच हूल उठवून ते सावध आहेत कीं नाहींत पहातों आणखी मग बातम्या काढण्यासाठीं व कांहीं बातम्या लागल्या तर आपल्या कानावर घालण्यासाठीं

इकडे येतों. आतां तरी मी फार मोठी महत्त्वाची बातमी आपल्या कानावर घाल-ण्यासाठीं आलों आहें. आपल्याला ती कळली असली तर ठीकच आहे; नाहीं तर मला कशी लागली एवढें मात्र मला विचारूं नये. बातमी अक्षरशः खरी आहे."

राजा जयसिंगानें कपाळाला आंठ्या घातल्या. त्याला आतां या किरातसिंगाच्या खटाटोपांचा कंटाळा आलेला दिसला. नंतर तो त्यास म्हणतो, "झकमक सुरू झाली कीं अशा बातम्या निघायच्याच. आतां काय बातमी आणली आहेस?"

"माझ्या दृष्टीनें ती बातमी फार महत्त्वाची आहे. आपण ऐकल्यावर ठरवा. आपण तह करण्यासंबंधानें लवकर निकाल लावीत नाहीं, तेव्हां आतां विजापूर-करांशीं सख्य करून दोघांचा एक विचार करायचा म्हणजे आपल्याला दोघांशीं लढावें लागणार. अर्थातच एकाला कोणाला तरी आपलेंसें करून घेतलें पाहिजे. दोघांशीं एकदम लढून बादशहाचें सैन्य आपला वर्चस्वाचा आब घालवून टाक-ण्यास तयार होणार नाहीं असा शिवाजीनें विचार केला आहे, तो मला कळला तो आपल्या कानावर घालायला आलों. माझ्या समजुतीनें यांत फार तथ्यांश आहे. मग आपल्याला काय वाटेल तें खरें."

राजा जयसिंगानें कपाळास आंठ्या घालून त्यास म्हटलें, "तूं बातमी आणली आहेस ही ठीक आहे; परंतु अशा बातम्या आणीत इकडून तिकडे हिंडण्यानें फारसा फायदा होतो असें नाहीं. ज्यांच्या शिरावर या मोहिमेचा भार आहे, त्यांना आपलें काम करतां येत नाहीं असें धरून चालण्यांत शहाणपणा काय? मला सगळ्या बातम्या लागतात, मी त्यांचा विचार करतों. मला काय व्यवस्था करा-यची तीही करतों. एकदां दोनदां तूं आलास; मला त्याबद्दल कांहीं वाटलें नाहीं; परंतु प्रत्येक वेळीं जर अशा प्रकारें तुझ्या म्हणण्याचा विचार करूं लागलों, तर माझा मला विचार करण्याला वेळच सांपडायला नको......"

राजा जयसिंग अशा प्रकारें आपल्यास बोलेल असें किरातसिंगास स्वप्नांतसुद्धां वाटलें नाहीं. परंतु आज प्रत्यक्ष तें ऐकावें लागलें. तो संतापला, लाल झाला. आपल्याविषयीं कांहीं कमीअधिक यास कळलें नाहींना, असें त्याच्या मनांत आलें. त्याच्या तोंडून शब्द निघेना. आपण आतां जर कांहीं बोललों तर भलतेंच होईल असें त्याला वाटलें आणि चार दोन शब्दांत आपलें बोलणें उरकून येथून आपण आपला गाशा गुंडाळावा असा बेत त्यानें केला. त्याप्रमाणें त्यानें त्वरित केलें. तो उठला. "आपल्याला माझ्या या करण्या बोलण्याचा राग येत असेल, तर मी आतां जातों; पुनः येणार नाहीं. कळलेली गोष्ट आपल्याला कळवली नाहीं आणि कांहीं नुकसान झालें, पुढें ती मला ठाऊक होती असें आपल्याला कळलें तर आपल्याला कां सांगितली नाहीं म्हणून आपल्याकडून दोष येण्याला जागा राहूं नये. आतां आपण स्पष्ट आज्ञा केली. आतां पुनः कितीही महत्त्वाची बातमी लागली तरी आपल्याला तसदी देणार नाहीं. वडील आपण आहांत, मला आपल्या बोलण्याचा

मुळींच विषाद वाटायचें कारण नाहीं. आपण समर्थ आहां. आज बालाल, दूर साराल. उद्यां हांका माराल, जवळ घ्याल. येतों."

हे सर्व शब्द तो बोलत होता खरा; परंतु त्याच्या अंगाचा तिळपापड झाला होता. जर त्याच्या अंगांत कांहीं सामर्थ्य असतें, तर त्यानें त्या सामर्थ्यानें त्यास भस्म करून टाकलें असतें. परंतु तसें सामर्थ्य नसल्यामुळें वर सांगितलें इतकेंच बोलून तो तेथून जळफळत उठून गेला. वाटेनें त्याच्या मनांत काय विचार आले आणि काय नाहीं, हें वर्णन करून सांगणें फार कठिण होतें.

राजा जयसिंग यानें त्याची ती बातमी ऐकून त्यास तेथून धिक्कारपूर्वक घालवून दिलें ही गोष्ट खरी; परंतु त्याच्या अंतःकरणांत खरोखरीच नवा उजेड पडल्यासारखें झालें! शिवाजीनें विजापूरकरांकडे खरोखरीच जर कांहीं संधान बांधलें, तर आपल्याला एकंदरींत जड जाईल. न जाणों, हा शिवाजीचा खरोखरीच शह देण्याचा विचार असेल, तर आपण त्याला काटशह दिला पाहिजे. युक्तीला युक्ति लढविल्याखेरीज कोठें कामें होतात ? असा विचार मनांत करून त्यानें लागलीच आपला एक हरकारा पाठवून रघुनाथपंतांस बोलावणें पाठविलें व त्यांस ह्मटलें: "आमच्याकडे तहाची बोलणीं करतां आणि त्याचा निकाल होतो न होतो तों विजापूरकरांकडेही बोलणीं लावतां, पण याचा परिणाम चांगला होणार नाहीं. आपण विजापूरकरांकडे बोलणें लावलें तर आह्मांलाही लावतां येणार नाहीं काय ? औरंगजेबासारखा बादशहा आपल्याशीं तह करतो असें पहाण्याबरोबर विजापूरचा बादशहा तुह्मांला धरून बसेल कीं आमच्याकडे वळेल, याचा विचार करा. विजापूरकर आणखी आह्मी एक झालों कीं आपल्याला एक तसूभर जागा तरी उभें राहण्याला सांपडेल काय? तेव्हां जें काय तुमच्या मनांत करायचें असेल तें पुरा विचार करून करा. मी हिंदु तुह्मी हिंदु. तुमचें वाईट होऊं नये, माझी नामुष्की होऊं नये, ह्मणून तुमच्याशींच आधीं तह करण्याचें कबूल केलें. आज मितीला तुह्मांला माझ्या अटी विलक्षण वाटताहेत, परंतु त्या तशा नाहींत. आपल्याला पांच हजारांची मनसबदारी जर मिळवून दिली तरच मी खरा. पण आतां मला बादशहाला असें लिहून पाठवायला सांपडलें पाहिजे, कीं शिवाजी आपल्या बाहेर बिलकुल नाहीं. तो सर्व कांहीं आपल्या ताब्यांत देऊन आपला नौकर ह्मणून रहाण्यास तयार आहे. पहा. याचा तुह्मी विचार करा आणखी मला काय तें कळूं द्या. आतां मी एक क्षणभरसुद्धां थांबणार नाहीं. विजापूरकरांना आणखी तुह्मांला दोघांनाही पालथें घालण्यासाठीं आह्मी आलों आहोंत. विजापूरकरांशीं सख्य करून तुह्मांला उडवायचें किंवा तुमच्याशीं सख्य करून विजापूरकरांना उडवायचें, आह्मांला दोनही शक्य. तुमचें आणखी त्यांचें सख्य कोठपर्यंत ? आह्मी जोंपर्यंत त्यांच्याशीं सख्य करण्याच्या गोष्टी काढीत नाहीं तोंपर्यंत. आह्मी त्या गोष्टी काढल्या, कीं विजापूरकर आह्मांला वश झालेच. तेव्हां आतां काय तो विचार करा,

आणखी मला एक दिवसाच्या आंत सांगा. तहाच्या अटी मीं काय त्या तुह्मांला सांगितल्या आहेत. दूरवर विचार करा. ''

राजा जयसिंग खरोखर कठोरपणें बोलत होता. आपलें सगळें बोलणें व तें बोलतां वेळचें आपलें स्वरूप हीं बरोबर शिवाजीस अगदीं तंतोतंत कळावीं असा त्याचा हेतु हें अगदीं उघड होतें.

---

# प्रकरण ३२ वें.

## तहाचा दिवस.

राजा जयसिंगाच्या इच्छेप्रमाणें त्याच्या भाषणाच्या वेळच्या सर्व आविर्भावाचें वर्णन व प्रत्येक शब्दन् शब्द शिवाजीमहाराजांच्या कानीं गेला. महाराजांना तरी तेंच पाहिजे होतें. फार दिवस भिजत घोंगडें ठेवण्यांत आतां तात्पर्यार्थ नव्हता. आपलें या जयसिंगाच्या व दिलेरखानाच्या सपाट्यापुढें कांहीं चालावयाचें नाहीं हें त्यांस उघडपणें दिसून आलें. साधारण वारा आला, त्याच्यापासून आपला बचाव करण्यासाठीं आपण कितीही लढलों तरी वावटळीच्या वेळीं लवून घेऊन आपला बचाव होत असल्यास तेंच करणें अधिक श्रेयस्कर असें त्यांच्या मनांत आतां येऊं लागलें. आपण आपल्याकडून या वावटळीसही तोंड देण्यास जितका प्रयत्न करावयाचा तितका केला; परंतु आपल्यास प्रत्यक्ष अंबेनें जो साक्षात्कार द्यावयाचा तो दिला. आपले गुरु येऊन गेले त्यांनींही तोच उपदेश केला. असें असतां आपणच आतां ओढून धरून विनाकारण आपल्या राज्याचे व लोकांचे हाल कशाला करून घ्यावे ! ज्या काय अटी ते घालूं इच्छितील त्या कबूल कराव्या आणि आपला कार्यभाग करून घ्यावा. या निश्चयापर्यंत आपलें मन आणण्यास महाराजांस किती परिश्रम करावे लागले असतील याची नुसती वाचकांनीं कल्पना करावी. त्यांच्या मनाला अतोनात वाईट वाटलें हें कांहीं सांगावयास पाहिजे ? प्रत्यक्ष पोटचा मुलगा वारल्यानेंसुद्धां त्यांस तसें वाईट वाटलें नसतें. एखाद्यानें मोठ्या कष्टानें पैसा मिळवून एखादा सुंदर वाडा बांधावा, तो वाडा आतां अगदीं पूर्ण होऊन रहाण्यायोग्य व्हावा, त्यांत रहाण्याची सर्व तयारी करावी आणि एकाएकीं तो कोण्या तरी दुष्टानें जाळून टाकण्यास सिद्ध व्हावें–नव्हे–अगदीं प्रत्यक्ष आग लावून त्याची राखरांगोळी करून टाकावी. पण आपल्या हातून त्याच्या प्रतीकारार्थ कांहींसुद्धां करतां न येऊन केवळ ती भडकलेली आग पहात बसण्याची पाळी आपल्यावर यावी. असा प्रसंग आला असतां तें घर बांधणाराच्या मनाची जी अवस्था होते तीच अवस्था महाराजांच्या मनाची झाली असें ह्मटलें तर

त्यांत नवल काय ? होणारापुढें आपला इलाज नाहीं. आपण आपल्या ठिकाणीं विनाकारण कुढून उपयोग नाहीं. असा एकंदर विचार करून व मनाची कशी तरी समजूत करून त्यांनीं जयसिंगाकडे पुनः निरोप पाठविला कीं आपल्या ह्मणण्याप्रमाणें तह करण्यास मी अगदीं खचित तयार आहें. तर आपल्या मुलाखतीस केव्हां येऊं तें कळवावें ह्मणजे त्याप्रमाणें येतों. माझ्या मरातबाप्रमाणें सर्व व्यवस्था राखली जाईल याबद्दल मला शंका नाहींच.

रघुनाथपंत जयसिंगाकडे गेल्यानंतर जेव्हां त्यांनीं महाराजांचा हा विचार त्याच्यापुढें निवेदन केला, तेव्हां अर्थातच जयसिंगास फार फार संतोष झाला. इतका कीं आपण जन्माला येऊन असलें विलक्षण मुत्सद्दीपणाचें व शौर्याचें कृत्यच कधीं केलें नव्हतें असें त्याच्या मनास वाटत असावें असें त्याच्या चर्येवरून दिसूं लागलें. आपण इतकीं वर्षें शिपाईगिरीचें काम केलें तरी सुद्धां आपल्यास स्वतंत्र राज्य स्थापण्याची इच्छा झाली नाहीं किंवा झाली असती, तरी ती सफल झाली नसती आणि हा वेड्यासारखा या भानगडींत पडून कां उगीच आपली माती करून घेतो ? आतां आपल्या ह्मणण्याप्रमाणें त्यानें दांडगाईचा मार्ग सोडून देऊन बादशहास शरण जाऊन त्याची चाकरी पत्करण्याचें कबूल केलें हेंच अगदीं रास्त आहे असें त्याच्या मनास खरोखरीच खरें वाटलें. त्यानें त्याप्रमाणें रघुनाथपंतास बोलूनही दाखविलें. योग्य वेळीं पोक्त विचार केला असें ह्मणून त्यानें महाराजांची प्रशंसा केली व त्यांस मुलाखतीस येण्याचा दिवस मुकर करून तो कळविला. लागलीच महाराजांच्या इतमामाप्रमाणें त्याची व्यवस्था ठेवण्याबद्दल सर्वांस हुकूम सोडले. आणि दिलेरखानास आपण अशी अशी व्यवस्था केली आहे अशाबद्दल निरोप पाठवून मुलाखतीच्या वेळीं आपण यावें अशी आग्रहपूर्वक विनंति केली.

जयसिंगाचा हा निरोप गेला तेव्हां तो ऐकून दिलेरखानाच्या तळपायाची आग मस्तकास गेली. त्याला असें वाटलें कीं जयसिंगानें आधीं सगळी तजवीज केली. करार मदार काय करावयाचे ते ठरविले, मुलाखतीचा दिवस कायम केला, आणि आतां आपल्याला निरोप पाठविला. तर या एकंदर व्यवस्थेंत आपण कांहींना कांहीं तरी खोड काढून हा तह होणार नाहीं असें करावें. असें कशा प्रकारें करावयाला येईल यासंबंधाच्या विचाराकडे त्याचें डोकें लागलें. एकदां त्यानें आपला हरकारा पाठवून असेंच विचारलें, कीं आपण तहाला अटी काय घालणार आणि सुटी काय घालणार ? याचा खुलासा मला आधीं कळवावयास पाहिजे होता तो कळविला नाहीं, तरी तो आतां कळवावा. ह्मणजे मला विचार करण्यास ठीक पडेल. जयसिंगास त्यांतला छेद कळला, परंतु तो आपल्यास कळल्याचें यत्किंचितही न दाखवितां त्यानें त्यास सरळपणें सर्व अटी व तहाचीं कलमें कळविलीं. त्यांत आपल्या मुलीच्या शोधाबद्दल कांहींच कलम नाहीं असें पाहून त्यास फार

राग आला. परंतु याबद्दलचें उट्टें आपण आतां आयत्या वेळीं काढूं असा विचार करून तें प्रकरण तितकेंच ठेविलें.

जयसिंगानें शिवाजीमहाराजांस आपण यत्किंचित् सुद्धां संकोच, शंका किंवा भीति मनांत न धरतां तहासाठीं यावें, आपल्याला कोणत्याही प्रकारचा धोका मी बसूं देणार नाहीं असें सांगून पाठविलें. आपण तहासाठीं जातों खरें, परंतु आपल्यास कोण्या वेळीं काय कपट करून काय करतील असा संशय महाराजांच्या मनांत आल्याखेरीज राहिला नाहीं. त्यांनीं आपली विश्वासू मंडळी जवळ बोलावून तसा कांहीं प्रसंग आल्यास काय करावयाचें याबद्दल पक्की निरवानिरव करून ठेविली होती. राजकीय बाबतींत विश्वास हा शब्द आपला बोलण्याचालण्यापुरताच. वर्तनांत परस्पर पक्ष कपटानें अगदीं पूर्णपणें भरलेले आहेत असें धरूनच चालावयाचें हा साधारण नियम असे. त्याप्रमाणेंच महाराजांनीं वर्तन केलें.

इकडे दिलेरखानानें आपली एक विश्वासू लवंडी व एक सिद्दी गुलाम अशीं दोघें शहाजाद्याकडील बातमी काढण्यासाठीं पाठविलीं होतीं. त्यांना बरेच दिवस लागले, यामुळें तो फार हवालदिल होता. आपल्या पोरीची एकंदर व्यवस्था झाली तरी काय, त्यास कांहींच कळेना. आपल्याजवळ सैन्य आहे इतकें सैन्य. तें सगळ्या देशभर धुमाकूळ घालून आपला दरारा जिकडे तिकडे बसवीत आहे, आणि असें असून आपली पोरगी आपल्या छावणींतून कोणीं पळवून न्यावी? पळवून नेली तर नेली, परंतु तिचा मागमूस आपल्यास लागूं नये यासारखी लाजिरवाणी गोष्ट कोणतीही नाहीं. असें वारंवार त्याच्या मनांत येई. तो मनाचा दुष्ट नव्हता. आपली पोरगी सांपडत नाहीं तर सगळ्या आपल्या चाकर नोकरांना एकदम फांशीं द्या, सुळीं द्या, डोंगरांकड्यांवरून लोटा, हत्तीच्या पायांखालीं द्या, असे हुकूम त्यास देतां आले असते; परंतु चौकशीअंतीं जेव्हां त्यास कळून चुकलें, कीं आपल्या माणसांचा कांहीं त्यांत वांक नाहीं तेव्हां त्यानें कोणास कांहीं केलें नाहीं. परंतु त्याच्या अंतःकरणाला भयंकर दुःख झालें. आपण आतां करावें काय, त्यास कांहीं सुचेना.

अशा विवंचनेंत तो असतां त्याचा तो सिद्दी गुलाम आपल्या कामगिरीवरून आला व त्याचेसमोर येऊन त्यानें त्यास असें सांगितलें, कीं "शहाजाद्याच्या जनान्यांत नूर–एल्–हुदा मुळींच नाहीं. जितका म्हणून बारकाईनें तपास करायचा तितका अगदीं पक्केपणें झाला. मीरिअमनें नानाप्रकारचे कांगावे व सोंगें करून सगळीकडे आपला प्रवेश करून घेऊन शोध केला. आतां फक्त एक ठिकाण शोधायचें राहिलें आहे. तेथें ती गेली आहे; परंतु तेथें कांहीं तपास लागेल ही कल्पना सुद्धां आपल्याला होत नाहीं. आपण विनाकारण काळजी करीत रहाल म्हणून मी तिला आपला वेडगळ शोध करण्यासाठीं तशीच सोडून देऊन इकडे निघून आलों. तीही कंटाळून शेवटीं कांहीं

तपास लागत नाहीं ह्मणून अशीच परत येणार. खाविंद, आपली कन्या-आमची धनीण-औरंगाबादेस किंवा शहाजाद्याच्या जनान्यांत कोठेंही नाहीं अशाबद्दल आमची अगदीं खालंखाल खात्री झाली आहे. आतां याउपर आपण काय ह्मणाल तें खरें."

त्या गुलामाचें तें भाषण ऐकतांच दिलेरखानाची फार फार निराशा झाली. आणि त्यास पहिल्या प्रथम जें वाटलें होतें, तेंच त्याचें ह्मणणें कायम झालें. तें हें, कीं आपली मुलगी मराठ्यांनीं नेली, अर्थातच अशा मराठ्यांशीं जयसिंग तह करतो आहे हें पाहून त्याच्या संतापाला व खेदाला पारावार नाहींसा झाला. या तहाच्या कामीं जितके मोडते घालतां येतील तितके घालावयाचे असा त्याचा निश्चय झाला. त्यानें त्या आपल्या गुलामास नानाप्रकारचे प्रश्न विचारून शेवटीं कांहीं त्याच्यापासून निघत नाहीं असें त्यानें पाहिलें तेव्हां त्यास जाण्यास सांगितलें.

शहाजाद्याकडे आपल्या पोरीचा कांहीं धागा लागत नाहीं असें कळल्यापासून त्याचें भानच नाहींसें झालें. मराठे आणि राजा जयसिंग यांनीं संगनमतानें आपल्या पोरीची कांहीं तरी वाट लाविली असली पाहिजे. किरातसिंगानें सुचविलें तें केवळ कांहीं काल्पनिकच असेल असें कां धरावें? त्यांतही कांहीं तरी तथ्य नाहीं ह्मणून कशावरून? असें आतां त्याच्या मनांत येऊं लागलें. शिवाजी आतां तहासाठीं येतोच आहे. तेथें हें पाहूं. मात्र या किरातसिंगाला तेथें नेलें पाहिजे. तो आपल्याबरोबर असला ह्मणजे कांहीं तरी फायदा होईल. असा विचार करून त्यानें किरातसिंगास शोधण्यासाठीं आपला माणूस पाठविला. त्या माणसास अशी सक्त ताकीद होती, कीं किरातसिंगास गांठून घेऊनच ये. त्याप्रमाणें तो माणूस गेला व त्यानें किरातसिंगास गांठून त्यास दिलेरखानाचें आमंत्रण दिलें. किरातसिंगही काय करावें आणि काय नाहीं या धोरणांत असून अव्हासव्हा हिंडत होता हें वाचकांस माहीत आहेच. आपणांस दिलेरखानाकडून बोलावणें आलें हें पहातांच किरातसिंगास फार आनंद झाला. तो तावडतोब आपलें परिभ्रमण करून सोडून दिलेरखानाकडे आला. त्यालाही आतां आपण पुनः दिलेरखानास भेटावें अशी फार इच्छा होती; कारण त्यानें आपल्या डोक्यांत पुढें घडवून आणावयाचीं पुष्कळशीं कपटनाटकें रचून ठेविलीं होतीं. तीं रंगभूमीवर आणण्यास उत्तम नट किंवा कळसूत्री बाहुलें ह्मटलें ह्मणजे दिलेरखानासारखें दुसरें मिळणार नाहीं असें त्यास वाटत होतें. त्याच्या कपटनाटकाचा उपयोग जयसिंगाकडे मुळींच झाला नाहीं. तेव्हां दिलेरखानाच्या द्वारानें त्याचा छळ करण्यास ही एक संधि त्यास बरी वाटली.

किरातसिंग दिलेरखानाकडे आल्यानंतर त्यानें चांगल्या प्रकारें त्याचें स्वागत करून नूर-एल्-हुदाचा तपास शहाजाद्याकडे बिलकुल लागत नाहीं असें

कळविलें, त्याबरोबर किरातसिंगाचें काळीज एकदम चरारलें. वार्तेत कांहीं तरी घात झाला असावा आणि आपलें कारस्थान पार फसलें असावें हें त्यास उघड दिसलें. परंतु त्यानें बाहेरून तसें कांहीं न दाखवितां दिलेरखानास अगदीं शांतपणें ह्मटलें: " तर मग मीं आपल्याला ह्मटलें तसेंच जयसिंग राजे आणखी मराठे यांचें संगनमत होऊन आपली सुशील कन्या कोठें तरी नेली गेली असावी. छे. छे. काय धारिष्ट हें ! खाविंद, राजांचा मुलगा माझ्या नांवचा एक आहे आपणांस माहीतच आहे. तो परवां शिवाजीकडे गेल्याची मला पक्की बातमी लागली आहे. आणखी तहाबद्दल बोलणीं लावण्याच्या मिषानें परंतु कांहीं तरी निराळेंच कारस्थान चालविण्याचा त्यांचा घाट होता असेंही माझ्या कानीं आलें आहे. तेव्हां हा प्रकार आहे तरी काय ? तो किरातसिंग जरा फंदी आहे आणि बापाचा लाडका आहे हें तर आपल्या कानीं आलेंच असेल. "

" काय ह्मणतोस ? " दिलेरखान त्यास एकदम ह्मणाला, " एकूण राज आपल्या चिरंजिवांना पाठवून तहाचीं बोलणीं आपण होऊन करताहेत काय ? ठीक............ "

" कसलीं तहाचीं बोलणीन् कसलें काय ! पण त्यांचें खलबत जें चाललें होतें तें अगदीं आपल्या कन्येसंबंधानें होतें अशी विश्वसनीय बातमी मला लागली आहे. माझ्या नांवासारखें नांव आहे तेव्हां माझ्या नांवाचा दुर्लौकिक केला नाहीं ह्मणजे झालें. मला तर खानसाहेब आतां इकडे रहाण्याचा अगदीं कंटाळा आला आहे. आपण आपलें देशीं जावें आणखी दरबारांतच आपल्या हातून काय बादशहाची सेवा होईल ती करून त्यांची मर्जी संपादन करावी. आमच्यासारख्या सरळ आणखी भोळ्या माणसांचे हे दिवस नव्हेत. एखादे वेळीं इकडच्या इकडेच कांहीं तरी बेइमानपणा केल्याचा आरोप आपल्यावर येऊन आपली गठडी वळेल कीं काय असें वाटूं लागलें आहे. पहावें पहावें नाहीं तर आपली परवानगी घेऊन दिल्लीची वाट धरावी असाच मीं मनाचा निर्धार केला आहे. "

अशा प्रकारचीं त्या दोघांचीं कांहीं कांहीं बोलणीं होऊन नंतर अर्थातच त्या वेळचा मुख्य विषय जो तह तिकडे बोलणें वळलें व त्या तहाच्या शर्तींत मोडता घालण्याबद्दल त्यांच्या त्यांच्यांत खूप वाटाघाट झाली. किरातसिंगाला जें काय दिलेरखानाच्या मनांत भरवावयाचें होतें तें सर्व त्यानें त्याच्या मनांत यथासांग भरवून ठेवलें. इतकें भरवलें, कीं आपल्या इतक्या दिवसांच्या कारस्थानाची पूर्तता झाली असें वाटून त्यास मोठा संतोष झाला.

इकडे मुलाखतीच्या दिवशीं ह्मणजे ता० ११ जून १६६५ रोजीं महाराजे मोठ्या कष्टी मनानें राजा जयसिंगाच्या छावणीकडे गेले. छावणीपासून थोड्या अंतरावर जाऊन पोंचल्यावर त्यांनीं आपण जवळ आल्याची वर्दी राजास पोंच-

विण्याकरितां पंडितास पुढें पाठविलें. तें पहातांच राजा जयसिंगास अत्यंत आनंद होऊन अस्मान् ठेंगणें झालें. त्यानें पुनः एकदां महाराजांस मोठ्या तोऱ्यानें निरोप पाठविला, कीं " आम्हीं ज्या शर्ती आपणांस सांगून पाठविल्या त्या साऱ्या जर आपल्यास कबूल असल्या तर आपण येण्याची तसदी घ्यावी. नाहीं तर आगळीं तसदी व्यर्थ होणार आहे. आम्ही आपल्या शर्तींत एक अक्षरसुद्धां कमी होऊं देणार नाहीं. आपण आपले सर्व किल्ले, सर्व प्रांत बादशहाच्या ताब्यांत दिले पाहिजेत. आपण स्वतः बादशहाचे ताबेदार ह्मणून त्यांची नौकरी पत्करिली पाहिजे. आणि मग आह्मी खुषीनें कांहीं किल्ले व प्रांत जहागीर ह्मणून आपल्याकडे ठेवूं. या गोष्टी पुनः आपल्यापुढें ठेवतों. त्या आपल्याला कबूल असल्या तर पुढें या, नाहींपेक्षां आपापले मार्ग आपापल्यास मोकळे आहेतच. जें काय होणार असेल तें होईल. "

या वेळीं महाराजांस अशा प्रकारचा निरोप पाठविणें ह्मणजे महाराजांच्या दुःखावर डागण्या देण्याप्रमाणेंच होय. तो तसा निरोप परत आला हें पाहून महाराजांस किती वाईट वाटलें असेल. बेहेत्तर आहे काय वाटेल तें झालें तरी, परंतु आपण आल्या वाटेनें परत जाऊन प्राण जाईपर्यंत लढावें, शेवटीं स्वराज्यासाठीं व स्वजनासाठीं प्राण द्यावे असेच विचार त्यांच्या मनांत आले. परंतु महाराज फार दूरदर्शी होते. आतां आपण मागें परतणें ह्मणजे पुनः स्वराज्यासाठीं प्रयत्न करणें पुढें कोणासही अशक्य करून ठेवलेंसें होईल. सध्यां नमून घेण्याचे दिवस आहेत तर नमून घ्यावें. जीव शाबूद ठेवूं. स्वराज्याचें मूळ शाबूद ठेवूं. मग पुढें काय होईल तें पाहूं. असाच त्यांनीं विचार केला आणि पुनः त्यांनीं निरोप पाठविला, कीं " आपलें व आमचें जें आतांपर्यंत ठरलें त्यांत अणुरेणुभरही फरक करण्याची इच्छा नाहीं. आपण स्वस्थ असावें. "

असा निरोप पाठवून स्वाऱ्या एकदां छावणींत जाऊन पोंचल्याबरोबर जयसिंगानें पाठविलेले लोक होतेच. छावणींत जाण्याबरोबर त्यांस जयसिंग स्वतः सामोरा आला नाहीं. शामिआनाच्या दाराशीं जानीबेग बक्षी यास त्यानें पाठविलें. तथापि महाराजांनीं आपला मनःस्थिति बिलकुल दिसूं दिली नाहीं. जयसिंग राजे दृष्टीस पडताच क्षणमात्र त्यांच्या कपाळास आंठ्या पडल्या. एक गुलाम दुसऱ्या स्वतंत्र माणसास आपल्यासारखा गुलाम बनवूं पहातो आहे ! असें मनांत येऊन त्यांस अत्यंत वाईट वाटलें. परंतु क्षणार्धांत आपलें सगळें खिन्नत्व एका बाजूस सारून ते हास्यमुख करून पुढें झाले. त्यांनीं दोनही हात पुढें केले. ते जयसिंगानें धरून मोठ्या आदरानें त्यांस आपले गादीवर बसविलें. नंतर पुनः उठून दिलेरखानाची त्याचप्रमाणें मुलाखत झाली. पुढें आतां तहाची बोलणी सुरू होणार तों जयसिंगराजे महाराजांस ह्मणाले: " आपण आतां आमच्या या दिवाणखान्यांत बसा. आम्ही व खानसा-

ठेव व दुसरी मंडळी दुसरीकडे बसतों. आपला काय विचार करायचा तो पुनः एकदां पक्का करा. ठरलें ह्मणजे आपण पुनः भेटूं व कायम ठरवूं." असें म्हणून ती सर्व मंडळी उठून गेली. महाराजांस एका प्रकारें तें बरें वाटलें. सुरतसिंग कच्छवा व उदेराज मुनशी या दोघांच्या मध्यस्थीनें पुढें बोलणीं सुरू झालीं. बोलणीं मध्यरात्रीपर्यंत सुरू होतीं. शेवटीं असें ठरलें, कीं स्वराज्यांतील लहान मोठे किल्ले २३ व प्रांत त्यांभोंवतालचा–एकंदर चार लक्ष होन उत्पन्नाचा मुलूख बादशाही अमलांत सामील करावा आणि लहान मोठे किल्ले १२–राजगडासकट व दरसाल एक लक्ष होन उत्पन्नाचा प्रांत इतका महाराजांकडे ठेवावयाचा. परंतु राजगड किल्ल्यासकट हा प्रांत व किल्ले बारा इकडे ठेवावयाचे ते एका अटीवर. ती अट ही, कीं महाराजानीं बादशहाचे नौकर बनावें. महाराजांस बाकी सर्व कांहीं ठीक वाटलें. परंतु तेवढी अट फार दुःसह वाटली. त्यांनीं आपल्या मनाच्या समाधानासाठीं एक युक्ति योजिली. ते म्हणाले, " मला आतां ही मनसबदारी नको. मी तर या तहाला कबूल झालों तेव्हां बादशहाचा ताबेदार झालोंच. पण माझा मुलगा संभाजी याच्या नांवानें ही मनसबदारी–पांच हजारांची मनसबदारी–द्यावी. तो आपलेकडे पाठवून देतों. त्याला आपण मनसबदारीचीं वस्त्रें द्यावीं ह्मणजे ठीक होईल. मला ती मनसबही नको, आणखी नौकरीही नको. मी आहें तोंपर्यंत आतां आपला–बादशहाचा बंदा झालोंच. आणखी काय ह्मणूं ! मी दक्षिणेंत आपण–बादशहा फर्मावील ती नौकरी करण्याला तयार आहे त्याचप्रमाणें विजापूरच्या ताब्यांतला जो प्रांत माझ्या ताब्यांत आहे तो केव्हांही–आपण विजापूरकरांचा सारा मुलूख घेतला तरी–माझ्यापासून घेऊं नये. त्याबद्दल मी दरसाल तीन लाख प्रमाणें ४० लाख होन खंडणी देण्यास कबूल आहें."

असें बोलणें करण्याचा महाराजांचा काय हेतु होता हें वाचकांच्या सहज लक्ष्यांत येणार आहे. होतां होईतों बादशहाच्या नौकरपणाचा बट्टा लागू नये ही त्यांची इच्छा. संभाजी अज्ञान होता. शिवाय स्वराज्याची पक्की स्थापना आपण केल्यानंतर मग त्याच्या त्या नौकरपणाचा कांहींच मुद्दा नाहीं. तो हिंदुपद पादशाहीच्या तख्तावर बसल्यावर औरंगजेबाचा नौकर कसा रहाणार ?

महाराजांचें हें सर्व बोलणें ऐकून जयसिंग तरकला व त्यासही त्याचें ह्मणणें कबूल करावें असें वाटलें.

परंतु पुढें ज्या काय मौजा झाल्या त्या पुढल्या प्रकरणासाठीं ठेवूं.

---

# प्रकरण ३३ वें.

## नजराणा.

जयसिंगराजे याप्रमाणें आपणांस वारंवार वारंवार लिहून निरोप पाठवितात यांतला हेतु तरी काय असावा हें शिवाजीमहाराजांस समजण्याला कांहीं कठिण नव्हतें. आपणाला आतां तह करण्यापलीकडे कांहीं दुसरा उपाय राहिला नाहीं हें पक्कें दिसून आल्यामुळें यांच्या या गमजा आहेत हें उघड होतें. परंतु या गमजा करण्यानें विजापुरकरांना आपण मिळूं नये ही मोगलांची इच्छा कशी सफळ होणार हें मात्र त्यांस समजेना. तथापि आपणास चेपवेल तेवढें चेपावें. आतां पुढें चेपलें जात नाहीं असें दिसलें कीं मागें घ्यावें, असें धोरण असलेंच पाहिजे हें उघड होतें. शिवाजीमहाराजांनीं प्रत्येक वेळीं आपण शहाच्या सर्व अटी व शर्ती कबूल करतों हें एकवार कळविलेंच आहे असा निरोप पाठविला. तेव्हां पुनः ठीक आहे, आपण पुढें यावें, आपल्या आदरातिथ्याची तयारी आहे असा निरोप गेला. महाराज शेवटपर्यंत काय करावयाचें तें ठरवूनच गेले होते. आपण आपल्याकडून आतां आपला डाव गमावयाचा नाहीं. एक वेळां तह करून स्थिरस्थावर झाल्यानंतर आपला विचार पहातां येईल.

छावणीच्या तोंडाशीं महाराजांची स्वारी जातांच त्यांचें स्वागत करण्यास उदेराज मुनशी व उग्रसेन कच्छवा हे सामोरे आले होते. यांनींही पुनः महाराजांस बजावलें, कीं " आपण सर्व किल्ले व सर्व प्रांत आमच्या स्वाधीन देतें असलां, त्यांत कांहीं बाधें नसलें तर तहाची गोष्ट, नाहीं तर कांहीं तात्पर्य नाहीं."

तें ऐकून महाराजांस फार हंसूं आलें. व मोठ्या मुत्सद्दीपणानें ते ह्मणाले: " आज मितीचा आमचा प्रांत तर काय ? परंतु यापुढें आम्ही मिळवूं तो सुद्धां आपलाच आहे ! " या बोलण्यांतील मर्म मुनशी व उग्रसेन कच्छवा यांस समजलें असेल असें दिसलें नाहीं. ते खूष होऊन माना डोलवूं लागले. महाराजांच्या बरोबरची सहा मंडळी मात्र एकमेकांकडे पाहून हंसली. पुढें मंडळी राजांच्या शमीआन्याच्या द्वारापाशीं गेली, तेव्हां जानीबेग बक्षी दारांत सामोरे आले. त्यांनीं महाराजांस आंत नेऊन राजांची व त्यांची मुलाखत झाली. महाराजांचे हात धरून राजानीं त्यांस आपलेजवळ बसविलें व ते ह्मणाले, " आपण विचार केला हा फार चांगला केला. या खेपेस आपल्याला यश आलें नसतें. मनुष्यहानि विनाकारण झाली असती. आणि

शेवटीं आह्मीं सारा मुलूख ताब्यांत घेतला असता तो असताच. तेव्हां आपण केला हा विचार फार शहाणपणाचा झाला. आतां मुलूख आपल्याच ताब्यांत राहील, पण बादशहाचा ह्मणून राहील. आह्मी तेव्हांच इथून जाणार. शिवाय आपण असें पहा, बादशहाचें सामर्थ्य केवढें! आपल्या लोकांचा दुबळेपणा केवढा! त्यांत सतरा हजार तंटे आणि अठरा हजार बखेडे! तेव्हां बादशहाशीं झगडण्यापासून कधीं तरी हित होण्याचा संभव? मुळींच नाहीं. फार चांगलें झालें. आपण फार पोक्त विचार केला. आतां एवढेंच करायचें, कीं पुरंदरच्या लोकांनीं अजून उगीच जो वायफळ दंगा चालवला आहे तो बंद करायचा. आपण हुकूम केल्याबरोबर सगळें कांहीं दबेल. तें दबून दिलेरखान वर माचीवर जाऊन कायम होईपर्यंत त्याचें मन शांत व्हायचें नाहीं. आतां त्यांत कांहीं जीव राहिला आहे असें नाहीं. त्यांनीं आपलें निशाण चढवलेंच आहे. पण आपला आपल्या लोकांना निरोप गेला, कीं पुरा नि होईल. पुनः त्यांत तक्रार रहाणार नाहीं. त्यांच्या मनांत कोणत्याही प्रकारची शंका रहाणार नाहीं. ते तहाला आड येणार नाहींत."

महाराजानीं त्याही ह्मणण्यास रुकार दिला. आतां तर त्यांची अशी स्थिति झाली होती, कीं ते जें काय ह्मणतील त्यांस रुकार देण्याखेरीज दुसरा मार्ग नव्हता. महाराजांनीं आपल्याबरोबर आणलेल्या परिवारांपैकीं दोघाजणांस आपल्या लोकांस निरोप पोंचविण्यासाठीं पाठविलें, इतकें जेव्हां झालें, तेव्हां जयसिंगराजांस पूर्ण विश्वास आला. त्यांनीं मग त्यांस विश्रांति घेण्याविषयीं विनंति केली. आपल्या खास दिवाणखान्यांत त्यांची व्यवस्था लाविली व दिलेरखानांस तहाबद्दलचें कायमचें बोलणें करण्यास येण्याविषयीं सूचना पाठविली.

दुसरे दिवसाची सकाळ उजाडतांच पुरंदराकडून निरोप आला, कीं आतां सर्व सामसूम झालें. परंतु तहासाठीं येण्याच्या निरोपाला मात्र प्रतिनिरोप असा आला, कीं तह करणें आह्मांला मान्य नाहीं. आतांपर्यंत आह्मीं फार त्रास भोगला. इतका त्रास न देतां प्रथमच जर तहाची गोष्ट निघती तर मग एक विचार करण्याची गोष्ट होती. परंतु तशी कांहीं गोष्ट झाली नाहीं. आतां आह्मी सगळा प्रांत काबीज करणारच. त्यांत काडीइतकीसुद्धां शंका नाहीं. इतका प्रकार झाला, तेव्हां आतां कोठें तहाच्या कबुल्या. आपण थोर आहां. आपल्याकडे सगळाच अधिकार आहे. तेव्हां आपण कराल त्यांत मी आहेंच. असें समजून आपण तह करण्याचा विचार केला असला, तर आपण खुशाल करावा. आमच्या काळजाला जें काय दुःख झालें आहे तें एक आह्मांला माहीत कीं एक परमेश्वराला माहीत. असा जबर घाव ज्यानें आमच्या काळजावर घातला त्याच्याशीं आमचा तह व्हावा कसा? आपण करा.

**काळजावर घाव घालण्याच्या संबंधाचा मजकूर कशाला अनुलक्षून होता हें वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल. आपली कन्या मराठ्यांनीं आपल्या छावणीतून**

नेली याबद्दल आतां त्याला अणुरेणुमात्र शंका राहिली नाहीं. शहाजाद्यानें आपल्या कांहीं लोकांस फितुर करून किंवा मराठ्यांना फितुर करून त्यांच्याकडून आपली मुलगी नेली असें प्रथम त्याच्या मनांत भरलें होतें, तें आतां कांहीं केल्या जाईना. शहाजाद्याच्या अंतःपुरांत आपल्या कन्येचा पत्ता नाहीं असें जेव्हां त्याला पक्केपणें कळलें, तेव्हां तर त्याच्या संशयाला पारावार नाहींसा झाला, आणि त्याच्या मनाचा निश्चय झाला, कीं या मराठ्यांनींच माझ्या पोरीला पळवून नेऊन तिचा सत्यनाश केला असावा. त्याखेरीज पोरगी नाहींशी व्हावी कशी ?

दिलेरखानाकडून असा निरोप येतांच राजा जयसिंगास फार चमत्कारिक वाटलें. तो आपल्या वचनांच्या आड येईल व तहाच्या कामांत मोडता घालील हें मुळींच संभवनीय नाहीं असें त्यास वाटत होतें. कारण आधीं त्याच्या इच्छेप्रमाणें आपण शिवाजीकडून पुरंदर त्याच्या ताब्यांत देवविला, आणि सर्व किल्ले एकदम ताब्यांत देण्याचें ठरविलें. दिलेरखानाची मोठी अट जी काय होती ती पुरंदर एकदम खालीं करून मिळावा ही होती. ती अट पुरी झाल्यानंतर आणखी काय पाहिजे होतें ? जयसिंगाचीही आतांपर्यंत अशीच समजूत होती, कीं दिलेरखानाची मुलगी शहाजाद्यानेंच कांहीं तरी लटपट करून नेली; कारण त्या मुलीसंबंधाच्या दिल्लीसच भानगडी काय झाल्या हें त्यासमुद्धां पक्कें ठाऊक होतें. शहाजाद्याचा डोळा तिजवर होता तेव्हां त्यानें कांहीं खलबतें करून ती मुलगी आपखुषीनें गेली असावी. तसें होण्यांत दिलेरखानाला घटकाभर जरी वाईट वाटलें तरी शेवटीं आनंदच होईल; कारण आपली मुलगी बादशहाची स्नुषा झाली असें त्यास कळेल. जो शहाजादा आपल्यास जांवई पाहिजे तोच मिळाला नाहीं म्हणून काय झालें ? शहाजादा तर आहे हें समाधान शेवटीं होईल असा आपला त्याचा समज झाला. परंतु वर सांगितल्याप्रमाणें जेव्हां निरोप आला, तेव्हां मग काय विचारतां ? तहाच्या कामांत मोठीच अडचण आली. आपण बादशहास एक ल्याहावें, आणि दिलेरखानानें दुसरेंच ल्याहावें हें अत्यंत अनुचित होतें. त्यापासून तह न होतां शिवाजीला जमीनदोस्त करण्याखेरीज दुसरी कामगिरी आपल्यास रहाणार नाहीं. ती कामगिरी करावी लागली, तरी आपण ती पुरी करूं अशी त्याला घमेंड तर होतीच. परंतु तसें करण्याची पाळी यावी हें त्याला इष्ट वाटत नव्हतें. तेव्हां तो मोठ्या बुचकळ्यांत पडला, कीं काय करावें ? शेवटीं त्यानें शिवाजीमहाराजांस भेटून त्यांचें व त्यांचें फार वेळ खलबत झालें. या खलबताच्या शेवटीं दोघांचेही चेहरे फार प्रफुल्लित झालेले दिसले. तेव्हां अर्थातच कांहीं तरी समाधानकारक असा प्रकार होणार असें त्या दोघांसही वाटलें असावें. तें खलबत झाल्यानंतर थोड्या वेळांत राजानीं दिलेरखानास असें पत्र पाठविलें कीं आपण एकवार इकडे येऊन जावें. आपल्याला ज्याबद्दल अत्यंत उद्वेग वाटत आहे, त्याबद्दल आम्हांला वाटत नाहीं असें समजूं नका. आपल्या काळजाला

जी भयंकर जखम झाली आहे तींत मलम भरून ती साफ बरी करण्याचें काम आमचे हातून होईल. आपण एकवार इकडे येऊन जावेंच. भेटीअंतीं आपणास समाधान होईल व आह्मासही फार समाधान होईल.

असा निरोप दिलेरखानाकडे गेला. त्याचप्रमाणें महाराजानीं आपल्याही माणसांपैकीं दोन माणसें आपला कांही निरोप घेऊन कोणीकडे तरी पाठविलीं.

दिलेरखानानें तो जयसिंगराजाचा निरोप ऐकला आणि त्याच्या मनाची चलबिचल झाली. आपल्या काळजाची जखम भरण्याबद्दलचें हें त्यांनीं आपणास विनोदानेंच लिहिलें नसेल कशावरून ? असा संशय येऊन तो संतापला. आणि त्या संतापाच्या भरांत त्याचा पहिला विचार कीं आपण साफ येत नाहीं ह्मणून निरोप पाठवावा, तो विचार त्यानें अमलांतही आणला. परंतु जयसिंगानें पुनः त्यास एक निरोप पाठविला. पुनः त्यांच्याकडून एक प्रतिनिरोप गेला. अशी निरोपानिरोपी सुमारें चार दिवस चालली.

इकडे याच चार दिवसांत दुसरी एक कांहीं मंडळी शिवाजीमहाराजांच्या निरोपावरून जयसिंगाच्या छावणींत येऊन पोंचली. या मंडळींत एक पडदपोशींतील स्त्री असावी हें त्या एकंदर व्यवस्थेवरूनच दिसून आलें. या नवीन पाहुण्यांच्यासाठीं जयसिंगराजानीं फारच निराळी आणखी अत्यंत उत्कृष्ट अशी व्यवस्था ठेविली.

नाहीं होय, नाहीं होय, करतां करतां व निरोपानिरोप होतां होतां शेवटीं दिलेरखानानें येण्याचें कबूल करून स्वारी पुरंदराहून निघालीही. जयसिंगराजानीं त्याचें स्वागत फार उत्तम केलें. दुःखी कष्टी चिंता आहे तेव्हां आपल्या मानापमानाच्या हक्कांकडे लक्ष्य न देतां आपणही त्यास सामोरें जावें असें जयसिंगानें सुचविल्यावरून महाराजही त्यास सामोरे गेले. परंतु त्यांच्याशीं तो धड बोलला नाहीं. सर्व मंडळी बसल्यानंतर दिलेरखानास जयसिंगानें विनंति केली, कीं आपल्याला ज्या कार्याकरितां इकडे बोलाविलें आहे त्याचा विचार होण्यापूर्वीं खुद्द आपल्यासाठीं शिवाजीमहाराजांनीं कांहीं नजराणा आणला आहे तो आपण पाहून घ्यावें. नंतर पुढें बोलणें बोलूं.

दिलेरखान तें ऐकून फार फार गोंधळांत पडला. तेव्हां राजे जयसिंग किंचित् हास्यवदन करून ह्मणाले, " आपण तो नजराणा आणला आहे तो पहा. "

राजा जयसिंगाचें तें बोलणें ऐकून दिलेरखान गोंधळल्याप्रमाणें होऊन वेड्यासारखा इकडे तिकडे पाहूं लागला. त्याच्या सभोंवार तर त्यास कोठें कांहीं दिसेना; आणि शिवाजीनें आपणासाठीं नजराणा आणला आहे असें तर जयसिंग राजे एकदां, दोनदां, तीनदां म्हणून हंसत होते व त्यास पलीकडच्या दालनांत जाण्याविषयीं खूण करीत होते. परंतु त्या नुसत्या खुणांचा त्यास अर्थ समजेना ह्मणून ह्मणा किंवा त्यांचें ह्मणणें काय तें आपणांस स्पष्टपणें सांगितल्याखेरीज आपण उठूं नये, कांहीं विनोद तर नसेल, अशी शंका त्याला आली ह्मणून ह्मणा, तो कांहीं

जागचा हलेना. जयसिंगराजानीं पुनः त्याला आग्रह करून सांगितलें, कीं आपल्यासाठीं आणलेला नजराणा शिवाजीराजानीं पलीकडच्या दालनांत ठेविला आहे तो आपण स्वीकारून नंतर पुढें काय बोलावयाचें तें बोलूं.

त्याबरोबर त्यानें उसळल्याप्रमाणें करून ह्मटलें, " जो नजराणा चार चौघांत माझ्यापुढें ठेवतां येणार नाहीं, असा नजराणा तरी काय आहे ? मला त्या तसल्या नजराण्याची जरूरी नाहीं. दिलेरखान असल्या नजराण्यावर भुलून आपल्या कर्तव्याला चुकणारा माणूस नव्हे. मला नजराणा वगैरे कांहीं नको. निदान गुप्त तर मुळींच नको. काय तुमचा नजराणा असेल तो इथें आणा. मीं तह्मालां अनुकूल व्हावें अशी तुमची इच्छा असली तर मी ह्मणतों त्या सगळ्या अटी आपण कबूल करा. नाहींपेक्षां आपण सर्व कांहीं बाबतींत मुखत्यार आहांच. आह्माला केवळ आपल्याला मदत ह्मणून आपल्या हाताखालीं दिलें आहे ! आपण कराल ती पूर्वदिशा आहे. "

जयसिंगराजे पुनः हंसून त्यास ह्मणतातः " ही हंसण्याची गोष्ट नव्हे आणखी वेळ किंवा स्थळही नव्हे. परंतु आपल्याला हंसूं आल्याखेरीज रहात नाहीं. खांसाहेब, आपल्याला शिवाजीराजानीं जो नजराणा आणला आहे तो असा आहे कीं तो चार चौघांत आणण्याजोगा नाहीं. तो येणार नाहीं. आग्रहानें आणला तर आपल्याला त्याबद्दल फार संताप येईल. मात्र तो आपण आंत जाऊन पाहिल्याबरोबर फार गार व्हाल. संतुष्ट व्हाल. आणखी तो आपल्यासाठीं संपादित करण्याला शिवाजीराजानीं किती परिश्रम केले. ते आपण ऐकले तर आपल्याला शिवाजीराजाबद्दल किती तरी आदर वाटेल. इतर कांहीं कारणें नसलीं तरी आमच्या मोहबतीखातर तरी आपण एकवार पडद्याआड जाऊन पहावें. आपल्याला तसें केल्याबद्दल यत्किंचितूसुद्धां वाईट वाटणार नाहीं किंवा राग येणार नाहीं. उलट आपण बाहेर याल ते आनंदांत याल, आणखी मग आपणही शिवाजीराजांस कांहीं नजराणा देऊं तो त्यांना किती आनंददायक होईल तें पहा. "

इतका आग्रह झाला तेव्हां दिलेरखानाच्या मनांत काय आलें तो " ठीक आहे. आपल्या आग्रहास्तव मी जातों; परंतु जर यांत कांहीं विनोदाचा प्रकार असला तर माझ्याइतका वाईट कोणी नाहीं हें आपण खूप लक्ष्यांत ठेवा " असें ह्मणाला. हे शेवटले शब्द विशेषतः शिवाजीमहाराजांकडे पाहून त्यानें उच्चारले होते.

नंतर जयसिंगानें दाखविलेल्या पडद्याआड तो गेला. तों आंत आणखी एक पडदा. त्याच्याबरोबर आणखी एक गृहस्थ होता, तो यानंतर तेथेंच थांबून ह्मणालाः " सरकार, आतां आपण एकट्यानेंच आंत जावें. मला आपल्याबरोबर पुढें येतां येत नाहीं. "

" असें कां बरें ? " अशा अर्थाची दृष्टि करून दिलेरखानानें एकवार त्याच्याकडे पाहिलें. आणि नंतर कांहीं एक न बोलतां त्यास त्यानें जाऊं दिलें. हा एकंदर प्रकार

आहे तरी काय ? असें त्याच्या मनांत येऊन तो क्षणमात्र स्तब्ध झाला. त्याच्या मनांत कांहीं विचार आला. तो विचार येण्याबरोबर त्याची चर्या एकदम प्रफुल्लित झाली. परंतु ती प्रफुल्लता क्षणमात्रच टिकली. पावसाळ्यांत ज्याप्रमाणें मध्यें एखाद्या क्षणाला सूर्याच्या मुखावरील ढग दूर होऊन त्याचें तेज दिसूं लागतें, परंतु एक क्षण गेला नाहीं तों पुनः ढग येऊन तें झांकतें, तशीच त्याची स्थिति झाली. त्याचा हात तर पुढला पडदा दूर सारण्याला पुढें सरेना, शेवटीं त्यानें तो सारला. तों काय ? त्यास आपल्यापुढें काय आहे असें दिसलें. जिच्यावर त्याचें अत्यंत प्रेम, जी त्याचा दुसरा प्राण, जिच्या नाहींसें होण्यामुळें त्याला हृद्रोग लागला होता, ती त्याची नक्षत्रतुल्य कन्या ! तीही त्यास पहातांच " बाबा " म्हणून एकदम त्याच्यापुढें धांवत येऊन तिनें त्यास मिठी मारली. तिच्या डोळ्यांतून अश्रुधारा एकसारख्या वाहूं लागल्या. तिला हुंदके आवरेनात. तें पाहून दिलेरखानासही फारच गहिंवर आला. त्यानें तिला घट्ट पोटाशीं धरलें आणि दोघेंही किती वेळ तरी अगदीं निश्चल अशा संगमरवरी पुतळ्यांप्रमाणें स्तब्ध उभीं राहिलीं.

नंतर दिलेरखानाच्या मनांत काय आलें कोणाला ठाऊक, त्यानें ती मिठी किंचित् शिथिल केली. नूर अलहुदानें आपल्या खांद्यावर मान टाकली होती, ती किंचित् मागें वळवून तिच्या हनुवटीला धरून त्यानें तिचें तें अत्यंत सुंदर परंतु अश्रुमलिन मुख आपल्यापुढें धरिलें. तिच्या त्या मुखाकडे त्यानें आपल्या अंतर्भेदी दृष्टीनें पाहिलें. डोळ्याला डोळा दिल्याप्रमाणें क्षणमात्र दोघांची दृष्टादृष्ट झाली. आणखी तो एकदम तिला म्हणाला :

" ए नूर, गुलाबकळी जशी या लुटारूंनीं नेली तशीच पवित्र अशी परत आली आहे ना ? तिच्या.........."

परंतु त्यास पुढें कांहीं बोलण्यास सुचेना. म्हणून तो आपला विषय बदलूं लागला. त्यानें तिची हनुवटी धरून तिचें मुख निरेखण्यासाठीं आपल्यापुढें धरलें व डोळ्यास डोळा देऊन अंतर्भेदी दृष्टीनें पाहिलें, तेव्हांच त्याच्या या प्रश्नाचें त्यास उत्तर मिळालें. निराळे शब्दांनीं उत्तर नको होतें, आणि तें मिळालेंही नाहीं. मात्र त्यानें तिला पुनः अत्यंत प्रेमानें कवटाळून धरलें. याप्रमाणें प्रेमाचा भर थोडा वेळ राहिला. मग तो ओसरूं लागला तेव्हां दिलेरखान कांहीं नूर अलहुदाला उद्देशून कांहीं आपल्याशींच म्हणतो: " या हरामखोर मराठ्यांनीं तुला पळवून नेलें तेव्हांच मला असें वाटलें कीं तुझ्या नखाला सुद्धां धक्का लावण्याचें ते धाडस करणार नाहींत. आम्हांला भिवडवण्यासाठीं किंवा आपल्या हातांत कांहीं तरी शस्त्र पाहिजे म्हणून विलक्षण संधि साधून त्यांनीं तुला नेली. हेतु हा कीं वेळप्रसंग पडला, तर ओलीस ठेवलेल्या माणसाप्रमाणें तुझा उपयोग करून घ्यावा. तह करा नाहीं तर आम्ही काय करूं याचा नेम नाहीं असा धाक दाखवायचा ! "

" छे. छे. छे. बाबा, मला आपल्या जनान्यांतून नेण्यांत मराठ्यांचा कांहीं सं-

बंध नाहीं. ज्यांनीं मला नेलें त्या च.डाळांचा बेत मध्येंच फसवू वंतोपरी रक्षण मात्र मराठ्यांनीं केलें. ते जर वाटेंत भेटतेना, त्यांना जर माझी दया आली नसती, तर माझे काय हाल झाले असते, आणखी काय नाहीं हें काय मी सांगूं ! मला आपण जशी पुनः पहातां आहां तशीची तशी मी रहाण्याला मराठेच कारण. त्यांनीं मला इथून छावणींतून नेली नाहीं. ते–निदान त्यांचे राजे–दुसऱ्यांच्या स्त्रियांना आपल्या मातेप्रमाणें मानतात, कन्येप्रमाणें मानतात, मला याचा फार उत्तम अनुभव आहे. या कामांत चुकून सुद्धां त्यांची आपण निंदा करूं नका. त्यांनीं जर मला सोडवली नसती, तर माझी अवस्था काय झाली असती याची आपल्याला कल्पना सुद्धां येणार नाहीं. मी आपल्या नजरेस पडलेंच नसतें."

"काय ह्मणतेस पोरी, तुला मराठ्यांनीं सोडवली ? मराठ्यांनीं सोडवली ? मग तुला नेली होती कोणीं ?"

"कोणी तरी आपल्या छावणींतल्याच माणसांनीं. मला औरंगाबादेकडे घेऊन जाणारे सगळे रजपूत होते. मराठे नव्हते. तो काळा मुर्दाड त्यांना फितूर झाला होता. आणखी त्यांनीं मेल्यांनीं माझा सत्यनास करण्याचा कांहीं तरी बेत केला होता. बाबा, मराठ्यांचा त्यांत कांहींसुद्धां संबंध नाहीं."

तिचें तें बोलणें ऐकून दिलेरखान फार चकित झाला. त्याला पुढें काय बोलावें कांहीं सुचेना. इतका वेळ त्यानें आपल्या मनांत जी काय कल्पना करून ठेवली होती ती सर्व आतां अगदीं चुकली असें त्यास स्पष्ट दिसलें आणि आपण बिचाऱ्या मराठ्यांच्या संबंधानें विनाकारण तर्क कुतर्क करीत राहिलों असेंही त्याच्या मनांत आलें. परंतु आपल्या मनांत येतें आहे हेंच बरोबर अशी त्याला कल्पनासुद्धां मोठी चमत्कारिक वाटली. मराठ्यांनीं आपल्या पोरीला नेली नाहीं. कोणी तरी रजपूत तिला घेऊन जाऊन औरंगाबादेस पोंचवीत होते ही कल्पनाच त्याला मोठी चमत्कारिक व अगदीं अविश्वास्य वाटली. आपली पोरगी कांहीं तरी फसली ही त्याची समजूत झाली. तेव्हां त्या आश्चर्यमग्न स्थितींतच तो तिला ह्मणतोः

"काय म्हणतेस पोरी, तुला मराठ्यांनीं नेली नाहीं ? तुला पोंचवायला तुझ्याबरोबर रजपूत होते ! मला या तुझ्या बोलण्याचा मोठा चमत्कार वाटतो आहे; पण तूंच म्हणतेस तेव्हां आतां विश्वास ठेवण्याशिवाय दुसरा मार्गच नाहीं. पण मला सांग, तुला औरंगाबादेला नेऊन पोंचविणार होते ते रजपूत कोण होते हें तरी तुला समजलें का ? तुला त्यांतला एखादा दुसरा तरी ओळखूं येईल का ? तसा ओळखूं आला तर आंत काय इंगित आहे तें समजून येईल आणखी कोणा पाजी हरामखोरांनीं माझ्या काळजाचा वाभाडा काढण्याचें धाष्टर्य केलें तें तरी कळेल. काय ह्मणतेस, आपल्या छावणींतले रजपूत होते ! आपल्या लोकांपैकीं होते कीं जयसिंगराजाच्या ? बोल पोरी, इतका वेळ माझी समजूत अशी होती कीं मराठ्यांनींच तुला पळवून नेण्याचें धाडस केलें."

"नाहीं. बाबा नाहीं. मराठे—दोनच मराठे—शिपाई रस्त्यांत भेटले. त्यांचें आणखी या रजपुतांचें कांहीं बोलणें झालें आणि त्यांनीं आमच्याबरोबर औरंगाबादेच्या जवळ जवळपर्यंत येऊन एकदम पुष्कळशा मराठ्या शिपायांनीं आमच्यावर अचानक घाला घातला. मला घेऊन जाणाऱ्या रजपुतांची दाणादाण उडवून दिली. एक सुद्धां जागेवर राहिला नाहीं. मग या मराठ्यांच्या मुख्याकडून मजजवळ एक कुलीन घराण्यांतील मराठे बाई येऊन ह्मणालीः " बाई, तुमच्यावर मोठा प्रसंग गुदरत होता. परंतु वेळींच आह्मी जवळ होतों ह्मणून सर्व यथास्थित झालें. हे तुमचेच लोक आणखी तुमच्यावर उलटून पडले याला काय ह्मणायचें ? आपण आतां यत्किंचित्सुद्धां घाबरूं नका. आपल्या केंसाला किंवा कशाला धक्का लागणार नाहीं. आपण आपल्या वडिलांपाशीं आपल्या गोषांत आहांत असें आपल्याला वाटूं द्या. "

इतकें बोलून बाबा मला त्यांनीं बोरगांव नांवाच्या एका गांवांत एका मोठ्या थोरल्या वाड्यांत नेली. तेथें माझी बरदास्त त्यांनीं एखाद्या शहाजादीप्रमाणें ठेवली. अपमानाचा किंवा तिरस्काराचा एक शब्द सुद्धां कोणी कधीं उच्चारला नाहीं. योग्य वेळ प्रसंग पाहून आपल्याला खानसाहेबांकडे पावत्या करूं असा रोज निरोप येई. आपण मराठ्यांना या बाबतींत बिलकुल दोष देऊं नका. "

दिलेरखान तें तिचें बोलणें आश्चर्यचकित होऊन ऐकत होता. आपल्या मुलाला आपल्या रजपुतांपैकीं कोणी तरी नेत असतां मराठ्यांनीं मध्यंतरीं त्यांना अडवून धरून सोडवून तिच्या केंसाला किंवा अब्रूला धक्का न लावतां आज माझ्या स्वाधीन करावयाला आणली याचा अर्थ काय ? शहाजाद्याला फितूर होऊन कोणी तरी हा उपद्व्याप केला असला पाहिजे. पण आपल्या छावणींत असा फितुरी कोण असावा ? रजपूत शिपाई एकंदर किती होते असें तिला विचारतां पन्नास होते असें तिनें सांगितलें. तेव्हां त्याचें आश्चर्य दुणावलें. कोणी तरी हजार पांचशें स्वारांचा धनीच या फंदांत असावा हें आतां अगदीं उघड होतें. त्यानें आपल्या पतकांतून पन्नास विश्वासू लोक निवडून हा कारभार केला असावा हेंही उघड होतें; परंतु त्याचा कांहीं तर्क चालेना. आपल्या लोकांपैकीं कोणी नसून जयसिंगराजाच्या पतकांतून तर कोणी हा कारभार केला नसेलना ? खुद्द जयसिंगानें तर हा प्रकार केला नसेलना ? एक वेळां किरातसिंगाशीं बोलतांना हा संशय त्याच्या मनांत आला होता. ज्यांनीं बादशहाची मर्जी मिळविण्याकरितां आपली कुळी बाटविली, त्यांना शहाजाद्याची मर्जी संपादन करण्याकरितां दुसऱ्याची मुलगी पळवून नेऊन—विश्वासघातानें पळवून नेऊन—आपला डाव साधण्याला काय शरम किंवा दिक्कत वाटणार आहे ? पुढें शिवाजीनें मध्यें अशा प्रकारें अडविल्यावर आपण नामानिराळे असल्याचा बहाणा करण्याला काय हरकत आहे ? जयसिंगराजांचीच ही सर्व करामत आहे असें त्याच्या मनानें पक्कें घेतलें. शिवाजीच्या माण-

सांबद्दल मात्र आतां त्याला शंका राहिली नाहीं. उलट त्याच्या मनानें असें घेतलें, कीं शिवाजीच्या मनांत जर तसला कांहीं कुविचार असता तर त्याला तिला भ्रष्ट करण्यास किंवा शहाजाद्याकडे तिला पोंचवून त्याची कुमक मागण्यास काय अडचण होती ? शहाजादा त्याला आंतून फितूर आहे असा जिकडे तिकडे लोकांचा व खुद्द बादशहाचाही समज होता. तेव्हां त्या शहाजाद्यास आणखी खुष करण्यास–फार खुष करण्यास–अनायासानें मिळालेली संधि तो काय ह्मणून घालवील ? पण त्याच्या मनांत कोणताच कुविचार नाहीं यामुळें त्यानें तिला इतके दिवस संभाळून आतां तह्याच्या वेळीं आपली आपल्याकडे परत केली.

बापाच्या मनांत काय विचार चालले आहेत हें जणूं काय ओळखूनच नूर–एल्–हुदा त्यास ह्मणाली: " बाबा, हे मराठे तुमच्या लढाईच्या कामांत काय लबाड्या किंवा दुष्टपणा करीत असतील ते असोत; पण आमच्यासारख्या बायकांच्या बाबतींत यत्किंचित् लबाड किंवा दुष्ट नाहींत. ते फार सालस. मला इतके दिवस आपल्या छावणीपासून इतक्या दूर ठेवली; पण पुरुषाचं वारं सुद्धां कुठें लागलं नाहीं. मला जिथें ठेवलं होतं तो मोठा थोरला वाडा होता; पण माझ्या कानीं पुरुषाचा शब्द सुद्धां आला नाहीं. माझ्या शुश्रूषेला ज्या बायका होत्या त्या नेहमीं मला म्हणत, ' तुम्ही कसलीसुद्धां दिक्कत बाळगूं नका. तुम्ही आपल्या वडिलांजवळ होतां तेव्हां जशा निर्धास्त होतां तशा निर्धास्त रहा. आमच्या महाराजांना परस्त्री म्हणजे आपल्या आईबहिणीप्रमाणं. ते तर कधीं या वाड्यांत पाऊलसुद्धां घालायचे नाहींत, पण दुसऱ्या कोणीं जर डुंकून पाहिलं असं त्यांना कळलं तर ते त्याला उभा छाटून टाकतील अशी ज्याला त्याला भीति वाटते, यामुळें कोणी म्हणतां कोणीसुद्धां इकडे फिरकण्याचं भय नाहीं.' प्रथम एक दोन दिवस मला भय वाटलं; पण तिसऱ्या दिवसापासून अगदीं एखाद्या लहान मुलाला जशी गाढ झोंप येते तशी मला येऊं लागली. रोज मला शिवाजीराजांकडून निरोप येत, कीं आपण यत्किंचित् सुद्धां काळजी करूं नये. योग्य वेळीं आपणांस खानसाहेबांकडे रवाना करून दिलं जाईल. त्यांची मुलगी ती माझी मुलगी. "

नूर–एल्–हुदा याप्रमाणें बोलूं लागली तेव्हां खानाच्या मनांत विचार चाललें होते ते असे. शिवाजीबद्दल आपण केवढा दुर्ग्रह घेऊन बसलों होतों. जें त्यानें केलें नाहीं तें त्यानें केलें म्हणून त्याच्यावर लादून त्याच्याबद्दल अन्यायानें त्याला प्रायश्चित्त भोगण्याला लावावयाचें म्हणून बेत करून येथें आलों; परंतु तो मोठा धूर्त मुत्सद्दी खरा. त्यानें इतके दिवस आपल्या मुलीला संभाळून ठेवून आज आपल्यापुढें आणून उभी केली; पण तिला पळवून नेणारे रजपूत शिपाई कोण ? आणि ते कोणाच्या सांगीवरून हें भयंकर धाडसाचें कृत्य करण्याला उद्युक्त झाले ? या प्रश्नांचें

उत्तर त्यास बिलकुल सुचेना. राजा जयसिंगाचेंच हें काम असें त्याच्या क्षणभर मनांत येई. पुनः दुसऱ्या क्षणीं असें वाटे, कीं असलें विलक्षण कृत्य तो कधीं करणार नाहीं. हें कृत्य कोणा तरी उलाढाल्या माणसाचें असलें पाहिजे. तो उलाढाल्या कोण असावा याबद्दल त्याचा तर्क चालेना.

शेवटीं आतां आपण बाहेरच्या मंडळीस किती वेळ तिष्ठत बसवणार? असें मनांत येऊन तो आपल्या मुलीचा निरोप घेऊन बाहेर आला. त्याची दृष्टि शिवाजीमहाराजांकडे गेली. आतांपर्यंत जे त्यास आपले कट्टे शत्रू वाटत होते, ज्यांस अणुरेणु मात्र सवलत देऊं नये, सांपडला आहे तो पुरा चेंचून टाकावा असें त्याला वाटत होतें, तोच आतां महाराजांकडे मोठ्या कौतुकानें पाहूं लागला. 'या माणसानें आपल्या पोरीची अब्रु वांचविली अं! आणखी इतका आपल्यावर उपकार करणाऱ्याला आपण वेडेंवांकडें शासन करूं पहात होतों! कांहीं हरकत नाहीं. आतां पुढें त्याची भरपाई करूं.' असा मनांत पक्का विचार करून तो महाराजांकडे पाहून ह्मणतो, "शिवाजीराजे, मी आपला फार उतराई आहें. आपण मला असा नजराणा दिला आहे, कीं तो स्वीकारण्याखेरीज मला दुसरा मार्गच नाहीं. मी तो पत्करतों. तुमच्या या कृत्याबद्दल उतराई होण्याला उपाय एकच. आपल्याला जयसिंगराजानीं ज्या अटीवर तह करण्याचें कबूल केलें आहे, त्या अटी कबूल करून आपण तह करण्याचें बेलाशक कबूल करा. माझी त्याला पूर्ण संमति आहे. एखादी अट आपल्याला अडचणीची वाटत असली तर तसें सांगा. ती अट काढून टाकण्याचीसुद्धां तजवीज करूं. तहापासून तुमचें कांहीं वाईट होणार नाहीं. आह्मांला यश आलें. तुमचें कांहीं फार नुकसान होणार नाहीं, अशा जशा वाटतील तशा अटी घालून या प्रकरणाचा निकाल लावूं. आपण मला आपल्या उपकाराखालीं नुसतें दडपून टाकलें आहे; परंतु त्याचा मी आतां उच्चार करीत नाहीं. वेळ प्रसंग आला तर पुढें पहातां येईल. माझी आतां कोणत्याही प्रकारची हरकत नाहीं. पुढें काय बोलणीं व्हायचीं तीं चालू द्या."

दिलेरखानाचें बोलणें इतकें एकदम बदललेलें पाहून सर्व मंडळी अगदीं चकित झाली. ज्या शिवाजीमहाराजांबद्दल बोलतांना तो नुसता साधारण आदरसुद्धां दाखवीत नसे, त्याच शिवाजीमहाराजांबद्दल तो आतां फार आदरानें बोलून त्यांच्या इच्छेप्रमाणें गोष्टी व्हाव्या अशी आतुरता दाखवूं लागला. जयसिंगराजांस तें पाहून फारच समाधान झालें. त्यांना जी गोष्ट घडावी अशा इच्छा होती ती गोष्ट घडली इतकेंच नव्हे तर ती जशी घडावी असें त्यांस वाटत होतें तशी ती घडली हें पाहिल्याबरोबर समाधान झालें तर त्यांत नवल काय? त्या समाधानांतच ते दिलेरखानास व महाराजांस ह्मणाले: "आपली सगळ्यांची समजूत पडून सारें यथास्थित झालें हें पाहून मला फार आनंद होतो आहे. शिवाजीराजे, आपणच विचार करा आपली ताकद काय, अलमगीर बादशहाची ताकद काय? आपण

त्याच्याशीं झगडण्यांत अखेरपर्यंत यश मिळवाल हें संभवनीय नाहीं. तेव्हां आमचा विचार मान्य करून शेवटीं सर्व गोष्टी कबूल केल्यात हें फार चांगलें झालें. आतां आपल्याला बादशहा आमच्याप्रमाणें लेखील. मात्र एक गोष्ट आतां राहिली आहे ती ही कीं आम्हीं आपल्याला कांहीं नजराणा द्यावयाचा. तो नजराणा आह्मी आपल्याला आतां देतों. आपण स्वीकार करावा. आपला नजराणा पाहून जसा खानसाहेबांस आनंद झाला तसाच आपल्याला आम्ही नजराणा देतों तो पाहून आनंद होईल. याबद्दल आह्मांला अगदींसुद्धां शंका नाहीं. हा पहा आमचा नजराणा !

असें म्हणून त्यांनीं एका माणसास एक सांकेतिक खूण केली. त्या खुणेसरसा तो इसम त्या दिवाणखान्याच्या बाहेर गेला. आणि त्यानें दुसऱ्या दोघां इसमांस दोन हातांनीं धरून आंत आणलें, व शिवाजीमहाराजांच्या पुढें उभें केलें. ते दोघेही अगदीं खालीं मान घालून उभे राहिले. महाराजांनीं त्यांच्याकडे पाहिलें. तों तो एक कोंगाडी आणि दुसरा जोशी !

एकूण आपलीं माणसें यांनीं अडकवून ठेवलीं ह्मणतात तीं खरीं, असें महाराजांच्या मनांत एकदम आलें.

हे कोंगाडी व जोशी कोण होते ते वाचकांच्या ध्यानांत आलेंच असेल !

महाराजांना केवढे तरी नजराणे जयसिंगानें दिले. याप्रमाणें नजरनजराणे परस्पराचे झाल्यानंतर पुढें तहाबद्दल बोलणीं पुनः सुरू झालीं.

महाराजांनीं त्यांच्या सर्व अटी कबूल केल्या. कबूल करण्याखेरीज दुसरा कांहीं त्यांस मार्गच नव्हता, हें अनेक प्रकारांनीं वाचकांस कळलेलेंच आहे; तेव्हां त्याबद्दल जास्त कांहीं सांगावयास नकोच.

जे जे किल्ले व प्रांत तहांतील कलमाप्रमाणें ठरले ते त्यांनीं त्यांच्या ताब्यांत दिले व बादशहाची अमलाखालीं मनसबदारी पतकरण्याचेंही त्यांनीं कबूल केलें. मात्र ती मनसबदारी पांच हजारांची आणि आपला मुलगा संभाजी याचें नांवें पतकरिली. आपल्या नांवास बादशहाच्या नोकरीचा कलंक लागूं द्यावयाचा नाहीं हा त्यांचा निश्चय कायम.

# प्रकरण ३४ वें.

## तह झाल्यानंतर.

आपल्या दक्षिणेंत येण्याचें पूर्णपणें सार्थक झालें असें जयसिंगराजास वाटण्याजोगी व्यवस्था झाल्यावर त्याला दीडबोट स्वर्ग उरून तो आनंदानें विमूढ झाला तर त्यांत आश्चर्य कांहींच नव्हतें हें उघड आहे. जी गोष्ट केवळ अशक्य, आजपर्यंत कैकांनीं करण्याचा प्रयत्न करूनही साधली नाहीं, ती आपण दक्षिणेंत

येऊन पोंचल्यास चार महिने झाले नाहींत तोंच सिद्ध केली हें आतां बादशहास कळलें ह्मणजे आपली त्याचेजवळ व दरबारांत बडेजाव चांगलीच वाढेल हें त्यास पक्कें दिसून आलें. त्या आनंदाच्या भरांत शिवाजीमहाराजांस त्यानें ह्मटलें, "आपल्याला विनाकारण दुर्ग्रहानें पछाडलें नाहीं. रिकामा दुराग्रह धरून आपण प्राणहानि आणि देशघात करून घेतला नाहीं हा आपण मोठा मुत्सद्दीपणा दाखविलांत. आतां आपण अगदीं निर्धास्त असा. झालेला सर्व प्रकार आत्तांच्या आतां जासुदाकरवीं बादशहाकडे थैली पाठवून कळवितों. बादशहाची मंजुरी मिळण्यास मुळींसुद्धां अडचण नाहीं. त्यांनीं आह्मांस या कामीं कुलमुखत्यारी दिली आहे. केवळ रुकार आणवायचा केलेली कामगिरी कानावर घालून. 'काय खानसाहेब, असेंच कीं नाहीं !' खानसाहेबांनीं आज हा एकंदर प्रसंग या रंगावर आणला ह्मणून सगळें ठीक झालें."

खान बिचारा आपल्या विचारांत दंग होता. आपल्या छावणींतून आपल्या पोरीला मोठ्या शिताफीनें पळवून नेऊन शहाजाद्याकडे पोंचवूं इच्छिणारा असा कोण ! जे पन्नास रजपूत त्याच्या सांगीवरून या धाडसाच्या कृत्यास पुढें झाले, त्यांच्यापैकीं एक जरी आतां आपल्याला भेटता, तरी त्याला वाटेल त्या प्रकारानें खरी गोष्ट काय आहे ती ओकावयाला लावला असता. परंतु त्याचा पत्ता कसा लागणार ? तो अबदल्या हरामखोर नाहींसा झाला आहे त्याचाही पत्ता नाहीं. तो जरी कोठें दिसला तरी त्याला जेरबंदांनीं चोपून मोकळा करून त्याच्याकडून सर्व प्रकार उघडकीस आणला असता. परंतु आतां आपण येथून निघून गडावर गेलों ह्मणजे पुढल्या शोधास लागण्यास ठीक होईल. कोणातरी वस्ताद माणसास हातीं धरल्याखेरीज या गोष्टीचा पक्का छडा लागावयाचा नाहीं. तो छडा लावण्यास कोणाला हातीं धरावा ? या विचारांत स्वारी निमग्न होती. यामुळें जयसिंगराजे काय बोलले तिकडे त्यांचें लक्ष्यच गेलें नाहीं; तथापि तसें कसें दिसू द्यावें ? या हेतूनें ते एकदम जयसिंगराजांकडे वळून ह्मणाले: "आपण जें कराल त्यांत मी आहें याबद्दल आतां आपण तिळभरसुद्धां शंका घेऊं नका. माझ्या जिवाचा कलिजा ज्यानें मला आणून दिला त्याच्याशीं वैर धरणें माझें ब्रीदच नाहीं. आपण बादशहाला सविस्तर हकीकत कळवावी. मीही कळवितों. असा पराक्रमी पुरुष आपल्याला मिळाला याजबद्दल बादशहास आनंदच होणार आहे. त्यानें दक्षिणची सुभेदारीच द्यावी. विजापूरची बंडाळी मोडून टाकून तें राज्य बादशाही अमलांत नेऊन सोडण्याच्या कामीं जर शिवाजीराजानीं मदत केली आणखी त्यांत यश मिळविलें तर फारच बहार होऊन जाणार आहे. बादशहांस त्यापासून फार आनंद होईल. कारण आपली बंडाळी मोडण्याकरितां ह्मणून आह्मांला पाठवलें खरें; परंतु त्यांतल्या त्यांत विशेष हेतु विजापुरकरांना वठणीला आणायचें हाच खरा. ता साधून देण्यांत जर आपण शिवाजीराजे मदत कराल तर आपली बादशहापाशीं फार चहा होईल. त्याचा

फारा वर्षांचा हेतु सिद्ध करून दाखविल्यासारखा होईल आणखी मग तो आपल्याला इतका मान देईल कीं कांहीं सांगतां येत नाहीं. ''

तें ऐकतांच शिवाजीमहाराजांच्या कपाळास आंठ्या चढल्या. त्यांचे डोळे किंचित् आकुंचले. कांहीं तरी बोलावें असा मनांत विचार येऊन एखाद्याचे ओंठ होतात तसे त्यांचे झालेले दिसले. परंतु तितक्यांत त्यांनीं आपल्या मनास आंवरून धरलें. ते कांहीं बोलले नाहींत. त्यांच्या चर्येवरून मात्र त्यांस दिलेरखानाची ती सूचना अगदीं नापसंत वाटली असें दिसलें. यावर कांहीं तरी बोलण्यापेक्षां आतां विषय बदलावा असें मनांत आणून ते ह्मणाले:

"आतां जर मला अनुज्ञा मिळेल, तर मी जातों. तहांत ठरल्याप्रमाणें सर्व किल्ल्यांवरील ठाणेदारांस आज्ञापत्रें लिहून पाठवितों. आतां त्यांत किल्बिष कांहीं राहिलें नाहीं. मला आपण जो प्रांत राहूं दिला आहे त्यांत मी स्वस्थ असतों. आपल्याला बिलकुल शंका नको. कांहीं जास्त कमती असलें तर पंत आहेतच. यांस येथें राहूं द्यावें. त्यांना कळविलें कीं ते त्वरित मला निवेदन करतील. मुलाखतीची जरूरी वाटल्यास मी लांब आहें असें नाहींच. ''

इतकें बोलणें झाल्यावर शिवाजीमहाराज उठून जाऊं लागले. जें काय झालें हें फार नामुष्कीचें काम झालें असें त्यांच्या मनास वाटत होतें हें उघडच दिसत होतें. अशा प्रकारची त्यांची मनःस्थिति असतां त्यांस उगीच आग्रह करून ठेवणें हें बरें नव्हे असा जयसिंगराजानीं विचार केला आणि त्यांस जाण्याविषयीं अनुज्ञा दिली. थोड्याच वेळांत ते तेथून आपल्या लव्याजम्यानिशीं व राजे यांनीं जे दोन इसम नजराणा ह्मणून दिले होते त्या इसमांनिशीं तेथून निघून गेले. ते दोघेही बिचारे अगदीं लाचार होऊन गेले होते, नुसते माना खालीं घालून व खालीं दृष्टि देऊन उभे होते.

महाराज तेथून निघून गेल्यानंतर थोड्याच वेळांत दिलेरखानही तेथून उठून पुरंदरावर गेला व आपल्या मुलीवर हा दुर्धर प्रसंग आणणाऱ्या मनुष्याचा बारकाईनें तपास करण्याचा उपक्रम त्यानें सुरू केला. या उपक्रमांत आपल्यास सिद्धि येण्याला किरातसिंगासारखा उलाढाल्या बातमीकाढ्या माणूस पाहिजे असें त्याच्या मनानें घेतलें आणि त्यानें लागलीच त्यास बोलावून आणून त्याच्याशीं खलबत सुरू केलें. परंतु त्याबद्दल पुढें पाहूं.

वर सांगितलेंच आहे कीं राजा जयसिंग यांस परमावधीचा आनंद झाला. त्यांनीं एकंदर हकीकतीचा लंबाचवडा विस्तार करून बादशहास पत्र लिहिलें व त्यांत दोन गोष्टींविषयीं त्यास आग्रहपूर्वक विनंति केली. एक संभाजीला पांच हजारांच्या मनसबदारीचीं वस्त्रें देवविण्याचें आपण वचन दिलें आहे तें पाळण्याबद्दल व दुसरें आपण ज्या प्रकारें तह घडवून आणला आहे त्यास आपली सर्व प्रकारें अनुमति देऊन आपला गौरव करण्याबद्दल. औरंगजेबाचा आपल्यावर

अतोनात विश्वास, आपण जें करूं त्याला त्याची मान्यता यावयाचीच असा आविर्भाव तो वर्तनानें व भाषणानें इतरांस दाखवी खरा, परंतु स्वतःच्या अंतर्यामीं त्यास बादशहाच्या आयत्या वेळीं काय डोक्यांत येईल आणि तो काय करील याचा नेम नाहीं असेंच वाटत असे. औरंगजेब बादशहा अत्यंत अविश्वासू. तो भरंवसा इतका दाखवील कीं जणूं काय आपण करूं ती पूर्वदिशा असेंच इतरांस वाटावें. परंतु आंतून एखादें दुट्टें असें ठोकून देईल कीं त्या भरंवशाचें सगळें उट्टें बाहेर निघेल. हा त्याचा स्वभाव राजांस फार चांगला ठाऊक होता. यामुळें त्यांनीं वर सांगितल्याप्रमाणें औरंगजेब बादशहास पत्र लिहून त्यांत आपण केलें तें सर्व मान्य करावें अशी फार फार आग्रहनिग्रहाची विनंति केली. तहाकरितां शिवाजीला बोलावून आणला असतां तो आला तेव्हां त्यास कैद करण्याचें टाकून किंवा अफझुलखान, शाहिस्तेखान यांच्याशीं त्यानें केलेल्या कपटवर्तनाबद्दल चांगलें देहांत प्रायश्चित्त देण्याचें टाकून त्याच्याशीं तह केला व त्याच्या मुलास मोठी थोरली मनसबदारी देण्याबद्दल आपण विनंति करतों याबद्दल त्या दुष्ट बादशहाचे मनांत कांहींतरी शंका येईल असें जयसिंगास पक्कें वाटलें आणि ह्मणून त्यानें पत्रांत त्यासंबंधानें खालीं दिल्याप्रमाणें मजकूर लिहिला होता.

" खाविंद मला असें विचारतील कीं, " शिवा जर इतका वंगला होता, तर त्याच्याकडे कांहीं किल्ले तरी कां ठेवले ? त्याला पकडून कैदेंत कां ठेवलें नाहीं ! त्याच्या मुलाला एवढी थोरली मनसबदारी कां ह्मणून देण्याचें कबूल केलें ! " या सर्व प्रश्नांना माझें उत्तर इतकेंच आहे, कीं हें माझें करणें फार मोठ्या धोरणानेंच ठरविलें आहे. मी येथें आल्यावर काय काय करण्याचें योजिलें तें आपल्याला कळवून आपली अनुमति आल्यानंतर काय तें करावयाचें असें ह्मणत बसलों असतों तर विनाकारण उशीर झाला असता आणि त्या दिरंगाईत काय काय रंग प्रसंग घडून आले असते याचा बिलकुल नेम नव्हता. एक तर शिवानें आपण परत जातों ह्मणून नेट लावला. काय जें ठरवावयाचें तें ठरवून मगच त्यास परत जाऊं देणें इष्ट होतें. दुसरें असें, कीं तो आयता तहासाठीं मजकडे आला असतां मीं विश्वासघातानें त्यास कैद केलें असतें तर अशक्य नव्हतें; परंतु उपयोग काय होता ? त्याचे लोक जास्त चिडून जाऊन त्यांनीं आह्मांस त्राहि त्राहि करून सोडलें असतें. त्यानें आपल्या एकूण एक किल्ल्यावर फार जय्यत तयारी करून ठेवली होती. दाण्यागोट्याचा पुरवठा उत्तम ठेवला होता. किल्ले मोठे बिकट. ते एकदम घेणें तर कोणासही अत्यंत दुर्घट. एक एक दोन दोन घेणेंच शक्य, परंतु दर किल्ल्याला वर्ष वर्षसुद्धां वेढा देऊन निभलें असतें कीं नाहीं शंकाच आहे. त्यानें तहास कबुली दिली याचें कारण एक तर आमच्यापुढें त्याचें कांहीं अखेरपर्यंत टिकावयाचें नाहीं याबद्दल त्याच्या मनाची खात्री, परंतु एवढ्या खात्री-

वरच त्यानें तहाला कबुली दिली असें नाहीं. शेवटीं कांहीं होणें नाहीं, मग विनाकारण प्राणहानि आणि धनधान्य नाश तरी काय ह्मणून घडूं द्यावा या सद्बुद्धीनें त्यानें मजकडे येऊन तह करण्याची कबुली दिली. हें सर्व जाणून विश्वास देऊन मीं आपल्याकडे त्याला बोलाविलें, व जर माझ्या सर्व अटी कबूल करशील तर तुझें ह्मणणें मीं ऐकेन असें त्याला वचन दिलें. तें मी मोडलें असतें तर तो अगदीं माझ्या तावडींतच होता. पण काय उपयोग ? येथील पाळेगार लोकांचा व सरदार लोकांचा आपल्यावरला विश्वास पार उडून ते विजापूरकरांस जाऊन मिळते. शिवा कांहीं लहानसान मुत्सद्दी नाहीं. त्यानें विजापूरकरांशीं मिलाफ करण्याचें आधींच संधान बांधून ठेविलें आहे. आपण त्यास फार चेपूं लागलों कीं त्याची मंडळी विजापूरकरांकडे गेलीच. जर मराठे आणि विजापूरकर दोघेही मिळाले व दर किल्ला घेण्यास चार चार सहा सहा महिने लागूं लागले तर काय होणार ! चार वर्षें राहूनही शेवटीं ज्या कामाकरितां आपली आज्ञा घेऊन आह्मी येथें आलों तें काम भागावयाचें नाहीं. हा सर्व विचार पूर्णपणें करून मीं त्याच्याशीं तह करण्याचें कबूल केलें व तो तहासाठीं माझ्या छावणींत आला असतां त्याच्याशीं विश्वासघात केला नाहीं. दुसरी गोष्ट अशी, कीं आपल्याला विजापूरचें तळपट उडवावयाचें आहे. दोन शत्रू जागृत ठेवून दोघांशीं लढत बसणें हें कांहीं मुत्सद्दीपणाचें काम होणार नाहीं. एकाचें साहाय्य घेऊन एकास मारावें मग उरलेल्याकडे वळावें ही तर राजनीति. आजपर्यंत कधीं विजापुराला मिळून कधीं विजापुराशीं तुटून शिवानें आपला उदय करून घेतला. परंतु दोघांनाही एका शत्रूबरोबर लढण्याची पाळी आली ह्मणजे त्यांचें एकचित्त होण्यास काय वेळ लागणार आहे ! ह्मणून शिवाला आपला अंकित करून घेऊन मग विजापूरकर मारावे असा माझा बेत आहे. या बाबतींत खाविंदांची इच्छा मला कळली,तर पुढें काय व्यवस्था करावयाची तें ठरवून ठेवीन.

शिवाच्या मुलास मनसबदारी देण्याचें वचन दिलें यांतही मीं कांहीं मोठेंसें केलें नाहीं. दक्षिणेंत पाठविलेल्या सुभेदारांनीं आपल्या अंकितांस अशा मनसबदाऱ्या कित्येक वेळां देवविल्या आहेत ! अशी मनसबदारी त्याच्याकडून घेवविल्याविना तो आपला पक्का अंकित तरी कसा बनणार ! त्यानें स्वतःसाठीं मनसबदारी पतकरिली नाहीं ह्मणून त्याचे मुलाचे नांवें ती देण्यास कांहींच हरकत नाहीं. आपल्याला शिवाचें पारिपत्य करावयाचेंच असलें तर औरंगाबादेकडे त्यास मनसबदारीची जहागीर द्यावी ह्मणजे ती वाटेल तेव्हां आपणांस त्याचेपासून काढून घेतां येईल. आणि त्याच्या साहाय्यानें विजापूरकरांचें पारिपत्य झाल्यावर याचाही समाचार तेव्हांच घेतां येईल. जे बारा किल्ले व जो प्रांत त्याच्याकडे राहूं दिला आहे तो असा आहे कीं त्यांचा त्यास बंडखोरपणा करण्यास कांहींच उपयोग होणार नाहीं. कारण त्या सर्व किल्ल्यांप्रांतांच्या सभोंवारचे किल्लेप्रांत आपल्या ताब्यांत असून त्यांजवर कडेकोट बंदोबस्त ठेवूं, असा कीं ह्मणूं तेव्हां शिवास चिरडूं.

आपला यासंबंधाचा जो फर्मान शिवास जाईल, त्यांत आपण स्पष्ट असें ह्मटलें पाहिजे कीं या वृद्ध दासानें जीं जीं अभिवचनें दिलीं आहेत, तीं तीं पूर्णपणें आपणांस मान्य आहेत. त्याचप्रमाणें तहाच्या अटींप्रमाणें सर्व किल्ले व प्रांत बादशहाच्या प्रतिनिधीच्या स्वाधीन केले असें राजा जयसिंगकडून लिहून आलें ह्मणजे पुढें जें काय करावयाचें तें केलें जाईल असें आश्वासनही त्या पत्रांत असावें.

अशा अर्थाच्या मजकुराचें परंतु फार सविस्तर असें पत्र राजा जयसिंगानें आपल्या यजमानास पाठविलें, आणि त्या पत्राचें उत्तर काय येतें, तिकडे सारखें लक्ष्य लावून बसला.

इकडे शिवाजीमहाराज वर सांगितल्याप्रमाणें सर्व तहाचें वगैरे बोलणें झाल्यानंतर खिन्न मन होऊन परत राजगडीं आले. त्यांस राजा जयसिंग यानें जे दोन गृहस्थ नजराणा ह्मणून दिले होते ते त्यांच्या बरोबरच होते. त्यांस इतकें लाजल्यासारखें झालें होतें, कीं महाराजांस आपण आतां तोंड तरी कोणत्या रीतीनें दाखवावें हें मुळींच कळेना. ते दोघेही असे चंग बांधून गेले होते कीं शत्रूच्या गोटांत शिरून आपण त्यांचीं सर्व गुपितें बाहेर काढूं तेव्हांच परत येऊं. परंतु दोघांनीं केलेल्या सर्व युक्त्या व क्लृप्त्या पार फसून ते स्वतःच जाळ्यांत सांपडून प्राणास मुकण्याची पाळी आली. ज्याच्या तावडींत ते सांपडले तो जयसिंगच होता म्हणून त्यांच्या प्राणावर गदा आली नाहीं. उलट त्यानें त्यांस नजरकैदेंत ठेवून त्यांची बडदास्त उत्तम ठेविली यामुळें त्या कैदेंत असतांना त्यांस मेल्यापेक्षांही मेल्याप्रमाणें झालें. आणि महाराजांनीं तह करण्याचें कबूल केल्यानंतर आपल्यास त्यांना नजराणा ह्मणून देण्यांत येईल असें जेव्हां त्यांना कळलें तेव्हां तर त्यांस फार वाईट वाटलें. असा प्रसंग आपल्यावर आला नसता, तर फार चांगलें झालें असतें, किंबहुना आपल्यास हेर ह्मणून पकडल्यानंतर जिवें मारलें असतें तरी बरें झालें असतें असें त्यांच्या मनांत आलें.

महाराज त्यांच्याशीं कांहीं बोलले नाहींत, यामुळें त्यांस जास्तच वाईट वाटलें. आपल्यावर महाराजांची फारच इतराजी झाली असावी, आणि म्हणून ते आपल्याशीं बोलत नाहींत अशी त्यांची समजूत झाली. परंतु वस्तुस्थिति तशी नव्हती. महाराज स्वतः अत्यंत खिन्न होते. झाला हा सगळा प्रकार त्यांस अत्यंत वाईट वाटला यामुळें त्यांस कोणाशींच कांहीं बोलूं नये असें वाटत होतें. एखादें आपलें फार प्रीतींतलें बालक मृत झालें असतां जसें त्या मुलाचें लालन पालन करून [illegible]ष्ट करून त्यास वाढविणाऱ्या बापास वाईट वाटावें तसें त्यांस वाईट वाटलें. [illegible] हातांनीं वाढविलेला स्वराज्यवृक्ष आपल्या शत्रूच्या हातांत आपण होऊन [illegible] प्रसंग त्यांस फार दुःखकारक वाटेल तर त्यांत नवल काय ? आपण आतां परत चाललों आहों, हे आपल्या सत्तावीस किल्ल्यावरील ठाणेदारांस शत्रू-

ऱ्या हातीं किल्ले देऊन तुह्मी सर्व खालीं उतरा म्हणून खालते पाठविण्यासाठीं जात आहोंत, हा विचारच त्यांस इतका भयंकर वाटला कीं राहून राहून त्यांच्या अंगावर शहारे येऊन ते अंग थरारवीत व उसासे टाकीत. जें काय होतें तें आपल्या बऱ्यासाठींच होत असतें असा दृष्टांत भवानी मातेनें त्यांस दिला, त्यांच्या मातुःश्रीनींही त्यांस तेंच सांगितलें आणि श्रीसमर्थ रामदास यांनींही तसेंच समाधान केलें होतें. परंतु एखाद्यानें मोठ्या कष्टानें द्रव्य मिळवून मोठ्या हौसेनें घर बांधावें आणि तें अखेरीस भलत्याच्याच स्वाधीन करावें लागावें यांत त्या बांधणाराला कधीं आनंद किंवा समाधान होईल काय? त्याला तसें करावें लागण्याबद्दल वेदांत कोणीं सांगितला ह्मणून काय मनाला वाईट वाटावयाचें तें रहाणार आहे?

महाराज परत राजगडावर आले. त्यांनीं किल्ले खालीं करून देण्याबद्दल काय खलिते ल्याहावयाचे ते लिहिले. परंतु ते आपल्या अश्रूंनीं कागद लिहिल्याप्रमाणें लिहिले असें ह्मटलें असतें तरी चालेल. जें केलेंच पाहिजे त्याला त्यांचा इलाज नव्हता. ते खलिते तयार होऊन जिकडचे तिकडे जाईपर्यंत ते कोणाशीं कांहीं बोलले नाहींत. जिजाबाईसाहेबांजवळसुद्धां ते बोलले नाहींत किंवा त्यांनाही त्यांच्याशीं बोलण्याचें धैर्य झालें नाहीं.

झालें. एक वेळीं जें करूं अशाबद्दल कबुली दिली तेंही महाराजांस करणें अर्थातच प्राप्त झालें. त्याप्रमाणें त्यांनीं केलें. सगळीकडे खलिते पाठवावयाचे ते पाठविले. जे किल्ले आपण तावडतोब खालीं करून देतों ह्मणून त्यांनीं सांगितलें होतें ते सर्व किल्ले खालीं करून देण्याचे फर्मान् सर्व ठाणेदारांकडे गेले. हे फर्मान् पाठवितांना महाराजांस किती खेद, किती दुःख झालें असेल याचें शब्दचित्र काढणें मला तर कांहीं शक्य नाहीं. जयसिंगानें आपल्या मालकास लिहिलेल्या पत्रांतून असें लिहिलें आहे, कीं शिवाजीशीं आपण तह केला तो पूर्णपणें राजीखुषीचा होता. तो पूर्णपणें आपल्यास शरण आला आहे, लाचार झाला आहे. कृतकर्माचा त्याला पश्चात्ताप झाला आहे. परंतु हें किती असंभवनीय! ज्यानें गोब्राह्मणांच्या प्रतिपालाकरितां एवढा अट्टाहास केला, तो कां पुढें त्याच्याबद्दल पश्चात्ताप करण्यास आणि औरंगजेबासारख्याला शरण जाण्याकरितां? खचित नव्हे. परंतु पुढें प्रसंगच तसा आला तेव्हां वेळेपुरती मान वांकवून वेळ मारून नेणें जरूर पडलें. अर्थात् तें तसें करणें मोठ्या आनंदानें करणें शक्यच नव्हे. आज नाहीं उद्यांचें उट्टें आपण काढूं, कधीं रहाणार नाहीं, असें ह्मणत ह्मणतच त्यांनीं किल्ले खालीं करून देण्याचे फर्मान् आपल्या ठाणेदारांकडे पाठविले असले पाहिजेत आणि खरोखरी तसेंच झालें.

शिवाजीमहाराजांनीं, आपल्या हाताखालील लोकांत जो एक मोठा गुण अवश्य असलाच पाहिजे अशाबद्दल मोठी सक्ति केली होती, तो गुण ह्मणजे आज्ञेप्रमाणें बिनतक्रार वागणें हा होय. महाराजांचा हुकूम ह्मटला ह्मणजे मग तो बरावाईट

याचा बिलकुल विचार न करितां अमलांत आणलाच पाहिजे. त्या गुणाला अनुसरून सगळे किल्ले खालीं करून दिले गेले. जेवढे बारा किल्ले तहाप्रमाणें यांच्याकडे रहावयाचे ठरलें होतें तेवढे राहिले. शेवटला किल्ला शत्रूच्या हवालीं करून तेथील ठाणेदार व त्याचीं माणसें महाराजांच्या चरणाजवळ किल्ला शत्रूच्या स्वाधीन केल्याची वर्दी देण्यास आलीं. तेव्हां महाराजांची स्थिति कशी झाली असावी तें एकाच उपमेनें वाचकांस समजावून देतां येईल. आपल्या प्रेमाचें अगदीं केंद्रस्थान असें एखादें माणूस मृत झालें असतां त्याला श्मशानांत पोंचवून आपण आलों ह्मणजे आपल्या मनाची जी स्थिति होते, तिच्याहून शतपट भयंकर स्थिति महाराजांच्या मनाची झाली असली पाहिजे हें उघड आहे. महाराजांच्या बाजूनें ज्या गोष्टी घडावयाच्या ठरल्या होत्या त्या झाल्या. आतां पुढल्या गोष्टी घडावयाच्या त्या राहिल्या. एक दोन वेळां अशीसुद्धां महाराजांस शंका आली, कीं आपण आपली बाजू सारी पुरी पाडली—परंतु जयसिंगानें जर का आपल्यास फसवण्याचें योजलें असलें तर मात्र आपल्या फजितीला पारावारच नाहीं. मनुष्याचें मन एकदां अधु झालें, जी गोष्ट करूं नये ती करणें भाग पडलें ह्मणजे मग त्याला नानाप्रकारच्या शंका येतात. तशीच स्थिति महाराजांच्या मनाची झाली होती. ते त्या दिवसांत कोणाशीं धड बोलत नसत. जिजाबाईसाहेबांपाशींसुद्धां जें बोलणें तें अगदीं परिमित असे. तीही माउली फारसें त्यांच्याशीं बोलत नसे. ते आपला बहुतेक काळ आई अंबाबाईच्या चरणापाशीं बसून निदिध्यास करण्यांत घालवीत. मध्येंच कांहीं दृष्टांत वगैरे झाले, तर तेवढे चिटणिसांनीं नित्याप्रमाणें टिपून ठेवून महाराजांस वाचून दाखवावे. असा क्रम चालला होता.

इकडे दिलेरखान आणि जयसिंग राजे अगदीं आनंदपर्वताच्या अगदीं शिखरावर जाऊन बसल्यासारखे बसले होते. महाराजांकडून सर्व किल्ले खालसा होऊन आल्याची वर्दी येतांच पुढला हेतु अर्थातच जो विजापुरकरांना नाहींसें करून टाकण्याचा तो सफल करण्याकडे त्यांचें लक्ष्य लागलें. त्या कामांत शिवाजीमहाराजानीं पूर्ण मदत देण्याचें कबूल केलें होतें. त्याप्रमाणें मदतीची व्यवस्था करावी अशाबद्दल त्यांस लिहून गेलें. महाराजांच्या मनांत विजापूरकरांचें राज्य रसातळाला नेण्याचें नव्हतें असें नाहीं; परंतु मोगलबादशहाच्या राज्याच्या विस्तारांत तें सामील होण्यास आपण मदत करावी कीं काय याबद्दल त्यांस थोडें चमत्कारिक वाटलें. परंतु शेवटीं आपणांस जें करणें आहे तें आपण आज करूं. मोगलांचें राज्य आपण फार दिवस येथें टिकूं देणार नाहीं. अर्थात् त्याच्याबरोबर हा विजापुरकरांचा प्रांतही आपण काबीज करूं असा विचार एक वेळ त्यांनीं मनांत केला. तथापि आपण करतों हें बरें नव्हे असें त्यांच्या मनांत राहून राहून वाटेच. परंतु तहाच्या अटींपैकींच एक अट ती असल्यामुळें महाराजांस त्याही बाबतींत आपल्या मनास दाबून धरून विजापुरकरांवर हल्ला करण्यास जावें लागल. त्याप्रमाणें त्यांनीं

इमानें इतबारें मोगल सैन्यास मदत केली. प्रतापराव गुजर आणि स्वतः महाराज यांनीं लढाईत फारच पराक्रम गाजविला. त्यांजबरोबर या वेळीं नेताजी पालकरही होता. विजपुरकरांचा पुष्कळ प्रांत व किल्ले या मोहिमेंत त्यांनीं सर केले. शिवाजीमहाराज आपल्या वचनाला जागून त्यांनीं आपणांस योग्य तऱ्हेनें मदत देण्यास प्रारंभ केला आहे हें जयसिंगास स्पष्टपणें दिसलें, तेव्हां त्यांनीं त्यांचेबद्दल बादशहाकडे आणखी एक शिफारसपत्र पाठविलें. या विजापुरच्या युद्धांत व्यंकोजीराजे–शिवाजीमहाराजांचे सापत्न बंधु–विजापुरच्यातर्फे लढण्यास आले होते. दोघां भावांचा सामना व्हावयाचा प्रसंग आला होता, परंतु कर्मधर्मसंयोगानें तो प्रसंग टळला. याचें कारण अमलगीरबादशहाचें पत्र आलें हें होय. राजा जयसिंग यानें जें तहासंबंधीं व इतर हकीकतीनें भरलेलें पत्र लिहिलें होतें, त्या पत्राचा हा जबाब होता. तो येतांच राजा जयसिंगानें शिवाजीमहाराजांस निरोप पाठवून कळविलें, कीं 'औरंगजेबाचें पत्र फार महत्त्वाचें आहे. त्यासंबंधानें आपलें व आमचें बोलणें होऊन पुढें काय करावयाचें तें ठरविलें पाहिजे. तरी आपली व आमची भेट झाली पाहिजे. तहाच्या सर्व अटी व माझ्या शिफारशी बादशहानें पूर्णपणें मान्य केल्या आहेत तरी आपण एकवार समक्ष भेटूं व पुढें काय करायचें तें ठरवूं.' असा निरोप येतांच शिवाजीमहाराजांनीं त्याची मुलाखत घेतली. या मुलाखतीचे वेळीं महाराजांनीं पत्र वाचलें. त्या पत्रांत सर्व एकंदर ठीक होतें; परंतु एक अट अशी घातली होती, कीं तहान्वयें सर्व कलमें शिवाजी येथें ( औरंगजेब होता तेथें ) आल्यास सर्व मान्य होतील. त्याप्रमाणें त्यानें आपल्या मुलास आपल्याबरोबर आणलें तर त्याला मनसबदारीचीं वस्त्रें दिलीं जातील. ही अट वाचतांच शिवाजीस फार चमत्कारिक वाटलें. पहिल्यापासून त्यास असें वाटतच होतें, कीं औरंगजेब कांहीं सुध्या मतानें आपणास सोडणार नाहीं. त्यानेंही त्याच्या दरबारांत जाण्याची अट घातली तीसुद्धां त्यांच्या कल्पनेंत एकवार आली होती. त्यांच्या मनांत असेंही वाटत होतें, कीं आपण एकवार त्या प्रांतीं गेलों तर आपल्या मनाप्रमाणें कांहीं कांहीं गोष्टी करावयाला सांपडतील. एक तर तेथली प्रत्यक्ष स्थिति तरी काय आहे ती समजेल. औरंगजेबाचा दरारा जसा [illegible] वाटतो तसा आहे कीं काय ? त्याचप्रमाणें त्याला न जुमानणारे कांहीं-तरी [illegible] वगैरे लोक निघतात किंवा कसें ? जसा आपण इकडे उपक्रम करतों आहोंत, तसा तिकडे करण्याची कल्पना कोणाच्या डोक्यांत घातली, तर ती मनांत शिरेल आणि कांहीं हातून घडेल अशी तरी मंडळी तेथें आहेत काय ? हें सर्व आपण प्रत्यक्ष तेथें गेल्याखेरीज कळण्याला मार्ग नाहीं. आपण कोणी तरी पाठवून माहिती आणूं ह्मटलें तर तशीं माणसें जाऊन माहिती मात्र मिळेल. कांहीं काम करावयाचें ह्मटलें, तर तें कांहीं त्यांच्या हातून व्हावयाचें नाहीं. तेव्हां हा प्रसंग आपण त्या कामाला उपयोगी पडेल असें करावें, ह्मणजे दोनही कामें

होतील. असा विचार त्यांनीं केला खरा; परंतु आपलें राज्य सोडून इतक्या दूर आपल्या शत्रूच्या तोंडांत जाऊन पडावें आणि त्यांतून निसटतों कसे याबद्दल काळजी करण्याचा प्रसंग आपल्यावर ओढून घ्यावा हें त्यांस बरें वाटेना. औरंगजेबाच्या मुलाखतीस जाण्यांत फार मोठा धोका आहे हें त्यांस फार चांगल्या प्रकारें माहीत होतें. औरंगजेब फार कपटी. तो विश्वास दाखवून आपल्यास तेथें नेऊन आपला घात करण्यास कमी करणार नाहीं. परंतु पत्र तर त्यानें असें लिहिलें होतें, कीं जणूं काय शिवाजीचा व आपला सलोखा झाला ही फार समाधानाची गोष्ट झाली असून त्यास आपण केव्हां आपल्या दरबारांत बोलावून त्याचा मान करूं असें त्याला झालें असावें.

महाराजांच्या मनांत वारंवार वारंवार आपण उत्तरहिंदुस्थानांत जाऊन तेथली स्थिति प्रत्यक्ष पहावी असें होतें खरें, परंतु आतां प्रत्यक्ष प्रसंग आला, तेव्हां त्यांस फार पंचाईत वाटूं लागली. आपण गेलों आणि कांहीं तरी कपट करून बादशहानें आपला घात केला, तर आपल्या पश्चात् इकडली गति काय होईल ! बादशहानें आणखी आपल्या थोरल्या मुलाला घेऊन येण्याबद्दल [illegible] लिहिलें आहे. तेव्हां आपला व त्याचा एकदमच घात करण्याचा त्यानें हेतु [illegible]जिला तरी तो सिद्धीस जाण्यास कांहीं कठिण पडणार नाहीं. मग त्याची मनां[illegible] योजना काय असेल ती खरी, असें त्यांच्या मनांत आल्याखेरीज राहिलें नाहीं.

त्यांनीं तें पत्र वाचल्यानंतर राजा जयसिंगास विचारलें कीं "बादशहानें आह्मांस आपले दरबारीं बोलावण्याचा हेतु काय ? त्यानें आह्मांस [illegible] बोलावून नेल्यावरून आह्मी तेथें गेलों आणि कपटानें त्यानें आमच्या जिवास धोका केला, तर काय समजावें ? " राजा जयसिंग यांसही महाराजांच्या बोलण्यांत कांहीं तरी तथ्य वाटलें; तथापि त्यांनीं थोडा वेळ विचार करून त्यास ह्मटलें " तसा संशय आपल्या मनांत आला यांत नवल नाहीं. परंतु तो संशय मनांत आणूं नका आणि जाण्याचा निश्चय करा. आपल्या केंसालाही धक्का तिकडे लागणार नाहीं याबद्दल मी आपली खातरजमा करून देतों. रामसिंग तेथें आहे, तो आपल्यासंबंधांत फार जागरूक राहील. यत्किंचितही शंका येण्याजोगें त्याला समजलें किंवा दिसलें तर तो आपणांस तेव्हांच सावध करील. परंतु तें सामील चित् कपटानें घात होईल अशा समजुतीनें आपण आज जाण्या[illegible]रिक [illegible] वाटलें. माझी अशी समजूत आहे, कीं आपण गेलांत तर एकंदरींत आपलें हितच होणार. घात होण्याची पाळी आली तर माझा मुलगा रामसिंग आपल्या [illegible]लाही धक्का न लागूं देतां आपल्याला अगदीं सुरक्षितपणें इकडे येण्याचा [illegible]जवीज करील. त्याबद्दल मी तुह्मांला खात्री देतों. "

अशा प्रकारानें बोलून राजा जयसिंगानें त्यास फार फार आग्रह करून सांगितलें, कीं आपण औरंगजेब आग्न्यास आहे तेथें त्यानें बोलावलें [illegible] जावें.

ह्मणत बसावें, ... तितकें ... पासून परत घ्या
त्यानें जर आपलें सर्वस्व ... आपल्या वांट्या
रते तुकडे घेऊन स्वस्थ बसता. परंतु ... परमेश्वरा
त्याच्या मनांत अशीच प्रेरणा केली, कीं त्यानें ... गावा
नेमानेमच असा कीं तें त्यानें गमवावें, त्याच्याकरितां ... आपण
मग आपल्या प्रतापानें सर्व कांहीं परत घ्यावें. आमचाह ... असा दिसत
आह्मी सारें आतां पणाला लावल्याप्रमाणेंच गमावून ... नाहीं. त्याच्या
माणेंच आह्मांला आतां वनवास भोगावा लागणार आहे ... शेवटीं आह्
आपलें जेवढें ह्मणून हक्काचें तेवढें सगळें सव्याज ... नी अशी अग
पूर्ण श्रद्धा आहे."

महाराजांनीं महाभारतांतील कथा इतक्या वे... ल्या, आणि त
त्यांना इतक्या अवगत झाल्या होत्या, कीं कोणता क... ला तरी त्य
त्यांतल्या कोणत्या तरी समप्रसंगाचें स्मरण होई व ते... ाय स त्या
स्मरण करून देऊन पुढें काय करावयाचें तें ठरवून टा... वारंवार अ
सांगितलेंच आहे, कीं महाराजांस 'आपण स्वतः एक... च्या दरब
जाऊन तेथें त्याच्या मार्गे कोणा तरी धीर वीर पुरुषाच्य... लावाव
असें उत्कटपणें वाटत होतें. त्याप्रमाणें जाण्याला आज ... रण झा
तें पाहून त्यांस एका दृष्टीनें समाधान झालें; परंतु दुसऱ्या ... टूं लाग
कीं आपण तिकडे जाणें, ह्मणजे फार दुर्धर अशा दिव्यांतू... ाचें धा
करण्यासारखें आहे. आपलें सर्वस्व एक कायमचें जाईल त... कें गेले
सर्व दामदुपटीनें परत घेण्याची पूर्ण तयारी तरी ... रखे
होतें. आणखी आतां जाय... बा
किल्ले आणि थोडासा मुलूख...
इकडे आल्यानंतर पुनः सगळें सव्याज परत घेऊन यावें. वनव... ावा
धर्मभीमार्जुनांनीं केलें, तेंच आपण करावें. हा विचार मन... का
आपल्या मंडळीपुढें वर सांगितल्याप्रमाणें भाषण केलें.

तें ऐकून सर्व मंडळी कांहीं वेळ अगदीं स्तब्ध बसली. नंतर म... त्यां
दम ह्मणतात: "महाराज, आपल्यापुढें बोलावें असा आमचा ए...
कार नाहीं. परंतु आह्मां सेवकांना सर्व गोष्टी सांगून त्यांचा ... र
घेण्याचा परिपाठ आपण घातला, विचार काय असेल तो बिन...
करण्याची संवय सेवकांना लावली, तेव्हां बोलण्याची माफी मागून ... ळ
गीर बादशहा महाकपटी असें आतांपर्यंत ऐकत होतों, परंतु ...
आपल्यांस प्रत्यक्ष अनुभव आला. सरकार, तहाचीं कलमें अगदीं ...
हून केलीं होतीं, त्यांत कांहीं फरक सुचविला नाहीं, सुचवायचा आ...

केलें नाहीं. नुसता रुकार द्यायचा, तो दिला आहे; तरी पण आपण स्वतः दरबारीं येऊन समक्ष दिलखुलासा झाला पाहिजे असें लिहितो ! बरें तह आपणाशीं करावयाचा म्हणून आपल्याला एक बोलावलें, पण संभाजीमहाराजांना अजून दहावें वर्ष लागलें नाहीं, त्यांना बरोबर आणण्याला सांगण्याची गरज ? त्यांना मनसबदारीचीं वस्त्रें द्यायचीं आहेत ही त्याला सबब ! काय ? मनसबदारीचीं वस्त्रें इकडे पाठवून देतां येत नाहींत ? इकडे त्यांच्या अगदीं नाकांतले बाल असे सरदार आहेत, त्यांच्या हातून वस्त्रें दिलीं तरी तीं वस्त्रें दिल्याप्रमाणेंच नाहींत का ? पण महाराज त्याचा कावा फार निराळा आहे. फार फार निराळा आहे. आपल्या लक्ष्यांत तो आला नसेल हें संभवतच नाहीं. पण आपल्याला त्या काव्याचें भय वाटत नाहीं, आणखी आमच्या मनांत तो प्रसंग आला कीं जिवाचा थरकांप होतो. छे.छे. महाराज आपण त्या काळाच्या तोंडांत जाण्याचा विचार बिलकुल करूं नये. तो आपल्या जाभाडांत आपणा दोघांनाही चिरडून टाकण्याचा कावा करून आपल्यास तिकडे बोलावतो आहे. आमचे भावि महाराज आपल्या तिकडे नेऊन निदान ओलीस ह्मणून कायमचे ठेवून घ्यावे, एवढा तरी त्याचा हेतु खाचित आहे. जुळलें तर आपणा दोघांसही तो कपटानें कैद करून ठेवण्याला कधीं कमी करणार नाहीं. परंतु आपल्याला जयसिंग राजांनीं अगदीं अभयवचन दिलें आहे, तेव्हां तें पाळलेंच पाहिजे असा प्रसंग आला तर, "निदान संभाजीमहाराजांना तरी कायमचे दरबारांत ठेवून जा. ते आमचे मनसबदार आहेत," असा हठाग्रह तो धरणार, कधीं सोडणार नाहीं. असें केलें तर दक्षिणेंत आपण परत आल्यावर कांहीं उलथापालथ करूं नये अशाबद्दल एक प्रकारची जामिनकी—फारफार नाजूक अशी जामिनकीच झाली. आपण थोडी चलबिचल केली, कीं छोटे महाराजांच्या जिवाला अपाय [illegible] ण्याची धास्ती आपणापुढें ठेवलीच. तेव्हां माझी हात जोडून एवढीच विनंति आहे, कीं आपण कांहीं इथून जाऊं नये. चार दिवस पडून नुसतें [illegible]तें आहे तर ठीक आहे पडूनचं घेऊं. शिकार आटोक्यांत येईपर्यंत दबा धरून झाडींत राखण्याला सिंहासारख्या शूर प्राण्याला सुद्धां भुइसरपट पडूनच रहावें लागतें. जाणें तेंही एकाकी कीं शिकार मिळणार अशी वेळ आली कीं झांप टाकलीच, पण जाऊं दिले. आतां त्याच्या दरबारांत—त्याच्या त्या खाईंत—जाण्याचा विचार करूं नये. एंनीं तहा अगदीं आमची सगळ्यांची हात जोडून विनंति आहे."

पेशवे इतक्या रांव उत्कंठेनें आणि मनःपूर्वक बोलत होते, कीं महाराज त्यांच्या बोलण्यानंतर बराच वेळ अगदीं स्तब्ध बसले होते. नंतर हंसले आणि त्यांस व इतरांस उद्देशून ह्मणतात, "आपण ह्मणतां ही गोष्ट अगदीं खरी. ही खरी हें मलासुद्धां दिसत आहे. परंतु आतां त्याला इलाज नाहीं. आह्माला स्वतःला आज बरेच दिवस वाटतच होतें ना, कीं तिकडे जाऊन कांहीं तरी गडबड उडवावी ? झालें तर ! आतां एक एक पाऊल आपण पुढें टाकीत चाललों.' आपलें सगळें गमावलें. थोडें

ठेवून घेतलें तें सरी त्यांनीं ठेवूं दिलें ह्मणूनच ठेवण्यास मिळालें. आतां अधिक गमजा करण्यांत काय तात्पर्य आहे ? असा परदेशवास–वनवास–अज्ञातवास–काय वाटेल तें त्याला नांव द्या–आपल्याला करावा लागेल, असें प्रत्यक्ष आई जगदंबेनें स्वप्नाप्रमाणें दृष्टांत देऊन सांगितलें. समर्थ गुरुमहाराजांनीं तीर्थयात्रेला निघण्यापूर्वी येथें येऊन आपणांस तेंच सांगितलें. त्याप्रमाणें सगळ्या गोष्टी घडून येताहेत. आतां आपण त्या गोष्टींच्या उलट वागणूक करून कांहीं निभायचें नाहीं, तोंड दिलें पाहिजे. संभाजीच्या नांवाची जर मनसबदारी मागितली, तर मनसबदारीचीं वस्त्रें घ्यायला त्याला आपल्या बरोबर येथें आणा हें त्यांचें ह्मणणें बाह्यात्कारी तरी कांहीं वावगें दिसतें आहे का ? तें कांहीं नाहीं. आतां अगदीं जें चाललें आहे त्याप्रमाणें पुढें चालायचें. संभाजीला न्यायचें–आतां नेलेंच पाहिजे. दहा दहा वर्षांच्या मुलांनीं रणांगणांत सेनापत्य केल्याचीं उदाहरणें आहेत. तर काय शंभूला आमच्या बरोबर जाऊन संकटांतून निसटून येतां येणार नाहीं ? वेळ प्रसंग पडला तर मी त्याची आधीं इकडे रवानगी करून देईन. परंतु आतां येत नाहीं ह्मणणें कांहीं ठीक होणार नाहीं. तेवढ्या आपल्या नकारानेंच एखादें काम बिघडायचें आणि आहे त्याचेंही तळपट करण्याला आयतीच त्यांना सबब मिळायची ! ”

इतकें बोलून महाराज कांहीं वेळ थांबले. नंतर पुनः ह्मणतात, “ तेंच, तें जें ठरलें तें ठरलें. शंभूला मी घेऊन जातों, कांहीं वेडावांकडा प्रसंग होऊन आह्मी दोघेही परत येत नाहीं असें ठरलें, कीं राजारामाच्या नांवानें तुह्मी फिरवून काय तुमच्या अंगांत मर्दुमकी असेल ती दाखवा. आतां त्याचा अधिक विचार नको. तुम्हां सर्वांवर मी हा सगळा भार टाकून जातों आहें. मातुःश्री आईसाहेब यांना विचारून प्रत्येक गोष्ट करणें. त्यांचा शब्द म्हणजे आज्ञा. तिचा भंग होतां कामा नये. हें तुह्मांला सांगायला पाहिजे असें नाहीं. जगदंबेच्या, समर्थां[illegible] अ[illegible]वी आईसाहेबांच्या आशीर्वादानें कोणतेंही वावगें होणार नाहीं, होईल तें स[illegible]रेंच [illegible]णार.”

त्यांचा कंठ भरून आला. पुढें बोलवेना; त्यांनीं मातुःश्रीकडे पाहिलें. [illegible]बाईसाहेबांचे नेत्र अश्रूंनीं मंद झाले होते, त्यांचा कंठ भरून आला हो[illegible] काढण्याची इच्छा असून शब्द निघेना.

इतरांनीं हा प्रकार पाहिला. मायलेंकरांच्या या अशा स्थितींत अ[illegible]सा त्यांनीं येथें असणें म्हणजे एके प्रकारानें इष्ट नव्हे असें त्यांच्या मनांत आ[illegible] व एकामागून एक ते तेथून उठून गेले.

मायलेंकरांचा झालेला करुणसंवाद व त्यांचा वियोगप्रसंग दोनही अत्यंत प[illegible]वित्र ते आम्ही वर्णूं शकत नाहीं.

---

# प्रकरण ३५ वें.

## भोळा बिचारा दिलेरखान.

तहाचें बोलणें सुरू झाल्यापासून—विशेषतः नूर—एल्—हुदा हिला महाराजांनीं तिच्या बापाच्या स्वाधीन केल्यापासून—किरातसिंगाचें धाबें दणाणून गेलें होतें. आतां आपलें सगळें बिंग बाहेर पडेल आणि आतांपर्यंत जीं कारस्थानें आपण रचीत आलों तीं सर्व फुकट जातील इतकेंच नव्हे, तर आपल्यावरला राजा जयसिंग यांचा व दिलेरखान याचाही सगळा विश्वास पार उडून जाईल हें त्यास स्पष्ट दिसत होतें. अशा वेळीं आपण ' यःपलायते स जीवति ' हाच काय तो मार्ग स्वीकारला पाहिजे; आणि ज्यानें आपल्याला अशा अवस्थेला आणून सोडलें त्याच्यावर पक्का सूड उगवला पाहिजे, एवढेंच काय तें आपलें कर्तव्य उरलें असें त्यास वाटूं लागलें. दिलेरखानाचा व महाराजांचा पुरा सलोखा झाला हें आतां अगदीं उघड होतें. त्याचा केवळ दुसरा प्राणच अशी जी त्याची मुलगी नूर—एल्—हुदा तिला ज्यानें मोठ्या संकटांतून वांचवून त्याच्या स्वाधीन केलें, त्याच्याबद्दल पूज्यबुद्धि उत्पन्न झाली तर त्यांत नवल काय ? परंतु या पूज्यबुद्धीमुळें आपल्यावर आतां केव्हां व कोणतें संकट येऊन कोसळेल याचा नेम नाहीं. आपलें नांव शिवाजीला कळलें असलेंच पाहिजे इतकेंच नव्हे, तर तें त्याच्याकडून दिलेरखानासही कळलेंच असलें पाहिजे. परंतु तसें तें कळलें असून आपल्यास त्याचें प्रायश्चित्त देण्याची धडपड कशी दिसत नाहीं याबद्दल त्यास मोठें आश्चर्य वाटलें. तथापि ही वेळ नुसतें आश्चर्य वाटून स्वस्थ बसण्याची नव्हे. आपली चामडी तुळतुळीतची तुळतुळीत राखण्याला जे काय उपाय योजणें जरूर ते योजले पाहिजेत. परंतु पळून जाणें तेंही एकदम उपयोगी नाहीं: असा विचार करून त्यानें बरेच दिवस तसेच जाऊं दिले. आपली जागा सोडली नाहीं. कोणाची गांठ घेतली नाहीं. शिवाजी-महाराजांनीं तहाप्रमाणें किल्ले प्रांत मोगलांच्या स्वाधीन करावयाचे ते केले आणि ते विजापुरकरांवरल्या स्वाऱ्यांत दिलेरखानास व जयसिंगास मदतही करूं लागले. तोंपर्यंत किरातसिंग अगदीं दबून राहिला. एकदां दोनदां त्यानें बादशहाकडे कांहीं गुप्तपत्रें मात्र पाठविलीं. परंतु हे पत्रें पाठविण्याचे कारभार त्यानें इतक्या गुप्तपणें केले, कीं त्याचा कोणास संशयसुद्धां आला नाहीं. त्यानें पडून दिवस काढले, परंतु जात्या भयंकर उलाढाल्या तो. त्याला अशी भुईसरपट पडून रहाण्याची स्थिति किती दिवस मानवणार ? आतां आपण कांहीं तरी लटपट करून येथून आपला पाय

काढावा असें त्याच्या मनांत आलें. कदाचित् त्याच्या गुप्त पत्रांस जीं उत्तरें येत त्यामुळेंही त्याचा तसा बेत झाला असावा. शिवाजीमहाराजांना बादशहानें मुलाखतीसाठीं बोलाविलें आहे हें त्यालाही कळलें असावें. ही संधि आपल्याला आपला पाय काढण्यास बरी आहे असें त्याच्या मनानें घेतलें व तो एके दिवशीं दिलेरखानाकडे गेला. प्रथम अभिनंदनपर भाषणें झाल्याबरोबर तो लागलीच खानास ह्मणतो, " खानसाहेब, झाली ही गोष्ट फार उत्तम झाली, परंतु मला राहून राहून एक मात्र चमत्कार वाटतो, कीं नूर-एल्-हुदा बेगमेला नेणारे लोक रजपूत असून अजून त्यांचा पत्ता आपणांस किंवा दुसऱ्या कोणास लागूं नये इतकेंच नव्हे, तर त्यांचा फारसा तपास केला गेला असेंसुद्धां कोणाच्या नजरेस येऊं नये! आपणच पहा ही किती आश्चर्याची गोष्ट आहे ती! आपल्याला राजे जयसिंग इतकी भुरळ घालतील आणि आपण त्या भुरळींत इतके सांपडाल अशी कल्पनासुद्धां मला नव्हती. ...... "

परंतु दिलेरखान त्याच्या अंगावर खेंकसून मध्येंच त्यास ह्मणाला " किरातसिंग राजांच्या संबंधानें तूं वेडेंवाकडें बोलशील तर आतां मीं तुझें एक अणुरेणुभरसुद्धां ऐकणार नाहीं. मूर्खा, तुझी काय अशी कल्पना आहे, कीं त्यांचें अंग माझ्या पोरीला पळवून नेण्यांत होतें ? कोण खरोखर त्यांत होता, हें मला सगळें कळलें आहे. तूं विनाकारण जास्ती कमती बोलण्यांत अर्थ नाहीं. "

दिलेरखान याप्रमाणें बोलत असतां किरातसिंगाचें लक्ष्य एकसारखें त्याच्या चेहऱ्याकडे होतें. " कोण खरोखर त्यांत होता हें मला कळलें आहे " असें तो ह्मणाला, तेव्हां तर विशेषतः त्याचें लक्ष्य त्याच्याकडे लागलें होतें. हेतु अर्थातच हा, कीं आपल्या स्वतःसंबंधीं यांना कांहीं संशय आला आहे कीं काय हें समजावें; परंतु तसें त्यास त्याच्या चर्येवरून कांहीं वाटलें नाहीं. अर्थातच त्यास तेवढेंच समाधान वाटलें आणि तो कांहीं वेळ अगदीं स्तब्ध बसून नंतर खानास ह्मणतोः

" खानसाहेब, आपण ' बोलूं नको ' म्हणत असाल, तर मी नाहीं बोलत. पण खरी गोष्ट अशी आहे, कीं राजा जयसिंगांचेंच किंवा त्यांचा दुसरा मुलगा किरात याचें हें कृत्य. त्यांनींच बेगमेस नाहींसें केलें. ज्याकरितां नाहींसें केलें तें साधलें नाहीं. मराठ्यांनीं मधल्यामध्यें तिला अडविलें, तेव्हां शिवाजीला मोठेपणा देऊन आपण त्याच्याशीं तह करण्याला तयार व्हावें म्हणून आपली मुलगी मोठ्या शिताफीनें मीं आपल्याकडे परत पोंचविली असें म्हणण्याला त्याला संधि दिली. झालें. आपण खूष झालां. शिवाजीचा आपल्यावर उपकार झाला, आपण त्याचे ऋणी झालां; आणखी काय पाहिजे ? त्याच्याबद्दल आपलें मन साफ झालें. आपण त्याची शिफारस केली. त्याच्याशीं त्याला जसा पाहिजे तसा तह झाला. राजा जयसिंगांना आणखी काय पाहिजे होतें ? त्यांचा सगळा ओढा शिवाजी राजांकडे होता

आणखी आहेही, हें काय सांगायला पाहिजे ? आपण त्याच्या आड याल, त्याचा नायनाट करण्याची इच्छा धराल, तेव्हां आपल्यालाच त्याच्या बाजूला वळवून घ्यायला ही युक्ति नाहीं म्हणून तरी कशावरून ? आपण इतक्या लवकर एकदम शिवाजीबद्दल इतका स्नेहभाव धराल ही कल्पनासुद्धां आपल्याला नव्हती. असो चला. आपण आतां तह केला. त्यानें सगळे किल्ले तुमच्या स्वाधीन केले. आतां इकडे दक्षिणेंत कांहीं पराक्रम करण्याला वावच नाहीं, तेव्हां इकडे रहाण्यांतही अर्थ नाहीं असें माझ्या मनांत आलें असून मीं निश्चय केला आहे, कीं आतां इथून परत जावें. आपल्याकडे मी परवानगी मागायला आलों आहें. आपण परवानगी याल अशी फार उमेद आहे. मला आतां कांहीं इथें चैन पडत नाहीं. उगीच माशा मारीत बसण्यांत तरी अर्थ काय ! आह्मी आपल्याबरोबर आलों ते या आशेनें, कीं ज्या मराठ्यानें आतांपर्यंत इतक्या लोकांच्या हातावर तुरी दिल्या, कांहींना कांहीं तरी करून ज्याला त्याला परत लावलें, त्याला आपण आपल्या मर्दुमकीनें आणखी युक्तीनें नरम करूं, नव्हे त्याचा नायनाट करूं अशी मला फार फार उमेद होती; परंतु आतां त्या उमेदीचा कांहींच उपयोग नाहीं. आतां उद्यां तो आमच्यावर हुकूम चालवायला लागेल. बादशहाचा आतां तो मनसबदार झाला. आज राजे जयसिंग जसे इकडे आले आहेत, तसाच त्यालाही बादशहा कुठेंना कुठें तरी दिग्विजयाकरितां पाठवील. आमच्यासारख्यांना त्याच्या हाताखालीं देईल. नाहीं ह्मणून तरी कशावरून ! तितकें तें झाल्याखेरीज रहायचें नाहीं. तेव्हां अशा स्थितीला येईपर्यंत आपल्याला कांहीं इथें रहावेंसें वाटत नाहीं. विजापुरकरांशीं लढण्यांत त्याचें साहाय्य होतेंच आहे. तेव्हां त्याला इकडची सुभेदारीही द्यावी अशी बादशहाला आपण शिफारस कराल. बादशहा ऐकेल आणखी त्याला आमच्या डोक्यावर बसवील. तेव्हां आपण हा अपमान होईपर्यंत राहूं नयेसें वाटतें. परमेश्वरदयेनें मला खायला यथास्थित आहे. बादशहानें तें कांहीं अजून घेतलें नाहीं, तोंपर्यंत कांहीं हरकत नाहीं. तेव्हां आतां कृपा करून माझे माझे लोक घेऊन जाण्याची मला आपण परवानगी द्यावी. उगीच आतां दक्षिणेंत रहाण्याचा तरी मुद्दा काय ! ”

दिलेरखान त्याचें तें बोलणें ऐकून चमत्कारिक दृष्टीनें त्याच्याकडे पाहूं लागला व शेवटीं त्यास ह्मणतो: “ एकूण झाली ही व्यवस्था आपल्याला पसंत नाहीं पडली ? आह्मांला तर तींत कांहीं वावगें दिसत नाहीं. त्याला सर्वपरीनें जिंकल्यावर आणखी काय पाहिजे ? तो लाचार झाला, शरण आला. मोगली बादशाही मको, तिचा आपल्याला तिटकारा आला ह्मणून जो इतक्या बढाया व उड्या मारीत होता, तो रुमालानें हात बांधून तह करण्याला—वाटेल त्या अटी सांगितल्या तरी तह करण्याला—तयार झाला आणि त्यानें तो केला, तेव्हां आतां उरलें काय ? कांहीं नाहीं, कांहीं उरलें नाहीं. त्याची स्वराज्याची हाव कुठें गेली ? आतां तो मोगल बाद-

शहाचा नोकर, अगदीं निव्वळ नोकर झाला ना ? त्याच्या पायांत आह्मीं एकदम शृंखळा अडकवल्या ना ? आतां त्याला तोंड वर करायला तरी जागा आहे ? आणखी तूं ह्मणतोस झालें हें कांहीं बरोबर झालें नाहीं. तेव्हां तुला काय व्हायला पाहिजे होतें तें तरी एकदां सांग पाहूं. "

" मला ? " किरातसिंग एकदम हंसून तिरस्कारानें त्यास म्हणाला, " मला काय पाहिजे ? कांहीं नको. इथून आतां जायला पाहिजे. आपल्याला जसं वाटतं तसं मला वाटत नाहीं एवढंच मला सांगणं आहे. दुसरं काय ? माझ्या हातीं आहे काय ? तर मला काय पाहिजे तें आपल्याला सांगायचं. त्यांतून आपण विचारतांच तर सांगतों, कीं खरं म्हटलं तर शिवाजीचा दरोबस्त किल्ला झाडून घेऊन त्याला आपण कैदेंत टाकून खितपतायला लावायचं. आपल्याला असं वाटतं काय, कीं हा आपल्या तहाच्या अटी शेवटपर्यंत पाळील ? खानसाहेब, आज हा सगळ्या गोष्टींना कबूल आहे; परंतु उद्यां इकडे स्थिरस्थावर झालं असं वाटून आपली नुसती पाठ वळूं द्या, कीं आपल्या राज्याची पुनः यानं स्थापना केलीच ह्मणून समजा. मी आतांच अशी वार्ता ऐकली, कीं बादशहानं त्याला दरबारीं बोलावलं आहे आणखी तो त्याप्रमाणें जायला कबूल झाला आहे हें थोडं आश्चर्य आहे. तो कबूल व्हायचा नव्हे, पण कबूल झाला आहे, त्याअर्थी त्याचा कांहीं तरी कावा आहे. काव्याखेरीज तो कधीं कांहीं करायचा नाहीं. मीं अगदीं मनांत खूणगांठ बांधून ठेवली आहे. तो जसे आपण आहों म्हणून आपल्याला दाखवितो, तसा तो खचित नाहीं. आज आपल्या अंगांत ताकद नाहीं. आज आपण दंगाच करीत राहिलों तर आपला नायनाट करतील. या भितीनं तो अगदीं गांगरून गेला आणि त्यानं जें म्हणाल त्याला होय ह्मटलं. पण मनाचा पक्का निश्चय, कीं उद्यां संधि सांपडली कीं यांतलं एकूनएक उलथून पाडायचं. याच्या पलीकडे काय आहे ? दरबारांत जाऊन बादशहापुढें अगदीं मांडलिक म्हणून कुर्निसा करून पांच हजारी मनसब मिळाली, कीं येतां येतांच कित्येक किल्ले स्वारी किल्ल्यामागें किल्ला या प्रकारें परत घेईल, आणखी पुनः आपलं राज्य स्थापन करील. हरळीची मुळी आणखी मराठ्यांची कुळी नायनाट करण्याला फार कठिण. ती उपटून जाळून पार नाहींशीच केली, तर पुनः त्रास होणार नाहीं. थोडा शेष राहूं द्या, कीं तिचा आपला विस्तार पुनः सुरू झालाच. आपल्याला वाटत असेल, कीं मी यःकश्चित् माणूस आणखी आपल्यापुढें अचावचा बोलतों, पण आपण तसा लोभ करतां, ह्मणून मी तरी बोलण्यास धजलों. नाहीं तर आपल्याकडे येण्याचं सुद्धां धाडस करावं असं माझ्या मनांत आलं नसतं. राजाकडे गेलों नाहीं ? असो चला. माझी विनंति आतां एवढीच, कीं कसंही करून मला जाऊं द्या. आपण राजेसाहेबांना सांगितलं तर ते मला परवानगी देतील, नाहीं तर कधीं जाऊं देणार नाहींत. माझे लोक किती ? अगदीं थोडे आहेत. ते घेऊन मी गेल्यानं आपल्याला अडचण अशी कांहींच

होणार नाहीं. त्यांतून आणखी मी आपल्याला असं सांगतों, कीं राजांचे दुसरे चिरंजीव किरातसिंगआहेत ना ? त्यांनीं कांहीं कांहीं मोठ्या विलक्षण गोष्टी केल्या आहेत, आणखी त्या करणारा मीच तो किरातसिंग असं होऊन मला एखादे वेळीं भलत्याच गोंधळांत पडण्याचा प्रसंग येणार आहे. याकरितां आपण चार पावलं दूर असलेलं आपल्याला बरं."

"राजांच्या किरातसिंगाबद्दल काय म्हणालास ?" दिलेरखानानें आपले डोळे आकुंचित करून आणि कपाळाला आंठ्या घालून त्याला विचारलें.

"कांहीं नाहीं. तसं कांहीं नाहीं. मी उगीच त्या पंचाइतींत विनाकारण पडूं कशाला ? पण त्याचं आणखी माझं नांव एक, यामुळें त्यानं जर आपल्या एखाद्या दुष्कृत्याचं खापर माझ्या माथीं फोडायचं आणखी आपण नांवानिराळं रहायचं असं मनांत आणलं, तर मीं गरिबानं काय करायचं ? त्याचं तेंच खरं व्हायचं. मलाच लोक लबाड समजायचे. तो काय काय करतो, याची त्याच्या वडलांना माहिती नसली तरी कळल्यावर तरी आपल्याच मुलाचं हें कृत्य, असं ते कधीं तरी म्हणतील का ? किरातसिंगाशीं किरातसिंग ! मी मात्र व्यर्थ फांशीं जायचा ! याचा मला विचार नको करायला ?

दिलेरखान मोठ्यानें हंसून म्हणालाः "तूं तरी एक दीर्घसंशयीच मला दिसतो आहेस ! वेड्या, जा. आपल्या ठाण्यावर जाऊन बस जा. अजून पुष्कळ गोष्टी इथें व्हायच्या आहेत. सगळ्या खालसा केलेल्या किल्ल्यांवरून आम्हांला आपले लोक ठेवायचे आहेत, त्यांपैकीं फार महत्त्वाच्या अशा किल्ल्यावर तुला आम्ही ठेवूं. आग्र्यास जाऊन तूं काय करणार ? तिथें आहे काय ?"

"तिथें कांहीं असो नसो. पण आतां दक्षिणेंत मला कांहीं रहाण्याची इच्छा नाहीं. उद्यां शिवाजी निघणार. तेव्हां आपल्याला माझा कांहीं उपयोग करून घ्यावा असं वाटत असेल, तर मला त्याच्या बरोबर म्हणून लावा. मी त्याच्या पोटांत शिरून त्याचा कांहीं कावा असला, तर तो तेव्हांच जाणीन आणखी आपल्याला किंवा तिकडे गेल्यावर बादशहाला कळवीन."

"तुझा निश्चयच असला तर कांहीं हरकत नाहीं. आम्ही आपलीं कांहीं माणसं त्याच्या बरोबर देणारच आहों. शिवाय मी एक विचार मनांत आणला आहे कीं नूर एल हुदालाही त्यांच्या सोबतीनंच घरीं पाठवून द्यावं. त्यानं तिला एकवार फार इमानानें संरक्षिलें, तर तो तिला नेऊन पोंचवीलही. इथें तिला बरं वाटत नाहीं, चैन पडत नाहीं, आयती ही संधि आहे. तिचीं माणसं आहेत; परंतु सोबतीनं म्हणून त्यांच्या बरोबर पाठवावी असा आजच माझ्या मनांत विचार आला आहे. तूंही आणखी जात असलास तर मग फारच चांगलं होईल."

हें हा बोलतो आहे हें खरोखर अंतःकरणास वाटून बोलतो आहे, कीं कांहीं तरी

लबाडीनें बोलतो आहे हेंच किरातसिंगास कळेना. चोराच्या मनांत चांदणें. आपलें काय बिंग आहे हें याचें याला ठाऊक होतें. तें आपलें बिंग बाहेर कळलें कीं काय ? याला ठाऊक झालें असून हा मुद्दाम काय आहे तें काढण्यासाठीं असें विचारतो कीं काय ? अशी याला शंका आली व हा त्याच्या चर्येकडे फार भेदिक दृष्टीनें पाहूं लागला. परंतु तसें कांहीं नाहीं असें त्यास पक्केपणें वाटलें, तेव्हां त्याचें चित्त शांत होऊन तो पुनः दिलेरखानास म्हणाला. " खानसाहेब, आपण बोललां तें ऐकून मी आश्चर्यानें थक्क होऊन आपल्याकडे पाहूं लागलों. कारण आपण शिवाजीबरोबर आपली मुलगी—आपले केवळ पंचप्राण—पाठविणार ही कल्पनाच मला चमत्कारिक वाटते आहे. आपण मला परवानगी दिली, तर जातोंच आहें. बेगमसाहेबांची काळजीपूर्वक सेवा करायची हें तर माझें कर्तव्यच आहे, परंतु हा विचार—त्यांना एकट्यांना पाठविण्याचा विचार—आपल्या मनांत आला तरी कसा, हें मला कांहीं समजत नाहीं. अजून समजत नाहीं. समजा, कीं माझ्या मनांत जाण्याचं नसतं, तर काय आपण त्यांना शिवाजीबरोबर तिकडे रवाना करून देणार होतां ? हें जर खरं असेल, तर आपण खरे खरे भोळे असं म्हटल्याखेरीज मला कांहीं रहावत नाहीं. एकवार त्यांनीं तिला संभाळून मोठ्या संकटांतून सोडवून आपल्याकडे आणून पोंचवलं म्हणून काय त्यांच्या स्वाधीन तिला करण्यापर्यंत पाळी आली ? आतां तर मला अगदीं जरूर जरूर बेगमसाहेबांच्या बरोबर गेलंच पाहिजे. आपण पाहिजे तर त्या मराठ्यावर विसंबा, पण मी आपल्याला तसं विसंबूं देणार नाहीं. "

किरातसिंग इतक्या आवेशानें व उत्सुकतेनें बोलत होता कीं त्या बिचाऱ्या दिलेरखानास, तो हें सर्व कपटनाटक करीत असेल असा संशयसुद्धां आला नाहीं. इकडे किरातसिंगाच्या मनांत तर चमत्कार असा वाटत होता, कीं आपलें नांव इतक्या सगळ्या या तऱ्हाच्या प्रकरणाचे वेळीं कसें निघालें नाहीं ? तें निघून आपली नाचक्की व्हावयाची परंतु ती झाली नाहीं हें आपलें मोठें नशीब. तें नशीब जोरावर आहे तोंपर्यंत आपण आपलें येथून प्रयाण करावें. जी गोष्ट शिवाजीला कळली असलीच पाहिजे, ती तो अद्यापि दिलेरखानाजवळ बोलला नाहीं याचा फायदा आपण घ्यावा हा त्याचा हेतु. दिलेरखानानें आपणास त्याच्या मुलीच्या संरक्षणाकरितां त्याच्याबरोबर पाठवावें अशी त्याची खरी इच्छा मुळींच नव्हे. आपणांस अशा अशा कारणाकरितां परत दिल्लीस पाठविलें जात आहे असें जर शिवाजीजवळ दिलेरखान ह्मणेल, तर तो सहज आपलें बिंग त्याच्याजवळ उघड करून सांगेल. [illegible] बरोबर जावें हा त्याचा हेतुच नव्हे. परंतु दिलेरखानानें [illegible] परवानगी राजापासून मिळवून द्यावी

त्याचें तें बोलणें ऐकून दिलेरखान हंसला आणि म्हणालाः "तुझ्यासारखा माणूस नूर एल्‌ हुदाला पोंचवायला मिळाला तर फारच चांगलं, पण आपलं इथलं काम अजून कांहीं संपलं नाहीं, तेव्हां तुझ्यासारख्या शूर माणसाला जाऊं द्यावं कीं नाहीं याचा मला संशयच वाटतो. मी आपला पहिल्या सपाट्यास म्हणालों कीं तुला जायचं तर जा, परंतु तूंच विचार कर बरं तुला जाणं योग्य आहे का ? "

"खानसाहेब, आतां इथें काम काय उरलं आहे ? आपणच विचार करा. सगळे किल्ले आपल्या स्वाधीन झाले. आपले किल्लेदार, ठाणेदार आणखी आपली शिबंदी तिथें नेऊन ठेवायची इतकंच काम राहिलं कीं नाहीं आतां ? शिवाजीला बादशहानं तिकडे बोलावलं नसतं, तर एक ह्मणायला तरी झालं असतं कीं न जाणों, आज यानं किल्ले खालीं करून दिले, परंतु उद्यां पुनः तो ते परत घेण्यासाठीं धडपड करणार नाहीं कशावरून ? पण तेंही आतां शक्य नाहीं. शिवाजी स्वतः गेल्यावर बाकीचे मुर्दाड लोक काय करणार ? शिवाजी इकडे गेला निघून कीं बसतील तलवारीचे विळे करून भातं कापीत ! छे. आतां तर आपल्याला कांहींसुद्धां वाटत नाहीं बोआ इथें रहाण्यांत अर्थ. मला आपण परत जाण्याची परवानगी द्याच. मी ज्या महत्त्वाकांक्षेनं इथें आलों होतों, ती महत्त्वाकांक्षा आतां इकडे राहून तृप्त होईल असं मला तर कांहीं वाटत नाहीं. कांहीं कर्तृत्व करून दाखवायला आतां इकडे जागाच नाहीं. माझी आपल्याला फारा दिवसांची माहिती आहे. मी आपल्या घराण्याचं नांव वर काढण्यासाठीं धडपडतों आहे. तर आपण मला या कामीं मदत केली पाहिजे. मला हातीं धरलं पाहिजे. मला आपण इथून जाऊं दिलंत ह्मणजे माझं काम होईल. आपल्यापासून मी कांहींही चोरून ठेवीत नाहीं. आपल्याबद्दल माझ्या मनांत किती पूज्यबुद्धि आहे, हें आतांपर्यंतच्या आपल्या अनुभवानं आपल्याला माहीत आहे. तर मजवर एवढी आपण कृपा करा. आपण ह्मणालांत कीं आपण मला कोठल्या तरी मोठ्या किल्ल्यावर ठाणेदारी किंवा परगण्यावर सुभेदारी देणार; पण मला तशी इच्छा नाहीं. मी अजून तरुण आहें. बादशहाच्या जवळ राहून आपली मर्दुमकी त्याच्या नजरेला आणून त्याच्यापासून शाबासकी मिळवावी हा माझा हेतु, तो आतां इकडे कांहीं कामगिरी केली तरी साधणार नाहीं; कारण आतां इकडे कांहीं महत्वाची कामगिरीच नाहीं. मी स्पष्ट बोलतों माफ करा. माझ्या बापानं मोगलांचा द्वेष केला. मीं मोगलांची सेवा पत्करूं नये अशी मला मरतांना द्वाही घातली. माझ्या संस्थानच्या लोकांनीं आणखी नातेवाइकांनीं मला नानाप्रकारांनीं शिकविलं. आई तर पुनः तुझं तोंड पहाणार नाहीं ह्मणून मला सोडून कोणीकडे गेली त्याचा पत्ता नाहीं. पण मीं आपला निश्चय सोडला नाहीं. मोगलांची नोकरी पत्करली. रजपुतान्यांतल्या दुसऱ्या लोकांस वठणीस आणण्यासाठीं बादशहाला त्यांचीं बिंगं सांगून देऊन मदत केली. माझा म नयनपाळ याच्या तालमींत मी वाढलों. हें सगळं काय दक्षिणेंतल्या एखाद्या

किल्ल्यावर ठाणेदार होऊन कुजत पडण्यासाठीं ! राजे जयसिंगांच्या मनांत अलमगिराच्या अंमलांत आपल्या इतकं मोठं कोणीं होऊं नये, ह्मणून ते कदाचित् आमच्यासारख्यांना असं इकडे तिकडे टाकूं इच्छित असतील. पण मी कधीं असा रहाणार नाहीं. मी इकडे आलों, तो आपल्याला कांहीं तरी मर्दुमकी करून आपलं नांव करण्यासाठीं आलों. तशी आतां वेळ नाहीं. परत जातों. मला परवानगी द्यावी एवढंच माझं मागणं आहे. शिवाजी जर तिकडे जातो आहे, तर अर्थातच त्याच्या हालचालीवर नजर ठेवायलाही कोणी तरी पाहिजेच. खानसाहेब, शिवाजी इतक्या साक्षेपानं तिकडे जायला सिद्ध झाला आहे तो कांहीं अगदीं साध्या हेतूनं जातो आहे अशी आपली समजूत आहे ? आतांपर्यंत ज्यानं हजारों कपटनाटकं रचलीं, तो केवळ साध्या हेतूनं चालला असेल हें संभवनीय तरी ? त्याच्या स्थितींत मी जर असतों तर मी कधीं गेलों नसतों. आपण गेलां नसतां. पण त्याचे विचार फार निराळे आहेत. मी ते पक्केपणानें जाणून आहें. मला आपण जाऊं द्या. अगदीं त्याच्या बरोबर जाऊं द्या. त्याचीं सगळीं कारस्थानं बरोबर हेरून जर मी त्याच्या शहाला काटशह देऊन त्याच्यावर मात करीना तर नांव बदलून ठेवा. मात्र मी जातों आहें तो बेगमसाहेबांना पोंचवण्यासाठीं जातों आहे असं त्याला सांगूं नका. एक तर आपण त्याच्यावर विश्वास टाकून त्याच्याबरोबर बेगमसाहेबांना पाठवणार असं त्याला वाटतं आहे तें त्याला वाटेनासं होईल. कारण आपण मला त्यांच्या संरक्षणाकरितां बरोबर देतों असं ह्मटलं कीं तें आलंच. तेव्हां त्याचा गैरविश्वास होईल असं तर करूं नका. पण त्याच्या एकंदर हालचालीवर नजर ठेवून ती बादशहाला बरोबर कळेल अशी तजवीज तर करा. ती तजवीज माझ्याकडे लागली. मला नुसती इथून निघून जाण्याची परवानगी द्या. मी त्याला नकळत त्याच्यावर अशी नजर ठेवीन कीं वा ! मला जें काय सांगायचं तें सारं आपल्याला सांगितलं. आतां आणखी कांहींसुद्धां राहिलं नाहीं. आणखी मी आतां अधिक कांहीं बोलत नाहीं. पुनः एकदां मी एवढंच सांगतों, कीं माझी श्रद्धा, माझी भक्ति आपल्यावर आहे. राजांवर नाहीं. आपल्याला हें अनेक प्रसंगीं दिसून आलंच असलं पाहिजे. तेव्हां आतां आणखी कांहीं सांगत नाहीं. झालं माझं बोलणं. "

दिलेरखानाच्या एकंदर स्थितीचीं व त्याच्या स्वभावाचीं आतांपर्यंत जीं वर्णनें या कथानकांत आलीं आहेत, त्यांवरून तो कोणत्या प्रकारचा माणूस होता हें वाचकांस चांगलेंच समजलें असेल. तो किरातसिंगाच्या या लांबलचक भाषणानें अगदीं संतुष्ट झाला. हिंदु व जातीचा रजपूत असून त्याची सगळी श्रद्धा, सगळी भक्ति आपल्यावर असावी आणि त्याचा जातभाई जो राजा जयसिंग त्याच्यावर नसावी, त्याच्याबद्दल त्याच्या मनांत संशय उत्पन्न व्हावा, याबद्दल त्याला फार मोठेपणा वाटला आणि हा जें काम सुचवितो आहे, कीं शिवाजीवर कोणी तरी नजर ठेवण्यास पाहिजे, तेंही कांहीं खोटें नाहीं असेंच त्याला वाटू

लागलें. राजा जयसिंगाचा शिवाजीकडे फार ओढा हें तर त्याला कळूनच चुकलें होतें. तेव्हां त्याला जर कांहीं मदत पाहिजे असेल तर ती मिळावी अशीच तजवीज ते करणार. परंतु तो जर कांहीं कारस्थानें रचूं लागेल, तर त्यावर नजर ठेवून तीं कारस्थानें बाहेर आणण्याला कोण ? जयसिंगराजानीं त्याचा पक्ष स्वीकारला आहे त्या अर्थी ते कांहीं त्याचीं कारस्थानें उघडीं पडूं देणार नाहींत. उलट त्याच्यावर पांघरूण घालतील. त्यांचा मुलगा रामसिंग त्यांना नानाप्रकारची मदत करील तेव्हां किरातसिंगासारखा हेर म्हणून कोणी तरी जरूर येथपासून त्याच्या बरोबर गेलाच पाहिजे. तो सहजगत्या जातो आहे तर त्याला जाऊं द्यावें अशी शिफारस करावी. जर नच ऐकलें तर आपल्या कामासाठीं म्हणून आम्ही त्याला पाठवतों, असें म्हणून आपण पाठविण्याचा अधिकार चालवूं. येथपर्यंत त्याच्या मनाची तयारी झाली आणि त्यानें आपण तुझ्या जाण्याबद्दलची परवानगी मिळवून देतों, तुला त्याची काळजी नको, असें अभिवचन देण्यापर्यंत पाळी आली.

किरातसिंगास मनांतल्या मनांत गुदगुल्या झाल्या. आपलें कपटनाटक बाहेर पडून आपल्याला देहांत प्रायश्चित्त होतें कीं काय अशा भीतीनें जो नुसती काय हालहवाल आहे ती पहाण्यासाठीं आला, तो आपलें कार्य साधून पुनः याच्या भोळेपणाबद्दल हंसूं लागला.

दिलेरखानानें वचन दिलें इतकेंच नव्हे, त्यास जाऊं देण्याबद्दल जयसिंगास निरोप पाठविला. असा निरोप पाठवितांच पडत्या फळाची आज्ञा समजून किरातसिंगाची स्वारी तेथून चालती झाली. राजा जयसिंगाचा उलट निरोप काय येतो तें पहाण्याच्या भानगडींत आपण पडूं नये असा त्यानें विचार केला. त्याच्या त्या घाईचें थोडेंसें दिलेरखानास सुद्धां आश्चर्य वाटलें. परंतु शिवाजीशीं तह केला हें मनास फार वाईट वाटल्यामुळें त्याला येथून इतक्यांत तांतडीनें जावेंसें वाटलें असावें असाच त्याच्या मनाचा ग्रह होऊन त्यानें त्याबद्दल ज्यास्त विचारही केला नाहीं आणि चौकशीही केली नाहीं.

---

# प्रकरण ३६ वें.

## मार्गांतील एक प्रसंग.

### सूर्यास्तीं.

पवित्र रमणीय असा नदीचा प्रवाह आणि सूर्यास्ताच्या वेळची पवित्र रमणीय अशी वेळ. त्या नदीप्रवाहापासून वरच्या बाजूस एक विस्तीर्ण व भव्य देवालय होतें.

या देवालयांत अनेक प्रवासी येऊन उतरत. तेथून जवळच बऱ्हाणपूर. त्या काळीं हें शहर फार मोठें व नामांकित, यामुळें तेथें जावें, चार घरें भिक्षा मागून आणावी, या देवालयांत यावं, नदीतीरीं त्या भिक्षेचा पाक करावा, खावा आणि देवालयांतील ओवरींत जाऊन पडावें. प्रातःकाल झाला कीं पुढें प्रवास करावा. अगर विश्रांति घ्यावयाची असल्यास पुनः शहरांत जाऊन भिक्षा मागून आणून आपला उदरनिर्वाह करावा आणि भगवान् शंकराच्या सान्निध्यांत खुशाल पडावें, अशा प्रकारें आपला काल कंठून पुढें मार्गस्थ होणारे असे कितीक पांथस्थ व यात्रेकरू या देवालयांत उतरत असत. बऱ्हाणपूर हें उत्तरेकडे जाणाऱ्या सर्व प्रवाशांचें उतरण्याचें, मुक्काम करण्याचें मुख्य ठिकाणच असे. परंतु ज्यांना शहराशीं संपर्क नको, त्यांना पवित्र तापी ही जवळ असल्याकारणानें व तिच्या कांठीं हें सुंदर व भव्य देवालय होतें यामुळें ज्यांस जनसंमर्दाचा त्रास नको, त्यांना अर्थातच या देवालयांत नदीप्रवाहाच्या सान्निध्यांत फार सौख्य होई. असे साधुसंत व गोसावी या देवालयांत उतरत. जे नगरवासांत आनंद मानणारे ते अर्थातच शहरांत उतरत. त्याचप्रमाणें मोठमोठालीं सैन्यें किंवा लवेजमे घेऊन प्रवास करणारे लोक शहराच्या बाहेर छावण्या देऊन रहावयाचे तेही नदीप्रवाहाचा फायदा घेत आणि त्यांतले धर्मश्रद्धालु देवालयाचाही आश्रय करूं इच्छीत. असा लवाजमा घेऊन प्रवास करणाऱ्या एका दोघां गृहस्थांचाही तळ या देवळापासून थोड्या अंतरावर पडलेला दिसला. परंतु या तळांशीं सध्यां आपल्याला कांहीं कर्तव्य नाहीं. आपल्याला सध्यां सूर्यास्तसमयीं नदीच्या घांटावर असणाऱ्या तीन चार व्यक्तींकडे पहावयाचें आहे.

या व्यक्ती वाचकांच्या परिचयाच्या आहेत. त्यांना पाहिल्याबरोबर त्यांस खचित आनंद होईल अशाच त्या आहेत. माता रणदेवी आणि तिच्या बरोबर असणाऱ्या तिच्या मैत्रिणी आपापले कमंडलु घेऊन नदीतीरीं सायंकाळचीं पवित्र कर्में करण्यासाठींच आल्या होत्या. त्यांच्या पहिल्या विचाराप्रमाणें त्या मध्यंतरींचीं सर्वं तीर्थें व यात्रा करीत करीत आतां या स्थानीं दोन दिवस मुक्काम करण्याच्या हेतूनें राहिल्या होत्या. सूर्यास्ताचा समय होता. सूर्य स्वतः अदृष्ट झाल्यासारखाच होता. त्याचें प्रशांत सुंदर तेज आकाशाच्या सन्निध भागावर पसरून त्याचें प्रतिबिंब त्या सुंदर जलप्रवाहांत पडलें होतें आणि त्या जलप्रवाहावरून परावर्तनानें तें घाटावरील व्यक्तींच्या अंगावर पडलें होतें. पश्चिम दिशेस त्या वेळचा तो देखावा इतका कांहीं चित्ताकर्षक दिसत होता, कीं माता रणदेवी आपला कमंडलू त्या काळीं वहात चाललेल्या रौप्यरसांत बुडविण्याचें विसरून जाऊन त्या दिग्भागाकडे तटस्थपणें पहातच उभी राहिली. वर सांगितलेंच आहे, कीं सूर्यनारायण बहुतेक अदृष्ट झालाच होता, परंतु त्याचे सहस्र कर मात्र अद्यापि लांबवर पसरले होते. जणूं काय तो जातांना रणदेवीसारख्या आपल्या पवित्र भक्तांस आवाहन करीत आहे किंवा भिऊं नका मी उद्यां पुनः येतों असें आश्वासनच देत आहे. माता रणदेवींचे नेत्र त्या प्रांता-

कडे अगदीं पूर्णपणें लागले होते. त्या प्रशांत रमणीय तेजाची प्रतिमा तिच्या चर्येवर दिसत होती. तिचें अंतःकरण जणूं काय त्या देखाव्यानें पूर्णपणें मोहून टाकलें होतें. तिची ती तल्लीनता पाहून कौसल्यादि तिच्या इतर मैत्रिणीही तिच्या-कडे पाहूं लागल्या. त्यांना तिचें त्या वेळचें स्वरूप एखाद्या देवतेच्या स्वरूपाप्रमाणें विशेषच प्रशांत व पवित्र वाटून त्यांचे डोळे तिच्या ठिकाणीं संलग्न झाले. तो नदीकाठ, तो सूर्याच्या अस्तकाळच्या सौम्य तेजस्वी किरणांनीं रंजित झालेला पश्चिम दिग्भाग, तो तेजानें रौप्यरसाप्रमाणें भासणारा जलप्रवाह, तें पार्श्वभागीं भव्य देवालय, तो सुंदर घांट, त्या घांटाच्या पायऱ्यांवर सूर्यतेजाकडे पहात उभी राहिलेली रणदेवीची श्वेतवस्त्र परिधान केलेली, तिच्या प्रशांत गंभीर मुखाकडे पहा-णाऱ्या श्वेतवस्त्र परिधान करणाऱ्या दुसऱ्या पवित्र स्त्रियांनीं वेष्टिलेली, एका हातांत तो कमंडलु, दुसऱ्या हातांत रुद्राक्षमाला आणि तोंडानें कांहीं जप करणारी, अशी माता रणदेवीची धीरगंभीर व प्रशांत पवित्र अशी मूर्ति. असा तो दे-खावा नुसता शब्दांनीं रेखाटला तरी मनास किती मोह होतो! मग ज्याच्या तो प्रत्यक्ष दृष्टीस पडला असेल त्याच्या आनंदाची कल्पना काय करावी? त्या वेळीं तो देखावा पहाणारा असा एक धन्य पुरुष त्या घाटांच्या वरच्या बाजूस एक-टाच उभा होता. त्याचे विशाल नेत्र माता रणदेवीच्या मुखाकडे अगदीं लागून गेले होते. तिच्याकडे पहाण्यांत त्याचें लय लागलें होतें. त्याला दुसरें कांहीं दिस-तच नव्हतें असें ह्मटलें तरी चालेल. त्या पावित्र्यमूर्तीकडून आपले नेत्र दूर करूंच नयेत असें त्याला वाटत असावें. किंवा आपण असे काय पहातों आहों असें वाटून त्यानें त्या नेत्रांस तिच्याकडून फिरवून दुसरीकडे नेण्याचा यत्न केला तरी ते जाईनात अशी तरी स्थिति असली पाहिजे. त्या त्याच्या पहाण्यांत पूज्य-बुद्धि, श्रद्धा, भक्ति इत्यादि पवित्र विकारांखेरीज दुसरें कांहींही नव्हतें हें तर अगदीं स्पष्ट होतें. पहातां पहातां त्याच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. ते ओघळून त्याच्या गालांवर, दाढीवर पडूं लागले; परंतु ते पुसून काढण्याचें सुद्धां त्याला भान नव्हतें. माता रणदेवीकडे पाहून कोणा तरी अत्यंत पूज्य अशा व्यक्तीचें त्याला स्मरण झालें असावें असें दिसलें.

परंतु असा प्रकार किती वेळ चालणार? सूर्याचें तेज हळूहळू कमी होत चा-ललें. माता रणदेवीही भानावर आली. तिनें आपल्या मैत्रिणींकडे पाहिलें व फारच मनोरम असें हास्य करून त्यांस ह्मटलें, "तुह्मी सुद्धां माझ्याप्रमाणेंच ह्या देखावा पाहून मोहित झालांना! मैत्रिणींनो, अशाच एका प्रसन्न समयीं आह्मी आनंदांत असतांना आमच्यावर फार मोठं संकट आलं.......पण त्याचं आतां कशाला स्मरण? चला आपण आपले कमंडलू भरून घेऊन हातपाय धुवून भजन करायला जाऊं. आज माझं मन फार सुप्रसन्न झालं आहे. भगवान एकलिंगजीचं भजन मनापासून करूं. श्रीरामचंद्रजीचं भजन करूं. चला."

हें त्यांचें बोलणें चाललें असतां देवळाच्या पाठीमागल्या बाजूनें दबकत दबकत येऊन पायऱ्या झपाझप उतरत एक माणूस त्यांचे बाजूस चालला होता. या माणसानें आपल्या अंगाभोंवतीं काळें कापड गुंडाळून घेतलें होतें. तो दहा पांच पायऱ्या उतरतो, तों त्याच्याचप्रमाणें काळ्या कापडानें अंग वेष्टिलेले आणखी पांच सात इसम एकदम पायऱ्या उतरूं लागलेले त्या वरच्या अंगास उंचावर उभ्या राहिलेल्या गृहस्थास दिसले. सूर्याचें धवल तेज खाऊन रात्रीनें आपलें जाभाड पसरण्यास आरंभ केल्याबरोबर त्यांतून हे यमदूतासारखे काळ पुरुष या पवित्र बायांकडे जाताहेत याचा अर्थ तरी काय, असें त्याच्या मनांत आलें व त्याचा हात साहजिकच त्याच्या कमरेस असलेल्या तलवारीकडे गेला.

माता रणदेवी व तिच्या मैत्रिणी आपापले कमंडलू भरून घेऊन हस्तपादादिकांचें प्रक्षालन करीत होत्या. तोंडानें केव्हां भगवान् एकलिंगजींचें, केव्हां दाशरथी रामाचें नामस्मरण करीत होत्या. त्यांचें हस्तपादादि प्रक्षालन झाल्यावर माता रणदेवीनें एकवार सर्वांकडे पाहिलें, आणि “ सगळ्यांचें हातपाय धुणं झालं असल्यास चला लवकर. ” असें बाकीच्यांस म्हटलें.

त्याबरोबर सगळ्या जणींनीं “ होय झालं ” असें उत्तर दिलें, त्यांत एक मात्र रणदेवीचे जवळ जाऊन म्हणाली, “ माताजी, मला एक प्रश्न आपल्याला विचारावा असं वाटतं आहे. विचारूं काय ? आतां तुम्ही म्हणालांत कीं ‘अशाच एका प्रसन्न समयीं आह्मी आनंदांत असतांना आमच्यावर फार मोठं संकट आलं.’ हें संकट कोणतं ? आणखी काय ? तें आम्हांला सांगा. आपली हकीकत ऐकण्याची आह्मांला फार फार उत्कंठा आहे. आपल्याला एकदां ती हकीकत विचारावी असं प्रत्येकीला वाटतं आहे. मी तर तुमच्या पायांजवळ अगदीं नवीच आलें, पण या सगळ्यांना तीच उत्सुकता आहे. मी विचारण्याची धिटाई केली, त्यांना ती होईना, इतकंच. ”

तें ऐकून माता रणदेवी हंसली व ह्मणते: “ वाराणशी, तुझं अजून लहान वय. अगदीं अल्लड, तेव्हां तूं धिटाई केलीस तर त्यांत नवल काय ? पण वेडे, ही वेळ, कां हें स्थळ अशी हकीकत विचारण्याला योग्य ? आपण आपलं भजन पूजन आटपून स्वस्थ बसलों म्हणजे स्वस्थपणानं विचार, मग मी तुमची सगळ्यांचीच जिज्ञासा तृप्त करीन. आमच्यावर तेव्हां फार मोठं संकट आलं, तसं आतां येण्याचा संभवच राहिला नाहीं. आतां...... ”

परंतु तिच्या तोंडून वरील शब्द बाहेर पडतात न पडतात तोंच तिची दृष्टि त्या वरून दबकत दबकत येणाऱ्या काळपुरुषांकडे गेली. ते तितक्यांत खालीं आले व त्यांनीं त्या स्त्रियांच्या भोंवतीं गराडा घातलाच.

वर सांगितलेंच आहे कीं त्या लोकांनीं आपल्या अंगाभोंवतीं काळा कपडा गुंडाळून घेतला होता. त्यांस पहाण्याबरोबर त्या सर्वजणी अगदीं घाबरून गेल्या

आणि वेड्यासारख्या त्या लोकांकडे पाहूं लागल्या. " तुह्मी कोण ? आमच्याभोंवतीं गराडा कां घातलात ? तुम्हांला काय पाहिजे ? " असें फक्त एकट्या रणदेवीनें फार नम्रस्वरानें त्यांस विचारलें. बाकीच्या अगदीं स्तब्धच राहिल्या. त्यांच्या तोंडून शब्द फुटेना.

तेही लोक कोणी बोलेनात. त्यांच्यापैकीं फक्त एक पुढें होऊन बोललाः " गोसावणी, विनाकारण प्रश्न विचारीत बसूं नकोस. तुझ्यासारख्या थेरड्यांची आम्हांला जरूर नाहीं. पण या बाकीच्यांपैकीं तिघींना आम्ही बळजबरीनें न्यायला आलों आहों. आमची छावणी इथून जवळ आहे. आज चार मुक्काम आम्ही तुमच्या पाळथीवर आहों. तर तूं मुकाट्यानं उभी रहा. ही वाराणशी, ही मथुरा, आणखी ही कौसल्या या तिघींना आम्ही आपल्या छावणींत घेऊन जाणार. तूं इथें विनाकारण आरडाओरडा करशील तर तुझं शासन करण्यासाठींच आमच्यांतले दोघे इथें राहतील. देवळांत लोक फार आहेत असं नाहीं. पण आरडाओरडा होऊन लोकांची आणखी आमची चकमक व्हावी अशी इच्छा नाहीं. तुला आपला जीव हवा असला, तर ठीकच आहे. तूं जीवावर उदार झाली असलीस तर आरडाओरडा कर, तुला गळा दाबून मारून तापींत फेंकून देतों...... "

तो इसम इतक्या शांतपणें बोलत होता कीं, माणसाचा गळा दाबून त्यास मारून नदींत फेंकून देणें ही एक अगदीं त्याच्या रोजच्या परिपाठांतली—जींत कांहींच विशेष नाहीं—अशी गोष्ट आहे.

तें त्याचें बोलणें ऐकून बाकीच्या तर गांगरून अगदींच स्वस्थ तटस्थ उभ्या राहिल्या. त्यांच्या तोंडून शब्द निघेना. तें पहातांच तो थोरल्या पुनः म्हणतो " तुम्ही कोणी गलगा करीत नाहीं ही फार शहाणपणाची गोष्ट आहे. आतां आणखी थोडा शहाणपणा करा. तो एवढाच कीं तुह्मी तिघी आमच्या बरोबर चला. कांहीं अंतरावर तुमच्याकरितां डोल्या आणून ठेवल्या आहेत, त्यांत बसा आणखी आमच्या छावणींत आह्मी तुम्हांला नेऊन सोडतों. तेथें गेल्यावर आमच्या विचाराला जें येईल त्याप्रमाणें पहातां येईल...... "

माता रणदेवी संतापानें लाल झाली होती. तिच्या ओंठावर कांहीं तरी शब्द आले होते; परंतु अत्यंत संतप्त अशा स्वरांत " अधमा ! " एवढाच शब्द तिच्या तोंडून बाहेर पडला. परंतु त्या शब्दांत काय सामर्थ्य भरलेलें असेल तें असो; एखादी गोळी लागल्याबरोबर जशी माणसाची अवस्था होते, तशी त्या बोलणाऱ्या गृहस्थाची अवस्था झाली आणि तो दचकून मागें सरकला. परंतु त्याच्या साथीदारांपैकीं जो माता रणदेवीच्या जवळ उभा होता, त्यानें तितक्यांत पुढें होऊन आपल्या कणखर व बोजड हातानें माता रणदेवीचें तोंड बंद केलें. तिच्या तोंडून पुढें एक अक्षरही निघूं दिलें नाहीं. हें आपल्या साथीदाराचें करणें त्या नायकास आवडलें नाहीं आणि आपली नापसंती दाखविण्यासाठीं त्यानें हातानें त्याचा निषेध केला. परंतु

तो निषेध त्या माणसास समजला नाहीं आणि त्यानें आपला माता रणदेवीच्या तोंडावरला हात दूरही केला नाहीं. इतक्यांत आपल्याला जी गोळी लागली असा भास झाला ती गोळी नव्हतीच मुळीं असें वाटून जसा माणूस शुद्धीवर यावा आणि आपल्या वेडगळ भीतीबद्दल त्याचें त्यालाच हंसूं यावें, तशीच त्या माणसाची स्थिति झाली. त्यानें आपला निषेध बाजूस ठेवून उलट तिला म्हटलें, "तूं आतां विनाकारण आरडाओरडा करून काय करणार ? थेरडे तुला गोसावीण होऊन रानोरान हिंडायचं असलं तर खुशाल हिंड; पण या वाराणशीसारख्या चटकचांदण्या आपल्या बरोबर हिंडवून त्यांचा सत्यानाश कां करतेस ? मधुमालतीचं फूल रानांत राहून कुजूं द्यायचं नाहीं; त्याला बागेंत नेऊन त्याच्या सुवासाचा उपभोगच घेतला पाहिजे. ही वाराणशी म्हणजे एक सुंदर सुवासिक पुष्प आहे. तिला मी आपल्या बागेंत नेणार. चलारे, हिच्याशीं बोलण्यांत आपला वेळ व्यर्थ काय म्हणून गमावतां ? उचला आपापले बळी, आणखी चालवा डोल्या ठेविल्या आहेत तिकडे."

परंतु हे शब्द त्याच्या तोंडाबाहेर पुरते येतात न येतात तोंच "खबरदार दुष्टांनो गरीब गोसावणींना त्रास दिलात तर ! तुम्हांला लज्जा नाहीं वाटत असल्या पवित्र शरीरांना आपले अमंगळ हात लावून भ्रष्ट करायला पहातां ते !" हे शब्द उच्चारणारा स्वर विलक्षण गंभीर व कठोर होता; इतकेंच नव्हे, तर ज्याला नेहमीं इतरांस हुकूम करून त्याची अंमलबजावणी करून घेण्याशिवाय दुसरी संवयच नाहीं असाच तो पुरुष असावा, हें त्याच्या स्वरावरून व त्याच्या त्या वेळच्या पवित्र्यावरून दिसत होतें. त्याच्या त्या हुकमाबरोबर ते सगळे काळपुरुष प्रथम तर दचकून मागेंच सरले आणि वेड्यासारखे पाहूं लागले. परंतु आपल्या पुढें एकदम आलेला हा गृहस्थ अगदीं एकटा आहे असें पाहतांच त्या त्यांच्या मुख्यास पुन्हां अवसान येऊन तो त्या नव्या गृहस्थास एकदम म्हणतो, "आम्ही सात आठ जण आणखी तूं एकटा. असें असून तूं ज्याअर्थी बिनदिक्कत आमच्या अंगावर आला आहेस, त्याअर्थी तुझी छाती तर जबर खरीच त्याबद्दल अगदीं तुझी तारीफ केली पाहिजे. पण मला वाटतं तूं आपल्या संसाराला कंटाळून कांहीं तरी भयंकर साहस करून जीव द्यावा अशीही बुद्धि मनांत धरून आपल्या ठिकाणाहून निघाला असावास. त्याखेरीज कांहीं कोणी असं मूर्खपणाचं धाडस करणार नाहीं. जा. तुला आपल्या जिवाची इच्छा असली तर जा, नाहीं तर आमच्या सात आठजणांच्या तलवारी तुला कांहीं जिवंत सोडतील असं समजूं नकोस."

खरोखर तें स्थळ व ती वेळ अशा प्रकारें मर्मच्छेदी विनोदाची नव्हे; परंतु हा मूर्ख एकटा सातजणांना अशा प्रकारें धर्षण करण्याला आला, हें पाहून व्याजविनोद करण्याखेरीज दुसरें कांहीं त्या माणसांस इष्टच वाटलें नाहीं असें दिसतें. परंतु

त्या नवख्या गृहस्थानें त्यास उत्तर देण्याची भानगड मुळींच न करतां एकदम आपल्या तलवारीचा फटकारा त्यास लगवावा म्हणून ती उपसली. त्या गोसावणींच्या जिभा जणूं काय आतांपर्यंत त्यांच्या तोंडांत अगदीं बद्ध झाल्या होत्या त्या सुटल्या आणि त्यांनीं खूप मोठा गलगा केला. ते काळपुरुषही आतां त्या एकट्या गृहस्थाच्या अंगावर धांवून जाऊन त्यांनींही गलगा केला. यामुळें अर्थातच तेथून जवळ असणाऱ्या देवळांत बाहेर येऊन बसलेल्या लोकांस तो गलगा ऐकूं गेला व ते धांवत तेथें आले. अर्थातच त्या काळपुरुषांना जें काय साधावयाचें होतें तें कांहीं साधलें नाहीं. जो एक गृहस्थ त्या सर्वांचा मारा चुकवीत होता, त्यास आतां हे सर्वजण मिळून जमीनदोस्त करितात अशा संधीस ही मंडळी आली. त्या देवळांतून आलेल्या मंडळींत एक हत्यारबंद शिपाई होता. त्याच्या दृष्टीस तो देखावा पडतांच त्यास स्फुरण चढलें आणि त्यानें लागलींच आपल्या अस्तन्या चढवून समशेर उपसून त्या एकाकी लढणाऱ्या वीराच्या मदतीस धांव घेतली.

त्या गोसावणी या सपाट्यांत केव्हांच तेथून निसटल्या व देवळांत गेल्या. फक्त माता रणदेवी तेथून हलली नाहीं. आपण कोण काय कांहीं ठाऊक नसतां, केवळ अनाथ गोसावणींचा छळ होतो आहे एवढेंच पाहून जो आपल्या संरक्षणाकरितां धांवला, त्यास कांहीं एक इजा न होतां त्याचे शत्रू नष्ट झाले असें पाहिल्याखेरीज, किंवा त्याला जखम वगैरे झाल्यास ती बांधून त्याची सेवा करून त्यास बरा केल्याखेरीज आपण त्याच्यापासून दूर होणें रास्त नाहीं असें तिला वाटत होतें हें उघडच होय. आपल्या बरोबर असणाऱ्या आपल्या सोबतिणी स्वस्थपणें आपल्या जागीं गेल्या. त्यांच्यावर आलेलें भयंकर संकट दूर झालें याबद्दल तिला फार समाधान झालें हें उघडच आहे.

आलेल्या मंडळींपैकीं तो हत्यारबंद शिपाई त्या एकाकी लढणाऱ्या शूर शिपायाला साहाय्य करण्यासाठीं पुढें झाला, त्याबरोबर सर्व मंडळींनीं त्याची वाहवा केली आणि तिकडे ते काळपुरुषही कच खाऊं लागले. आतांपर्यंत त्यांना असें वाटत होतें, कीं आपल्याशीं एकटा तर एकटाच लढणारा हा पुरुष कितीही शूर आणि कारवाई करणारा असला, तरी काय होणार आहे? किती वेळ टिकणार आहे? त्याला आपण केव्हांना केव्हां तरी उताणा पाडूं. परंतु तसें कांहीं होण्याच्या पूर्वींच दुसरा एक कसलेला माणूस आपल्याशींच लढण्याला आला आणि पुष्कळसे लोक आपल्या भोंवतीं जमले तेव्हां आतां आपण येथून निसटून कसे जाऊं? एवढीच वास्तविक काळजी आतां केली पाहिजे, असें त्यांच्या मनास पूर्णपणें वाटूं लागलें. आमच्या दोन्ही शिपायांनीं त्यांच्या अंगावर नेट केला आणि त्यांस पळण्याखेरीज गत्यंतर ठेविलें नाहीं. त्यांपैकीं एक तर यःपलायनेला आरंभ करावयाचा असा निश्चय करून तो निश्चय अंमलांत आणण्यासाठीं हळूहळू मार्ग शोधूं लागला. गर्दीत एके ठिकाणीं निघून जाण्याजोगी वाट होती. गर्दी पातळ होती. त्या बाजूस स्वारी आपला पाय

हळूहळू वळवूं लागली. ही लढणारी मंडळी घांटाच्या पायऱ्यांवरून वर सपाटीला केव्हांच आली होती आणि तेथून आपला पाय काढावा म्हणून यांची धडपड चालली असतां वर सांगितल्याप्रमाणें एकाची चलबिचल झाली. परंतु लोक आतां त्यास तसे कसचे जाऊं देणार ! तो त्या कमी गर्दीच्या भागाकडे जाऊन पळणार तोंच त्या बाजूचे लोक त्याच्या अंगावर तुटून पडले आणि त्यास त्यांनीं घेरलें. इकडे त्याला घेरण्याबरोबर जो गलगा झाला, तिकडे बाकीच्यांचें लक्ष लागलें आहे अशी संधि पाहून व आपल्या प्रतिस्पर्ध्यांपैकींही एकाचें लक्ष्य त्या बाजूला गेलें असें पाहून त्या काळ पुरुषांपैकीं एक मागून लोकांच्या गर्दीबरोबर जो आला व त्या दुसऱ्याच्या साहाय्याला धांवला, त्याजवर एक असा जोराचा सपाटा मारला, कीं त्यायोगानें तो खालींच बसला. मारणाराचा हात फार दांडगा असला पाहिजे, हें तर आतां अगदीं पूर्णपणें ठरलें. तो जो खालीं बसला त्याला जबरदस्त जखम झाली असावी; कारण तो खालीं बसल्यावर एक क्षण दोन क्षण होतात न होतात तों खालीं पडला. तें पहातांच त्याला मारणारा पार पळाला. जो पडला त्याच्याकडे लोकांचें लक्ष्य गेलें हें त्यास त्या वेळीं अनुकूळच झालें. त्याच्या पाठोपाठ दुसऱ्यानें पाय काढला, तिसऱ्यानें काढला; परंतु चवथ्याला मात्र आमच्या पहिल्या शिपायानें जाऊं दिलें नाहीं. त्याला त्यानें जबरदस्त वार करून खालीं पाडलें. हेंही एक बाकीच्यांस अनुकूळ असेंच झालें ह्मणावयाचें. कारण त्यायोगानें बाकीच्यांस स्वस्थपणें यःपलाय करावयास सांपडलें. पहिला शिपाई खालीं पडला असें पहातांच माता रणदेवी एकदम त्याच्या शेजारीं जाऊन उभी राहिली व मोठमोठ्यानें ओरडून इतर मंडळीस हांका मारूं लागली. रात्र चांदणी होती, यामुळें एवढें बरें होतें, कीं चांगलें स्वच्छ दिसत होतें. तिच्या हांका ऐकतांक्षणींच सर्वजण त्याच्या भोंवतीं जमा झाले.

---

# प्रकरण ३७ वें.

## कोणाचें दर्शन झालें ?

माता रणदेवी ज्या जखमी झालेल्या शिपायाच्या जवळ जाऊन उभी राहिली तो तर अगदीं बेशुद्ध झाला होता. त्याच्या कानशिलावर अगदीं मर्मस्थानीं जरी नव्हे, तरी मर्मस्थानाजवळ जखम आली होती आणि तींतून रक्ताचा एकसारखा पाट चालला होता. तिनें लोकांस हांका मारल्याबरोबर लोक जमा झाले. त्यांपैकीं अनेकांनीं अनेक उपाय सुचविले आणि त्यांतले शक्य तेवढे तेथल्या तेथें करूनही पाहिले. परंतु कांहीं केल्या रक्त म्हणून थांबेना. माता रणदेवी त्याची ती जखम

दाबून धरीत होती. परंतु अशा दाबण्यानें कोठें रक्ताचे पूर थांबले आहेत ! तिनें जखमेचें स्थान घट्ट दाबलें ह्मणजे किंचित् वेळ रक्त थांबे, पुनः दाब किंचित् सैल झाला कीं रक्ताच्या चिळकांड्या उडूं लागत. कांहीं कोणी सांगितलेली भुकटी अगर पाला भरला, ह्मणजे क्षणभर रक्त थांबे, परंतु आंतून त्याचा जोर झाला कीं त्या भुकटी अगर पाल्यासकट तें जोरानें बाहेर येई. हें चिन्ह कांहीं ठीक नाहीं असें माता रणदेवीला वाटलें आणि तिनें शेजारीं उभे असलेल्या लोकांपैकीं एकदोघांस ह्मटलें: " कोणी तरी शहरांत धांवत जाऊन हकीम अगर वैद्यास घेऊन आला तर पहा. या तरुण रजपुतानें आमच्या अब्रूच्या रक्षणासाठीं आपले प्राण धोक्यांत घातले, तेव्हां याला बरा करणें माझें काम आहे तसें सगळ्यांचेंच आहे. तुम्ही कोणी नसाल जात, तर निदान याला देवळांत तरी घेऊन चला. आम्ही उतरलों आहोंत त्या ओंवरींत ठेवा. मी शहरांत जाऊन कोणी तरी वैद्य हकीम पाहून आणतें. "

माता रणदेवीच्या शब्दांत आकर्षकताच विशेष. तिची ती कळकळ पाहूनच कित्येकांनीं "अहो, आम्ही जातों आणि कोणा तरी वैद्याला घेऊन येतों. माताजी, आपण बिलकुल काळजी करूं नका. आम्ही याला उचलून आंत नेतों. "

परंतु तितक्यांत तो दुसरा शिपाई तेथें आला आणि त्यानें काय स्थिति आहे त्याबद्दल चौकशी केली. नंतर शांतपणें त्या जखमी शिपायाजवळ जाऊन त्याची जखम पाहून ह्मटलें: " आपण कोणी शहरापर्यंत जाण्याची तसदी घेऊं नका. येथें पलीकडे मराठे लोकांची एक छावणी पडली आहे, तेथपर्यंत कसा तरी या इसमाला घेऊन चला, ह्मणजे त्या छावणींत याची जखम बंद करण्याची, बांधण्याची आणखी सगळ्या प्रकारची व्यवस्था उत्तम प्रकारानें होईल. मी एक याला उचलायला लागतों, दुसरे आणखी एकदोघे लागा, म्हणजे आतां याला नेऊन पोंचवूं. छावणी लांब नाहीं. आणखी सगळे शिपाईच आहेत. त्यांच्याजवळ ही सगळी सामग्री आहेच. तो दुसरा शिपाई—आपल्या शत्रूपैकीं—पडला आहे त्यालाही घेऊन चला."

परंतु त्या दुसऱ्यास नेण्यास एकही इसम तयार होईना. तेव्हां शेवटीं त्या एकट्यास तरी घेऊन चला असें त्यानें कष्टानें म्हटलें: तेव्हां मग काय विचारतां ? फार चांगली सोय झाली असें ज्याला त्याला वाटलें आणि दोघे चौघे त्यास उचलून नेण्यास तयार झाले. त्या दुसऱ्या शिपायास त्यांनीं आपण दमलां आहां, आपण नुसते चला, आम्ही आपल्या मागें याला घेऊन येतों असें सांगितलें. माता रणदेवीच्या मनांतही आपण याची व्यवस्था काय लागते ती शेवटपर्यंत पाहूं असें आलें व ती गर्दीगर्दीनें आंत आपल्या ओंवरींत जाऊन आपल्या मैत्रिणींस काय हकीकत झाली ती सांगून मी आतां त्या जखमी शिपायाबरोबर जाऊन त्याची व्यवस्था काय होते ती पाहून येतें असें

ह्मणाली. त्या बिचाऱ्या आतां अगदीं घाबरल्या होत्या. त्यांपैकीं वाराणशी तर तिला म्हणाली, " आम्हांला एकट्या टाकून आपण जातां कशा ? आम्ही आपल्याबरोबर येतों. निदान मी तरी येतें. येथें आम्ही बसलों आणखी मघाच्याचसारखा प्रसंग आला तर ! "

माता रणदेवीनें तिला आश्वासून व भीतीचें कारण आतां नाहीं, सगळ्या ओंवऱ्यांतून माणसें आहेत, आणखी मी त्याची व्यवस्था काय लागते ती पाहून येतें, दुसरें कांहीं नाहीं, असें ह्मणून ती त्यांच्यांपैकीं कोणाच्या उत्तराची अपेक्षा न धरतां तेथून बाहेर आली, तों बाकी मंडळींनीं त्या जखमी व बेशुद्ध रजपूत शिपायास उचलून त्या दुसऱ्या शिपायाच्या मागोमाग चालविलें होतें. देवळापासून सुमारें शंभर कदमांवर मंडळी गेलीही होती. माता रणदेवीनें तेवढ्या रात्रींत तशा स्थितींत त्या मंडळीला जाऊन गांठलें. त्या पुढें चाललेल्या शिपायानें ती आली असें पहातांच मोठ्या आदरानें तिला ह्मटलें:

" माताजी, आपण कशाला तसदी घेतली ? हा कोणीही रजपूत असो. शूर मर्द आहे. माझा भाऊ आहे असें मी समजतों. त्याला बरा करण्याला जितकी काळजी घ्यायची आणखी व्यवस्था करायची, तितकी मी करतों. आपल्यासारख्या वृद्ध माउलीला तसदी व्हावी हें मला बिलकुल बरें वाटत नाहीं. आपण देवळांतल्या आपल्या ओंवरींत बसा. मी याची व्यवस्था लावतांच, काय व्यवस्था लावली काय नाहीं, त्याबद्दलची माहिती जासूद पाठवून कळवतों, आणखी दर प्रहरा प्रहरानें पाहिजे तर त्याची हालहवाल कळवीन. पण कृपा करून आपण कष्ट करूं नका. झाला हाच त्रास आपल्यासारख्याला किती तरी झाला ! "

परंतु माताजी कांहीं केल्या ऐकेना. शेवटीं तो शिपाई तिला म्हणाला: " निदान आपण इथें देवळांत बसा. आपल्याला मी एक म्याना पाठवून देतों. आमच्या छावणींत बरेच म्याने आहेत. ह्मणजे आपल्याला त्रास होणार नाहीं. "

परंतु तेंही माता रणदेवीस बरें वाटलें नाहीं. ती ह्मणाली: " महाराज, माझी आपण काळजी करूं नका. मी आज कित्येक वर्षें अशी हिंडतें आहें, आणखी आतां काय तुमच्या म्यानांत बसूं ? तुह्मी एवढ्या आदरानें मला म्हणतां आहां पण माझें व्रत पायीं चालण्याचें. आपल्या मनाला बिलकुल संकोच वाटायला नको. मी काशीपासून रामेश्वरापर्यंत पायीं तीर्थयात्रा करीत आलें ती काय मेण्यावर अवलंबून ! "

तो शिपाई मग पुढें जास्त कांहीं बोलला नाहीं. मात्र मोठ्या पूज्य बुद्धीनें तिच्याजवळून चालूं लागला. हा शिपाई कोण असावा याबद्दल तीही मनांतल्या मनांत तर्क करीत त्याच्याबरोबर चालली.

सर्व मंडळी त्या शिपायाच्या छावणीजवळ जातात तों तेथून कांहीं मंडळी मशाली वगैरे घेऊन समोरून येतांना दिसली. आमच्या शिपायानें मोठ्यानें कांहीं

खुणेचा शब्द उच्चारून त्यांस हटकलें. त्याबरोबर त्यांच्यापैकीं एक पुढें होऊन फार नम्रपणें रामराम करून एकदम म्हणालाः " महाराज, आह्मी आपल्याच शोधासाठीं चाललों होतों. आपण भगवान् शंकराच्या दर्शनाला ह्मणून गेलां. बरोबर कोणी नाहीं......"

परंतु आमच्या शिपायानें त्या बोलणारास मध्येंच थांबवून म्हटलें, " आम्ही आपली हकीकत मग सांगूं; परंतु तान्हाजी, या आम्ही आपल्याबरोबर आणलेल्या जखमी शिपायाची जखम बांधण्याची तजवीज करा. आणखी दुसरी कांहीं मंडळी पाठवून दुसरा एक इसम त्या दंग्याच्या जागीं जखमी होऊन पडला आहे त्यालाही आणण्याची तजवीज ताबडतोब करा. लढेपर्यंत तो शत्रु. आतां तो दयेला पात्र. चला आटपा."

ते शब्द ऐकतांच माताजी त्याजकडे फार आदरबुद्धीनें पाहूं लागली. त्या जखमी शिपायाकडे सर्व वळले. त्यांनीं त्याला एका तंबूंत नेलें. लागलीच बरोबरच्या वैद्यबोआंस व इतर त्यांतली ज्ञानी मंडळी होती त्यांस बोलावून आणून त्याच्या जखमेची धू पूस करून जे काय बरोबर उपचार करावयाचे ते करण्यांत मंडळी गुंतली. कांहीं लोक त्या दुसऱ्या शिपायास आणण्यास गेले.

आमचा शिपाई– ज्याला त्या छावणींतील लोक अत्यंत आदरानें म
महाराज म्हणत होते, तो–माता रणदेवीकडे वळून म्हणालाः " माताज
तर आपल्याला कांहीं काळजी नाहींना ? आतां जर त्याच्या आयुष
बळकट असली, तर सर्व गोष्टी अगदीं जशा हव्या तशा होतील
भरसुद्धां कसूर होणार नाहीं. आपल्याबरोबरच्या बाया
आणून आपण आमच्या छावणीबरोबर प्रवास करीत
इकडे बोलावतों. नाहींपेक्षां आपणास तिकडे पोंचवितों.
आपल्याला याची खबर देऊन आपल्याला इकडे आ
जशी आपली आज्ञा होईल तसें करीन. मी आप
समजा."

त्या शिपायास छावणींतले लोक " महाराज.
होते, तें पाहून माता रणदेवी आपल्याशीं विचार
पुरुष कोण असावा ? त्या छावणींतले लोक एक
बोलत नव्हते. मराठी भाषेंत बोलत होते यावरू
असा तिनें तर्क केलाच होता. तिला स्वतःला
असतांना अनेक क्षेत्रांच्या ठिकाणीं व मार्गाव
कानावरून गेलें होतें. हा ' महाराज महाराज
मराठ्यांचा राजा शिवाजी तर नव्हे ! असें ति
तर्क खरा कीं खोटा हें पहाण्यासाठीं तिनें एक

कृपाळू, पीडित लोकांचा कनवाळू, आणखी मोठा तेजस्वी दिसतोस, तेव्हां तूं या मराठ्यांचा राजा शिवाजी तर नव्हेस ! पण तुला मारण्यासाठीं अंगावर येणारा शत्रू जखमी होऊन पडला म्हणजे त्याच्या जिवाचीसुद्धां काळजी घेणारा त्या शिव-राजाखेरीज कोण असणार ? तूं तोच ना !"

त्या प्रश्नास त्यानें कांहीं उत्तर दिलें नाहीं. अत्यंत विनयानें त्यानें आपली मान मात्र लववली आणि माता रणदेवीस फार लीनपणें नमस्कार केला. तें पहातांच माता रणदेवीच्या नेत्रांत एकदम अश्रुपूर लोटला आणि तिनें त्याचेवरून हात ओवाळून तोंडानें कांहीं उच्चारलें. नंतर त्यास आपल्या अगदीं जवळ बोलावून ह्मटलें " बाबा, तुला भगवान् एकलिंगजी दीर्घायुष्याचा करो. तूं आपल्या आईबापांच्या पोटीं येऊन जन्माचं सार्थक केलंस. तुझी मीं कीर्ति फार ऐकली, आणखी आज प्रत्यक्ष तुला पाहिलं. समाधान झालं. आमच्यासारख्या गोसावणींच्या जिवासाठीं तूं सात आठ मारेकऱ्यांच्या अंगावर तुटून पडलास, तेव्हां तुझ्या आईचा कुसवा धन्य ! परमेश्वर तुला खचित खाचित यशस्वी करील. तूं आतां इकडे कोणीकडे चाललास ? एवढासा लहान लवाजमा घेऊन तूं उत्तरेकडे चाललास, पण बादशहा ...जेब फार नीच, फार दुष्ट, आणखी कपटी. कोण्या वेळीं तुला काय करील ...प नाहीं...... "

महाराज अगदीं नम्रपणें उभे राहिले होते व आपल्या तोंडावरून हात ...बोलणार, तोंच त्या जखमी शिपायाच्या जखमेंतून रक्त ...झालें असून त्याला आतांच वैद्यबोआंनीं कांहीं औषध ...आहे. वैद्यबोआंचें म्हणणें, कीं आतां त्याच्याबद्दल ...रण नाहीं, तो सकाळीं चांगला खडखडीत उठेल असें सांगितलें.

...फार समाधान झालें व ती एकदम उठून शिवाजी ...जा, आतां माझ्या जागीं मी जातें. तेथें माझ्या ...वाट पहात असतील, ज्यांनीं आम्हांला संकटांतून ...यांत घातले त्यांची नीट व्यवस्था, शुश्रूषा होते ...ऊन मी इकडे आलें. पण माझ्या हातून कांहीं ...आतां सकाळीं आम्ही आपल्या मार्गाला ...ई देऊन जातें. मात्र सकाळीं या आमच्या- ...पायाची हालहवाल काय आहे तेवढी ...लं. नाहीं तर आम्हीच जातां जातां ...ची परवानगी असूं दे. सकाळीं त्याला ...म्हणजे चिंता निवारली. येतें आतां...... "

...नानाजीकडे वळून म्हणतातः—" तान्हा,

माताजींच्या बरोबर जा. त्या म्यान्यांत बसतच नाहींत, इलाज नाहीं. पण तूं बरोबर मशाली घेऊन माताजींना अगदीं देवळांत पोंचवून ओवरी पाहून ये. सकाळीं तुलाच यांच्याकडे निरोप घेऊन जावें लागेल."

माताजी त्यावर कांहीं बोलली नाहीं. नुसतें पुज्यबुद्धीनें व कौतुकानें तिनें शिवाजी महाराजांकडे पाहिलें आणि आपला मार्ग धरला. तानाजी तिच्याबरोबर गेला. देवळापर्यंत जाऊन त्यानें तिला अगदीं ओवरीपर्यंत पोंचविलें व तिला वंदन करून तो परत फिरला.

इकडे माता रणदेवीच्या मैत्रिणी देवळाच्या त्या ओवरींत येऊन बसल्या होत्या, तरी अजून त्यांचें भय कसें तें कमी झालें नव्हतें. माता रणदेवी केव्हां येईल असें त्यांना होऊन गेलें होतें. थोडें कुठें कांहीं वाजलें, कीं त्या दचकत अगर माता रणदेवी आली कीं काय तें पहाण्यासाठीं पुढें येत. वास्तविक ह्मटलें म्हणजे आतां त्या देवळांत इतकी गर्दी झालेली होती, कीं त्यांनीं कशालाही भिण्याचें मुळींच कारण नव्हतें; परंतु संध्याकाळच्या त्या प्रसंगानें त्यांचा जीव इतका भिऊन गेला होता, कीं त्यांस आपल्यावर कोण्या वेळीं काय प्रसंग येईल आणि काय नाहीं असें वाटूं लागलें होतें. आपण यःकश्चित् गोसावणी आणि आपल्याला ते काळपुरुष पकडण्यासाठीं आले, यांतला हेतु तरी काय ? एक दुसरीला ह्मणे तुझ्यामुळें आले, दुसरी पहिलीला म्हणे तुझ्यामुळें आले, असा प्रकार चालला होता. कौसल्या वगैरे सर्वजणी त्या अल्लड वाराणशीला फारच चिडवीत होत्या. कां कीं, ती अगदीं तरुण, फार सुस्वरूप, तेजस्वी आणि तिचा स्वर फार फार मधुर होता. हिच्या लोभानेंच ते काळपुरुष आपल्या पाठीमागें आले अशी त्यांची साऱ्यांची समजूत झाली होती. आतां त्यांना असेंही आठवलें, कीं आदल्या एक दोन मुक्कामाला, आपलें नित्याचें भजन चाललें असतां कांहीं मंडळी तेथें येऊन वाराणशीकडे फारच चमत्कारिक दृष्टीनें पहात होती. हीच मंडळी आपल्या मागोमाग येथें येऊन अशा वेषानें आपणास गराडा देऊन पकडण्यास आली असावी. त्याखेरीज दुसऱ्या कोणाचा संशय घेण्यास जागाच नव्हती. ती भजन ऐकण्याच्या मिषानें आलेली मंडळी वाराणशीकडे ज्याअर्थी इतक्या चमत्कारिक नजरेनें पहात होती, त्याअर्थी तिच्याचकरितां त्यांचा हा प्रयत्न असला पाहिजे, असा कौसल्या वगैरेंचा समज झाला आणि त्या समजाप्रमाणें तिला त्या चिडवीत होत्या. इतकेंच नव्हे तर तूं आपली कोठें तरी सुरक्षित जागीं जाऊन राहून मग कोणाच्या तरी आश्रयानें आपल्याला जायचें तिकडे जा. आमच्यासारख्या गोसावणींच्या नादाला लागशील तर विनाकारण आपलेंही कांहीं तरी करून घेशील आणि आम्हांलाही त्रास होईल असें सुद्धां त्या चौघींपैकीं एकजण—अनसूयाच असावी—म्हणाली. अनसूया असें म्हणण्याला आणि माता रणदेवीनें ओवरींत पाय ठेवण्याला एकच

गांठ पडली; परंतु माता रणदेवीला तानाजीला आशीर्वाद देऊन परत लावावयाचें होतें, यामुळें ती त्या वेळीं कांहीं बोलली नाहीं. तानाजी गेल्यानंतरही कांहीं वेळ ती त्यांच्याशीं इकडच्या तिकडच्या गोष्टी सांगूं विचारूं लागली. "तुह्मी निजलां कां नाहीं ? कोणाला कांहीं भूक नाहीं का ? कांहीं खाल्लें का ? वाराणशी, अशी घाबरल्यासारखी कां करतेस ? तूं अजून पोरवय आहेस यामुळें तुला भय वाटतें. पण तूं आतां परमेश्वराच्या-शंकराच्या भजनीं लागलीस, आतां दिवसानुदिवस तुझें भय कमी होईल." इत्यादि गोष्टी बोलून व तिला आश्वासन देऊन माता रणदेवी अनसूयेकडे वळून म्हणालीः "बेटा अनसूये, मी आतां आलें तेव्हां या बिचाऱ्या वाराणशीला काय म्हणत होतीस ?"

माता रणदेवीचा हा प्रश्न ऐकतांक्षणींच वाराणशी एकदम रडावयास लागली. तिचे हुंदके तिला आवरेनात. तिनें माता रणदेवीच्या पायांवर लोटांगण घातलें आणि ती कांहीं बोलूं लागली. परंतु तिच्या हुंदक्यांत ती काय बोलते आहे तें माता रणदेवीस किंवा दुसऱ्या कोणास कांहीं समजेना. माता रणदेवीनें तिला उठविलें व जशी एखादी अत्यंत वत्सल माता आपल्या दुःखित कन्येला पोटाशीं धरून तिचें सांत्वन करिते, त्याप्रमाणें तिचें ती सांत्वन करूं लागली. माता रणदेवीनें वाराणशीला याप्रमाणें पोटाशीं धरल्यावर तिला थोडासा धीर आला, तिनें आपलें रडें आवरण्याचा यत्न केला आणि ती एकदम माताजीस म्हणालीः "माताजी मला आतां आपण पोटाशीं धरलें आहे. आतां मला दूर करूं नका. तूं आमच्या बरोबर नकोस असें म्हणूं नका. मी तुमची सगळ्यांची बटीक होऊन तुमच्या बरोबर राहीन; तुमची वाटेल ती सेवा करीन, पण ही अनसूया आणखी या कौसल्या म्हणतात तसें तुम्ही मनांत आणूं नका. मी अगदीं परदेशी झालें आहें. मला या जगांत माझें असें कोणी नाहीं. निदान या देशांत तरी कोणी नाहीं. तेव्हां देशीं गेल्यावर माझ्या मावशीच्या स्वाधीन मला करा, तोंपर्यंत तुम्ही माझी आई. तुम्ही मला सर्वस्वी आधार ! या सगळ्याजणी मला म्हणतात, तूं तरुण, तूं सुस्वरूप, तुझ्यामुळें हे असे प्रसंग आमच्यावर आले, तर तूं आपली चालती हो ! माताजी, मी सुस्वरूप असलें, तरुण असलें, तर त्याला माझा काय उपाय ? तुम्ही धुमींतलें एखादें जळलें लांकूड घेऊन माझ्या तोंडावरून सगळीकडून ओढा म्हणजे तरी कोणी माझ्यामागें लागणार नाहीं. या स्वरूपानेंच माझा सगळा सत्यनाश झाला. माताजी, मी आपली सगळी हकीकत आपल्याला सांगितलीच आहे !"

तिचें तें करुण भाषण ऐकून माता रणदेवीनें तिला आणखी एकवार आपल्या पोटाशीं घट्ट धरलें आणि ती कौसल्या अनसूया यांच्यावर कडाडून म्हणालीः

"कौसल्ये, अनसूये, इतके दिवस माझ्या सहवासांत राहून तुम्ही हेंच का शिकलां ! हीच का तुमची भूतदया ? वा !"

अनसूया तत्काळ म्हणाली:–"मीं खरोखर तिचा विनोद केला. आपण एकदां जिचा अंगीकार केला, तिला कालत्रयींही कधीं अंतर देणार नाहीं हें काय मला माहीत नाहीं. ही अल्लड पोर किती भिते हें सहज थट्टेनें बोलून पहाणार होतें. पहातें तों अगदींच भित्री !"

"वा ! भित्री म्हणून तिला घाबरवायचें काय ? पुनः असा विनोद करायचा नाहीं. आतां मी एक मोठी आनंदाची गोष्ट तुला सांगतें. आज आपल्याला कोण्या पुण्य पुरुषाचें दर्शन झालें तें ऐका. दक्षिणेंत आपण असतांना ज्या पुरुषाचें नांव गोब्राह्मणप्रतिपालक म्हणून पावलोंपावलीं ऐकत होतों, तोच आपल्या सोडवणुकी-ला धांवला होता !"

सर्वजणी अत्यंत आश्चर्यानें एकदम उद्गारल्या:—

"कोण ? शिवाजीमहाराज !"

---

# प्रकरण ३८ वें.

## गोसावणींच्या गोष्टी.

शिवाजीमहाराजांचें नांव ऐकतांच सर्वजणी अगदीं चकित नेत्रांनीं माता रण-देवीकडे पाहूं लागल्या. नंतर त्या सर्व रात्रभर शिवाजीमहाराजांच्या व त्यांच्या पराक्रमांच्याबद्दलच गोष्टी बोलत होत्या. त्या रात्रीं त्यांना झोंप कोठली ? केव्हां आपल्यावर हल्ला करणाऱ्या लोकांबद्दल कांहीं तरी बोलणें होई; पुनः आप-णास त्या दुष्टांपासून शिवाजीमहाराजांनीं सोडविलें याबद्दल गोष्टी चालत. अशा गोष्टी होतां होतां सुप्रभात झाली. गोसावी, बैरागी वगैरे लोकांना दक्षिणचा राजा ऐकून चांगला ठाऊक होता. मुसलमानांच्या कचाट्यांतून आपल्या देशाला सोडवून गोब्राह्मणांचा प्रतिपाळ करण्यासाठीं त्याचा एकसारखा खटाटोप चालला आहे, हें जिकडे तिकडे महशूर होतें. आणि तें महशूर होण्याला जीं अनेक कारणें होतीं त्यांपैकीं सगळ्यांत मोठें कारण म्हणजे भारतवर्षाच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत एकसारखे हिंडत रहाणारे हे यात्रेकरू–गोसावी बैरागी,–तडीतापसीच होत यांत तिळमात्र संदेह नाहीं. आपल्या धर्मावर औरंगजेबानें काय अनन्वित जुलूम चालविले आहेत; त्यानें कित्येक देवळांत गाई कापवून त्या देवळांचा कसा उच्छेद करविला व तेथें मशिदी कशा बांधल्या, याचें ज्ञान जितकें या बैराग्यांस व तापशांस तितकें तें कोणासच नसावयाचें, यामुळें या सर्व लोकांस असें वाटत

होतें, कीं कोणी तरी अवतारी पुरुष जन्मास येऊन तो ही भरतभूमि या जुलुमी पादशहापासून कधीं तरी सोडवील ! आणि शिवाजीमहाराजांनीं असा कांहीं उपक्रम चालविला आहे असें त्यांस समजतांच ते सर्व त्याला चिरायुष्य चिंतूं लागले. दक्षिणेंत जे तीर्थाटनें करीत आले त्यांपैकीं पुष्कळांना अशीही उत्सुकता होई, कीं हा महात्मा आपणास पहावयास मिळेल तर फार चांगलें होईल; परंतु शिवाजीमहाराजांच्या हालचाली त्यांच्या त्यांनाच नक्की ठाऊक नसल्यामुळें त्यांचें प्रत्यक्ष दर्शन कोणासही फार क्वचितूच घडावयाचें. आतुरता मात्र सगळ्यांना अतिशय उत्कट असावयाची. तशीच उत्कट आतुरता या बायकांना—गोसावणींना—होती. सकाळ होतांच माता रणदेवी ह्मणालीः आपण आतां येथून निघून शिवाजीच्या छावणींत जाऊं. त्याचें दर्शन तुह्मांला होईल. त्या जखमी शिपायाचा समाचार घेऊं आणि पुढें जाऊं. " तें ऐकतांच कौसल्या वगैरेंस फार आनंद झाला. शिवाजीच्या दर्शनाबद्दलची आपली उत्कट आतुरता आज खरोखर तृप्त होण्याचा प्रसंग जवळ आला आहे. शिवाजीमहाराज आपल्या माता रणदेवीला दिसले, आणि आपण माताजीबरोबर जर गेलों तर ती मूर्ति आपणास पहाण्यास सांपडणार हे विचार मनांत येतांच त्या सर्वजणींचे नेत्र आनंदानें प्रफुल्लित झाले.

कौसल्या तर एकदम माताजीस ह्मणाली, " माताजी, आमचें तरी दैव काय हो ! इतके दिवस आपण दक्षिणेंत हिंडलों, परंतु आपणास ह्या पुण्य पुरुषाचें दर्शन होण्याची संधि सांपडली नाहीं आणि जिकडे त्याचें दर्शन होण्याचा मुळींच संभव नाहीं, तिकडे आपण येतों तों त्याचें दर्शन होतें ! तेव्हां योगायोग ह्मणतात तो हा असा. पण माताजी, तो पुण्य पुरुष या प्रांतांत कसा आला ! त्याला इकडे येण्याला काय बरें कारण झालें ? इकडला प्रांत काबीज करण्यासाठीं कांहीं त्याचें येणें झालें नसावें ! पण मी वेडी काय विचारतें ! आपल्याला थोड्या दिवसांपूर्वीच कोणींसें सांगितलें नाहीं का कीं औरंगजेबानें दिलेरखान आणखी राजा जयसिंग यांना इकडे पाठवून त्यांनीं धुमाकूळ चालवून शिवाजीराजास तह करण्यास लाविलें. त्या तहावरून कायसा त्याचा बहुतेक प्रांत या दोघांनीं आपल्या ताब्यांत घेऊन याला औरंगजेबाकडे रवाना केलें. माझी तरी अगदीं शिकस्त आहे विसराळूपणाची ! शिवाजी त्या तहाच्या अटीप्रमाणें अलमगिराकडे जावयाचा असें ठरलें आहे खरें, आणखी त्यामुळेंच तो इकडे चालला असेल. अहाहा, परमेश्वराची तरी ही काय लीला आहे पहा. केवळ गरीबगुरीबांची सुटका व्हावी, धर्माचा छळ होतो आहे तो होऊं नये ह्मणून जो कायावाचामनानें श्रम करीत होता. त्याचा त्यानें पराभव घडवून आणला ! त्याला मुठींत लाविलें आणि त्याला या जुलुमी बादशहाच्यापुढें उभें रहाण्यास इकडे आणलें. माताजी, तुह्मीच ह्मांला त्या काळपुरुषांपासून सोडविलें नसतें तर आज

आमची काय अवस्था झाली असती! त्यानें केवळ आमच्यासारख्या गरीब गाईंचा छळ होऊं नये, ह्मणून सात आठ काळपुरुषांच्यावरही तुटून पडण्यास मागें पुढें पाहिलें नाहीं. एकट्यानें सहासात पुरुषांवर—सशस्त्र पुरुषांवर—आपली एकट्याची तलवार चालवून आपला जीव धोक्यांत घालाव-याचा ह्मणजे कांहीं लहानसान गोष्ट नव्हे. धन्य त्याची! खरा गोब्राह्मणांचा कैवारी तो! आह्मी साऱ्याजणी गाई नाहीं तर काय! माताजी, आह्मांला तुह्मी घेऊन चलाच. त्याचें दर्शन आह्मी घेऊंच या. त्याचें दर्शन घेतल्याखेरीज कधींही आह्मी बऱ्हाणपुरामधून पुढें जाणार नाहीं."

कौसल्येचें हें बोलणें चाललें असतां दुसऱ्या सगळ्याजणी माताजीकडे नुसत्या पहात होत्या. त्या कांहीं बोलल्या नाहींत. मात्र वाराणशी शेवटीं ह्मणाली, "माताजी, आपल्याला सोडवायला धांवलेला दुसरा पुरुष कोण? त्याला फार जबर जखमा लागल्या आहेत ना? त्याचीसुद्धां चौकशी आपण करायला पाहिजेना? त्यानेंही आपल्याकरितां आपला जीव फार धोक्यांत घातला, तेव्हां त्याची विचारपूस करायला आपण पुढें गेलें पाहिजे."

माता रणदेवी तीस म्हणतेः "वाराणशी, त्यानें तर आपल्याकरितां जबर जखम खाल्ली, तेव्हां त्याला कशी विसरूं? त्याची प्रकृति कशी काय आहे ती बातमी प्रातःकाळ होतांच तुह्मांला सांगण्यासाठीं एक माणूस पाठवीन महाराजानीं त्यांनीं आपण होऊन मुद्दाम मला सांगितलें. तेव्हां तो निरोप आतां आपल्याला कळेल व आपण तिकडे जाऊं. मी रात्रीं मराठ्यांच्या छावणींतून इकडे आलें, तेव्हां शिवाजीमहाराजानीं मला पोंचवण्याला जो माणूस दिला होता, तोच माणूस सांगायला येणार आहे. एव्हांना आला कसा नाहीं याचेंच मला थोडें आश्चर्य वाटतें आहे."

इतकें त्यांचें बोलणें चाललें होतें, तों तान्हाजी माता रणदेवीची चौकशी करीत तेथें आला. त्यास पहातांच माता रणदेवी एकदम पुढें होऊन म्हणालीः "आलांत, फार चांगलें झालें. कशी काय आहे त्या शिपाईगड्याची तब्येत? त्या बिचाऱ्यास आमच्यामुळें ह्या यातना भोगाव्या लागल्या. आम्ही त्याच्या आतां कशा उतराई होणार? तो शुद्धीवर तरी आला आहे का? तो बोलूं चालूं लागला असल्यास त्याच्याकडे जाऊन दोन गौरवाचे शब्द बोलूं."

तान्हाजीनें त्यांस वंदन केलें व ह्मटलें: "माताजी, महाराजानीं सांगितलें आहे, कीं त्या शिपायाची आपणांस आतां बिलकुल काळजी नको. त्याला रात्रीं फार गाढ झोंप लागली होती. जखमेंतून रक्त वहाण्याचें केव्हांच बंद झालें. सकाळीं तो जागा झाला तेव्हां खडखडीत बोलूंही लागला होता. मीही येते वेळीं त्याला पाहून आलों. त्याची जखम थोडी मर्मस्थानीं होती, परंतु आमच्या वैद्यबोआंनीं फार उत्तम औषधयोजना करून त्याला काळाच्या दाढेंतून ओढून काढलें. नाहीं तर कान-

शिलासारख्या मर्मस्थानावर जखम झाली, ह्मणजे कधीं कोणी सहसा जगत नाहीं, पण आमचे वैद्यबोआ कसले ! दुसरा मात्र विचारा मेला."

तान्हाजीचें तें बोलणें ऐकून माताजीस फार वाईट वाटलें व आनंदही झाला. आपल्याकरितां कोणी आपला जीव धोक्यांत घातला, आणि तो जीवास मुकला असें झालें नाहीं, यांत तिला केवढें समाधान होतें ! त्या समाधानाच्या भरांत ती तान्हाजीस ह्मणालीः " बाबा, तुझ्या तोंडांत साखर पडो. तूं फार चांगली बातमी आणलीस. आह्मांला संकटांतून सोडविण्यासाठीं आपला जीव धोक्यांत घालणाऱ्या एका वीराचा जीव गेला असें जर ऐकलें असतें, तर जन्मभर मनाला खाल्लें असतें, कीं आपल्याकरितां एका प्राण्याचा जीव गेला. आतां एवढी आमच्यावर कृपा करा. आह्मांला आपल्या छावणींत घेऊन जाऊन एकवार महाराजांना भेटवा. आह्मी त्यांचा निरोप घेऊं, त्या जखमी झालेल्या शिपायासही भेटूं आणि मार्गाला लागूं. ते काळपुरुष कोण आणखी कुठून आमच्या मागें आले होते कोणास ठाऊक ! पण आतां आम्ही दुसराच मार्ग धरून त्यांना फसवूं ह्मणजे झालें."

" माताजी " तान्हाजी दोनही हात जोडून नमस्कार करून ह्मणतोः " मी आपल्याला छावणीकडे नेण्यासाठींच आलों आहें. महाराजांनीं मला सांगितलेंच आहे, कीं आपल्याला छावणींत चलण्याबद्दल विनंति करावी. आपण होऊनच येतां आहां तेव्हां महाराजांची इच्छा आपल्याला निवेदन करण्यापलीकडे माझें कांहींच काम राहिलें नाहीं. तर आतां आपलें कांहीं सामानसुमान असेल तर तें मी घेतों. आणखी आपण माझ्याबरोबर चलावें."

रणदेवी हंसून ह्मणतेः " बाबारे, आमचें सामान आमच्या पाठीवर. सामानसुमान बैरागणींना कसलें ? आमचें आम्ही घेतों."

परंतु तान्हाजीनें फारच आग्रह केल्यामुळें त्यांनीं त्याच्याजवळ सर्वांचें सामान दिलें आणि त्या सर्वजणी चालूं लागल्या. आपणास शिवाजीमहाराजांचें दर्शन होणार ह्मणून सगळ्याजणींनाच आनंद झाला. त्याचप्रमाणें आपल्याकरितां ज्यांनीं आपले जीव धोक्यांत घातले, त्यांच्यापैकीं कोणाच्याही जिवास धोका झाला नाहीं हें पाहून तर त्यांस विशेषच आनंद झाला. त्या मोठ्या आनंदानें चालल्या होत्या. योग्य वेळांत महाराजांच्या छावणींत जाऊन पोंचल्या. महाराजांनीं त्यांस पहातांच मोठ्या आदरसत्कारानें त्यांचें स्वागत केलें. त्या शिपायाची प्रकृति आतां अगदीं बरी आहे, ह्मणून त्यांनींही माता रणदेवीस सांगितलें, तेव्हां माता रणदेवी त्यांस म्हणालीः " महाराजा, तुझी पुण्याई फार जबर आहे. चार दिवस जरी तुला पड खावी लागत आहे, तरी अंतीं तुझा जयच होणार याबद्दल तुला अगदीं शंका नको. तूं अलमगिराच्या खाईंत जातो आहेस हें मात्र बरोबर नाहीं. तो फार कपटी—अत्यंत कपटी. कपटाचा मूर्तिमंत पुतळा आहे ! तर आतां तूं असें तरी

कर, कीं त्याच्याशीं फार सावधगिरीनें वाग! तो कोण्या वेळीं काय घात करील याचा बिलकुल नेम नाहीं. त्यानें आजपर्यंत कित्येकांना आपल्या कपटजालांत गोंवून त्यांचा सत्यनाश केला याची तुला कल्पना येणार नाहीं. आतां तूं येथपर्यंत आला आहेस. तुला माघारीं जाणें शक्य नाहीं. माघारीं जाऊन कांहीं फायदाही नाहीं. परंतु तूं फार सावधगिरीनें रहा. दुसरें तुला मी गरीब बैरागीण काय सांगणार? तुझें कल्याण होईल. यापलीकडे तुला आशीर्वाद तरी काय देणार? पण माझा आशीर्वाद कधीं खोटा होणार नाहीं. आम्हांला एकवार त्या जखमी शिपायाची भेट घेऊं दे म्हणजे आम्ही जातों. आतां आणखी कांहीं आम्हांला सांगायचें नाहीं. ज्यानें आमच्या जिवाकरितां आपला जीव धोक्यांत घातला त्याला एकदां भेटावें तें चांगलें."

महाराजानीं तिचें बोलणें ऐकलें आणि म्हटलें: "माताजी, आपल्यासारख्यासाठीं जो आपला जीव धोक्यांत घालायला मागें घेईल, तो काय माणूस म्हणायचा? आपण त्याला भेटा, पण माझी एक विनंति आहे ती ऐकून मग काय आपल्याला करायचें तें करा. माझी इच्छा अशी आहे, कीं आतां या पुढें आपल्याला प्रवास करायचा तो आमच्या छावणीबरोबर करावा म्हणजे आपल्यावर तसे कठिण प्रसंगच येणार नाहींत. आपणच विचार करा, कीं कालच्यासारख्या प्रसंगीं जर त्या दुष्ट पुरुषांचा कावा साधला असता, आमच्या हातून त्यांचा पराजय झाला नसता, तर आपल्यावर केवढा प्रसंग गुदरला असता! आपण जिथें कुठें जाणार असाल तिथें पोंचविण्यास पाहिजे तर चारदोन शिपाई देईन. आपला व आमचा रस्ता एक असेल तोंपर्यंत आपली आम्हांलाही संगति लाभेल. आपलें रोज चार पांचदां दर्शन होईल, आणखी त्यामुळें आमचाही काळ पवित्र गोष्टींत जाईल. जेथून रस्ता फुटेल तेथून आपणांस पोंचविण्यासाठीं मी चारसहा माणसें देईन. पण आपण आतां कांहीं मजलपर्यंत तरी एकट्या जाऊं नका."

तें ऐकतांच माता रणदेवी हंसली व म्हणाली: "महाराजा, तुला जी आमच्याबद्दल काळजी वाटते ती अगदीं यथार्थ आहे. कारण तूं स्वभावतःच दीनांचा दयाळू, गरिबांचा कनवाळू असा आहेस. पण आम्ही तर तापसी! दर घटकेला जर कोणाच्या आश्रयाची अपेक्षा करूं लागलों, तर आमचें निभावें कसें? तूं म्हणालास तें ठीक आहे, पण आमचा आम्हीं विचार केला पाहिजेना. कुठवर आम्हीं याचना करायची, कुठवर लोकांना त्रास द्यायचा........."

परंतु महाराजानीं त्यांस पुढें बोलूं दिलें नाहीं. ते मध्येंच म्हणाले "माताजी, आपण मला मातेसमान आहां. आपल्याला मी दुरून पाहिल्या वेळेपासून माझ्या मातेचें—जिला मी दक्षिणेंत सोडून इकडे चाललों आहें तिचें—स्मरण झालें. ती अशीच आपल्यासारख्या पावित्र्यतेजानें नुसती तळपते आहे. आपल्याचप्रमाणें तिची कांति आहे. ती माझी माता, तिच्या हातांत सर्व अधिकार. तिच्या आज्ञेचें उल्लंघन कोणी तिळभ-

रही करावयाचें नाहीं, परंतु तिची वृत्तिही अगदीं आपल्याप्रमाणें. संसारांत असून अगदीं अलिप्त. तेव्हां आपण मजजवळ असलां तर मला माझी माता माझ्याजवळ असल्याप्रमाणें वाटणार आहे......... "

माता रणदेवीनें त्याचें तें बोलणें अगदीं शांतपणें ऐकून घेतलें; परंतु तो तिचा शांतपणा एकदम नाहींसा झाला. तिच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले. त्या अश्रूंनीं व्याप्त अशा नेत्रांनींच ती शिवाजीमहाराजांकडे पहात म्हणालीः "महाराजा, माझा पुत्र जर तुझ्यासारखा असता, तर मी अशी देशोधडीला कशाला लागलें असतें ! ... पण मी हें काय बोलतें. राजा ! मला मोह घालूं नको. मी हा मातृमोहाचा पाश एकदां ताडकन तोडून टाकला आहे. तो मी पुनः जडवून घेऊं इच्छीत नाहीं. माझी मी एकटी तीर्थयात्रा करीत हिंडतें. या माझ्या लहान मैत्रिणी केवळ वाटेंत माझ्या सोबतीसाठीं म्हणून मजबरोबर आहेत. नाहीं तर जशी माझी मी एकटी, तशीच प्रत्येकजण एकटीच आहे. जशी मी माझ्या दुर्दैवानें बैरागीण झालें, तशाच याही बैरागिणी झाल्या आहेत. तेव्हां जिची ती स्वतंत्र आहे. पण तुझ्यावर आम्हीं आपली काळजी कां घालावी ? आम्ही स्वच्छंदानें जाऊं. आलाच प्रसंग तर भगवान् एकलिंगजी आमचें त्यांतूनही आजच्याचप्रमाणें संरक्षण करील. आज तरी तूं जवळ असशील असा काय भरंवसा होता ! परमेश्वराच्या मनांत आमच्यावर प्रसंग आणून तुझ्या हातून आमची सुटका करवावयाची होती, ती त्यानें केली. पुनः संकट कदाचित् यायचेंच नाहीं. आलेंच तर तो असेंच रक्षण करील; नाहीं तर काय पारिपत्य भोगायचें असेल तें पूर्वसंचितानुरूप भोगावें लागेल. भोगविणारा तो, आणखी भोगणारही तोच. आपल्या हातीं काय आहे ? आणखी आपण विनाकारण काळजी तरी कां करावी ? महाराजा, आम्हांला आपल्या जाऊं दे. झाला एवढा तुझ्या दर्शनाचा लाभ तो पुरे. तूं तर आम्हांला मोठ्या संकटांतून सोडवलेंस. आतां आणखी तुझे उपकार किती घ्यायचे ? "

माता रणदेवी इतकें पुष्कळ बोलली, परंतु तिच्या एका वाक्यानें महाराजांचें मन फार फार वेधून गेलें. त्या वाक्यानंतर जें कांहीं ती बोलत होती तिकडे त्यांचें लक्ष्य इतकें नव्हतेंच. "महाराजा, माझा पुत्र जर तुझ्यासारखा असता, तर मी अशी देशोधडीला कशाला लागलें असतें ! " हें वाक्य तिच्या अंतःकरणाच्या अगदीं आंतून आंतडें पिळून निघाल्याप्रमाणें निघालें. त्या वाक्यांत तिनें जणूं काय आपला सर्व इतिहास सांगितला. आणि तो काय असावा याबद्दल शिवाजीमहाराज आपल्या मनाशीं विचार करूं लागले. त्यांनीं तिचें नंतरचें बोलणें मुळींच ऐकलें नाहीं. फक्त शेवटीं ती जेव्हां थांबली, तेव्हांच तिचें शेवटचें "आतां आणखी तुझे उपकार किती घ्यायचे ! " हें वाक्य पुनः त्यानीं ऐकलें. आणि ते जागे झाल्याप्रमाणें होऊन तीस म्हणाले: "मातांजी आपण हें काय बोलतां ? माझे

उपकार कसले, आणखी काय कसले ? आपण असें बोलूं नये. मी आपल्या स्वतःला आपल्या मुलाप्रमाणें समजतों, तेव्हा आपलें रक्षण करणें माझें कामच आहे. याउपर आपली मर्जी. पण आपण जर माझ्या वचनाला कांहीं मानाल, तर पहा. कांहीं मुक्काम आमच्याबरोबर चला. आणखी काय सांगूं ? आपल्यावर ज्यांनीं काल हल्ला केला ते लोक कोठले, कोण, याचा मी तपास लावतों आहें. अद्यापि कांहीं लागला नाहीं, पण तो तपास लावल्याखेरीज माझीं माणसें राहणार नाहींत. त्यांच्याकडून तपास लागला, कीं त्या दुष्टांना उघड मैदानांत आणून त्यांची चांगली फजिती करूं. त्यांना चांगलें कडक पारिपत्य करूं. मग आपण पाहिजे तर एकट्या तीर्थयात्रेला जा. पण जोंपर्यंत ते दुष्ट सांपडले नाहींत किंवा ते कोण, कुठले याचा पत्ता लागला नाहीं, तोंपर्यंत आपण यापुढें कांहीं दिवसपर्यंत हिंडूं नका. आपल्याला एवढी आमची विनंति आहे. "

महाराजानीं हें सर्व भाषण फारच कळकळीनें केलें. तेव्हां माता रणदेवी त्यांस म्हणालीः " बरें पाहूं आतां पुढें काय होतें तें, सध्यां तूं मला त्या शिपायाकडे घेऊन चल. "

महाराजानीं तिला त्या शिपायाकडे नेलें. इतर मैत्रिणीही तिच्या मागोमाग येत होत्या, परंतु माता रणदेवीनेंच त्यांस म्हटलें, कीं तुम्ही येण्याचें कांहीं कारण नाहीं. तो बिचारा पडला असेल, त्याला पाहून आशीर्वाद देऊन मी येतें. माता रणदेवीनें असें सांगितल्यावर त्या गोसावणी महाराजानीं दाखविल्या जागीं बसल्या.

त्या वेळीं तेथें दुसरे कोणी नव्हतें असें पाहून कौसल्या वाराणशीकडे पाहून म्हणतेः "बेटा वाराणशी, माता रणदेवी जर छावणींत राहून प्रवास करण्याचें कबूल करील तर कांहीं वाईट नाहीं. महाराज म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं. ते कालचे मेले दुष्ट जर आपल्या पाळथीवरच असले तर आपल्याला पुढें कुठें गांठणार नाहींत म्हणून तरी कशावरून ? मला तर वाटतं, कीं या महाराजांच्या छावणीचा आश्रय करून चार मुक्काम आपण जावं आणखी मग पुढें काय रंग होईल तसा पहावा. तूं म्हणेनास माताजींना तसं त्या परत आल्या म्हणजे ! "

वाराणशी कौसल्येकडे आणखी इतरांकडे टवकारून पाहूं लागली. ही कौसल्या खरोखर बोलते आहे कीं चेष्टेनें बोलते आहे, तिला समजेना. तिची इच्छा खरोखरी अशीच होती, कीं माता रणदेवीनें महाराजांच्या म्हणण्याप्रमाणें करावें. परंतु आपण तसें माताजींस सुचवावें हें तिच्या मनांत देखील येईना. आपल्यामुळें या दुसऱ्या गोसावणींना त्रास होतो, आपल्यामुळें ते दुष्ट या गोसावणींच्या मागें लागले असें अनसूयेनें ध्वनित केलेलें तिला आठवलें आणि एकदम तिला असें वाटलें, कीं असें जर आपलें दुर्दैव असेल, तर मग आपण आपला जीव तरी आतां कशाला ठेवावा ? असें मनास वाटून तिच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले. तिनें ते आपल्या पदरानें पुसले आणि ती एकदम कौसल्येस म्हणालीः

" कौसल्याबाई, मी संकटांत सांपडलेली अनाथ गाय तुमच्याबरोबर नको अशीच तुमची बुद्धि झाली आहे का ? तशी असली तर सांगा, मी आपल्या जिवाचें काय वाटेल तें करून घेऊन तुम्हांला मोकळ्या करतें कशी ? माताजीनीं मला आपल्या मुलीप्रमाणें मानून जवळ केलें, तुम्हीं आतांपर्यंत मला आपल्या धाकट्या बहिणी-प्रमाणें पाळलंत ह्मणून मी तरी तुम्हाला चिकटलें. आतां दूर लोटणार असलां, तर चलाना त्या तिथें तापीच्या डोहांत लोटायला ! "

तिचें तें बोलणें ऐकून कौसल्या फारच खिन्न व विस्मित झाली. तिच्या मनांत कांहीं वाराणशीला लागेल असें मर्मभेदक बोलावयाचें नव्हतें. ती अगदीं सहजीं आणि खऱ्या अंतःकरणानें ह्मणाली, कीं माताजीनीं जर छावणीचा आश्रय धरला, तर फार चांगलें होईल. आपल्यावरलें संकट टळेल. परंतु देवळांत अनसूयेनें वाराणशीला एकवार असेंच मर्मभेदक बोलून दुखविल्यामुळें आतां तिला कौसल्येचेंही बोलणें तसेंच वाटलें. कौसल्येस तें स्पष्ट दिसलें ह्मणून ती अधिक कांहीं न बोलतां वाराणशीस एवढेंच ह्मणाली: " बेटा वाराणशी, तूं असे वेडे विचार मनांत आणूं नको. तुला आह्मी जिवंत असेपर्यंत तर दूर करणार नाहीं. मी खऱ्याखऱ्याच बुद्धीनें म्हटलें, कीं महाराजांच्या म्हणण्याप्रमाणें जर माताजीनीं ऐकलें तर फार चांगलें होईल. अग, एकदां त्या काळच्या दुष्टांनीं आकस धरला, आतां कांहीं कारण नसतांना ते आमच्यामागें लागण्याला कमी करायचे नाहींत. कालचा त्यांचा बेत फसला, यामुळें तर त्यांना जास्तच चिडण्याला कारण झालें आहे. म्हणून माझी खरोखरीच अशी समजूत, कीं माताजीनीं आतां कांहीं मुक्काम तरी यांच्याबरोबर असावें."

---

# प्रकरण ३९ वें.

## जखमी झालेला शिपाई.

माता रणदेवीला घेऊन महाराज त्या जखमी झालेल्या शिपायाकडे गेले. आदले दिवसापेक्षां त्याची प्रकृति आज पुष्कळ बरी होती. हा शिपाई जातीचा रजपूत होता. माता रणदेवीनें त्यास पहाण्याबरोबरच तें ओळखलें आणि अत्यंत मृदु अशा स्वरानें त्यास ह्मटलें : " भाई, तुला आमच्याकरितां फार कष्ट सोसावे लागले, तूं आपला जीवही द्यायला तयार झालास, आतां आम्हीं तुझें उतराई कोणत्या मार्गानें व्हावें ? तुझ्या या आजारी स्थितींत आम्हीं तुझी सेवा केली असती, परंतु तीही या महाराजानीं आपल्याकडे घेतली. तेव्हां वारंवार शब्दांनीं

तुझा धन्यवाद गाण्यापलीकडे आमच्या हातीं कांहींच उरलें नाहीं. भगवान् एकालिं-गजी या तुझ्या परोपकाराबद्दल चांगलें कल्याण करील असा माझा आशीर्वाद आहे...... ''

तो शिपाई डोळे उघडून टक लावून माता रणदेवीकडे पहात होता. त्यानें तिला ओळखलेंसें त्यास वाटलें कीं काय न कळे. त्याचे कपाळ वगैरे बांधल्यामुळें माता रण-देवीस त्याची ओळख असावी तरी पटेना. त्याच्या जिवाला आतां कसलीही भीति नव्हती ही गोष्ट खरी. त्याची जखम वहाण्याचें बंद झालें होतें. वैद्यबोआनीं फार उत्तम मलम आंत भरून ती चांगली बांधली होती. ठणका वगैरेही अगदीं कमी होता. परंतु अद्यापि तो बराच क्षीण असल्याकारणानें त्याला शब्द काढण्यास फार अडचण पडत असावी असें स्पष्ट दिसलें. तथापि जें शब्दांनीं काम करा-वयाचें, तें तो आपल्या अर्थपूर्ण व उत्कट नेत्रांनीं करीत होता. शिवाजीमहाराजां-कडे तो फारच कृतज्ञतेनें पाही व माता रणदेवीकडे अत्यंत पूज्यबुद्धि व आदर यांनीं भरलेल्या दृष्टीनें पाही. परंतु तितक्यानेंही त्याचें समाधान झालें नाहीं. आपणाकडून त्यानें बराच जोर करून ह्मटलें: " आपल्यासारख्यांच्या उपयोगी पडलों हें माझें मोठें भाग्य ! " ' हें माझें मोठें भाग्य ' हे शब्द उच्चारतांना त्यानें आपल्या कपाळाला हात लावूनच दाखविला. शब्दोच्चार स्पष्ट होईना. तेव्हां माता रणदेवीनें त्यास ह्मटलें: " बोलूं नको. तुझें काय ह्मणणें तें मी समजलें. अनाथांचें संरक्षण करणें हें रजपुतांच्या नशिबीं लिहिलेलेंच आहे. तें जाणून वर्तन करणारे मात्र तुझ्यासारखे आणखी महाराजां-सारखे थोडे. असो; पण कांहीं तरी आहेत यामुळेंच सृष्टि चालली आहे. तूं लव-कर बरा होशील. काळजी करूं नको. "

इतकें बोलून माता रणदेवी परत फिरली. शिवाजीमहाराजांनींही त्यास ह्मटलें " आपण आतां अगदीं वांचलांत. अगदीं काळजी करूं नका. निखालस बरें वाटूं लागलें म्हणजे एकमेकांच्या हकीकती एकमेकांना विचारून घेऊं. सध्यां स्वस्थ चित्तानें असा. एका पंधरा दिवसांत आपण पुनः कांहीं तरी कामगिरी करण्याला तयार व्हाल अशी अगदीं खात्री वैद्यबोआ देताहेत. "

तें ऐकून त्यास फार समाधान झालें. आणि त्यावर तो कांहीं बोलणार तों महाराजांनीं खुणा करून त्यास अगदीं गप्प बसण्यास सांगितलें. नंतर महाराज तिथें असलेल्या लोकांस ह्मणाले, "अरे यांची नीट काळजी घ्या. अणुमात्र लागलें संवरलें तर जरूर देत जा. वेळ पडल्यास वैद्यबोआंकडे कळवीत जा. इतका आळस होतो असें जर माझ्या कानावर किंवा नजरेस आलें, तर कोणाला काय शिक्षा होईल, याबद्दल कांहीं मी बजावायला पाहिजे असें नाहीं. " इतकें बोलून ते तेथून निघाले. माता रणदेवीस त्यांनीं पुनः एकवार म्हटलें: " माताजी, आपल्याला मी पुनः एकदां आग्रहपूर्वक विनंति करतों, कीं आपण कांहीं दिवस तरी येथून जाऊं

नये. आपली तजवीज उत्तम ठेवूं. आपल्याला कोणत्याही प्रकारची तोषीस लागूं देणार नाहीं. पण माझी फार इच्छा आहे, कीं आपण माझ्याजवळ चार दिवस रहावें."

हें बोलतां बोलतांच महाराज प्रथम ज्या ठिकाणीं इतर गोसावणींना सोडून गेले होते तेथें आले. कौसल्या आदिकरून तेथें त्यांच्या सोबतिणी होत्या, त्यांच्या कानीं त्यांचे शब्द पडले आणि त्यामुळें कौसल्येस बोलण्यास फार उचित अशी संधि सांपडली व ती लागलींच माताजीस म्हणाली: " खरेंच माताजी, महाराजांच्या म्हणण्याप्रमाणें कराना ! आपल्यालाही तें बरें आणि त्यांचीही मर्जी राखल्याप्रमाणें होईल. "

माताजी तें ऐकून हंसली आणि म्हणाली: " एकूण तुम्ही सगळ्याजणींनीं महाराजांशीं खलबत करून आपलं तें खरं करण्याचा विचार केला आहे ह्मणाना ! ठीक आहे. मला तरी काय अमूक दिवशीं अमूक ठिकाणाहून अमूक ठिकाणीं गेलंच पाहिजे असं थोडंच आहे. तसं कांहीं नाहीं. महाराजांसारख्यांना त्यांच्या त्यांच्या काळज्या काय थोड्या असतात, तर त्यांना आपल्याला संभाळण्याची आणखी काळजी लावावी असं मनांत येऊन मी आपली आपल्या मार्गाला लागावं असं ह्मणत होतें. ठीक आहे. कांहीं हरकत नाहीं. महाराजा, तुझ्या आज्ञेप्रमाणें आह्मी वागूं. आम्ही तरी तुझी प्रजाच आहों. परंतु आह्माला तुझ्या छावणीपासून अगदीं अलिप्त असं रहावं लागेल. कारण तुझ्याबरोबर बायकामाणसं कोणी नाहींत आणि आह्मी इतक्या जणी बायका. तेव्हां कोणाचा उपसर्ग आह्मांला होऊं नये; शिवाय आमचं भजनपूजन चालतं, त्यापासून दुसऱ्या कोणाला उपसर्ग पोंचूं नये."

तें ऐकतांच महाराज मोठ्यानें हंसले. या स्त्रीची पवित्र संगत आपल्याला लाभणार हें पाहून त्यांना फार आनंद झाला व ते ह्मणतात: " माताजी, आपल्याला आमच्यापासून उपसर्ग होऊं नये हें बरोबर. पण आपल्या भजनापूजनापासून आह्मांला उपसर्ग व्हायचा तो काय ? असा जर उपसर्ग वाटूं लागला, तर मग आमच्या ब्रीदाचाच आह्मांला उपसर्ग होऊं लागला ह्मणावें लागेल. असो, चला. आपण आतां आमच्याबरोबर चार दोन मुक्काम रहाणार यांत आह्मांला समाधान आहे. मात्र आपल्याला आतां जेवणाखाणास लागणारी शिधासामग्री माझी आणि रहाण्याला एक मोठें पाल देतों. दर मुक्कामास तें काढतील, ठोकतील आणि नेमलेल्या माणसांखेरीज दुसरीं कोणतींही माणसें आपल्या परवानगीखेरीज आपल्याकडे येणार नाहींत. आपण वाटेल तेव्हां, वाटेल त्या कामाकरितां मला आज्ञा मात्र करावी. संकोचानें राहूं नये. यापेक्षां माझें आपल्याजवळ दुसरें कांहीं मागणें नाहीं.'

याप्रमाणें सर्व व्यवस्था झाली. त्या गोसावणींच्या योगक्षेमाची व्यवस्था महाराजांनीं उत्तम प्रकारें लावून दिली. संभाजीला त्यांनीं एकवार माताजीच्या पाया पडण्यास पाठविलें आणि काय चमत्कार ! त्यानें तेव्हांपासून माताजीचा टोकळा

धरल्याप्रमाणेंच केलें. आपला उठल्या सुटल्या त्यांच्याकडे जाऊन बसूं लागला. माताजी दिवसांतून एक दोन वेळ तरी त्या जखमी शिपायाच्या समाचाराकरितां जात असे. त्याच्याजवळ घटकाभर बसतही असे. तिला पाहिल्याबरोबर त्यालाही फार संतोष होत असे. त्याला थोडें बरें वाटूं लागतांच महाराजांनीं तळ हालविला.

आपल्या बरोबर असलेल्या गोसावणींना त्रास देण्यासाठीं आलेले इसम कोण व कोठले याचा पत्ता लावण्यासाठीं महाराजांनीं पुष्कळ माणसें ठिकठिकाणीं पाठविलीं, परंतु त्यांस कांहींच पत्ता लागेना. तीं माणसें रजपूत असावीं असा त्यांचा अजमास झाला होता, परंतु तीं कोठलीं हें कांहीं कळेना. शेवटीं त्यांनीं विशेष तपास करतां त्यांस असें कळलें, कीं किरातसिंग ह्मणून जयसिंगाबरोबरचा कोणी सरदार परत दिल्लीकडे चालला आहे, त्याचीही छावणी आपल्यापासून थोड्या अंतरावर पडलेली आहे, आणि आज महिना पंधरा दिवस याप्रमाणें आपल्याबरोबरच आगेंमागें चालली आहे, तेव्हां त्या छावणींतले हे लोक असावे. या गोसावणींत दोघी तिघी स्वरूपानें फार सुंदर, त्यांतून एक तर फारच सुंदर आहे, तेव्हां त्यांच्यावर या दुष्टांनीं डोळा ठेवून हें काम केलें असावें असें त्यांच्या मनांत आलें. किरातसिंग हें नांव आपण कोठें तरी ऐकलें आहे, असें महाराजांच्या मनांत आलें आणि ते आठवण करूं लागले. जयसिंगराजांचा मुलगा किरातसिंग त्यांस आठवला; पण तो हा नसावा असें त्यांच्या साहजिकच मनांत आलें. कारण त्यास परत पाठवावयाचें असतें तर राजांनीं आपल्याबरोबरच पाठविलें असतें. बरोबरच जा ह्मणून सांगितलें असतें. तसें ज्या अर्थी सांगितलें नाहीं, त्या अर्थी तो त्यांचा मुलगा नव्हे. हा दुसरा कोणी तरी असला पाहिजे व हा कोण याचा तपास आपण लावला पाहिजे असेंही त्यांच्या मनांत आलें. विचार करतां करतां एकदम त्यांस कांहीं स्मरण झालें. हें आपलें स्मरण बरोबर आहे असें एकवार त्यांस वाटे आणि एकवार बरोबर नाहीं असेंही वाटे. शेवटीं त्यांनीं तान्हाजीला आपल्याकडे बोलावून आणून त्याच्याशीं कांहीं हितगुज केलें.

त्यानें स्मरण केल्याप्रमाणें करून ह्मटलें, " महाराज, आपण म्हणतां तोच तो इसम असला पाहिजे. त्याच्याखेरीज असलं धाडस कोणी करणार नाहीं. मला आतां आणखी असं वाटायला लागलं आहे, कीं आपण जयसिंगावर जितका विश्वास टाकला, तितका त्याचा मात्र आपल्यावर नाहीं. इतके दिवस हा विचार आपल्या मनांत कसा आला नाहीं याचं मला मोठं आश्चर्य आतां वाटतं आहे. आपण दिल्लीकडे बादशहाच्या दरबारीं जायला निघालों, पण बरोबर तिकडेच जातों कीं नाहीं हें पहाण्यासाठीं, आणखी आपण वाटेंत काय काय करतों इकडे नजर ठेवण्यासाठीं तर त्यांनीं ही एक तुकडी आपल्या पाठीवर पाठविली नसेलना ? नाहीं तर ही पांचसातशें रजपुतांची छावणी आमच्या अगदीं अनुसंधानानं अशी कां जाते ?

किरातसिंग ! किरातसिंग तोच तो. आणखी तोच ले टेहळणीचं काम पतक-रील. दुसरा कोणी असं काम पतकरायचा नाहीं. य गुलामांचे कावे पहा ! इकडे तर आह्मांला अगदीं आपल्यांतले समजून नाना प्रकारच्या विश्वासाच्या गोष्टी सांगून बादशहाकडे पाठविण्याची व्यवस्था केली. पुनः आम्ही बरोबर रीतीनं जातों कीं नाहीं हें पहाण्यासाठीं आमच्या सगळ्या हालचालींची टेहळणी करण्या-साठीं आमच्यावर एक हेर तयारच. बरं आहे. पाहून घेनों आम्ही तरी या हेराची किंमत काय आहे ती ! सरासरी पंधरा दिवसांपूर्वी मला एकदां अशी शंका आली होती, पण असं वाटलं, कीं आपल्यावर ही अशा प्रकारची नजर ठेवण्याचं जयसिंगाला कांहीं कारण नाहीं. पण आज आतां जों जों जास्त विचार करावा, तों तों असं वाटतं, कीं ही टोळीची टोळी राजानीं किंवा दिलेरखानानीं आमच्यावर नजर ठेवण्यासाठीं पाठविली आहे. न जाणों आपण त्यांच्या इच्छेविरुद्ध कांहीं तरी करूं किंवा वाटेंत कांहीं घोंटाळा घालून बसूं. तेव्हां शेवटपर्यंत नीट तऱ्हेनं आपण जातों कीं नाहीं हें दूर मुक्कामापासून त्यांना कळलं पाहिजे. पहा आपण, या माणसाचे हेर दक्षिणेकडे आणखी उत्तरेकडे दरबारांत सारखीं पत्रं नेऊन पोंचवीत असावेत. आतां मीही सावध झालों आहें. माझींही माणसं पाठवून कोण कोण कसे कसे हेर जातात आणि साध्या बातम्या कळवतात कीं तिखटमीठ लावून कळवतात तें पाहूं. वेळ पडली तर स्वतः सोंग घेऊन त्यांच्यांत शिरून काय आहे तें काढूं. "

तें ऐकतांच महाराज हंसले आणि म्हणाले: " आपल्या सोंगाची काय किंमत आहे ती सर्वजण ओळखून आहेत. कारण आपण सगळे फार उत्तम सोंगं बन-विणारे म्हणून तर आपणांला आम्हांला नजरभेट म्हणून दिलें. तान्हाजीराव तींच तीं सोंगंनू त्याच त्या युक्त्या कुठें दोनदोनदां केल्या तर पचतात ! एकदां जोशाचें सोंग कामीं आलें, पुनः तेंच, असें करून कसें चालणार ? बरें असो. तुम्हांला मीं लाजविण्यासाठीं म्हणून त्याचा उच्चार केला नाहीं, आपली उगीच मौज म्हणून बोललों. आह्मांला सोंगाड्यांची जोडी जेव्हां का राजा जयसिंगानं नजर केली, तेव्हां काय मनांत वाटलं असेल ? आतां आपली सहज गोष्ट निघाली म्हणून बो-ललों. पण तें असो. तुला काय वाटतं आपल्या हालचालीवर नजर ठेवण्यासाठीं म्हणून हा कोणी तरी रजपूत आपल्या पाठोपाठ पाठविला असावा ? असेल बोआ. नाहीं असं तरी कोणी म्हणावं ! तसंही असेल. पण हा कोण, काय, याचा तरी पत्ता लावला पाहिजे. तसं कांहीं नसलं तरी निदान गरीब गोसावणी संतिणींच्या पाठीमागें तुमचे लोक लागतात हें तरी त्यांच्या कानीं घालवून त्याचा बंदोबस्त करवूं. काढा तुह्मी काय माहिती काढतां ती. विशेषतः हे दुष्ट लोक कोण, ती मा-हिती काढा. अशा लोकांचें शासन झालें पाहिजे."

तान्हाजी थोडा वेळ कांहीं बोलला नाहीं. स्तब्ध बसला, नंतर एकदम ह्मणाला:

" महाराज, तवेढी माहिती मी काढून आणतों इतकंच नाहीं, पण आणखी अनेक बातम्या मी त्यांच्याकडून काढून आणून देतों. मात्र मला चार मुक्कामाइतकी फुरसत द्यावी. आजपासून आपला चवथा मुक्काम जेथें होईल, तेथें आपणांस सर्व बातमी सांगतों. त्या दोघांप्रमाणें अडकून बसत नाहीं. "

महाराजांनीं नुसतें स्मित केलें आणि मानेनें ' ठीक आहे करा काय तें ' अशा अर्थाची खूण केली. तान्हाजीनें लवून रामराम केला व " बरं आहे आपली परवानगी घेतों " असें म्हणून तेथून चालता झाला. महाराजांना तरी तेंच पाहिजे होतें. इतकें लष्कर घेऊन एखादा रजपूत सरदार दक्षिणेंतून आपल्या बरोबर चालावा, आणि त्यानें आपल्याशीं न बोलतां, न भेटतां नुसती आपली पाळथ राखल्याप्रमाणें पुढें नाहीं तर मागें, पण आपल्याला चिकटून असावें, याचें त्यांना फार आश्चर्य वाटूं लागलें. आतांपर्यंत असा कोणी तरी रजपूत सरदार आपल्या बरोबर चालला आहे असें त्यांच्या कानीं आलें होतें, परंतु त्यांना त्यांत महत्त्व वाटत नव्हतें. आज आतां वाटूं लागलें. त्यांना विशेषच वाईट वाटलें तें गरीबगुरीब तापशांचा छळ करायला हे नीच लोक उद्युक्त झाले आहेत याबद्दल होय. मोगल लोक आपल्या बायका नेतात ह्मणून ज्यांनीं त्यांना विष देऊन मारलें, किंवा आपल्या तलवारींनीं त्यांचीं शरीरें कापून काढलीं, अशी मंडळी आपल्यांतल्याच पवित्र बैरागणींना आणखी तापशांना भ्रष्ट करण्यासाठीं उद्युक्त व्हावी याचें त्यांस फार फार वाईट वाटलें आणि हा असला नीचपणा उघडकीस आणून शिक्षेस पात्र अशा लोकांना पुरी शिक्षा द्यावी हा निश्चय त्यांनीं केला. त्यांत तान्हाजीचें तें वरील प्रकारचें भाषण ऐकून त्यांस अर्थातच बरें वाटलें. तान्हाजी गेल्यानंतर ते सहज त्या जखमी शिपायाच्या समाचाराकरितां म्हणून गेले, तों तेथें माता रणदेवी बसलेलीच होती. महाराजही तेथें जाऊन बसले. कसें काय आहे वगैरे प्रश्न झाल्यानंतर महाराजांच्या मनांत काय आलें, ते त्या शिपायास ह्मणतातः " आपली थोडीशी चौकशी केली, तर आपल्याला कांहीं राग नाहींना येणार ? आपण कोण, कुठले हें आपल्याला एकदां विचारावें असें पांचचार वेळां मनांत आलें, त्याप्रमाणें आमच्या लोकांनीं आपली चौकशी केलीही, परंतु कोठेंही कांहींच माहिती लागली नाहीं. आपल्याजवळ स्पष्टपणें विचारावें कसें ? असें मनांत येऊन कोणीं आपल्याकडे येऊन प्रत्यक्ष विचारलें नाहीं. आतां मी सहज आलों, आपण पहावें विचारून असें मनांत येऊन विचारलें आहे. बाकी तुम्हांला कांहीं सांगायचें नसलें तर आग्रह नाहीं......... "

महाराजांचें इतकें बोलणें ऐकून तो शिपाई आपल्याशींच किंचित् हंसला, आणखी ह्मणतोः " महाराज, मी औरंगजेबाच्या जुलमाला आणखी त्याच्या पदरच्या कित्येक नीच लोकांनीं आरंभलेल्या छळाला त्रासून गेलेला एक प्राणी आहें. आपल्याला थोडें चमत्कारिक वाटेल, पण खरी गोष्ट अशी आहे, कीं मी दक्षिणेंत आप-

त्या जवळ नौकरी मागण्यास येणार होतों, तों वाटेंत हा एक अगदींच अनपेक्षित असा प्रसंग आला आणखी त्यामुळं आपलं मला दर्शन झालं. आणखी माझं खरं खरं नशीबही मी समजतों, कीं मला आपल्याजवळ राहण्याला संधि सांपडली. देवाजवळ मागणार होतों एक डोळा,तर देवानं दिले दोन, अशांतली माझी स्थिति झाली माझी मागली स्थिति कांहीं असो, पण आतां यामुळें मला आपली छावणी सोडायची नाहीं असा मीं कृतनिश्चय केला आहे. तो सिद्धीस नेणं आपल्या हातीं आहे. माझी मागली हकीकत विशेष ऐकण्यासारखी नाहीं, कारण मी एक आपला अगदीं यःकश्चित् माणूस आहें. पण तीच आपल्याला ऐकायची इच्छा असल्यास मी सांगतों. आपण मला जीवदान दिलें आहे तर मला कांहीं एवढी आपली गोष्ट अमान्य करतां येणार नाहीं ! "

माता रणदेवी त्या दोघांचें हें भाषण चाललेलें स्वस्थपणें ऐकत होती. तिलाही त्या बोलण्यामुळें अशी उत्कट इच्छा झाली, कीं हा शिवाजीची नौकरी धरण्यास जाऊं इच्छिणारा रजपूत कोण व त्याची हकीकत काय ती अवश्य ऐकावी. यामुळें ती मध्येंच त्यास म्हणाली. " ठीक आहे. तूं जरी सांगितलीस हकीकत तरी हरकत नाहीं. मनांत एखाद्या गोष्टीबद्दल वारंवार वारंवार विचार येऊं लागले, कीं एकदां ती कोणाला तरी सांगून टाकावी. आणखी ज्याची नौकरी करण्यासाठीं तूं जाणार होतास; त्याच्यापेक्षां ती हकीकत ऐकण्यास अधिक योग्य पुरुष आहे कोण ! माझ्याही मनांत ती हकीकत ऐकावी असें आहे, तर ही वेळ व्यर्थ जाऊं देऊं नको. सांगून टाक. "

" आपली दोघांची आज्ञा होते आहे, तर माझ्याकडूनही तयारी आहे. महाराज, मी मूळचा अगदीं गरीब आईबापांचा. परंतु माझा बाप फार शूर आणि त्याला मोगलांचा फार तिटकारा. राजपुतान्यांतल्या कांहीं घराण्यांनीं मुसलमानांशीं बेटीव्यवहार केले याबद्दल त्या घराण्यांचा त्याला मोठा तिरस्कार. आम्ही ज्याच्या पदरीं होतों तो एक मध्यम प्रतीचा जहागीरदार होता. त्यालाही मोगलांचा फार तिरस्कार. पुढें एकवार अशी स्थिति झाली, कीं औरंगजेबानें एकवार राजपुतान्यांत स्वारी करण्यासाठीं ह्मणून येऊन आमच्या त्या खरकपुरास ठाणें दिलें. आमच्या गांवाला जबरदस्त तटबंदी होती, तेव्हां आमच्या जहागिरदारांनीं—अनुपमसिंह हें त्यांचें नांव—वेशी लावून घेऊन औरंगजेबाचें कांहीं चालूं द्यायचें नाहीं असें ठरविलें. अनुपमसिंह आणखी माझे वडील यांचा फार मोठा स्नेह. मरायचें पण मोगलांच्या ताब्यांत आपला गांव जाऊं द्यायचा नाहीं असा त्यांचा निश्चय झाला. सगळ्या गांवांतल्या वृद्ध व तरुण पुरुषांना त्यांनीं एकत्र जमवून सांगितलें, कीं आपणास आपल्या वाडवडिलांचें नांव राखावयाचें असेल तर आतां जिवावर उदार होऊन लढायला सिद्ध व्हा. तशीच वेळ आली, तर आपल्या कुळाचाराप्रमाणें गांवांतील

बायकामुळें आपल्या हातांनीं मारून टाकून आपण लढाईला उभे ठाकूं. आम्ही अगदीं शेवटल्या माणसाचें प्रेत पडेपर्यंत लढूं. पण अलमगिराला येथें—आपणांपैकीं एक तरी जिवंत असतां—बोट शिरकूं द्यायचें नाहीं. सर्वांना तो विचार फार पसंत पडला. आमच्या बायकांनींसुद्धां आह्मांला अतोनात उत्तेजन दिलें. प्रत्येक लढण्यायोग्य मुलगा, तरुण व वृद्ध कमर कसून शस्त्रास्त्रें झाव-रून लढण्यास सिद्ध झाला. बायकांनीं मरणाची तयारी केली. सर्व गांव मरणास सिद्ध झाल्याप्रमाणें दिसूं लागला. सर्वांना फार फार स्फुरण आलें. औरंगजेबास हें कळतांच त्याच्या अंगाचा तिळपापड झाला. आपल्याशीं या लोकांचें असें वर्तन, तर आपणही यांना आपला सपाटा काय आहे तें दाखवूं असा त्यानें निश्चय केला. परंतु तो महा कपटी. त्यानें आपल्या मनांतला कावा बिलकुल कोणास कळूं दिला नाहीं. पहिल्या प्रथम दोनचार वेळां गांवच्या वेशींवर हल्ले केल्याचा बहाणा केला. अर्थातच त्यांत यश आलें नाहीं तेव्हां जासुदाकडून निरोप पाठविला कीं आपण तुमच्या गांवास बिलकुल त्रास देऊं इच्छित नाहीं, आपला तळ उठवून नेतों. असें म्हणून तें खरें भासविण्याकरितां खरोखरच त्यानें आपल्या सैन्याचा तळ तेथून उठवून नेला. मोगलसैन्याचें चिटूपांखरूंही तेथें राहिलें नाहीं. मोगलसैन्य पार हललें असें पहातांच आह्मांला सगळ्यांना फार आनंद झाला. केवळ आमच्या बाणेदारपणामुळें आपली आज सरशी झाली, गांव वांचला असें सगळ्यांना वाटूं लागलें आणि सर्व लोक आनंदानें इकडे तिकडे फिरूं लागले. अनुपमसिंहानें सर्वांच्या निश्चयाबद्दल त्यांची तारीफ केली. माझ्या वडिलांना तर त्यांनीं फारच मान दिला. अलमगीर कपटी आहे. कदाचित् अजूनही केव्हां काय प्रसंग आणील याचा नेम नाहीं. तेव्हां आपण सावध रहावें असा सगळ्यांना इशारा देऊन व विशेषतः रात्रीं जागृति ठेवण्याची व्यवस्था करून आह्मी होतों. याप्रमाणें सुमारें पंधरा दिवस गेले. आमच्या गांवाचा नाद अलमगिरानें सोडला असें आह्मांला वाटलें आणि आह्मी हळू हळू गाफिल झालों. अलमगीर दुसऱ्या एका गांवाकडे मोर्चा लावून होता अशी बातमी आम्हांला आली असल्यामुळें आम्ही निर्धास्त होतों.

आमच्या गांवाला नदीचा प्रवाह सुंदर होता. तेथें नदीकांठीं गांवाच्या तटाच्या बुरुजावर अनुपमसिंह आणि माझे वडील त्याचप्रमाणें मी आणि अनुपमसिंहाचा पुत्र असे चौघे एके दिवशीं सायंकाळीं मौजेनें गोष्टी बोलत बसलों होतों. त्याचप्रमाणें आम्हां दोघांच्या मातुःश्री दूर एका बाजूस सूर्याकडे पहात गोष्टी सांगत होत्या. अलमगिर केवळ आपल्या निश्चयाला भिऊन येथून चालता झाला. त्यानें जोर केला असता, तर आपलें काय चाललें असतें ? अशा प्रकारच्या गोष्टी आम्हां चौघांच्या चालल्या होत्या. सूर्यास्त फारच रमणीय दिसत होता. तो पाहून अनुपमसिंह सहज माझ्या वडिलांस म्हणाला: " या क्षणोक्षणीं नष्टतेज

होत जाणाऱ्या सूर्याप्रमाणेंच आमच्या राजपुतान्याची स्थिति होत चालली आहे. नाहीं कां ? " इतक्यांत अनुपमसिंहाचा मुलगा कोठें नाहींसा झाला. सहज कोठें ज़रा गेला असेल असें समजून मीं त्याचा शोध केला नाहीं. इतक्यांत नदीच्या एका बाजूनें पांचसात नावा येताहेत असें दिसलें. सायंकाळचा रमणीय देखावा पहाण्यासाठीं कोणी मंडळी सहज नावांत बसून चालली असतील असें समजून आम्हीं तिकडे दुर्लक्ष्य केलें. बहुतेक अस्तंगत झालेल्या सूर्याकडे मजेनें पहात होतों. वेळ फार रमणीय यामुळें सर्वांचें मन कसें उल्हसित झालें होतें. इतक्यांत त्या नदीच्या बाजूच्या तटाच्या दाराजवळल्या पायऱ्यांजवळ त्या नावा लागल्या आणि त्यांतून भराभर लोक उतरताहेत असें आम्हां सर्वांस दिसलें. हें काय व हे कोण हें पहाणार तों तटाचें दार उघडल्याचा आवाज झाला. आगे माझे वडील व अनुपमसिंह 'घातरे घात' म्हणून ओरडून आपलीं शस्त्रें सावरतात, तों पांचपन्नास लोकांनीं वर येऊन 'दीन दीन' करीत त्यांस गराडा घातला. तो गराडा घालण्याबरोबर नदीच्या तटावरून कोणी तरी उड्या घातल्याचाही आवाज झाला. मी अनुपमसिंहाच्या व माझ्या वडिलांपासून दूर परंतु बायकांपासून अगदीं जवळ होतों. उड्या त्यांनींच घातल्या असें खास वाटलें. यामुळें मींही नदींत उडी घातली.

---

# प्रकरण ४० वें.

## शिपायाची पुढली हकीकत.

मीं उडी घातली, ती एवढ्याच संशयावरून कीं माझ्या आईनें व अनुपमसिंहाच्या पत्नीनें तटावरून उड्या टाकल्या असाव्या. 'घातरे घात' असा शब्द अनुपमसिंहाच्या व माझ्या बापाच्या तोंडून बाहेर पडतांच त्या दोघींनीं ताडलें, कीं मोगलांनीं कांहीं तरी कावा करून शहरांत प्रवेश करून घेतला आणि आपल्या पतींच्या भोंवतीं गराडा घातलेले तेच लोक होत. आतां आपली धडगत नाहीं, तर आपण आपलीं शरीरें गंगार्पण करावीं हाच मार्ग उत्तम. त्यांनीं उड्या टाकल्या असा संशय मनाला वाटतांच त्यांना वांचविलें पाहिजे हा विचार पहिल्या प्रथम माझ्या मनांत आला आणि त्या विचाराच्या जोरांत मींही उडी टाकली. दोघी तर कांहीं माझ्या हातीं लागल्या नाहींत; परंतु एक लागली. ती माझी स्वतःची मातुःश्री होय. असें समजून तिचे केश धरून मीं तिला पैलतीरापर्यंत ओढीत नेलें. मी तिला ओढीत असतां माझ्या हातून सुटावें म्हणून तिनें फार धडपड केली. तिची अशी समजूत

झाली असावी, कीं आपल्याला धरून नेणारा कोणी मोगल आहे. परंतु मीं मोठ्यानें ओरडून तिला सांगितलें, कीं मी तुझा पुत्र आहें. अंधार पडल्या कारणानें एकमेकांस एकमेक दिसत नव्हतोंच. मी सपाट्यानें पोहून पैलतीरावर गेलों. तेथें जाऊन मी त्या स्त्रीला वाळवंटीवर नेऊन टाकतों तों ती एकदम आरडून मला म्हणालीः “ षंढा, आपल्या बापाच्या आणखी स्वामीच्या सोडवणुकीसाठीं जायचें, तें आमच्या संरक्षणासाठीं नदींत उडी टाकलीस ! मी मेलें असतें तर काय जग ओस पडतें ! आमची अब्रु जाणार असें वाटण्याबरोबर तुह्मी आपल्या हातानें जोहार करीत नाहीं का ! आह्मीं गंगेंत उड्या घातल्या त्यांत वावगें काय होत होतें ! आतां तरी तूं खऱ्या बीजाचा असशील, तर पोहून आलास तसा परत जा. मला तोंड दाखवूं नकोस. ”

तें तिचें भाषण ऐकतांच मला फार वाईट वाटलें. माझा मला अतोनात रागही आला. आपण आपल्या बापास व स्वामीस सोडून नदींत उडी घातली हें फार अनुचित केलें असें माझें मलाही वाटलें आणि “मातुःश्री क्षमा करा” असें ह्मणून मी तसा पुनः तटाकडे येण्यासाठीं परतलों; परंतु आतां तेथें त्या नावा नुसत्या होत्या. आंत माणूस एकही नव्हतें आणि ज्या दरवाज्यांतून ते लोक आंत शिरले होते, तो दरवाजा अगदीं बंद केला होता. आतां आपण वर जाणार कसे ! वर व आंत धुमश्चक्री चाललेली ऐकूं येत होती. ती ऐकून आंत भयंकर लढाई सुरू आहे हें जाणलें. आपण तींत जाऊन मिसळावें–दुसरें कांहीं नाहीं तर नाहीं, एक दोन चार मोगल शिपाई तरी समोरासमोर लढाई करून मारले असते; पण तेंही माझ्या नशिबीं नाहीं, याबद्दल मला फार फार वाईट वाटत होतें. मी तटाच्या त्या भागाच्या दरवाज्याच्या पायऱ्या चढून बसलों होतों. तों इतक्यांत दुरून एक नाव येते आहे अशी चाहूल लागली. आणि मी कान देऊन ऐकूं लागलों तों पुढील शब्द माझ्या कानीं आलेः “ मीं तुम्हांला म्हटलं नाहीं ! त्यांनींच उडी टाकली असावी. दुसरी मला वाटतें ताबडतोब बुडून गेली. आपण वेळींच पोंचलों, ह्मणून ही एवढी सांपडली. ” ते शब्द ऐकण्याबरोबर मी एकदम तटकन् उभा राहिलों. शब्द मोगलाचे नव्हते, रजपुताचे होते. ते उच्चारणारा दुष्ट कोण तें मीं ओळखलें. त्याचें नांव घेतलें तर सचैल स्नान करावें असें मनांत येतें, तेव्हां त्या माझ्या स्वामिपुत्राच्या दुष्ट नांवाचा मी उच्चार करीत नाहीं. माझ्या कमरेला दोन तीन हत्यारें–लहान लहान हत्यारें होतीं, दुसरीं कोठून असणार. परंतु तेवढ्यांचाच उपयोग करून या नावेंत असणाऱ्या इसमांना नरकांत पाठवायचें असा निश्चय मीं केला आणि टपणीस बसलों. माझ्या अजमासाप्रमाणें त्यांची नाव पायऱ्यांशीं आली. त्याबरोबर मीं एकदम तींत उडी घालून “ अरे दुष्टांनो ” असें ओरडून जो एक जवळ सांपडला त्याला खंजिराचा सपाटा लगावला, इतक्यांत दुसरा कोणीकडे नाहींसा झाला. तो नावानावांतून उड्या मारून पळाला असावा

किंवा एखाद्या पलीकडल्या नावेंत लपून बसला असावा. ज्याला मीं अचानक खंजीर मारला तो धाडकन् खालीं पडल्याबरोबर मीं त्याला आणखी भराभर भराभर पांच-पंचवीस तडाखे खंजिराचे दिले. तो आतां पडलाच, मीं त्या संतापाच्या भरांत त्याला उचलून नदींत ढकलूनही दिलें आणि पाहूं लागलों तों आंत एक चिंब झालेली अशी स्त्री. ही कोण तें पहाण्यास आतां एका बारीक दिव्याचें साधन होतें. ती स्त्री–माझी मातुःश्री–जिला आपण पैलतीरावर पोंचविलें ती नव्हे असें जाणून मी फार विव्हल झालों. ती गतप्राण झाली आहे कीं अजून जिवंत आहे हें समजेना. तेव्हां काय करावें हें सुचेना. तटाचे दरवाजे लागले, आंत जाऊन लढूं म्हटलें, तर तेंही शक्य नाहीं. तेव्हां ही नाव अशीच वल्हवून आपण पैलतीरावर नेऊन आपल्या मातुःश्रीची स्थिति तरी काय आहे तें पाहूं एवढेंच काय तें आतां शक्य. त्याप्रमाणें मीं केलें. पैलतीरावर गेलों आणि तिकडे नाव वाळवंटीमुळें लवकरच अडखळली. शेवटीं गुडघाभर पाण्यांत उतरून नावेंतून आपल्या मातुःश्रीलाही उचलून घेतलें. तिला उचलून घेणें कांहीं सोपें नव्हतें हें उघडच आहे. परंतु ती वेळ अशी होती, कीं शेळीच्या अंगीं वाघाचें बळ यायचें. मीं आपल्या मातुःश्रीला तीरावर नेऊन ठेवलें. आपण थोड्या वेळापूर्वीं तीरावर जिला बसविलें ती आपली स्वामिनी कोठें गेली, ती जवळपास असली, तर आपल्याला मदत होईल असें मला वाटलें म्हणून मीं इकडे तिकडे पाहूं लागलों, परंतु कांहीं उपयोग नाहीं. त्या कोठें दिसेनात. जों जों वेळ जाईल, तों तों अर्थातच आपल्या आईला शुद्धीवर आणणें केवळ दुरापास्त किंबहुना केवळ अशक्य, तेव्हां पलीकडे गांवांतून तरी कोणाला बोलावलें तर बरें होईल असें माझ्या मनांत आलें आणि मी त्या दृष्टीनें दूर पाहूं लागलों. परंतु तेथून पावलें हलेनात. आपण येथून गेलों आणि आपले पश्चात् कोणा कोल्ह्याकुत्र्यानें येऊन जर कांहीं केलें तर ? तीरावर कोणी माणसें या वेळीं नव्हतीं. एवढ्या रात्रीं आणि आसपास औरंगजेबाची छावणी पडली असतां माणसें बाहेर पडताहेत कशाला ? शेवटीं दोन तीन प्रहर मीं तेथें बसून काढले. पुनः पुनः आपल्या मातुःश्रीच्या नाकापुढें हात धरावा, किंवा छातीवर हात ठेवून काळीज उडतें आहे कीं काय हें पहावें आणि पुनः निराश होऊन स्वस्थ बसावें. असा प्रकार अ-गदीं सारखा चालला होता. मन इतकें उद्विग्न झालें, कीं आपणही आतां नदींत उडी टाकून प्राण द्यावा असें वाटलें. कां कीं, तटावरून उडी टाकल्यामुळें पुनः वर तटावर जाऊन गांवांत जो प्रकार चालला असेल त्यांत जाऊन मिसळून आपली कर्तबगारी दाखविणें शक्य नाहींसें झालें. आपल्या स्वामिनीला व आईला वांचविल्याचें तरी श्रेय ? तर तेंही नाहीं. स्वामिनीला वांचविली, तर तिनें आपली निर्भर्त्सना करून आपलें तोंड काळें कर म्हणून सांगितलें आणि मातुःश्री तर इहलोक सोडून गेली–आतां त्यांत शंका नव्हतीच. अशी कांहीं विचित्र स्थिति झाली असल्यामुळें

माझें मन फार फार उद्विग्न झालें. आतां प्रातःकाळ झाल्यावर मातुःश्रीला अग्नि देऊन जिकडे वाट फुटेल तिकडे जावें असा विचार माझ्या मनांत वागूं लागला.

सकाळ झाली. चांगलें उजाडलें. ज्या सूर्यनारायणाची अस्तकाळची मजा आम्ही पहाण्यांत गुंतलों असतां तो भयंकर प्रसंग आमच्यावर येऊन गुदरला, तो सूर्यनारायण आपल्या टिपेवर पुनः उगवला. आपण येथें नसतांना या संस्थानावर काय कहर गुदरला याची जणूं काय त्यास वास्तपुस्तच नाहीं आणि कांहीं वास्तपुस्त करावी असा विचारही त्याचे मनांत आला नाहीं. तो क्षणोक्षणीं वर येऊं लागला. तेव्हां मीं समोर तटाकडे पाहिलें तों तेथें अगदीं शून्यवत् दिसूं लागलें. नदीमात्र तांबडीलाल दिसूं लागली आणि मधून मधून त्या तटावरून एखादें दुसरें प्रेत कोणी तरी ढकलून देई. हा प्रकार पहातांच मला अत्यंत उद्वेग वाटला. अंगाला शहारे आले. आपला सगळा जन्म व्यर्थ. आतां आपण कोणत्या तोंडानें खरकपुराला जाणार ? अर्थातच आपल्या मातुःश्रीला अग्नि देऊन आपल्याला फुटेल ती वाट धरावी या विचाराखेरीज दुसरा विचार कोठला ? त्याप्रमाणें करण्याकरितां मी त्या शेजारच्या गांवांत गेलों. त्या गांवांतून गांवजोशाला बोलवूं लागलों तर सगळ्या गांवांत अगदीं चुपचाप. दारें लावून बसल्याप्रमाणें हत्यारें कमरेस कसून व सज्ज ठेवून मंडळी बसलेली. खरकपुरावर कहर गुदरला, तो आपल्यावर गुदरायचाच हें सर्वांस वाटलें आणखी तें स्वाभाविकही होतें. प्रथम कोणी दाद देईनात. नंतर जोशीबोआ येऊन त्यानें सर्व विधियुक्त करायचें तें केलें. माझी मातुःश्री मला नाहींशी झाली, मी किती कष्टी झालों असेन याची कल्पना महाराज आपणच करावी. "

इतकी लांबलचक हकीकत सांगून तो शिपाई थांबला. तो गहिंवरला. त्याचा कंठ सद्गदित झाला. त्याला एकही शब्द उमटेना. त्याची ती हकीकत ऐकून माता रणदेवीच्या डोळ्यांतून तर एकसारखे अश्रु गळूं लागले. जात्या स्त्रियांचें अंतःकरण अगदीं मृदु आणि त्यांतही असली गोष्ट. मग काय विचारतां ! तो थांबला तेव्हां तिनें आपले डोळे पुसले. ती उठली आणि ह्मणालीः "पुढें ही तुझी हकीकत माझ्यानें ऐकवेल कीं नाहीं कोण जाणे !"

त्याबरोबर तो तिला ह्मणतोः "माताजी, पुढें काय हकीकत असायची ! माझा बाप आणि अनुपमसिंह हे दोघे लढतां लढतां मेले—तो दुष्ट ज्यानें फितुरी करून आपलें संस्थान अलमगीरच्या हातीं दिलें व जो आपल्या व माझ्या मातुःश्रीच्या मृत्यूला कारण झाला तो औरंगजेबाचा बंदा गुलाम बनला. त्या दुष्टाचें नांव तोंडावाटे उच्चारूंसुद्धां नये. मीं इकडेच राजपुतान्यांत कोणातरी स्वतंत्र बाण्यानें रहाणाऱ्या संस्थानिकाच्या पदरीं रहावें ह्मणून पुष्कळ खटपट केली. माझी बायको खरकपुराहून कोणीकडे गेली समजत नाहीं. तिचा बाप लढतांलढतांच वारला. खरकपुरास जाण्याची माझी इच्छाही नाहीं, आणि जाणें मला शक्यही नाहीं. आतां

राजपुतान्यांत आपल्याला नौकरी मिळणें शक्य नाहीं असें पाहून मीं दक्षिणेंतल्या या महाराजांची कीर्ति ऐकून यांच्याकडे येण्याचा निश्चय केला आणि निघालों होतों. तों वाटेनें हलकें हलकें मन। मानेल त्याप्रमाणें चाललों होतों. माझी अशी कायती एकटी बायको, ती आपल्या बापाच्या मरणानंतर कोणीकडे गेली तिचा पत्ता लागत नाहीं. असा कांहीं माझा विचित्र इतिहास आहे. अनुपमसिंहाच्या त्या दुष्ट कारट्यानें ही आमची सगळ्यांची स्थिति केली. त्याचें स्मरण झालें कीं अंगाचा संताप होतो ! असो चला. महाराज, कधींकाळीं त्याची माझी समक्षा-समक्ष भेट झाली तर मी सूड उगवीन, आपण माझ्यावर एवढे उपकार केलेत तसा माझा स्वीकारही करा. आपले तानाजी, येसाजी आहेत त्याप्रमाणेंच एक रजपूत शिपाई–सर्वथा निराश्रित झालेला शिपाई–आपल्या जिवास जीव देण्यास तयार होऊन आला आहे. त्याचा आपण पूर्ण अंगीकार करावा. दुसरी कांहीं विनंति नाहीं. मी इकडल्या प्रांतांतला आहें. तेव्हां माझा आपल्याला फार उपयोग होईल. बादशहाच्या दरबारांत लुडबुडणारी सर्व मंडळी मला पूर्णपणें ठाऊक आहेत. त्यांच्यापैकीं कोण केव्हां कोणतें कृत्य करायला तयार होईल आणखी कोण नाहीं हें मी चांगलें जाणतों. आपली सेवा करायची हें तर माझें पक्कें ठरलें आहे. तेव्हां आपण माझा अंगीकार केला तर फार चांगलें होईल. आपण केला आहेच असें मी समजतों. आपल्याला मी प्रत्यक्ष देव–भगवान् एकलिंगजी समजतों."

तो शिपाई त्यांच्याकडे फारच पूज्य बुद्धीनें पाहूं लागला. मीना रणदेवी त्याच्याकडे मोठ्या प्रेमानें पाहूं लागली. तिच्या ओंठांवर कांहीं तरी शब्द आले. परंतु ते तिनें मागें ओढले. बाहेर पडूं दिले नाहींत. नंतर त्यास म्हणते: " फार चांगलें केलेंस. तूं यांचा आश्रय केला आहेस हें फार चांगलें. बाबारे, अशा महात्म्याजवळ मृत्यु बरा, पण अलमगिराच्या दरबारांत दिवाणगिरी नको. परमेश्वर तुझें कल्याण करील. तुला कधीं कांहीं कमी पडूं देणार नाहीं. तुझी बायको तुला भेटेल. सारें कांहीं यथास्थित होईल. तूं अगदींसुद्धां काळजी करूं नकोस. तुला महाराजानीं बरा केला, तो तुझा स्वीकार केला ह्मणूनच केला. आतां मीच तुला त्याच्या देखत तुझी कामगिरी काय ती सांगतें. अलमगीर बादशहा किती कपटी आहे हें तुला ठाऊक आहेच. तो स्वतः आपल्या बापाविरुद्ध उठून त्यानें त्याला कैदेंत टाकून राज्य मिळविलें. त्याच्या हिताची गोष्ट असली ह्मणजे त्याचप्रमाणें दुसऱ्यांना फुसलावून कोणाच्याविरुद्ध कोणाला उठवील याचा कांहीं नेम नाहीं. आणखी कोणाशीं केव्हां काय बोलून कसा विश्वासघात करील याचाही नेम नाहीं. तेव्हां तुला जी कामगिरी करायची ती महाराजानीं तुला सांगण्याच्या आधीं मीच सांगतें. महाराजांच्या माणसांपैकीं कोणाला इकडली फारशी माहिती नाहीं. तेव्हां तूं जपणीवर रहा. तूं आपले डोळे उघडे ठेव. वाटेल तीं सोंगें करून वाटेल तें कर; पण यांच्या सभोंवतालीं दरबारांत काय चाललें आहे, कोण यांच्याशीं कसा

वागतो, याच्यावर नजर ठेव. काय नजरेस पडेल तें यांना सांगत जा. आणखी कांहीं संकट आलें तर त्याचा प्रतिकार करायला खटपट कर. महाराज ह्मणतात, कीं रामसिंग–जयसिंगाचा मुलगा–आपली सर्व प्रकारांनीं काळजी घेणार आहे, परंतु किती झालें तरी गुलामगिरीचें दूध प्यालेला तो, त्याच्या मनांत हेतु चांगला असला तरी हातून चांगली कृति घडेलच असा नेम नाहीं. गुलामगिरींत वाढलेल्यांची सल्ला गुलामांना शोभेशीच असायची. ह्मणून तुला सांगतें. आणखी तूं स्वतःही थोडा जपून रहा. तूं आतां हकीकत सांगितलीस यावरून तूं जर ओळखला गेलास तर तुझ्याही जिवाला धोका आहे. याहून आणखी कांहींच मला सांगायचें नाहीं. महाराज, या माणसाला आपण दूर करूं नका. याच्यापासून आपल्याला फार उपयोग होईल. आपण अनेकांचा संग्रह केला आहे त्यांत याचा करा. "

महाराजानीं त्याला आपल्याजवळ ठेवून घेण्याचें आश्वासन दिलें. तितक्यांत माता रणदेवी त्यांस ह्मणालीः " महाराज, आतां आम्ही आपल्यापासून फुटणार. इतके मुक्काम आपण आमची काळजी घेतली त्याचे उपकार आह्मी आपल्या चर्माचे जोडे आपल्या पायीं घातले तरी कधीं फिटणार नाहींत. महाराजा, धन्य धन्य ती माउली कीं जिच्या कुसव्यांत तुझा जन्म झाला. माझ्या ह्मातारीच्या आशीर्वादाचा उपयोग काय होणार, पण तुझ्यावर किती जरी संकटें आलीं तरी तूं अखेरीस यशस्वी होऊन स्वराज्य स्थापशील. या मोगलांच्या गुलामगिरींतून–या दुष्ट अलमगिराच्या कावेबाजपणांतून–आपल्या देशाला सोडवशील. माझी ह्मातारीची वाणी कधीं खोटी होणार नाहीं. आतां आह्मी जातों. आम्ही आतां कायमच्या–निदान चार सहा महिने तरी कायमच्या–मथुरेस रहाणार. दुष्ट अलमगीर आग्र्यास आहे. तेथून मथुरा अगदीं जवळ. माझी म्हातान्या गोसावणीची आपल्याला मदत ती काय होणार! पण जर कधींकाळीं लागली, तर वृंदावनास माता रणदेवीचा शोध आपण करा, ह्मणजे माझी जागा कोणीही आपल्यास दाखवील. न जाणों जसा मोठा सार्वभौम प्रभु असला तरी त्याला गवताच्या काडीची जरूरी लागते, तशी माझ्यासारख्या दुबळ्या गोसावणीच्या मदतीचीही आपल्याला जरूर लागणार नाहीं म्हणून कशावरून. आपण दरबारीं जा. तेथलें आपलें काम होऊन परत जाण्यास निघालां ह्मणजे मथुरा, गोकुळ, वृंदावन येथेंही भगवान् गोपालकृष्णजींच्या दर्शनाला या. आग्र्यास रहाणें झालें, मध्येंच एखाद्या दिवशीं या. आतां आह्मी जातों. इतका वेळ आपल्या छत्राखालीं होतों. आपलें ऋण कसें फेडावें ! "

तें ऐकतांच महाराज एकदम ह्मणतातः " छे. छे. छे. छे. माताजी, आपण इतक्यांत जाण्याची गोष्ट काढूं नका. आपण आमच्याबरोबर शेवटपर्यंत असा. आम्ही आपल्याबरोबर गोकुळवृंदावनाला येऊन आपल्याला आपल्या मुक्कामावर पोंचवून मग पुढें जाऊं. परंतु आपण आतां एकट्या जाण्याचें नांवसुद्धां

काढूं नका. मी आपला मुलगा आहें. आपल्या मातुःश्रीला जशी कोठें एकटी जाऊं देणार नाहीं, तशीच आपल्यालाही यापुढें जाऊं देणार नाहीं. आणखी आपणही विनाकारण माझा त्याग करूं नये."

तें ऐकून माता रणदेवी एकाएकीं गहिंवरली. मग काय तिला स्मरण झालें असेल तें परमेश्वर जाणे. कांहीं केल्या तिचे अश्रू थांबेनात. परंतु कसा तरी आपला गहिंवर तिनें आवरून धरून आणि अश्रू थांबवून त्यांस ह्मटलें: "महाराजा, आतां या मोहपाशांत आपण मला पाडूं नका. माझा निश्चय झाला तो झाला. आतां आम्ही येथूनच फुटणार. आम्हांला आतां लांब जायचें नाहीं. जवळच जायचें आहे. वृंदावनास पोंचायला आतां फार वेळ लागणार नाहीं. एकदां वृंदावनास पोंचलों ह्मणजे मग आम्हांला कशाची भीति नाहीं. आम्ही अगदीं सुखरूप राहूं. तुझ्या तुलाच आतां अनेक काळज्या उत्पन्न होतील. त्यांत आतां आमची काळजी वाहूं नको. बाळा, संभाजीराजाला तर विशेष जप."

इतकें बोलून ती वृद्ध गोसावीण निश्चयानें उठली. निदान या नवीन शिपायाला तरी आपण आपल्याला सोबत म्हणून घेऊन चला, म्हणून महाराजानीं तिला विनविलें; परंतु त्याला बरोबर नेण्याचें तर तिनें फारच निश्चयानें नाकारलें. त्याबद्दल बोलतांना तिची वृत्ति इतकी दुराग्रहाची दिसली, कीं महाराजसुद्धां पुढें कांहीं बोलले नाहींत. दुसरे कोणी चार शिपाई बरोबर देतों म्हणून त्यांनीं एकवार ह्मटलें, परंतु त्याबद्दलही तिनें निषेध केला. आणि ती महाराजांस पुनः आशीर्वाद देऊन व संभाजीसही आशीर्वाद देऊन निघाली.

वर सांगण्यांत आलेंच आहे, कीं संभाजी अलीकडे आपला बहुत काळ माता रणदेवीकडे बसूनच काढीत असे, यामुळें त्याला तिचा लळा लागला होता व तिचाही त्याच्या ठिकाणीं फार जीव होता. अर्थातच माताजी निघाली तेव्हां त्यानें तिच्या पायांला विळखा घालून "माताजी, तुह्मी जाऊं नका. नाहींतर मला आपल्याबरोबर न्या." असा आग्रह धरला. तो बालमोह मात्र तोडण्याचें माताजीस फार कठिण वाटलें. परंतु तिचा एकाएकीं निश्चयच दृढ झाल्याकारणानें तिनें संभाजीचीही समजूत घालून ती निघाली. आपल्याबरोबर कोणी नका असा तिनें हट्टच धरला, तेव्हां महाराजांचा नाइलाज होऊन त्यांनीं तिला जाऊं दिलें. जातेवेळीं तिचे त्यांनीं घट्ट पाय धरले. त्याचप्रमाणें सर्व मंडळीनीं तिला लोटांगण घातलें आणि आशीर्वाद घेतले. माता रणदेवीनें सद्गदित कंठानें सर्वांस आशीर्वाद दिले आणि सर्वजण त्यांच्याकडे पहात असतां त्या सर्व गोसावणी तेथून निघून गेल्या. त्या जात असतांना तो खरकपूरचा शिपाई तर त्यांच्याकडे फारच आतुरतेनें
...ता. किती वेळ झाला, तो त्या आतां दूर चालत असलेल्या गोसावणींकडून
...ना. मग त्या गोसावणींविषयीं आतांच त्याच्या मनांत काय
त्या अगदीं दिसेनाशा झाल्या, तरी तो आपला जागच्या

जागींच उभा होता. त्याच्या मनांत कांहीं तरी विलक्षण विचार आला असावा असें दिसलें. तो विचार कांहीं केल्या त्याच्या मनांतून दूर होत नसावा सर्वजण आपापल्या तंबूंत पालांत परत गेले, तरी हा त्या गोसाविणीं-च्या रस्त्याकडे पहात उभाच आहे. याचें त्याच्या एका नवीन झालेल्या स्नेह्यास फार आश्चर्य वाटलें व तो त्यास सहज थट्टेनें म्हणाला: " काय खरकसिंग, आतां काय तिकडे पहातां! भलत्याच हेतूनें पहात असाल, तर महाराज तुह्मांला एक क्षणभरसुद्धां आपल्या पायांपाशीं उभें करणार नाहींत हो. या कामांत त्यांचा कडकपणा फार भयंकर आहे. आपण त्यांना सोडविण्यासाठीं जिवावर उदार हो-ऊन लढलां म्हणून त्यांच्याकडे डोळे भरून पहाण्याचा हक्क नाहीं पोंचत!" तो गृहस्थ खरकसिंगास (याला शिवाजीमहाराजांचे सर्व लोक खरकसिंगच म्हणत. कारण त्यानें त्यांस सर्व हकीकत सांगितली, परंतु खरें नांव सांगितलें नाहीं. यामुळें तो खरकपूरचा खरकसिंग असें ते लोक म्हणूं लागले.) याप्रमाणें बोलला, तेव्हां खरकसिंग भानावर आला व एकदम म्हणाला: " शिव! शिव! शिव! शिव! हें काय आपण बोलतां! माझ्या मनांत असला विचार कालत्रयीं कधीं येणार नाहीं. माताजी आतां येथून गेल्या, त्यांना पाहून आणखी त्यांच्या मंडळीकडे पाहून मला कांहीं चमत्कारिक भास झाला म्हणून मी चकित होऊन आपल्याशींच विचार करीत होतों. या दक्षिणेंतून आपल्याबरोबर आल्या नव्हे का? मग तो माझा भासच खरा. त्यांत तथ्यांश कांहीं नाहीं. त्या गृहस्थानें त्यास त्यावर कसला भास, काय? वगैरे विचारलें; परंतु खरकसिंगानें कांहींच उत्तर दिलें नाहीं. तो आपल्या पालांत जाऊन बसला. पुढें दुसरेच दिवशीं तो मुक्काम महाराजांनीं सोडला आणि मध्यंतरीं कांहींएक विशेष न घडतां ते आग्रा शहराच्या हद्दीवर जाऊन पोंचले. जयसिंगाचा मुलगा रामसिंग हा त्यांस सामोरा आला.

---

# प्रकरण ४१ वें.

## आग्र्यास गेल्यानंतर.

माता रणदेवी व तिच्या मैत्रिणी ज्या मुक्कामापासून मथुरेला गेल्या त्याच मुक्कामापासून महाराजांनीं एक जासूद जयसिंगाचा पुत्र रामसिंग याच्याकडे पाठ-विला होता. तो जासूद पोंचतांच रामसिंगानें बादशहाच्याही काना-वर घातलें, कीं शिवाजीमहाराज ठरल्याप्रमाणें दरबारीं आले आहेत. जासूद येऊन पोंचला ती वेळ सकाळची होती आणि प्रहर दिवस येण्याच्या सुमारास

बादशहा आपला नमाज पढून स्वस्थ कांहीं पत्रें लिहीत असतां रामसिंगानें त्याची मुलाखत घेतली. रीतीप्रमाणें कुर्निसा होऊन काय हवाल आहे, ह्मणून बादशहानें विचारतांच रामसिंगानें "दक्षिणेंतून शिवाजीमहाराज जवळ येऊन पोंचले आहेत. सामोरें कोणीं जावें, कशा लव्याजम्यानिशीं जावें याबद्दल आज्ञा व्हावी" अशी विनंति केली.

ती ऐकण्याबरोबर बादशहानें जणूं काय आपलें तिकड लक्ष्यच नव्हतें असें दाखविलें. इतकेंच नव्हे, तर रामसिंग आपल्यापुढें उभा आहे, आणखी आपणास कांहीं सांगतो आहे ही गोष्टच आपल्या लक्ष्यांत आली नाहीं असें त्यानें दाखविलें. परंतु वस्तुस्थिति तशी नव्हती. त्याचें पूर्ण लक्ष्य रामसिंगाकडे होतें. इतकेंच नव्हे, तर शिवाजीमहाराज एका मुक्कामावर येऊन त्यांनीं छावणी दिली आहे हें याच्यापूर्वींच त्याच्या हेरांनीं त्यास केव्हांच– दोन दिवसांपूर्वींच–कळविलें होतें. परंतु त्यानें त्यांस सामोरें कोणीं जावें, कसें जावें, त्यांची व्यवस्था काय करावी याबद्दल कोणाजवळ एक चकार शब्दसुद्धां काढला नाहीं; आणि कोणी त्यासंबंधानें प्रश्न विचारण्याला आलाच तर पुढें काय, आणखी कसें वागावयाचें याबद्दल त्यानें आपल्या मनाशीं सगळा विचार करूनही ठेवला असला पाहिजे. शिवाजीमहाराज आपल्या तावडींत आला आहे हें कळल्यापासून औरंगजेबाची जी वृत्ति झाली होती, तिचें अगदीं बरोबर असें वर्णन करून वाचकांच्या मनांत ती गोष्ट उतरविण्याला एकच दृष्टांत आहे. एखाद्या उंदरानें एखाद्या जागीं फार धुमाकूळ माजविला ह्मणजे मांजर त्यास पकडण्यास टपून बसलेलें असतें आणि तो उंदीर आतां अगदीं आपल्या झांपेंत खास आला असें त्या बोकोबास दिसलें, कीं त्याची चर्या व वृत्ति हीं कांहीं निराळींच बनून जातात. ती चर्या व ती वृत्ति ज्यांनीं सूक्ष्म दृष्टीनें पाहिलीं असतील, त्यांनाच औरंगजेबाच्या आतांच्या–शिवाजी आतां आपल्या वेंघेंत आला हें कळलें तेव्हांच्या–वृत्तीची बरोबर कल्पना येईल. त्याच्या तेजस्वी डोळ्यांत एक प्रकारचें दुष्ट समाधान अगदीं स्पष्टपणें तळपत होतें. त्याचप्रमाणें "पाहूं आतां काय काय चमत्कार होतात ते, जाळ्यांत सावज तर पक्कें आलें," असें वाटून पुढें कसें कसें वागावयाचें याबद्दल कांहीं बेत ठरविण्यांत त्याचें डोकें पूर्णपणें गुंतलें आहे असें स्पष्ट दिसलें. रामसिंग आपल्यास शिवाजीच्या येण्याबद्दल वर्दी देण्यास आतां येईल, उद्यां येईल, त्या वेळीं कसें वागावयाचें याबद्दलही त्यानें आपल्या मनांत खचित कांहीं तरी विचार करून ठेवला असला पाहिजे. तो मोठा वस्ताद, धूर्त, मत्सरी व घातकी होता. दरबारच्या सर्व लोकांना त्याचा हा स्वभाव पूर्णपणें माहीत होता आणि त्यामुळें जो कोणी त्याच्या नजीक येई त्याला असें वाटे, कीं आपण याच्यापासून जितकें दूर राहूं तेवढें चांगलें. नवीन माणसाची मात्र स्थिति फार निराळी असे. त्याला बादशहा फार प्रेमळ, फार कनवाळू असें वाटे. कां कीं, प्रथम भेटीला तो इतका मिठास व कळकळीचें बोलावयाचा

कीं जणूं काय ज्याच्याशीं बोलत असेल त्याच्या कळकळीखेरीज दुसरें कांहीं बादशहास कामच नाहीं. परंतु आपण आतां आधीं प्रस्तुताकडे वळूं.

रामसिंगानें वर्दी दिली. बादशहानें असें दाखविलें, कीं जणूं काय आपल चित्त मुळींच त्याच्या बोलण्याकडे नाहीं. तो कांहीं स्वदस्तुरचें पत्र कोणास लिहीत होता. रामसिंग येण्याबरोबर एकवार त्यानें वर त्याच्याकडे पाहिलें मात्र आणि प्रथम किंचित् स्मित केलें, नंतर कपाळाला आंठ्या घातल्या आणि रामसिंग रीती-प्रमाणें कुर्निसा वगैरे करून बोलूं लागला, तेव्हां स्वारी आपल्या पत्रलेखनांत गुंग होऊन गेली !

रामसिंगास हा बादशहाचा स्वभाव माहीत नव्हता असें कांहीं नाहीं. तो पूर्ण-पणें माहीत होता. परंतु अशा वेळीं अमुकच लहर असेल हें त्यासही अजमावतां येईना. आपल्या वडिलांनीं नाना प्रकारांनीं लिहिलें आहे, तेव्हां त्यांचा बोज राख-ण्याकरितां हा कांहीं तसें विचित्र वागणार नाहीं असें त्याच्या मनांत आलें; परंतु वस्तुस्थिति पहातो तों अगदींच भिन्न. लिहिण्याच्या नादामुळें तसें असेल असें समजून त्यानें पुनः कुर्निसा केला. आणि पुन्हां पहिल्याप्रमाणेंच विनंति केली कीं, “ सामोरें जाण्याबद्दल कायतो हुकूम फर्मावावा. शिवाजीमहाराज अगदीं जवळ आले आहेत. कोणीं तरी सामोरें गेलेंच पाहिजे. ............ ”

औरंगजेब थोडा वेळ कांहींच बोलला नाहीं. नंतर ह्मणतोः “ आधीं शिवाजी-महाराज कोण तें मला सांग, मग पुढें काय बोलायचें तें बोलूं. ”

हें बोलतांना औरंगजेबाचा चेहरा इतका मत्सर व द्वेष यांनीं पूर्ण दिसला, कीं रामसिंगास त्याच्याकडे पाहून फार चमत्कारिक वाटलें. तो अगदीं स्तब्ध होऊन त्याच्याकडे पहात राहिला.

तें पाहून औरंगजेब पुनः ह्मणालाः “ दहा पांच किल्ले आणखी पांचपंचवीस खेडीं भिक्षा मागून आपल्या हातीं ठेवून माणूस कुठें महाराज होतो काय ? जा. असल्या माणसाच्या योग्यतेला साजेसाच पांच दहा इसमांचा लवाजमा देऊन एखाद्या शिलेदाराला पाठव सामोरा. आणखी त्याला लहानसान घर कुठें तरी पाहून तिथें त्याचें बिऱ्हाड लाव. किती माणसें आहेत त्याच्याबरोबर ? आहेत का पांच सात ? महाराज ! पुनः माझ्या देखत त्याला महाराज कोणी ह्मणतां कामा नये, जा. ”

रामसिंग फारच चमत्कारला. आतांपर्यंत औरंगजेबानें अशा प्रकारें शिवाजी-महाराजांसंबंधानें उद्गार काढले नव्हते; असें असतांना आतांच हें काय ? ते दरबारीं आले ह्मणजे आपल्या तावडींत आले असें वाटूनच हा प्रकार जर सुरू झाला तर ते एकदां येऊन येथें राहिल्यानंतर काय होणार ? हा विचार त्याच्या मनांत एकसारखा वावरूं लागला. सामोरें जाण्याच्या संबंधानें मोठीशी अडचणीची गोष्ट नव्हती. रामसिंगाजवळ शिबंदी

कांहीं कमी नव्हती. वाटेल तेवढा लवाजमा घेऊन त्यानें सामोरें जाण्याचा थाट उडवून दिला असता. परंतु बादशहाच्या अनुमतीवांचून कांहीं केल्यास त्याला राग येईल ह्मणून तो विचारण्यासाठीं गेला तों हें तिरपगडेंच झालें. बादशहा तसें बोलूं लागला हा पुढें होणाऱ्या एकंदर गोष्टींचा प्रस्ताव कीं काय, हें भय त्यास पडलें. तथापि ही वेळ जास्त कांहीं बोलण्याची नव्हेच. ह्मणून त्यानें कांहीं वेळ स्तब्ध बसून बादशहाची आज्ञा घेण्यासाठीं पुनः कुर्निसा केला. बादशहाचें लक्ष त्याच्याकडे होतेंच. त्यानें रजा घेण्याचा मानस दाखवितांच बादशहा त्यास ह्मणतोः "कांहीं हरकत नाहीं. तुम्ही वाटेल तितका–जितकी त्याची योग्यता आहे अशी तुमची समजूत असेल, तितक्यापेक्षां थोडा जास्तच वाटेल तर घेऊन जा. त्याची रहाण्याची काय तजवीज केली आहे ?"

"वाडा पाहून साफसुफ करून ठेवला आहे, सर्व तयारी आहे, शिधासामग्री भरून ठेवली आहे. आपण आज्ञा कराल त्याप्रमाणें आणखी काय तजवीज करायची ती करूं."

"तुमचे तुह्मी सर्व एकच आहां, तेव्हां त्यांत कांहीं कमी पडायचेंच नाहीं, पण आमचें विचारण्याचें काम आहे, ह्मणून विचारलें."

बादशहाचें हें भाषण रामसिंगास तर फारच विचित्र वाटलें. आज बादशहाच्या अंगांत कांहीं भूतसंचार झाला आहे, कीं आहे तरी काय ? जें बोलावयाला जावें त्याच्यावर कांहीं तरी आपलें तेढें ठेवलेलेंच. असा आजचा प्रकार होता. हें शेवटचें बोलणें ऐकून तर त्याच्या मनाला असें खास वाटलें, कीं आज आपण याच्या समोरून लवकर गेलों तरच बरें. महाराजांना आणण्याची काय तजवीज करावयाची, त्यांना सुखांत रहाण्याला काय व्यवस्था करावयाची ती आपली आपणच काय करावयाची ती करूं. बादशहा आपल्या बाबतींत संतुष्ट आहे कीं असंतुष्ट आहे, त्यांना आपल्याबद्दल आदर वाटतो आहे कीं अनादर वाटतो आहे याबद्दल त्याला प्रथमच कांहीं कळावयाचें कारण नाहीं. परंतु ही एकंदर तऱ्हाच विचित्र दिसली आणि ते तर हुरुपानें येणार. तेव्हां त्यांना एकंदर हकीकत कळली ह्मणजे काय होईल, हेंच त्याच्या मनाला खाऊं लागलें. शेवटीं त्यानें मनाचा दृढनिश्चय केला, कीं आतां आपण येथून निघून तर जावयाचेंच. मग बादशहा काय खवचट टोंचून बोलावयाचें असेल तें बोलो. इतक्या प्रकारें मनाची तयारी होऊन तो उठला. बादशहानें त्यास विचारलें, "तो येऊन स्थिरस्थावर झाल्यावर मला येऊन कळवा. ह्मणजे त्याची मुलाखत घेण्याची व्यवस्था करूं. मी आतांपर्यंत जें काय बोललों तें आपण त्याला सांगूं नका. जा, खूप लवाजमा–वाटेल तितका लवाजमा–घेऊन जाऊन त्याची तब्यत खुष ठेवा. वाटेल तशी सरबराई करा. बोभाट येतां कामा नये. आणखी आतां काय सांगायचें आहे ?" ही पडत्या फळाची आज्ञा असें समजूनच रामसिंगानें तेथून पाय काढला. आणखी कांहीं

वेळ बसलों तर आणखी काय बोलेल कोणास ठाऊक ! कां कीं आज त्याची लहर ठीक नव्हती हें उघड दिसलें.

रामसिंग तेथून निघून आपल्या वाड्यांत आला. म्यान्यांतून खालीं उतरतांक्षणींच त्यानें आपल्या कारभाऱ्यास व पागनिसास बोलावून आणून त्यानें शिवाजीमहाराजांस सामोरें जाण्यासाठीं काय तजवीज करावयाची तें सर्व सांगितलें. शिवाजीमहाराजांनीं आग्र्याच्या शिवेवर केव्हां यावें, त्याचप्रमाणें कोठें थांबावें तें ठरविण्यासाठीं त्या जासुदाबरोबरच आणखी एक माणूस आपलेकडून दिला. आपल्या घरून जी काय तजवीज करावयाची ती केल्यानंतर स्वारी आपल्या बरोबरीचे जे दुसरे कोणी सरदार होते, त्या सरदारांकडे जासूद पाठविण्याच्या तजविजीस लागली. दरबारांतल्या पुष्कळ सरदारांना शिवाजीमहाराजांना पहाण्याची इच्छा होती. हें रामसिंगास ठाऊक होतें; कारण गेल्या आठदहा दिवसांत शिवाजीमहाराज कधीं येणार, कधीं येणार ह्मणून सर्वजण एकसारख्या चौकशा करीत होते. ज्यांनीं ज्यांनीं म्हणून चौकशा केल्या होत्या, त्या सर्वांस त्यांनीं निरोप पाठविले आणि ते सर्व आपापल्या लव्याजम्यानिशीं महाराजांस सामोरे जाण्यास सिद्ध झाले. या त्यांच्या सिद्ध होण्यामुळें एक फारच मोठी गोष्ट झाली, कीं दक्षिणेंत ज्यानें एवढा धुमाकूळ घालून बादशहास अगदीं त्रासवून सोडलें, तो शिवाजी राजा आज आग्र्यास आला असून त्याची मिरवणूक निघणार आहे. एक बादशहाखेरीज बाकी सर्व रजपूत व मुसलमान सरदार त्याला सामोरे जाणार आहेत. खुद्द बादशहाची स्वारी निघत असते, तसला थाट होणार आहे अशी जिकडे तिकडे भुमका उठली आणि ही भुमका पसरतां पसरतां शहरांत इतकी पसरली कीं मुख्य मुख्य रस्त्यावरील घरांतील मंडळी आपल्या रस्त्यावरल्या खिडक्यांतून ठाणें देऊन बसली. हेतु हा, कीं आपल्यास तो दक्षिणचा राजा दिसावा ! तो येणार केव्हां, कोणत्या रस्त्यानें जाणार, याची दाद कोणासच नव्हती. साधारण मोठ्या रस्त्यावरील प्रत्येक इसमास असें वाटत होतें, कीं त्याची स्वारी आपल्याच रस्त्यानें जाणार. शिवाजीमहाराजांचें नांव आणि कीर्ति हीं सर्व हिंदुस्थानभर पसरलीं असल्यामुळें त्यांना पहाण्यासाठीं सर्व लोक अगदीं उत्सुक होते; यामुळेंच त्यांची जय्यत तयारी सुरू झाली. त्याचप्रमाणें शिवाजीमहाराज हे शिवाचे अवतार असून त्यांच्या हातून मोगलांचें पारिपत्य होणार आहे अशी पुष्कळांची श्रद्धा होती. असें जर त्यांचे हातून पारिपत्य व्हावयाचें आहे तर त्याचा पार पराभव कां झाला असें कोणी कुचेष्टकांनीं विचारलें, तर दुसऱ्यांनीं त्यांस ह्मणावें, बाबांनो, रामालासुद्धां कांहीं वर्षें वनवास भोगावा लागला, पांडवांना भोगावा लागला, मग त्याला चार दिवस पड घ्यावी लागली, तर त्यांत नवल काय !

अशा तऱ्हेचीं बोलणीं जिकडे तिकडे सुरू होऊन सगळ्या आग्राशहरभर शिवाजीमहाराजांच्या स्वागताची एकच धुमश्चक्री सुरू झाली. कोणी कोणाला न सांगतां

न सवरतां सर्व लोकांत एक प्रकारची चढाओढ लागली, कीं शिवाजीच्या प्रवेशा-प्रीत्यर्थ आपलें घर जास्त थाटानें कोण शृंगारतो ! कोणीं गुढ्या उभारल्या, कोणीं तोरणें उभारलीं, कोणीं सडासंमार्जनें करून अंगणें व दारांपुढील जागा सारवून त्यांवर रांगोळ्या काढल्या. थोडी संध्याकाळ होतेशी दिसतांच कित्येकांनीं पणत्या लावून दीपावली करण्याचाही विचार सुरू केला ! " गतानुगतिको लोकः " म्हणतात त्याप्रमाणेंच सर्व अवस्था झाली. रामसिंगाच्या स्वप्नांतसुद्धां असें आलें नव्हतें कीं महाराजांच्या स्वागताचा केवळ यदृच्छेनें इतका थाट होईल. ही कल्पनाही त्यास नव्हती. परंतु बनाव बनून गेला. सर्व सरदार, दरकदार, दरबारी रजपूत, इतर हिंदू आपापला लवाजमा घेऊन महाराजांच्या स्वागतासाठीं गेले आणि सर्व शहरभर नुसती गडबड उडून गेली. ही गडबड बादशहाच्या कानापर्यंत गेली. त्याच्या जनान्यांतसुद्धां ती जाऊन पोंचली. यामुळें रामसिंगानें शिवाजीमहाराजांस निरोप पाठविला कीं आपण आतां शहरांत येण्याची सत्वर तजवीज करावी. विलंब लावूं नये. लहानांपासून थोरांपर्यंत सर्व माणसें आपलें दर्शन व्हावें ह्मणून उत्सुक आहेत.

शिवाजीमहाराजानीं आपला मुक्काम हलविला होताच. आग्रा जों जों जवळ येऊं लागलें, तों तों त्यांचें अंतःकरण मात्र फार जड होऊं लागलें. आग्र्यास बादशहानें आपल्यास आणलें, त्याचा हेतु आपली लाचारी जगाच्या निदर्शनास आणावी एवढाच होय. आणि स्वतःबद्दल गौरव करून घेऊन आपल्या बळाचा वाजागाजा व्हावा हें दुसरें त्याच्या मनांतलें इंगित. तेव्हां तो आपलें स्वागत आतां कोणत्या प्रकारानें, किती आपला कमीपणा दाखवून करतो हेंच पहाणें राहिलें. महाराजांस असें वाटलें, कीं जसा एखादा विजयी पुरुष आपल्या शत्रूस बंदिवान् करून घेऊन येतो आणि मग मोठ्या थाटानें नगरप्रवेश करून आपण आणलेल्या बंदिवानाचें रस्तोरस्तीं प्रदर्शन करावयाचें ह्मणून सगळ्या शहरांतून हिंडतो, तसाच हा आपला प्रवेशसमारंभ होणार असें त्यांस वाटत होतें. अर्थात् त्यांच्या मनास फार खेद होत असे. परंतु उपयोग काय ? त्यांस असें वाटलें, कीं बादशहाच्या पुत्रांपैकीं कोणास तरी तो पाठवून आपल्यास आपल्या दरबारीं नेईल. कोणी तरी शहाजादा आपल्यापुढें चालेल, आणि आपल्या वडिलांनीं दक्षिणेंतून आणलेला हा बंदिवान् सगळ्या नगरच्या लोकांस दाखवील.

परंत नगरच्या वेशीपासून पुढें सामोरे आलेले लोक त्यांच्या नजरेस ... त्यांस सर्व रजपूत व इतरच दिसले. बादशहाच्या लोकांपैकीं ...ाहींत. एका दृष्टीनें त्यांस तें समाधान झालें. परंतु पुढें त्यांस जेव्हां ...ाणखी उत्साह दिसला, आपल्याविषयींचें त्यांचें प्रेम दिसलें, तेव्हां त्यांच्या समाधानास पारावार नाहींसा झाला. दक्षिणेंतून आणलेला बंदिवान् प्रदर्शनासाठीं फिरविला जात आहे असें पाहून लोकांचा जो उत्साह असावयाचा

त्याहून हा उत्साह फार भिन्न होता. जसा एखादा वीर मोठी थोरली लढाई मारून आला असतां लोकांस त्याच्याबद्दल फार कौतुक वाटावें आणि त्याचें स्वागत त्यांनीं करावें त्याप्रमाणेंच सर्व नगरभर त्यांचें स्वागत चाललें होतें. त्यांच्या नांवाचा जयघोष होत होता. आपणास जें वाटलें होतें, त्याहून अगदीं भिन्न प्रकार पाहून महाराजांस व त्यांच्या मंडळीसही फार आनंद आणि समाधान हा झाली. इतरांस आनंद झाला, त्याचें कारण निराळें. महाराजांस झाला, त्याचें कारण अगदीं निराळें.

---

# प्रकरण ४२ वें.

## स्वागत.

मोगलांचें पारिपत्य करण्यासाठीं अवतरलेला हा पुरुष आज आपल्या नजरेस पडला म्हणून ज्यास त्यास फार आनंद झाला. आपल्या उत्तरेस जरी ज्यानें त्यानें बादशहापुढें मान वांकविली आहे, तरी दक्षिणेंत यानें कित्येक वर्षेंपर्यंत मान न वांकवितां बादशहास हात टेंकीस आणलें. शेवटीं बादशहाला त्याच्याशीं तह करून घेण्याची पाळी आली व त्यानें मोठ्या मिनतवारीनें त्याची स्वतंत्रता कबूल करून त्यास इकडे आणून त्याला मनसबदारीची लालूच दाखवावयाचा बेत केला आहे अशा जिकडे तिकडे भुमका उठली. सर्व हिंदू लोकांत असा समज फैलावला. शिवाजीमहाराजांस इकडे यावें लागलें, तह करण्यास कबुली द्यावी लागली, यांत त्यांस नामुष्कीचें असें कोणासच कांहीं दिसेना. आपण बंदिवान् ह्मणून आपल्याविषयीं लोकांस अनादर वाटत नसून आपण जणूं काय विजयी पुरुष आहों असें वाटत आहे, हें महाराजांस स्पष्ट दिसलें. अर्थातच त्यांस एका दृष्टीनें समाधान झालें. परंतु विशेष समाधान झालें तें निराळ्याच दृष्टीनें होय. स्वराज्याची व स्वातंत्र्याची इच्छा लोकांत अद्यापि कायम आहे. स्वराज्यासाठीं व स्वातंत्र्यासाठीं आपण आपल्या देशीं धडपड करतों आहों, ती केवळ मूर्खपणाची आहे असें कांहीं या लोकांना वाटत नाहीं हें फार चांगलें लक्षण आहे असें महाराजांस वाटलें. जोंपर्यंत माणूस किंवा समाज आपल्या अवनत स्थितीला-हीच आपली कायमची ईश्वरानें नेमून दिलेली स्थिति असें मनांत धरून निराश होऊन बसला नाहीं, तोंपर्यंतच त्याचें डोकें वर निघण्याची आशा. ती स्थिति जर का एकदां येऊन पोंचली तर पुढच्या आशेचें नांवच काढावयाला नको, हें महाराजांस स्पष्ट दिसत होतें. तेव्हां तितकी अवनत स्थिति अद्यापि दिल्ली, आग्रा वगैरे ठिकाणींही येऊन पोंचली नाहीं हें पाहून त्यांना समाधान झालें तर त्यांत नवल काय? दिल्ली, आग्रा-येथें

जवळ जवळ चारशें वर्षें मुसलमानी अंमल थोड्याबहुत अंशांनीं कायम झाला होता. बाबरापासून तर तो पक्का बसत चालला आणि औरंगजेबाचे कारकीर्दींत त्याच्या जुलुमाची कमाल उडाली. तेव्हां तितक्या वर्षांच्या अमलांतूनही लोकांची स्वातंत्र्येच्छा कायम रहावी निदान स्वातंत्र्याकरितां धडपड करणाऱ्या इसमाबद्दल त्यांना समाधान वाटावें हें विशेषच होतें.

लोक केवळ गतानुगतिक असतात हें उघडच आहे. लोकांत जो उत्साह दिसला तो प्रत्येक व्यक्तीला महाराजांच्या अंगच्या गुणाचें ज्ञान होतें किंवा आदर वाटत होता अशामुळें खचित नव्हे. आपला शेजारी ह्मणतो, आपणही ह्मणूं लागलों असाच सर्वांचा प्रकार होता. परंतु एवढी गोष्ट खास, कीं महाराजांचें आग्रा शहरीं लोकांकडून जें स्वागत झालें, तें अगदीं अनाहूत असून सर्वोत्कृष्ट झालें. आपणांस अस्सल मुसलमान ह्मणविणाऱ्यांना मात्र त्याबद्दल फार फार वाईट वाटलें. आपल्या हिंदुबांधवांचें हें कृत्य पाहून त्यांनीं त्यांची निर्भर्त्सना चालविली. त्यांना ते टाकून बोलूं लागले. शिवाजीची निंदा ते करूं लागले. या त्यांच्या करण्यामुळें अर्थातच हिंदूंचा अभिमान फार वाढला आणि ते त्यांची निर्भर्त्सना करूं लागून मारामाऱ्यांवर प्रसंग आले. बादशहा विजय मिळवून येत आहे तर त्याचें स्वागत करण्यासाठीं लोकांनीं अमूक प्रकारें समारंभ करावा असें जरी कोणीं मुद्दाम द्वाही फिरवून लोकांस सांगितलें असतें, तरीसुद्धां जो उत्सव झाला असता, त्यापेक्षां या वेळेचा उत्सव फार प्रचंड होता. कां कीं, यांत हिंदूंना फार उत्साह वाटत होता. मुसलमान पुरुष जरी वाटेल तशा शिव्या देत होते तरीपण त्यांचीं अंतःपुरें त्यांच्याइतकीं दुरभिमानी नव्हतीं. मनुष्य जात्या उत्सवप्रिय आणि त्यांत स्त्रियांची उत्सवप्रियता तर विचारूंच नये. यामुळें त्यांना तो उत्सव पहाण्याची उत्सुकता साहजिकपणेंच वाटून त्या आपापल्या गच्चयांवर बसून त्या मिरवणुकीकडे पहात होत्या. घरांतील पुरुष मंडळी खालीं इतर लोकांशीं वाद्‌विवाद करण्यांत गुंतल्याकारणानें आपल्या घरांत काय चाललें आहे हें त्यांस दिसतें आहे कशाला? स्त्रियांना जिज्ञासा ही फार. शिवाजीमहाराजांचें नांव त्यांच्या कानांपर्यंत गेलें होतें यामुळें त्यांस पहावें हीही त्यांस इच्छा होतीच.

याप्रमाणें शिवाजीमहाराजांच्या आगमनानें आग्रा शहरांतील लहानांपासून थोरांपर्यंत अगदीं गडबड उडून जाऊन सगळें शहर त्यांचें स्वागत करण्यास उत्सुक झालें होतें म्हणण्यास हरकत नाहीं. अशी स्थिति झाली होती आणि हें सव कोणी कोणतीही पूर्व व्यवस्था न करतां! रामसिंगास तें पाहून किती समाधान झालें! जें बादशहाच्या आज्ञेनेंसुद्धां झालें नसतें तें अगदीं आपोआप झालें. बादशहाशीं मुलाखत करून आल्यानंतर तो अगदीं खिन्न झाला होता. आपल्या वडिलांनीं ज्या उत्सुकतेनें व आशेनें शिवाजीची रवानगी केली, त्याला अगदीं विरुद्ध असें कांहीं तरी वर्तन बादशहा करील हें त्याच्या स्वप्नींही आलें नाहीं. परंतु आतां

त्याच्या मनाची खात्री झाली, कीं असें वर्तन तो करणार इतकेंच नव्हे, तर त्याच्यापेक्षां विलक्षण असें कांहीं न करो म्हणजे झालें. काय करील याचा तर्क करण्याससुद्धां रामसिंगाचें मन कचरूं लागलें.

अगदीं अनायासें झालेल्या या स्वागतसमारंभानें रामसिंगास एका परीनें समाधान झालें, परंतु दुसऱ्या परीनें वाईट वाटलें. या समारंभाचें वर्णन बादशहाच्या कानीं गेलें असतां त्याच्या वैराग्नीचा भडका होईल व त्यायोगानें अंगाची अगदीं लाही लाही होईल हें त्यास उघड उघड दिसलें. ज्याला आपण नुसतें महाराज झटलें म्हणून संताप आला, तो हें वर्णन ऐकून डोक्यांत राख घालून उठणार नाहीं हें संभवनीयच नव्हे. परंतु आतां काय करणार ? जें झालें तें तर ठीक झालें. बादशहा काय करील तें पहातां येईल. असें त्यानें आपलें समाधान करून घेऊन पुढें नजर दिली.

शिवाजीमहाराजांना त्याबद्दल समाधान झालें तें केवळ याच दृष्टीनें कीं आग्रयास–बादशहाच्या राजधानींतसुद्धां–आपल्या प्रयत्नाला वाखाणणारे व त्याची किंमत जाणणारे लोक आहेत. स्वातंत्र्यप्रियता कांहीं अगदीं नष्ट झाली असें नाहीं. ठीक आहे. आज नाहीं उद्यां या लोकांना संधि मिळाली, तर ते कांहींना कांहीं तरी हातपाय हलवितील. आपण ज्या हेतूनें इकडे आलों, तो हेतु अगदीं विफल होईल असें नाहीं. अशा समाधानांत ते होते. तानाजी वगैरे इतर मंडळींना अर्थातच आपल्या महाराजांचा असा गौरव झाला एवढें पाहूनच फार हर्ष झाला. त्यांची दृष्टीच दुसऱ्या कशाही विचाराकडे नव्हती.

रामसिंगानें आपल्या मकाणापासून जवळच महाराजांसाठीं व त्यांच्या लवाजम्यासाठीं जागा पाहून ठेविली होती. एक प्रचंड वाडा होता तो खासास्वारीसाठीं व त्या वाड्याच्या आवारांत तंबू, शाम्याने वगैरे देऊन त्यांच्या पागेची वगैरे सर्व व्यवस्था उत्तम प्रकारें राहील अशी तजवीज लाविली होती. त्या वाड्यांत स्वाऱ्या जाऊन पोंचल्या. महाराजांस त्या वाड्याच्या दिवाणखान्यांत नेऊन बसविलें. नंतर थोडक्यांत पुष्कळ अमीर उमरावांच्या–अर्थातच फक्त हिंदु उमरावांच्या–भेटी झाल्या. नंतर महाराजांस विश्रांति पाहिजे ह्मणून मंडळी उठून गेली. रामसिंगही " सर्व व्यवस्था उत्तम प्रकारें केली आहे. तथापि आणखी कांहीं लागल्यासवरल्यास यत्किंचितही संकोच न करतां माझें मकाण जवळ आहे तेथें निरोप पाठवून मागवून घ्यावें. आपण आपल्या प्रांतीं आपल्या राजवाड्यांत असल्याप्रमाणें समजावें " असें महाराजांच्या वांकनिसास बजावून, महाराजांस विचारून गेला. रामसिंग गेल्यानंतर महाराज स्वस्थ बसले. त्यांची मंडळीही त्यांचे सभोंवार बसली. आतांपर्यंत पाहिलेल्या विलक्षण देखाव्याबद्दल भाषण अर्थातच निघालें. परंतु महाराज त्यांत कांहीं बोलले नाहींत. त्यांच्या मनांत तिसराच कांहीं विचार घोळत होता. बाळाजी व तान्हाजी त्यांच्या अगदीं जवळ होते. त्यांस ते

ह्मणालेः " रामसिंगाच्या मनांत कांहीं तरी डांचतें आहे. त्याला कांहीं तरी काळजी उत्पन्न झाली असावी असें दिसतें. इथें आल्यानंतर मला एकदोनदां असेंसुद्धां वाटलें कीं त्याला माझ्याशीं कांहींतरी एकांतांत बोलायचें आहे. परंतु शेवटीं आतांच बोलूं नये असा निश्चय करून तो गेला असावा असें दिसलें. आपल्यास मुसलमान सरदारांपैकीं कोणीही सामोरा आला नाहीं हीही गोष्ट ध्यानांत धरण्याजोगी आहे. "

बाळाजी किंवा तानाजी यांना रामसिंगाच्या वर्तनांत कांहीं तसें आहे असें वाटण्यास कारण नव्हतें. कारण त्यांचें मन त्याच्याकडे नव्हतेंच. महाराजांचें स्वागत उत्तम प्रकारें झालें या आनंदांतच होतें. त्या मंडळींत खरकासिंगही होता. त्यानें तें महाराजांचें भाषण ऐकलें आणि तो हात जोडून महाराजांस एकदम म्हणतोः—"महाराज, रामसिंगास कांहीं चिंता पडली, तर नवल नाहीं. कारण आतां झालेल्या या आपल्या स्वागताची हकीकत बादशहाच्या कानीं गेली ह्मणजे मत्सरानें व द्वेषानें त्याच्या अंगाचा अगदीं भडका उडेल व तो त्या मत्सराच्या आणि द्वेषाच्या भरांत काय करील आणि काय नाहीं याचा नेम नाहीं. आपलें अशा प्रकारें स्वागत व्हावें ही बादशहाची इच्छा नसणारच, तेव्हां तसें तें झालें हें कळतांच त्याला फार फार वाईटही वाटणार. शहाजाद्यांपैकीं कोणी आपल्यास सामोरा आला काय ? शहाजादा राहो परंतु कोणी तरी मुसलमान उमराव ? "

खरकसिंग इतकें बोलून थांबला. महाराजांस त्याचें बोलणें अगदीं यथार्थ वाटलें. आपल्याला आग्र्यास सुरक्षित ठेवणें, कांहीं दगाफटका होऊं न देणें हें रामसिंग आपलें काम समजतो हें साहजिकच होय. तेव्हां त्याला हीच काळजी वाटत असली पाहिजे हें उघड आहे हें महाराजांसही बरोबर वाटलें.

नंतर थोडा वेळ आणखी भाषण झाल्यानंतर महाराज भोजनाला गेले व इतर मंडळीही आपआपल्या आहाराच्या तजविजीस लागली.

भोजनोत्तर रामसिंग पुनः महाराजांची व्यवस्था कशी काय लागली तें पहाण्यास आला. महाराजांचें भोजन होऊन ते जरा पडण्याच्या विचारांत होते, परंतु रामसिंग आल्याची वर्दी लागतांच त्यांनीं त्यास बोलावून " आपण आमची फार काळजी वहातां. सर्वस्वी परामर्ष घेण्याचा भार आपल्यावर आहेच. परंतु इतकी तकलीफ आपल्याला पडावी अशी माझी इच्छा नाहीं. आपण आतां अगदीं निर्धास्त असा. आह्मांला कांहीं कमी नाहीं. " असें आग्रहानें सांगितलें. त्यावर रामसिंगही कांहीं औपचारिक बोलला आणि तेथून महाराजांचा निरोप घेऊन निघाला. थोडा बाहेर गेला—आणि पुनः त्याच्या मनांत कांहीं विचार येऊन तो आपल्याशींच—" सांगून टाकावें तें चांगलें " असें पुटपुटला व आंत जाऊं लागला. इतक्यांत त्याच्या अंगरख्याला धरून कोणींतरी ओढलें असा त्याला भास झाला व त्यानें वळून पाहिलें आणि अंगरखा ओढणाऱ्यास ओळखलें असें दि-

सलें. तो त्याचें नांव घेऊन ' तूं इकडे कसा ? ' असें कांहीं म्हणणार तों तो दुसरा गृहस्थ एकदम ' माझें येथलें नांव खरकसिंग. मला आपल्याशीं कांहीं बोलायचें आहे. पण तें मी आपल्याबरोबर येऊन बोलेन. येथें नको. मी येथें कसा, हीही हकीकत सांगेन.' रामसिंगानें मान डोलवून अनुमति दाखविली. तेव्हां खरकसिंग त्यास ह्मणतो: " महाराजानीं माझ्यावर अनंत उपकार केले आहेत. त्यांचा उतराई होण्यासाठीं मी त्यांच्या बरोबर राहिलों आहें. यत्किंचित् कांहीं संकट दिसलें, तरी मी आपल्याला कळवीन. वाघीण आपल्या पिलाची जशी काळजी घेते आणखी जागरूक असते तसा मी राहीन. आपण बिलकुल काळजी करूं नका. दरबारांत किंवा बादशहाशीं आपलें भाषण काय होतें तें कळलें कीं झालें. "

नंतर रामसिंगाचा हेतु पुनः बदलला. जें बोलून टाकावें असें मनांत योजून तो परतला होता तें बोलूं नये असें त्यास वाटून तो आपल्या घरीं जाण्यास निघाला.

शिवाजीमहाराजांच्या आपोआप झालेल्या स्वागताच्या सर्व बातम्या बादशहास प्रत्येक क्षणीं जातच होत्या. अर्थातच त्याच्या अंगाचा अगदीं तिळपापड झाला. त्याच्याजवळ असणाऱ्या एक दोघां सरदारांनीं बादशहाचा कल पाहून त्यास ' हें सर्व बंद होणार नाहीं का ' म्हणून विचारलें. परंतु त्यानें त्यांच्याकडे चमत्कारिक नजरेनें पाहून कपाळास किंचित् आंठ्या घातल्या व दुसरीकडेच दृष्टि दिली. त्याच्या मनांत काय चाललें होतें तें त्याचें त्यालाच ठाऊक. इतक्यांत रामसिंग आल्याची वर्दी आली. त्याबरोबर बादशहानें त्यास आंत बोलाविलें व जवळ होते त्यांस जाण्यास सांगितलें. रामसिंग येण्याबरोबर बादशहा त्यास ह्मणाला: " वा ! आपण तर फारच बहार उडवून दिली असें ऐकतों. पण ठीक केलेंत. त्याला असें वाटायला नको, कीं आपण इकडे आलों आणखी आपला अपमान झाला. दक्षिणेंत परत जाऊंच नये असें त्याला वाटावें किंवा गेलाच तर बादशहातीच्या उलट आपण वागावें असें त्याच्या मनांतसुद्धां येऊं नये. त्याची रहाण्याची वगैरे व्यवस्था फार उत्तम ठेवली आहेना ? कांहींसुद्धां उणें पडूं नये. आपण त्यांच्या तैनातींत असायला पाहिजे. आमच्याविषयीं गैरविश्वास उत्पन्न होईल असें कांहींसुद्धां घडतां कामा नये. अशी खबरदारी ठेवा. त्याला आमचा दोस्त बनवायचा आहे. दुस्मन् राहूं द्यायचा नाहीं. "

रामसिंग तें ऐकून फारच चकित झाला. शिवाजीमहाराज जवळ आले असें कळविलें तेव्हांचें बादशहाचें वर्तन, भाषण आणि आतांचें वर्तन, भाषण यांत किती जमीनअस्मानचें अंतर ! तेव्हां हा प्रकार आहे तरी काय ? असें त्यास वाटून तो अगदीं स्तब्धपणें बादशहापुढें उभा राहिला. बादशहा त्याजकडे पहातच होता. नंतर एकदम ह्मणाला: " दोन तीन दिवस त्यास विश्रांति घेऊं द्या. विश्रांति घेतली ह्मणजे मग दरबाराला येण्याची व्यवस्था करूं. आमचा निरोप कळवा कीं ' वाटेच्या दगदगीचा शीण जाऊन आराम वाटेपर्यंत आपल्याला दरबाराला ये-

ण्याची तसदी घ्यायची नाहीं. असा बादशहाचा हुकूम आहे. तेव्हां आपण अगदीं ऐषआरामांत आणि मजेंत रहा. अगदीं आराम वाटला ह्मणजे मग सावकाशीनें दरबारांत आपल्याला पाचारण केलें जाईल. आपण मनांत कांहींही दिक्कत बाळगूं नये.' आतां जा. आणखी त्यांना आपण इथें आलों हें बरें झालें नाहीं असें वाटूं देऊं नका. त्याची आह्मांला दोस्ती संपादायची आहे. दुस्मनी नको. हें पुनः सांगतों तें ध्यानांत ठेवा."

रामसिंग कुर्निसा करून तेथून निघाला. आपण जें होईल असें अपेक्षून आलों होतों त्याच्या अगदींच उलट प्रकार पाहून तो फार थक्क झाला. हा एकंदर प्रकार काय याची त्यास कल्पना होईना. गांवांत काय प्रकार झाला तो घटकोघटकीं–नव्हे क्षणोक्षणीं–बादशहाच्या कानीं गेला असलाच पाहिजे. अर्थात् तो मत्सराच्या ज्वालांनीं अगदीं वेष्टित होऊन त्याच्या अंगाचा संताप झाला असेल. त्या संतापाच्या भरांत तो काय ह्मणेल आणि काय करील याचा नेम नाहीं; परंतु आपलें कर्तव्य कीं जें काय घडलें असेल तें त्याला सांगावयाचें. तें कर्तव्य केलें पाहिजे ह्मणून आपण जावयाचें असा विचार करून तो आला होता. त्याला असें वाटलें, कीं बादशहा आपली खूप खरडपट्टी काढील. आपल्याला फार टाकून बोलेल; परंतु जें घडलें, तें अगदींच निराळें. तेव्हां हें आहे तरी काय ? विलक्षण प्रकार होऊन बादशहा शांत कसा ? परंतु कपटी माणसें असतात तीं अशींच असावयाचीं हें त्यास पक्कें ठाऊक आणि बादशहा ह्मणजे कपट्यांतला कपटी तेव्हां त्याच्या बोलण्याचा भरंवसा मुळींच धरूं नये हें त्याचें पक्कें ठरलेलें. त्यास अनुसरून तो तेथून अशाच समजुतीनें निघाला, कीं जें काय बादशहानें सांगितलें, त्यांतला अर्थ इतकाच, कीं वरून साखर पेरून आंतून त्याच्या मनांतून कांहीं तरी विषप्रयोग करावयाचा आहे. तेव्हां आपण अत्यंत सावधपणें रहावें हेंच विहित. इतका जो विलक्षण स्वागतसमारंभ झाला, त्याचें बादशहास समाधान वाटणें शक्यच नव्हे.

असा आपल्याशींच विचार करीत रामसिंग आपल्या घरीं परतला. बादशहाच्या एकंदर वर्तनानें त्याच्या जिवास तळमळ लागली. शिवाजीमहाराजांस इकडे पाठविण्याचें आपल्या वडिलांस बादशहानें भाग पाडल्यामुळें त्यांनीं त्यांना इकडे येण्याची सल्ला दिली ती कांहीं एकंदरींत बरी नव्हे, भलताच घात होण्याचा संभव फार असें त्यास वारंवार वाटूं लागलें. तिकडच्या तिकडे जर महाराज असते, तर कांहींसुद्धां झालें नसतें. स्वस्थ तरी असते. असे नाना प्रकारचे विचार त्याच्या मनांत येत राहिले आणि तो आपल्या घरीं गेला. महाराजांस अगदीं सुरक्षित ठेवण्याची जबाबदारी आपल्यावर आहे. आपण जितकी काळजी घेऊं तेवढी थोडी आहे हें त्यास दिसतच होतें.

रामसिंग गेल्यानंतर बादशहा आपल्या शेजमहालांत जाण्याच्या विचारांत होता. शेजमहालांत जाण्यापूर्वी तो एकवार निमाज पढत असे. तो अतिशय धर्मनिष्ठ

–कर्मठ धर्मनिष्ठ– होता. कुराणांत सांगितल्या वेळीं निमाज पढण्याचें तो कधींही विसरत नसे. त्याच्या हातची स्मरणी कधीं खळली नाहीं. त्याप्रमाणें तो निमाज पढण्यासाठीं हात पाय धुण्याच्या विचारांत उठणार. तों त्याच्या चोपदारानें येऊन हात बांधून त्यास विनंति केलीः " आपला बंदा गुलाम किरातसिंग आपल्या पायापाशीं कांहीं विनंति करण्याला आला आहे. 'अपरात्र झाली, आतां मुलाखत व्हायची नाहीं' असें मीं त्याला सांगितलें. पण 'काम फार महत्त्वाचें आहे, तेवढ्या॰ करितां गरीब परवरनीं मुलाखत घ्यावी' अशी विनंति करच. असा त्यानें आग्रह धरिला ह्मणून मी आलों आहें." बादशहानें थोडा विचार केला, नंतर त्याला घेऊन ये असा हुकूम दिला. तो आंत आला. बादशहास त्यानें अत्यंत नम्रपणानें कुर्निसा केला. रुमालानें हात बांधून जोडून धरून ह्मटलें: " सरकार, भलत्याच वेळीं तकलीफ द्यायला आलों याबद्दल माफी असावी. पण आजच्या स्वागताची हकीकत आपल्या कानीं सगळी आली नसेल ह्मणून आलों. शहानशहा, आपल्याला जो मान मिळायचा, तो मान त्या यःकश्चित् मरगट्ट्याला मिळायला लागला ह्मणजे मग काय ह्मणायचें ? परंतु रामसिंग वगैरे मंडळींनीं अगदीं जय्यत तयारी करून ठेवली होती. अशा गोष्टी आपोआप कधीं होत नाहींत. आपल्यापुढें मीं हें बोलायला पाहिजे असें नाहीं. पण जो बंदा गुलाम किंवा नौकर बंदिवान् ह्मणून इकडे आणला, त्याचा मानमरातब लोकांकडून अशा प्रकारें होईल हें शक्य तरी आहे काय ? पण हें आम्याला प्रत्यक्ष घडलें कीं नाहीं ? तेव्हां हीं सूत्रें कोण चालवितो, आणखी कशा प्रकारें चालवितो याबद्दल आपल्याला माहिती असेलच. "

बादशहानें त्यास बसण्यास सांगून पुढें ह्मटलें: "बरं, मग तुझं ह्मणणं काय ? त्याचं स्वागत झालं हें फार मोठं वाईट झालं इतकंच ना ? मग पण तूं काय करीत होतास ? कांहीं केलं किंवा कांहीं करणार, कांहीं सांग. "

" आपल्या पाठिंब्यावांचून मी एकटा काय करणार ? माझ्या कानीं जें पडलं, जें प्रत्यक्ष मीं पाहिलं, तें आपल्याजवळ येऊन सांगितलं. यापेक्षां अधिक करण्याला मला आपली कृपा पाहिजे. "

असें तो बोलून शेवटीं ह्मणतोः " परंतु गरीब परवर, आपण आज्ञा केली तर त्याच्या प्रत्येक क्षणीं घडणाऱ्या हालचालींवर लक्ष्य ठेवून रोज आपल्याला बातम्या देईन. त्याच्याकडे भेटायला जे कोणी येतील, त्यांचीही नांवनिशी ठेवून ती आपल्याकडे येऊन निवेदन करीन. मीं वाटेंत त्याच्या पाठीवर किंवा पुढें असा राहून त्याला नकळत सगळ्या बातम्या काढल्या. आपल्याला सगळ्या विदित केल्या, तशा इथल्या रोज विदित करीत जाईन. मात्र आपण मला वाटेल तेव्हां मुलाखत होण्याची कुलपरवानगी द्यावी, किंवा वेळ नेमून द्यावा.

आपल्याला अशा बित्तंबातम्या आणून देईन, कीं शिवाजीचं जें बिंग आहे तें आपल्यापुढें बरोबर उभें राहील.

" एवढी परवानगी मागण्याकरितांच का तूं एवढ्या अपरात्रीं आलास ? शाबास. तुला काय दुसरी वेळ नव्हती !" बादशहा थोडा रागावून बोलला. परंतु असे कितीकांचे किती राग किरातसिंग गिळून बसला होता. यामुळें त्या तडाख्याचें त्यास कांहीं न वाटून तो ह्मणाला: " सरकार, मी खरोखर एवढ्या पंचायतींत पडलों नसतों. परंतु किती लोकांचें आज या समारंभांत अंग होतें हें एकदां आपल्या निदर्शनाला आणलें ह्मणजे ठीक असें माझ्या मनांत येऊन मीं ही तकलीफ दिली, माफी असावी. आपली मर्जी खप्पा होत असल्यास खाविंदांना पुनः तसदी देणार नाहीं. "

हे त्याचे शब्द ऐकतांच बादशहा किंचित् हंसला व त्याला म्हणतो, " तुला काय पाहिजे तें सांग. उगीच वायफळ बोलूं नको. "

" मला त्याच्यावर नजर ठेवतां येईल अशी तजवीज केली पाहिजे, दुसरें कांहीं नको. त्याच्या तैनातीला म्हणून जे लोक नेमले आहेत, त्यांत माझी नेमणूक पाहिजे. ह्मणजे मी शिवाजीला त्याच्या छायेपेक्षां जास्त चिकटून राहीन. अंधार असला, तर छाया सोडून जाते. पण मी क्षणभरसुद्धां त्याला सोडून रहाणार नाहीं. एवढी तजवीज खाविंदानीं करावी. बाकी माझी सगळी व्यवस्था मी करतों. खाविंदांच्या हुकुमानें मला आंत—त्याच्या त्या वाड्यांत—शिरकाव पाहिजे. दुसरें कांहीं नाहीं. आतां मला हुकूम मिळाला कीं मी जाऊन बसलोंच त्याच्या डोक्याशीं ! नाहीं तर रामसिंग माझी दाद लागू देणार नाहीं."

बादशहानें विचाराची मुद्रा केली आणि ह्मटलें: " जा. आतां जा. मला वाटेल तेव्हां मी तुला काय हुकूम द्यायचा तो देईन. आतां ही वेळ नव्हे. "

किरातसिंग थोडा निराश झाला. त्याला असें वाटलें होतें कीं बादशहाजवळ जें मागूं तें आणि जेव्हां मागूं तेव्हां, त्यानें दिलें पाहिजे अशी विलक्षण कामगिरी आपण केली आहे. आणि अपरात्रींसुद्धां आपला निरोप जातांच बादशहानें आपली भेट घेतली; तेव्हां आपण म्हणतों तें बादशहा तेव्हांच हूं ह्मणून करील यांत नवल काय ! परंतु बादशहानें त्यास वर सांगितल्याप्रमाणें किंचित् धुडकावल्यासारखेंच केलें. तेव्हां अर्थातच खिन्न होऊन तो तेथून निघाला आणि आपल्या मुक्कामावर गेला.

# प्रकरण ४३ वें.

## हा कोण ?

आग्र्यास महाराज येऊन उतरल्यानंतर दोन दिवस झाले. बादशहाकडून त्यांना कांहीं निरोपशिरोप नाहीं. बादशहाच्या तर्फेनें किंवा त्याचा निरोप असा घेऊन एकच माणूस आला. त्यानें एवढाच निरोप आणला, कीं आपण स्वस्थ असावें. आपल्या दगदगीचा शीण उतरला म्हणजे बादशहा आपणास दरबारीं बोलावण्याचा दिवस मुक्रर करून निरोप पाठवितील. दरम्यान कांहीं कमी जास्त असेल, तर रामसिंगामार्फत कळतेंच आहे.

दोन दिवस झाल्यानंतर महाराजांस असें वाटलें, कीं आपण आतां काय करावें ? व्यवस्था उत्तम होती. कोणत्याही गोष्टीची ददात नव्हती. पालख्या, मेणे, चाकर, नौकर कशाची उणीव म्हणून नाहीं. रामसिंग दिवसांतून दोनदां येऊन समाचार घेई. हें सगळें ठीक; परंतु त्या पुरुषास या गोष्टींनीं समाधान होतें ? आपण आलों त्या कार्याचें काय हे प्रश्न त्यांच्या मनांत यावयाला लागले. रामसिंगाजवळ त्यांनीं तिसरे दिवशीं सकाळींच गोष्ट काढली, कीं "आपल्या मनांतून मंडळीच्या मुलाखती घ्यायच्या, चार नवे स्नेह संपादायचे. बादशहाची मुलाखत झाल्यानंतर कोणाकडें जायचें तें जायचें. परंतु तोंपर्यंत काय ? उगीच माशा मारीत बसायचें ? कोणी मंडळी आपण होऊन आमचेकडे येऊन मुलाखती झाल्या तरी ठीकच आहे."

रामसिगानें त्यांस म्हटलें: "आपण कांहीं काळजी करूं नका. हळूहळू सर्व कांहीं होईल. बादशहाची वृत्ति आपल्यासंबंधानें ठीक आहे असें दिसतें आहे; तेव्हां आपल्याकडे येण्याला लोक मुळींच अनमान करणार नाहींत. कोणी एकानें आरंभ केला म्हणजे झालें. परंतु आपण त्यांच्या घरीं भेटीस गेलें पाहिजे. तें आपल्याकडून झालें नाहीं यामुळें मंडळी स्वस्थ आहेत. बादशहा दरबारांत अगर खासगी आपली मुलाखत घेईपर्यंत आपल्यास इतरांच्या भेटीला जातां येत नाहीं असें मी सुचविलें आहे. हा आमच्या रजपुतांत मानापमानाचा मोठा प्रश्न असतो !"

महाराजांनीं तें ऐकून त्यास म्हटलें, कीं "दरबारांत जाण्याच्या आधीं आम्ही मंडळीस भेटायास जाऊं येऊं लागलों तर काय हरकत आहे ? बादशहाची तब्यत आणखी आठ दिवस लागली नाहीं तर काय करणार ?"

रामसिंग हंसला व त्यांस थोडी सबुरी ठेवण्याबद्दल सांगूं लागला. आपण एकाकी या देशांत आहां, जें करणें तें शांतपणानें केलें पाहिजे, असें तो म्हणाला. हें महाराजांसही दिसत नव्हतें असें नाहीं, तेव्हां त्यांनीं तें तितकेंच ठेविलें.

महाराजांची मंडळी आग्रा शहरांत हिंडत होतीच. आपण शहराची चांगली माहिती करून घेतली पाहिजे, हें त्यास पक्कें ठाऊकच होतें. तानाजी, येसाजी, श्रीधरस्वामी वगैरे मंडळी खुशाल चार सहा घटका शहरांत हिंडून शहराच्या सर्व भागांची माहिती गोळा करण्यासाठीं हिंडूं लागले. खरकसिंग त्यांचा वाटाड्या बनला. आपणास जरी स्वस्थ बसावें लागलें, तरी आपलीं माणसें आपला कार्यभाग—निदान शहराची माहिती मिळविण्याचा कार्यभाग—करीत आहेत एवढेंच महाराजांस समाधान वाटलें.

वर सांगितल्या स्थितींतच आणखी चार दिवस गेले. अद्यापि बादशहाकडून दरबारीं येण्याबद्दल महाराजांस कांहीं निरोप नाहीं. महाराज जास्त त्रस्त झाले. त्यांस आपण येथें येऊन उगीच अटकेंत पडल्याप्रमाणें वाटूं लागलें. वास्तविक अटक कांहींच नव्हती. तेव्हां त्यांनीं आपल्या माणसांबरोबर कांहीं भेटीचे जिन्नस व पत्रें देऊन निरनिराळ्या अमीरउमरावांकडे पाठविण्याची सुरुवात केली. पत्रीं एवढेंच लिहिलेलें, कीं " बादशहाच्या आमंत्रणावरून आम्ही आपल्या गांवीं आलों आहों. बादशहा तर सर्वथा आमचा परामर्ष घेत आहेतच. परंतु आपणही परामर्ष घेत जावा. कां कीं मी आपल्यापैकींच आहे."

अशीं पत्रें व भेटीच्या जिनसांच्या संदुका किंवा मोठ्या पेट्या पाठविण्यांत येऊं लागल्या. त्यांत काय आहे, काय नाहीं याबद्दल चौकशी करण्याचें कोणाच्या मनांत आलें नाहीं. येणार कसें! महाराजांसारख्यांनीं आपल्या बरोबरीच्या किंवा आपल्याहून श्रेष्ठ अशा लोकांस नजरनजराणा पाठविणें अगदीं स्वाभाविक होय. त्यांत वावगें—रीतीला सोडून जें काय होतें तें इतकेंच, कीं बादशहाची मुलाखत होण्याच्या आधींच हें सर्व सुरू झालें. परंतु त्याची विशेष कोणी चिकित्सा केली नाहीं. रामसिंगानेंही तिकडे विशेष लक्ष दिलें नाहीं. बादशहाच्या कानीं कांहीं गेलें असलें, तरी त्यानें त्याबद्दल विचारपूस केली नाहीं. तेव्हां तो प्रकार सुरूच राहिला आणि त्यामुळें ज्यांना ज्यांना पत्रें गेलीं, ती तीं मंडळी भेटीस येण्याचाही विचारास लागली. महाराज आल्यापासून सुमार दहाबारा दिवस झाले. दहा पांच मध्यम स्थितीतले सरदार महाराजांकडे येऊन भेटून गेले. जे कोणी भेटीस आले त्यांनीं महाराजांचें अभिनंदन केलें, कीं आपण बादशहाच्या इच्छेप्रमाणें इकडे आलां ही फार उत्तम गोष्ट केली. आपल्याला बादशहानें आपला म्हणून स्वीकारल्यानंतर आपला किती मान वाढवितील याचा नेम नाहीं. अशीं उपचाराचीं भाषणें झालीं. प्रथम प्रथम अशींच भाषणें व्हावयाचीं हें महाराज जाणूनच होते; परंतु मंडळी येण्यास सुरुवात झाली याचेंच त्यांस फार समाधान झालें.

असें करतां करतां एके दिवशीं एक तरुण रजपूत सरदार अगदीं एकटाच त्यांचे भेटीस आला. आल्याबरोबर त्याचें रीतीप्रमाणें स्वागत झाल्यानंतर तो

तरुण सरदार ह्मणाला: “ आपल्याशीं माझ्या मनांत चार शब्द एकीकडे बोलायचे आहेत. आपली विलक्षण कीर्ति ऐकून मी मुद्दाम आलों आहें. ”

महाराजांनीं एक क्षणभर त्याच्या चर्येकडे पाहिलें. फार फार सूक्ष्म दृष्टीनें पाहिलें. नंतर जवळच्या इसमांस खूण केली. त्याबरोबर ती मंडळी दूर झाली. ते लागलीच त्यास ह्मणतात: “ काय ! बोला. काय, आपल्याला काय बोलायचें आहे तें बोला. ”

त्या तरुण रजपुतानेंही त्यांच्या चर्येकडे मोठ्या भेदक दृष्टीनें एकवार पाहिलें आणि तो त्यांस ह्मणाला: “ आपल्याला अद्यापि बादशहा नुसता मुलाखतीला-सुद्धां बोलावीत नाहीं, याचें कारण आपण ताडलें का ! कीं अजून आपल्याला भ्रांति आहे ! ”

महाराजांनीं त्याला उत्तर दिलें नाहीं. नुसतें त्याच्या तोंडाकडे टक लावून पाहिलें. तो पुढें ह्मणाला:

“ बादशहाच्या मनांत आपला अपमान करायचा आहे हें काय आपल्या लक्ष्यांत आलें नाहीं ! आपणास इथें येऊन किती दिवस झाले ! आणखी अजून नुसती दरबारांत येण्याची वर्दी येऊं नये ! आपले लोक शहरांत हिंडतात, त्यांच्या-वर हेर ठेवले आहेत. हें आहे तरी काय ! याचा आपण विचार करा. कोण्या वेळीं बादशहाच्या मनांत काय येईल याचा मुळींच नेम नाहीं. आपण फार चतुर, फार शूर असें आम्ही ऐकतों ह्मणून आपल्याजवळ हें सांगायला आलों. ”

महाराज तें ऐकून हंसले आणि ह्मणतात: “ ठीक. ठीक. पण आपल्यासारख्यां-च्या मनांत जर माझ्याविषयीं इतकी कळकळ वाटते आहे तर आणखी काय पाहिजे ! बादशहानें कांहीं संकट आणलेंच तर आपण त्यांतून माझी मुक्तता करण्यास कांहीं तरी उपाय सुचवालच. सध्यां तरी मला स्वस्थ बसण्याच्या पली-कडे काय करतां येणार ! ”

“ माझी सल्ला अशी आहे, कीं आपण इथून मुकाट्यानें एक दिवस निघून जावें. बादशहाचें मन आपल्याविषयीं बिलकुल शुद्ध नाहीं. आपल्यावर कांहीं तरी संकट तो आणणार. काय आणणार तें कांहीं सांगतां येत नाहीं. तेव्हां आपण मुकाट्यानें निघून गेलां तर काय होईल ! ” महाराज त्याचें ह्मणणें ऐकून घेऊन त्याच्याकडे नुसते पहात बसले. उत्तर देईनात.

तेव्हां तो त्यांस आणखी ह्मणतो: “ बादशहाच्या मनांत कांहीं तरी तसला प्रकार चालला आहे, ह्मणून मी आपल्याला सांगायला आलों. मी कांहीं-तरी वायफळ सांगतों असें समजूं नका. आपण निघून जाण्याचा विचार करावा. आपल्याला मी कांहीं तरी येऊन सांगतों असें नाहीं. मी आपल्याला इथून निसटून जाण्याला मदत करतों. मी खरा कोण आहें हें कोणाला ठाऊक नाहीं. मी भलत्याचेंच नांव सांगून-( अर्थातच आपल्या सभोंवतालच्या लोकांना चकवि-

ण्यासाठीं )-इकडे आलों. ज्याचें नांव सांगितलें त्याच्यासारखा पोषाख वगैरे करून आलों आहें. खरा मी कोण आहें हें आज आपल्यालाही मी सांगत नाहीं. आपला जर बेत झाला इथून जायचें असा, तर योग्य वेळीं सांगेन. पण आपल्याविषयीं मला फार पूज्यबुद्धि. आपण इथें अडकून पडूं नये, किंवा आपला इथें घात होऊं नये म्हणून माझी सगळी धडपड आहे, दुसरें कांहीं नाहीं. बोला, आपण माझा उपयोग करून घेण्याचा इरादा धरीत असलां तर मी सर्वस्वी आपल्या चरणाजवळ आहें. आपल्याबरोबर मीही दक्षिणेंत येईन आणि आपण करतां आहां तें काम करण्यांत आपला काळ घालवीन. "

महाराज तरी कांहीं बोलले नाहींत. तेव्हां तो थोडा निराश होऊन ह्मणतोः "आपण कांहींच बोलत नाहीं हें काय ! आपल्याला विचार करावा असें वाटत असलें, तर विचार करा; परंतु विचार करण्यांत वेळ घालविण्याला अवकाश नाहीं. जो क्षण जातो, तो आपला. पुढच्या क्षणीं काय होईल याचा नेम नाहीं. अशी खरी स्थिति आहे. रामसिंग आपल्याविषयीं मोठा जागरूक आहे ही गोष्ट खरी, पण त्याला खऱ्या बातम्या कांहीं कळत नाहींत. कळणें शक्य नाहीं. त्याच्यापाशीं बादशहा कांहीं बोलत नाहीं. रामसिंगाच्या बातम्यांवर विश्वास ठेवाल तर आपण फसाल-तो फसतो आहे म्हणून फसाल. मी रामसिंगाची गांठ घेऊन या सगळ्या गोष्टी सांगेनच; पण आधीं आपल्याला सांगितल्या. मग आपल्याला पश्चात्ताप वाटायला नको. दुसरें कांहीं नाहीं. महाराज, आपल्याबद्दल माझ्या मनांत किती आदर आणखी भक्ति आहे याबद्दल आपल्याला मी काय सांगूं ? शब्दांनीं सांगतां येणार नाहीं. आपण संधि दिल्यास कृतीनें आपल्या अनुभवाला आणून देईन. मग आपल्याला वाटेल कीं मीं ह्मटलें तें खरें ! "

त्याच्या त्या प्रत्येक शब्दांत उत्सुकता व मनःपूर्वकता हीं अगदीं ओतप्रोत भरलीं होतीं असें महाराजांस दिसलें. परंतु हा खरोखर कोण आणखी याला माहिती असण्याचा संभव काय, हें कळेपर्यंत महाराजानीं तरी काय समजावें ? ते शांतपणें त्यास पुनः एवढेंच ह्मणालेः "आपण ह्मणतां ही गोष्ट अगदीं खरी; परंतु तसें कांहीं प्रत्यक्ष दिसून आल्याखेरीज आम्हांला काय करतां येणार आहे ? अजून बादशहानें आम्हांला दरबाराला बोलावलें नाहीं खरें; परंतु तेवढ्यावरून आम्हीं येथून निघून जाणें आणखी तेंही मुकाट्यानें हें अगदींच अयुक्त. तसाच जर प्रसंग आला, तर मग पहातां येईल. आपण आम्हांला वारंवार भेटतच आहां-निदान भेटत रहावें. आम्हीही दरबार झाल्यावर आपल्याकडे येत जाऊं; परंतु आपण कोण काय हें सांगून ठेवावें. "

वास्तविक त्या ठिकाणीं आतां महाराज आणखी तो दोघेच होते. दुसरें कोणी यांचें बोलणें ऐकेल हें संभवनीयसुद्धां नव्हतें; परंतु तितक्यांतल्या तितक्यांत

फारच विश्रब्ध असा आवाज काढून त्यानें महाराजांच्या कानांत कांहीं सांगितलें. महाराज चटूकन् त्याच्याकडे आश्चर्यपूर्ण दृष्टीनें पाहूं लागले. नंतर नुसतें "ठीक आहे" एवढेंच ह्मणाले, आणि त्यांनीं त्याला निरोप दिला.

तो गृहस्थ तेथून गेला तो संतुष्ट मुद्रेनें गेला. त्याला महाराजांच्या "ठीक आहे" म्हणण्यानेंच संतोष झाला असावा असें दिसलें. तो गेल्यानंतर महाराजानीं आपल्या मंडळीस सभोंवार जमवून त्यांस या गृहस्थानें जें काय सांगितलें तें सर्व कळविलें. मात्र त्यानें कानांत जें काय सांगितलें तें सांगितलें नाहीं.

रोजचा क्रम असा असे, कीं तानाजी, येसाजी वगैरे मंडळींनीं दिवसां जी काय सफर केली असेल व माहिती मिळविली असेल, ती महाराजांना निवेदन करावयाची आणि महाराजानींही जें काय अधिक उणें घडलें असेल तें त्यांस सांगावयाचें. याप्रमाणें रोज रात्रीं सर्व मंडळी एकांतांत बसून गोष्टी सांगत. खरकसिंग आतां तानाजी वगैरे मंडळीप्रमाणेंच महाराजांच्या विश्वासांतला झाला होता. तेव्हां मंडळी एकांतांत बसली ह्मणजे तोही त्यांत असे. त्यानें तें महाराजानीं सांगितलेलें सर्व ऐकलें आणि महाराजांस मोठ्या आदरानें विज्ञापिलें: "महाराज, आपल्याला अशी मसलत देणाराचें नांव कळलें, तर मी त्याला माहिती असण्याचा संभव काय हें सांगेन. तोंपर्यंत कांहीं या गोष्टीवर भरंवसा ठेवतां येत नाहीं. बादशहाचा आतांपर्यंतचा सगळा वृत्तांत जर ऐकला, तर तो कोणाला आपल्या मनांतलें अगदीं आंतलें हितगुज करूं देईल हें संभवनीयच नाहीं. आपल्याकडे आलेला इसम तर अगदीं विश्वासांत असल्याप्रमाणेंच गोष्टी सांगून गेला. जें नांव त्यानें वरकांतीं सांगितलें तो गृहस्थ या भानगडींत पडायचा नाहीं. आपल्याला येऊन सावध करण्याच्या भानगडींत पडावयाचा नाहीं. तो आपल्या ऐषआरामांत आणखी बादशहाची मर्जी संभाळण्यांत चूर. तेव्हां हें काय गौडबंगाल आहे तें समजण्याला त्याचें खरें नांव कळलें पाहिजे. नाहीं तर त्याला मला एकदां प्रत्यक्ष पाहिलें पाहिजे."

महाराजानीं बराच वेळ विचार केला. नंतर ते ह्मणाले, "तो गृहस्थ मजकडे आणखी एक वेळ येऊन गेला ह्मणजे मग सांगेन. सध्यां तें प्रकरण तसेंच राहूं देऊं. आणि काय काय चमत्कार होतात तें पाहूं."

महाराजांपुढें अधिक कोण बोलणार? नंतर दुसऱ्याच गोष्टी निघाल्या. प्रत्येकानें आपण शहराची व शहराच्या पंचक्रोशीची किती माहिती मिळविली तें सांगितलें. त्याचप्रमाणें आपण कोणकोणास भेटलों व आपल्यास कोणकोण भेटले, आपलीं बोलणीं काय काय झालीं हींही सांगितलीं. ज्याच्या त्याच्या बोलण्यांत असेंच आलें, कीं बादशहानें अजूनपावेतों दरबारांत येण्याबद्दल निरोप पाठविला नाहीं तेव्हां त्याच्या मनांत कांहीं तरी दगा करण्याचें खचित आहे परंतु काय

दगा केला जाईल, केव्हां केला जाईल आणि कसा केला जाईल याचा अंदाज कोणासही सांगतां येत नव्हता.

रामसिंग रोज दोन वेळां महाराजांच्या भेटीस येऊन त्यांचा पुसतपास करीत असे. त्याचप्रमाणें तो बादशहासही भेटत असे; परंतु बादशहा त्याला प्रश्नसुद्धां विचारीत नसे, कीं शिवाजी ठीक आहेना ? जणूं काय शिवाजीमहाराज आग्र्यास आले आहेत हेंसुद्धां त्याच्या ध्यानांत राहिलें आहे कीं नाहीं कोणास कळे ? रामसिंगाला शेवटीं शिवाजीमहाराजानीं एके दिवशीं विचारलें, कीं "आम्हांला दक्षिणेंतून इकडे आणलें तें काय असें अटकेंत लोंबत ठेवण्यासाठीं आणलें कीं आहे तरी काय ? आपण एके दिवशीं त्यांना स्मरण तरी द्या, कीं असा असा मी इथें येऊन बसलों आहें. त्यांना कदाचित् विस्मरण झालें असेल."

तें ऐकून रामसिंग हंसला आणि ह्मणालाः "महाराज, त्यांना विस्मरण होणें शक्यच नाहीं. कांहीं तरी मनसुबा त्यांच्या मनांत चालला आहे. तो शेवटपर्यंत कोणाला कळायचा नाहीं. तेव्हां आपण आपलें सावध असावें एवढेंच काय तें आपल्या हातीं आहे. बादशहा आपल्या मनांतली एकही गोष्ट कधीं कोणाजवळ उलगडून सांगायचा नाहीं. तेव्हां स्वस्थ बसण्यापलीकडे आपल्याला कांहीं उपाय नाहीं."

महाराजानीं इतके दिवस काढले. इतके दिवसांत त्यांना जें करावयाचें होतें, त्यालाही त्यांनीं प्रारंभ करून हळूहळू खडे टाकून पहाण्याचें काम चालू केलें होतें. त्यांत त्यांस कांहीं विशेष यश येण्याचें चिन्ह दिसेना. अर्थात् त्यामुळें त्यांना आपण या उत्तरहिंदुस्थानांत फार दिवस काढण्यांत तात्पर्य नाहीं असें वाटूं लागलें आणि आपला पाय येथून कसा लवकर निघेल या विचारास ते लागले. परंतु बादशहाच्या अनुमतीवांचून—निदान त्याची व आपली मुलाखत होण्याच्या आधींच—जाणें केवळ अनिष्ट होतें. कुचंबणी चालली होती ती फारच त्रासदायक होती. परंतु ती एकदम दूर करून घेणें त्यांच्या हातचें नव्हतें. शेवटीं एके दिवशीं रामसिंगास त्यांनीं बजावून सांगितलें, कीं आतां काय होईल तें होवो, आपण बादशहास आमचें स्मरण देऊन मुलाखत कधीं घेणार हें विचारावें आणि काय उत्तर देतील तें येऊन सांगावें. आतां आपण त्यांचा मुलाहिजा ठेवूं इच्छित नाहीं. मी हवें असल्यास एक पत्र देतों. तें पत्र त्याला आपण नेऊन द्यावें. ह्मणजे त्याच्या मनांत आमची मुलाखत घ्यावयाची असली तर तो आपल्याळाच केव्हां कोठें तें सांगेल, नाहीं तर मग आमचा आम्ही काय तो उपाय पाहूं.

रामसिंगास आतां अगदीं कचाट्यांत सांपडल्याप्रमाणें झालें. काय उत्तर द्यावें समजेना. एकीकडे महाराजांचें बोलणें अगदीं रास्त होतें, पण दुसरीकडे अशी पंचाईत, कीं बादशहाशीं निक्षून कोणीं बोलावें ? निक्षून बोललें तर परिणाम

तरी काय होईल ? परंतु आतां दुसरा मार्ग नाहीं असें पक्कें मनांत वाटून त्यानें बादशहाची लागलीच मुलाखत घेऊन त्याजला ह्मटलें: " खाविंद, आपल्याला कोणत्याच गोष्टीचें कधींच विस्मरण पडत नाहीं. तेव्हां माझ्यासारख्यानें कसलेंही स्मरण करून देणें ह्मणजे मोठें धाडस आहे. उद्धटपणा आहे. पण शिवाजीमहाराज येथें आल्यास आज फार दिवस झाले. एकवार दरबारांत बोलावून त्यांना काय मानपान द्यायचा, त्यांच्या मुलाला–संभाजी राजांना–काय वस्त्रें द्यायचीं तीं द्यावीं अशी विनंति आहे. बरेच दिवस झाल्यानें त्यांचे मनीं खाविंदांची अवकृपा झाली असावी असा खेद वाटूं लागला आहे. लोकांतही चर्चा सुरू झाल्यामुळें थोडी लाचारी वाटूं लागली आहे. याउपर खाविंदांची मर्जी. "

रामसिंगाचें हें भाषण ऐकून बादशहा एकदम ह्मणतो: " कां ? त्यांचा फितुरी करण्याचा उद्योग यशस्वी होत नाहीं असें वाटूं लागलें वाटतें ? त्याखेरीज कांहीं इथून आपण जावें एकदां असें नाहीं वाटणार ! त्यांचे लोक गांवभर हिंडताहेत. त्यांनाहां आमची कांहीं मनाई नाहीं. दरबारांत खुद्द जरी ते आले नाहींत, आमची त्यांची मुलाखत झाली नाहीं तरी आमच्या शहरांत आले आहेत, आमची चाकरी करण्याच्या इरायानें आले आहेत, त्यांना मनसबदारी पाहिजे आहे, मग असें कंटाळून कसें चालणार ? शिवाय कोणाला तरी गांठून त्याला आमच्याविरुद्ध उठविण्याचा उद्योग चालूच आहे. मग आणखी काय पाहिजे ? सांगा त्यांना, कीं आपल्याला दिलगिरी वाटून घेण्याचें कांहीं कारण नाहीं. बादशहाला आपलें पक्कें स्मरण आहे. जा, असा आमचा त्यांना निरोप सांगा, आणखी त्यांना त्यांच्या कामांत मदत करीत रहा. "

बादशहाच्या भाषणाचा अर्थ काय, हें त्या बिचाऱ्या रामसिंगाच्या लक्ष्यांत येईना. हें हा म्हणतो तरी काय ? मध्येंच फितुरी काय ह्मणतो ? काम काय ह्मणतो ? आणखी आपण याला मदत करीत रहावें असें काय सांगतो ? कांहींच जेव्हां लक्ष्यांत येईना तेव्हां तो पुनः बादशहास फार नम्रतेनें कुर्निसा करून व रुमालानें हात बांधून ह्मणाला: "शहानशहा, आपण काय म्हणतां याचा मला उलगडा होत नाहीं. वडिलांनीं शिवाजीमहाराजांस नानाप्रकारें समजावून आणि खाविंदांच्या हुकुमाप्रमाणें कबुल्या करून इकडे पाठवून दिलें. त्यांनीं इकडे येण्याचें नाकारलें नाहीं, कारण आपल्या ठिकाणीं त्यांचा विश्वास. परंतु त्यांनीं किती दिवस स्वस्थ बसावें ? आपल्या मनांत काय आहे म्हणून समजावें ? आपण एक वेळां तरी मुलाखत घेतली व स्पष्ट दिलखुलासा केला तरी ठीक होणार आहे. परंतु आपल्याकडून कांहींच निरोप नाहीं त्यावरून त्यांनीं काय समजावें ? ते सर्वथैव वडिलांवर विश्वास ठेवून इकडे आले. "

रामसिंग थोडा धीटपणा करून हें बोलत होता हें तर आतां उघड दिसलें. बादशहासही मनांतल्या मनांत त्याच्या धीटपणाचें थोडें आश्चर्य वाटलें. परंतु तें

आश्चर्य बाहेर न दाखवितां कपाळाला आंठ्या घालून तो ह्मणालाः " विश्वासाचा गैरविश्वास झाला कुठें ! चार दिवस दरबाराला बोलावलें नाहीं म्हणून ! शाबास. मग त्याच्या मनांत आम्हीं त्याला सामोरें जाऊन आपल्या तख्तावरच आणून बसवायला पाहिजे होतें ह्मणायचें. बरें तें असो. पण त्याचे दिवस इथें काय वायां चालले आहेत का ? त्याला जी कामगिरी करायची ह्मणून तो आला, ती कामगिरी चाललीच आहेना जशी व्हायला पाहिजे तशी ! आणखी काय पाहिजे !"

" खाविंद " रामसिंग एकदम ह्मणालाः " आपण काय म्हणतां तें माझ्या लक्ष्यांत येत नाहीं, याबद्दल मी फार लाचार आहें ! "

" नाहीं लक्ष्यांत येणार. तें लक्ष्यांत कसें येईल ? कारण तुम्ही सगळा कारभार करतां तो डोळे मिटून करतां. तुम्ही डोळे मिटून कारभार करतां ह्मणून तर त्याचें सगळें ठीक चाललें आहे. मीं जर दुसऱ्या कोणाला त्याच्या पाठीवर ठेवला नसता, तर मला वाटतें मला कांहींसुद्धां समजलें नसतें. समजणार कसें ! आपण दोन दोनदां तीन तीनदां जातां. चार चार घटका खलबतें करीत बसतां. आणखी त्यांचे उद्योग काय चालले आहेत हें तुम्हांला समजत नाहीं ! यावरून काय समजावें ? एक सामिली तरी समजावी, नाहीं तर आंधळेपणा तरी समजावा. असेंच कीं नाहीं ! का आणखी कांहीं आहे ! "

बादशहाचें तें भाषण ऐकून रामसिंग फार चकित झाला. कांहीं वेळ त्याच्यानें बोलवेना. पण शेवटीं म्हणतो:—"खाविंद, आपण जो कोणी पाठीवर ठेवला आहे ह्मणतां त्याचें नांव कळेपर्यंत, आणखी तो काय सांगतो तें कळेपर्यंत तो सांगतो तें खरें कीं खोटें हें मी तरी काय ह्मणूं ? बाकी महाराज तर घराच्या बाहेरसुद्धां जात नाहींत. एखाद् वेळ गेले तर भगवान् गोपालकृष्णाच्या दर्शनासाठीं मथुरेला जातात. इतके दिवसांत तेही दोनदांच गेले होते. आणखी त्यांचे लोक शहरांत हिंडतात...... "

" बरें आहे, बरें आहे " बादशहा मध्येंच ह्मणालाः " तुह्मांला त्याबद्दल आम्ही दोषी ठरवीत नाहीं. तुमच्या अंगीं तितकें धोरण नाहीं इतकेंच ह्मणतों. पण आतां आह्मांला जेव्हां लहर लागेल तेव्हां दरबारीं बोलावूं. तोंपर्यंत त्यांना ह्मणावें तुह्मांला असेंच इथें राहिलें पाहिजे. तुमचे कांहीं कोणत्याही प्रकारानें हाल होत नाहींत किंवा तुम्हांला कोणताही त्रास नाहीं. दक्षिणेंत इतकीं वर्षें दगदग केली तिचा शीण जायला पाहिजे. तो शींण गेला ह्मणजे पुढें काम करायला आपल्याला चांगला दम येईल. "

इतकें बादशहानें निक्षून सांगितल्यावर आणखी काय उरलें ? पुढें एक अक्षरही न बोलतां तो आपल्या वाड्यांत गेला. तेथें गेल्यावर झाल्या गोष्टीवर विचार करीत त्यानें दिवस काढला. महाराजांजवळ कोणी तरी हेर असून तो बादशहाला बातम्या पुरवितो असें तर त्यास समजून आलें. हा हेर कोण याबद्दल त्याचा तर्क होईना. महाराजांच्या तैनातीस जे कोणी आपण चाकर नौकर ठेवले आहेत त्यांपैकीं

र कोणी हा हेरपणाचा धंदा करीत नसेलना ? अशी मनांत शंका येऊन त्यानें आ-
ला मानसदृष्टि त्या सर्व नोकरांवरून फिरविली. परंतु त्यांपैकीं एकही बादशहापर्यंत
गागा नेऊन लावील असा दिसला नाहीं. तेव्हां बाहेरून महाराजांकडे वारंवार
येणारा कोण, याचा त्यानें आपल्या मनांत तलास चालविला तों तसाही कोणी
त्याच्या मनांत येईना. तेव्हां आतां तपास तरी कसा करावा, कीं हा खोट्यानाट्या
बातम्या सांगणारा कोण ? पण असा विचार करतां करतां त्याला एक विचार
सुचलाः बादशहा ह्मणतो कीं आपण एक हेर येथें ठेविला आहे आणि तो आप-
ल्याला बातम्या सांगतो हें तरी कशावरून ? बादशहानें आपल्या कल्पनेनेंच कांहीं
तरी काढून आपली परीक्षा पहाण्यासाठीं तें आपल्या तोंडावर झोंकून दिलें नसेल
ह्मणून तरी कशावरून ?

असा विचार त्याच्या मनांत आला आणि तोच विचार बरोबर असा निश्चय
करून त्यानें आपल्या मनाचें समाधान मात्र करून घेतलें. तें समाधान
ठीक झालें असें त्याचें त्यालाच वाटेना. या विचारांत
त्यानें एक दिवस काढला. दुसरे दिवशीं शिवाजीमहाराजांकडे नित्या-
प्रमाणें जावयाचे वेळीं पुनः त्याला पंचाईत पडली, कीं आपण आतां यांना बाद-
शहाचें आपलें बोलणें काय झालें तें काय सांगावें ? पुनः तो बुचकळ्यांत
पडला. आयत्या वेळीं जें सुचेल तें सांगावें झालें असा त्यानें विचार केला
आणि तो शिवाजीमहाराजांकडे आला. ते त्याची वाटच पहात होते. यामुळें त्यांनीं
येतांक्षणींच त्यांस " आपण बादशहाजवळ गोष्ट काढली का ? त्याचा निरोप
काय ? त्याचें ह्मणणें तरी काय ? " असें विचारलें.

तेव्हां रामसिंगानें चटकन् उत्तर दिलें: " बादशहा आतां लवकरच मोठा दर-
बार भरवून आपल्यास बोलावून काय मानसन्मान करायचा तो करणार आहे.
आजपर्यंत सहज—कांहीं कारण नसतां तें पुढें ढकलण्यांत आलें. "

शिवाजीमहाराजांच्या तीक्ष्ण दृष्टीस अगदीं स्पष्टपणें दिसलें, कीं अगदीं नाइ-
लाजास्तव रामसिंग आपल्यास कांहीं तरी सांगतो आहे. बादशहाजवळ गोष्ट
काढण्याची एक तर त्याची छाती झाली नसावी किंवा त्यानें गोष्ट काढली असून
बादशहानें त्यास धुडकावून लावलें असावें. याखेरीज दुसरा कांहीं प्रकार असेल
असें त्यांच्या मनांत येईचना. तथापि त्यांनीं त्याला तसें बोलून दाखवून लाज-
विण्याचें मनांतसुद्धां आणिलें नाहीं. उलट त्याच्या मनाला वाईट वाटूं नये ह्मणून
ह्मणतातः

" बादशहा ते बादशहाच. त्यांना अशीं स्मरणें रहायला लागलीं तर मग आ-
णखी काय पाहिजे ? ठीक. जितके दिवस आमचे अन्नोदकाचा ऋणानुबंध इथें आहे
तितके दिवस असेंच राहिलें पाहिजे. जे दिवशीं ऋणानुबंध सुटेल ते दिवशीं आपो-
आप आम्ही इथून हलूं. मग बादशहाच्या हुकुमाची वाट नाहीं पहावी लागणार !

पण बादशहाच्या मनांत आहे तरी काय तें जर समजेल तर आपापली वाट सुधारण्याला किंवा दुसरें कांहीं करण्याला ठीक पडेल. "

"मनांत तर बोआ त्यांच्या कांहीं तसें दिसत नाहीं. आपण कसा वेळ घालवितां, आपण कोणाशीं काय बोलतां याची चौकशी त्यांनीं केली. आणखी मीं पण सांगितलें मला काय सांगायचें तें. तेव्हां ते गप्प बसले. पण महाराज, आपल्याजवळ जे लोक आहेत त्यांच्यावर आपली ठीक नजर आहेना ? त्यांत कोणी हेरपणा करणारा नाहींना ? तसा कोणी तरी असून तो इकडून भलत्याच गोष्टी बाहेर सांगतो असें दिसतें. तर आपण आपल्या मंडळीवर नजर ठेवून असा कोणी असला तर त्याला दूर करावा हें बरें असें मला वाटतें. "

"आमच्यांत हेरपणा करणारा कोणी ! आमच्यांत तर तसा कांहीं कोणी नाहीं. परंतु आपण आमच्या तैनातीला दिलेल्या नोकरांत कोणी असला तर पहावा. आमच्या माणसांत तर खास कोणी नाहीं. पण सांगणारा तरी काय सांगत असावा ? मला कांहीं कल्पना नाहीं करतां येत तो काय सांगत असावा त्याची, ह्मणून ह्मणतों. "

" काय सांगतो त्याची माहिती कुठें होते आहे ? आपल्याकडे कोण आला, कोण गेला, कोणाचें बोलणें काय झालें हेंच सांगायचें दुसरें काय ? पण हें तरी सांगणारा कोण असावा ? याची चौकशी झाली पाहिजे. इकडला माहीतगार जो बादशहाशीं धागा लावून देईल असा कोणी आहे का ? रोज किंवा दोन चार दिवसांनीं हेलपाटा घालणारा तरी कोणी आहे का ? न जाणों कोणी तरी नोकर दुसऱ्या कोणाच्या जाळ्यांत सांपडला असून त्याला इकडल्या बातम्या सांगत असेल आणि तो बादशहापर्यंत नेऊन पोंचवीत असेल. "

" तें सगळें खरें. बातम्या पोंचवीत असेल, पण काय बातम्या पोंचवीत असेल याचा कांहीं पत्ता ? तो जर पत्ता लागला, तर मग माणसाचा पत्ता आपोआपच लागेल. "

"काय बातम्या पोंचतात याचा पत्ता कांहीं लागत नाहीं. पण हळूहळू मी पत्ता खास लावतों. आपणही आपल्याला जर तो पत्ता लागला तर पहा. "

परंतु यांस आतां हा पत्ता लावण्यास सोडून आपण दुसरीकडे जाऊं.

# प्रकरण ४४ वें.

## मथुरावृंदावनास.

माता रणदेवी आणि तिच्या मैत्रिणी महाराजांची छावणी सोडून ज्या निघाल्या त्या लवकरच मथुरेस जाऊन पोंचल्या. आतां याच ठिकाणीं आपण वृंदावनास चार सहा महिने रहाणार असें माता रणदेवीनें महाराजांस सांगितलें होतें आणि त्याप्रमाणें तिचा बेत कायम होता. तिनें पुष्कळ महिनेपर्यंत तीर्थयात्रा केल्याकारणानें आतां तिला शीण आला होता. शिवाय तिला असेंही वाटत होतें, कीं शिवाजीमहाराज बादशहाच्या कचाट्यांतून सुखानें निघणार नाहींत. बादशहा त्यांना कांहीं तरी दगाफटका करणार. अशा वेळीं न जाणों, आपल्यासारख्या गरीबाचाही त्यांस कदाचित् उपयोग होईल, तर आपण त्यांच्या सन्निध असावें. जुळलें तर मधून मधून त्यांस भेटावें किंवा त्यांचा समाचार आणीत जावें. त्यांस प्रत्यक्ष मदत करणें जरी शक्य नसलें, तरी त्यांजवर प्रसंग आला आणि कांहीं मदत करणें शक्य झालें तर आपण जवळ असावें.

महाराजांची कीर्ति तिनें आपल्या तीर्थयात्राप्रवासांत अनेक स्थळीं ऐकली होती आणि पुढें मार्गांत प्रत्यक्ष त्यांचें दर्शन घडलें व परिचय झाला, तेव्हां तर त्यांचें समक्षज्ञानच झालें. अर्थातच तिची जी त्यांच्याविषयीं पूज्यबुद्धि होती, ती दुप्पट वाढली आणि एखाद्या मातेला आपल्या पोटच्या पोराबद्दल जें प्रेम वाटतें, तेंच प्रेम त्यांच्याबद्दल तिच्या मनांत उद्भवून तिनें एकदम त्यांच्यासाठीं मथुरावृंदावनांत रहाण्याचा निश्चय केला. कित्येक वेळां असें होतें, कीं आपल्या हातून कोणाला काय साहाय्य होईल याची कल्पना नसून केवळ कांहीं तरी साहाय्य झालें तर करावें अशी सद्बुद्धि उत्पन्न होऊन एखादा निश्चय होतो, तशीच माता रणदेवीची गोष्ट झाली. इकडे काय हालहवाल आहे हें पहाण्यासाठीं स्वतः एखादे वेळ आग्राशहरीं जावें असें सुद्धां तिच्या मनांत एकवार आलें; परंतु शिवाजीमहाराजांनीं एकदा मथुरेस येऊन आपल्या भेटीच्या वेळीं तिला विनवून विनविलें कीं, कृपा करून आपण इतक्या लांब येऊं नये. मी स्वतः येऊन आपल्याला भेटेन किंवा कोणाला तरी मधून मधून पाठवून आपल्यास समाचार कळवीत जाईन. आपण अगदीं काळजी करूं नये. तेव्हां तिनें तो विचार रहित केला; परंतु तिचें चित्त त्यांच्याकडे एकसारखें असे.

शिवाजीमहाराज पहिले वेळीं येऊन गेल्यानंतर दोन दिवसांनीं मराठ्याचा पोषाख केलेला एक इसम माता रणदेवीचा शोध करीत आला. माता रणदेवी

आपल्या मठांत नव्हती ही संधि पाहूनच कीं काय हा वेषधारी मराठा मठांत गेला आणि माता रणदेवी आहेत काय ह्मणून विचारूं लागला. तों आंतून तिच्या मैत्रिणींपैकीं एक तरुण गोसावीण बाहेर आली व त्याचा तो वेष पहातांच त्यास ह्मणालीः "आपण शिवाजीमहाराजांकडून कांहीं निरोप घेऊन आलां आहां काय !"

तो प्रश्न ऐकण्याऐवजीं त्या गृहस्थाचें लक्ष्य त्या स्त्रीच्या स्वरूपाकडेच जास्त वेधलें असावें असें दिसलें. तो क्षणभर कांहींएक न बोलतां तटस्थ उभा राहिला. तें त्याचें वर्तन पाहून ती तरुण स्त्री लाजली व खालीं पाहूं लागली. तितक्यांत तो तिला म्हणतोः "बाई क्षमा करा. माता रणदेवी मला आतां यमुनातटावर भेटल्या. त्यांना महाराजांचा निरोप सांगून मी जाऊं लागलों, तों त्यांनीं मला आपल्या मठांत जाऊन वाराणशीबाई कोण आहे तिला इकडे पाठवून दे म्हणून सांगितलें. वाराणशीबाई म्हणजे कोणी तरी माता रणदेवीसारखीच वृद्ध बाई असेल असें मला वाटून मी आलों. आणखी आपल्याला पाहिल्याबरोबर आश्चर्य वाटलें ह्मणून पाहूं लागलों. असें पाहूं नये, पण एकदम झालें. आतां मला क्षमा करा आणखी दोन कमंडलु घेऊन आपल्याला माता रणदेवींनीं बोलाविलें आहे तिकडे चला. बाकी चार पांचजणी त्यांच्याबरोबर तेथेंच मथुरातटाकीं आहेत. पाहिजे तर मी आपल्याला त्यांच्यापर्यंत पोंचवितों."

ती तरुण स्त्री वाराणशीच होती. तिनें तो निरोप ऐकून किंचित् विचार केला. नंतर ती त्यास ह्मणालीः "आपण जा. मला आमची नेहमींची जागा माहीत आहे. मी जाईन. आपण चला पुढें."

त्याबरोबर तो गृहस्थ तिला ह्मणालाः "मलाही पुनः माता रणदेवीच्या दर्शनाला जायचेंच आहे. कारण मी त्यांचा निरोप घेऊन निघालों नव्हतों. निरोप घेणार तों त्यांनीं मला हा निरोप घेऊन इकडे येण्याला सांगितलें म्हणून इकडे आलों. माता रणदेवींचें दर्शन जितक्यांदा घ्यायला सांपडेल तितक्यांदा बरेंच वाटतें. आपल्याला तर त्यांचा नेहमींच सहवास आहे. पण आह्मी आमचें मोठें दैव समजतों, कीं आह्मी दक्षिणेंतले, सहज कारणानें इकडे आलों आणखी या पवित्र स्त्रीचें दर्शन झालें. आह्मांला तुमची व्रजभाषा धड येत नाहीं, पण कसें तरी आह्मी बोलून आपलें ह्मणणें लोकांना समजावून देतों झालें. तुह्मांला काय सांगावें वाराणशीबाई, आमच्या महाराजांच्या मातुःश्री अशा माताजींसारख्या पवित्र आणखी तेजस्वी आहेत. आह्मांला यांना पाहिलें, कीं त्यांचें स्मरण होतें. दुसरें काय सांगावें ! आणि त्यामुळें तर आह्मांला यांचें दर्शन वारंवार घ्यावेंसें वाटतें. चला आपल्याबरोबर आह्मी त्यांच्याकडे जाऊं. तेवढेंच पुनः दर्शन होईल. आपल्याशींही दोन शब्द बोलायला सांपडतील. हें तरी एक मोठें दैवच म्हणायचें. इतक्या तरुण वयांत असें सौंदर्य असून इतकें वैराग्य ! तेव्हां आणखी काय पाहिजे. आपल्यासा-

त्यांचा एखादा शब्द कानीं पडला तरी केवढी धन्य वाटते, आणखी किती पुण्य लागतें. चला, आपण संकोच करूं नका. शिवाजीमहाराजांच्या लोकांपैकीं आह्मी. आमच्यावर सर्वांनीं पूर्ण विश्वास टाकून चलावें. "

इतकें त्यानें ह्मटल्यानंतर मग काय करणार ? वाराणशी कमंडलू घेऊन मठाचें द्वार लावून बाहेर पडली. हा मराठा शिपाई तिच्या बरोबर चालला. ती रोजच्या मार्गानें जाऊं लागली तों यानें "आपण रोजच्या जागीं चाललां वाटतें! पण माता रणदेवी, अनसूयाबाई वगैरे मंडळी इकडे त्या राईत बसली आहे. आपण कमंडलू घेऊन आलां ह्मणजे घाटावर जायचें असें त्या ह्मणाल्या, आणखी त्याकरितां त्यांनीं मला इकडे पाठवलें. ही समोर राई दिसत आहे ही आग्रा शहरच्या रस्त्याच्या बाजूला, तींत आहेत त्या. "

तें ऐकून वाराणशी किंचित् चपापली. तिला शंका आली असावी असें दिसलें. त्याबरोबर तो गृहस्थ तिला एकदम ह्मणालाः "आपल्याला माझ्या बोलण्याचा संशय आला कीं काय ? संशय घ्यायचें कांहीं कारण नाहीं. या राईच्या तोंडाजवळ आपण जा. तितक्यांत आपल्याला त्यांचें बोलणें ऐकूं येईल. मी येथें उभा राहतों. आपली तर नेहमींच्या बैठकीची राई आहे ती ना ? आपण तेथें पोंचलां ह्मणजे मग मी तेथें येतों. त्या पहा. त्या राईच्या तोंडाशींच आहेत. आपण तेथें जवळ जातां तों आपल्याला त्यांचें भजन ऐकूं येईल. त्या भजन करीत होत्या मी तिकडून आलों तेव्हां. वाराणशी किंचित् घुटमळली. नंतर जलद जलद पुढें जाऊं लागली. हा गृहस्थ जेथल्या तेथेंच उभा राहिला. ती बरीच पुढें गेली, असें पाहिल्यावर हा मागोमाग थोडा झपाट्यानें चालूं लागला. ती मागें वळून पाही व पुढें चाले. आपण फसतों आहोंत अशी तिला किंचित् शंका आली असावी; परंतु माता रणदेवी केव्हां केव्हां सगळ्यांना घेऊन कधीं कधीं खरोखरीच भजन करीत असे, यामुळें ती शंका तितकी दृढपणें राहिली नाहीं. शिवाय तो गृहस्थ बराच मागें राहून मग चालूं लागला होता, यामुळें जास्त विचार न करतां ती पुढें चालली. राईच्या तोंडाशीं गेली तों मागून एक शीळ वाजली आणि त्या राईंतून दोन तीन काळे जवान पुढें येऊन त्यांनीं अलद्द तिला उचललें. तिनें आरडाओरडा करूं नये ह्मणून एकानें तिच्या तोंडावर हात दिला होता. पाठोपाठ तो मराठा शिपाईही धांवत आला. तिची ती स्थिति पाहून तो मोठ्यानें हंसला आणि ह्मणालाः

"हंसीकूं काग लेत हय् हरनीकूं जंबुक लिजाय् "

तो आवाज ऐकतांच तशा त्या स्थितींत—बेशुद्ध ह्मटलें तरी चालेल अशा स्थितींतही वाराणशी दचकली. तिनें तो आवाज पूर्वी कधीं ऐकला असावा—कदाचित् त्या शब्दांशीं तिचीही पूर्वींची ओळख असेल. क्षणांत ती सर्व मंडळी तेथून त्या राईच्या घनदाट अशा भागांत निघून गेली !

थोड्याच वेळांत माता रणदेवी व तिच्या दुसऱ्या मैत्रिणी आपल्या मठांत आल्या. पाहतात तों मठाच्या दाराला कडी लावलेली असून आसपास वाराणशी नाहीं. वाराणशीला कधीं तरी कोणी संकटांत टाकील, मागें ब्रह्मणपुरास आपल्यावर आलेलें संकट तिच्यावरूनच आलेलें होतें ह्मणून माता रणदेवी तिला होतां होईतों मठांत ठेवी. दुसरीकडे कोठें नेत नसे. तिची इच्छा ही, कीं ती कोणाच्या दृष्टीस पडूं नये. ह्मणजे अर्थातच तिजवर संकट येऊं नये. जर कधीं तिनें तिला बाहेर नेलेंच तर नेहमीं आपल्या बरोबर नेत असे. नाहीं ह्मणजे आपल्या मठांत बसून राहण्यास सांगे. तीही मोठ्या आनंदानें मठांत बसून सगळें मठाचें काम करी व इतर सगळ्या पोटापाण्याची व्यवस्था लावीत. त्याप्रमाणेंच आज तिला त्या ठेवून गेल्या होत्या व ती आपल्याशींच रामाचें पद गात आपलें काम करीत होती. इतक्यांत वर सांगितलेला प्रसंग झाला.

माता रणदेवी मठाशीं आली आणि तिनें मठाचें द्वार असें लागलेलें पहातांच तिचें काळीज चर झालें. आजपर्यंत तिला वाराणशी मठ सोडून कोठें गेलेली आढळली नाहीं. आपणाला जें अत्यंत प्रिय असतें, ज्याच्यावर संकट येऊं नये म्हणून आपण अत्यंत सचिंत असतों, त्याच्यावर तें संकट आलें असें यत्किंचित् कारणावरूनही आपणास वाटतें हा अनुभव कोणाला नाहीं ? मठाचें दार लागलेलें पहातांच माता रणदेवीच्या पोटांत धस्स् झालें; परंतु लागलींच तिनें आपल्या मनाशीं असेंही ह्मटलें, कीं ती कांहीं कामानिमित्त जवळपास कोठें तरी गेली असेल. आतां येईल.

असें ह्मणून ती क्षणभर स्वस्थ बसली. तिच्या मैत्रिणींपैकीं एकीनें–अनसूयेनें –दार उघडलें. आंत पहातात तों सर्व यथास्थित आहे. जिकडे जी व्यवस्था होती, ती बरोबर आहे. फक्त दोन कमंडलू नाहींत. लागलींच त्यांचा तर्क झाला, कीं कदाचित् तिला थोडासा पाय मोकळा करावा असें वाटून ती पाणी आणण्याच्या हेतूनें यमुनातटाकीं गेली असावी. मठींत बसून बसून तिला कंटाळा आला असेल, तेव्हां थोडा गार वारा लागेल, हातपाय धुतल्यानें ताजेंतवानें वाटेल आणि स्वच्छ ताजें पाणी भरूनही आणूं अशा विचारानें ती मठाबाहेर पडली असेल. तेव्हां एक दोघी शोध करण्याकरितां यमुनातटाकीं गेल्या, एक दोघी आजूबाजूस शोध करण्यास गेल्या आणि माता रणदेवी व बाकीच्या मठांतच बसल्या. आपले हे सगळे तर्क व शोध व्यर्थ आहेत. त्या बिचारीवर पूर्वींधेंच संकट आलें यांत कांहीं शंका नाहीं असें माता रणदेवीच्या मनानें घेतलें. इतके दिवस आपल्या पोरीप्रमाणें संभाळ करून शेवटीं आपण तिला मुकलों. आतां तिच्यावर केवढें संकट गुदरलें असेल आणि काय झालें असेल याचा काय नेम सांगावा ! परंतु मुख्य जें तिला अतोनात वाईट वाटलें तें निराळ्याच कारणानें, तें कारण पुढें कळेल.

# प्रकरण ४५ वें.

## खरकसिंग.

महाराजांनीं खरकसिंगाचा जीव वांचविल्यापासून तो महाराजांची छाया होऊन बसला होता. आपल्यावर या पुरुषानें केलेले उपकार अंशतः तरी आपल्या हातून फिटावे ही त्याच्या मनाची अत्यंत उत्कट इच्छा. शिवाय हा पुरुष आपल्या मातृभूमीला घातक मोगलांपासून सोडविण्यासाठीं एवढी सगळी धडपड करतो आहे, तर त्याला आपल्यासारख्याचा उपयोग व्हावा ह्मणून आपण दक्षिणेंत चाललों असतां आयताच त्याचा आपला भेटीचा योगायोग झाला, हाही एक फारच चमत्कारिक आणि आपल्याला सर्वथा शुभ असा योग घडून आला, याबद्धल त्यास फार आनंद झाला होता. त्याला असें पक्कें वाटत होतें, कीं अलमगीर बादशहा फार कपटी, फार दुष्ट, हा महाराजांस सुखेपणानें वागविणार नाहीं, कांहींना कांहीं तरी संकट त्यांच्यावर आणील, तर तसल्या संकटांतून त्यांना मुक्त करण्यासाठीं आपण कांहींना कांहीं तरी तजवीज लावलीच पाहिजे इतकेंच नव्हे, तर आपले डोळे, कान डोकें हीं अगदीं शाबूद ठेवून व त्यांचा नीट उपयोग करून आपण राहिलें पाहिजे. तरच आपल्याला कोठें काय चाललें आहे हें समजून येईल. हें समजून घेण्यासाठीं ज्या काय तजविजी लावावयाच्या त्या तजविजी आपण एकट्यानें लावणें शक्य नाहीं हें त्यास दिसतच होतें, ह्मणून त्यानें आपला एक फार जुना स्नेही गांठून त्यालाही आपल्या विचाराला आणून सोडलें होतें. हे दोघे आळीपाळीनें महाराजांच्या छायेप्रमाणें असत. एक ना एक तरी नेहमीं महाराजांच्या वाड्याभोंवतीं किंवा वाड्यांत असावयाचा आणि दुसरा शहरांत व दरबारांत काय चाललें आहे याच्या चौकशीस जावयाचा, अशी खरकसिंग आणखी त्याचा मित्र हत्यारसिंग यांनीं दोघांनीं वांटणी करून घेतली होती. कचित् प्रसंगीं केव्हां सकाळीं केव्हां दुपारीं—जेव्हां वेळ सांपडेल तेव्हां ऊन तहान यांचा विचार न करतां खरकसिंग माताजींच्या दर्शनास मात्र जात असे. कचित् प्रसंगीं महाराजही त्यास पाठवीत किंवा आपल्याला त्यांनीं पाठवावें अशी उत्सुकता तो दाखवी व त्याप्रमाणें खटपट करी. माताजीकडे जाण्याची त्याला फार हौस आणि माताजीही त्यास फार प्रेमानें—आपल्या पोटच्या पोराप्रमाणें—वागवी.

खरकसिंग माताजीकडे गेला ह्मणजे प्रहरप्रहर दोन दोन प्रहर बसे. शेवटीं माताजीनें त्याला सांगावें एखादे वेळीं, कीं आतां तूं आपल्या धन्याच्या सेवेसाठीं जावेंस तें बरें, तेव्हां गृहस्थ भानावर येऊन चालता होई. माता रणदेवीवर जे दिवशीं

मागल्या प्रकरणांत सांगितलेला प्रसंग गुदरला, त्या दिवशीं कर्मधर्मसंयोगानें खरकसिंगाच्या मनांत अत्यंत उत्सुकता उत्पन्न झाली, कीं आपण आज माताजीच्या दर्शनाला जावें आणि त्याप्रमाणें लागलींच त्यानें त्याप्रमाणें आपल्या मित्राला सांगून तिकडे जाण्याची तयारी केली. महाराजांचीही आज्ञा घेतली आणि स्वारी निघाली. तेव्हां रात्र पडण्याचा बेत होता. वास्तविक मथुरेला जाण्यास निघण्याची ती वेळ नव्हे. परंतु त्याच्या मनांत त्या वेळीं काय लहर आली, त्यानें आपल्या घोड्यावर खोगिर करून मथुरेची वाट धरली. आग्र्यापासून मथुरेचें अंतर चवदा पंधरा कोस. तें अंतर जाण्याला त्याला फार तर दीड तास लागे, आणि घोड्याच्या जिवाकडे पहावयाचें कारण नाहीं, असें वाटून त्यानें आपल्या घोड्याला इषारा दिला ह्मणजे मग कांहीं विचारूंच नका. तो घोडाही जणूं काय आपल्या धन्याच्या आज्ञेप्रमाणें करण्याकरितां प्राण टाकी. आज खरकसिंगाच्या मनांत तसलीच उत्सुकता उत्पन्न झाली होती. त्यानें घोड्याला इषारा दिला होता आणि तोही अगदीं थंड वेळीं खूप वेगानें चालला होता. इतक्यांत समोरून कोणी मंडळी येत आहेत, ती बरीच आहेत आणि घोड्यावरच येताहेत असें दिसून आल्यामुळें, खरकसिंगानें आपल्या घोड्याला आंवरलें. त्याचीं पावलें अर्थातच तितकीं सावकाश पडूं लागलीं. इतक्यांत ती समोरून येणारी मंडळी जवळ आली. ते चार पांच असामी असून त्यांच्यापैकीं एकाच्या घोड्यावर आडवें प्रेतासारखें असें कांहीं पांढऱ्या वस्त्रानें गुंडाळलेलें होतें. हें काय असावें याचा खरकसिंगाला तर्क होईना; इतक्यांत त्या समोरून येणाऱ्या दोघांचौघांपैकीं एकजण आपल्या साथीदारांस ह्मणतोः "या रानांत असली ही शिकार आपल्याला मिळेल, ही कांहीं कल्पना नव्हती! आणखी किती सहज काम घडलें!"

"अरे बाबा सहज कशानें? आज किती दिवस माझा डोळा ह्या शिकारीवर होता. आज लाभली."

इतकेंच भाषण त्याच्या कानीं पडलें. त्याचा अर्थ काय आणखी त्या गृहस्थाच्या घोड्यावर आडवें टाकलेलें काय असावें असा प्रश्न सहज त्याच्या मनांत आलाही. परंतु असेल कांहीं. या दुनियेंत हजारों गोष्टी घडत असतात त्यांतलेंच कांहीं तरी हें एक असेल. कोणी कोणाची कांहीं वस्तु उपटून आणली असेल. प्रत्येक बाबतींत आपण जर ज्याला त्याला आडवें जाऊं लागलों, तर आपल्याला दोन पावलेंसुद्धां पुढें टाकतां येणार नाहींत. आपण आपल्या वाटेनें जावें हें बरें, असा त्यानें विचार करून पुनः आपल्या घोड्यास वेगानें जाण्याची इषारत केली. थोड्याच वेळांत तो मथुरेस जाऊन पोंचला. त्यानें माताजीचा मठ गांठला तों तेथें एकच हाहाकार उडालेला. तो घोड्यावरून उतरून माताजीच्या दर्शनाच्या उत्सुकतेनें आंत जाणार तों त्यास पाहून माताजी एकदम मोठ्या, परंतु अत्यंत सद्गदित स्वरानें त्यास ह्मणालीः

" खरकसिंग, बेटा, ज्या वाराणशीला आणखी आह्मांला तूं आपला जीव धोक्यांत घालून संकटांतून सोडवलेंच ती वाराणशी त्याच दुष्टांनीं आज येथून नेली. तिचा शोध कोठें लागत नाहीं. आम्ही यमुनातटावर गेलों होतों. वाराणशी नित्याप्रमाणें मठ संभाळायला मठांतच राहिली होती, आणखी आह्मी परत येतों तों तिचा पत्ता नाहीं. कुठें गेली असेल देवळांत वगैरे असें मनांत येऊन देवळें धुंडून आतांच येथें आलों. आमचा सगळ्यांचा जीवच गेल्यासारखें झालें आहे. ती आपण होऊन कुठें जायची नाहीं याबद्दल शंकांच नाहीं. एकदा तूं तिला संकटांतून सोडवलेंस—आमच्या साऱ्यांचीच सुटका केलीस—परंतु आतां पुनः तुला कोणत्या तोंडानें सांगूं ! मी तरी आतां कोणत्या उपायांनीं शोधूं. ज्यांनीं बऱ्हाणपूरच्या मुक्कामाला आम्हांला संकटांत घातलें त्यांचेंच हें कृत्य असलें पाहिजे. त्यांच्याखेरीज कांहीं दुसऱ्या कोणाचें हें कृत्य नव्हे, परंतु आतां ते लोक आले कुठून, त्यांनीं केलें काय आणखी गेले कुठें हें कांहींच समजायला जागा नाहीं. माझी फारफार त्रेधा उडाली आहे. खरकसिंगा, मीं तुझा केवढा अपराध केला ... ... ... ... "

इतकें बोलून माता रणदेवी एकदम ओक्साबोक्शीं रडूं लागली. तिचें तें भाषण चाललें असतां खरकसिंगाचें लक्ष्य दुसरीकडेच होतें. तिच्या बोलण्याकडे मुळींच नव्हतें, यामुळें त्यास तिचें तें शेवटलें त्याला हांक मारून म्हटलेलें " मीं तुझा केवढा अपराध केला ! " हें वाक्य ऐकूं गेलें नाहीं असें वाटतें. तो आपल्या नादांत होता. त्याच्या मनांत कांहीं तरी निराळा विचार आला होता आणि त्यांतच तो गर्क होऊन गेला असावा. त्याचा विचार थोड्याच वेळांत पूर्ण झाला आणखी तो एकदम मठाच्या बाहेर येऊन त्यानें आपल्या घोड्याच्या पाठीवर थाप मारून " खैराती खैराती, गुलामा, तुझ्या चपलतेची आज आतां परीक्षा आहे. चल. चल. ती आडवी बांधलेली शिकार वाराणशीच. आपल्याला आग्र्याच्या बाहेर पडल्याबरोबर भेटलेल्या मंडळींचेंच हें काम यांत शंकाच नाहीं. अरे हरामखोरांनो, तुह्मी अशा पवित्र स्त्रीला अशा तऱ्हेनें नेऊन भ्रष्ट करणार काय ! खैराती चल. आपली शिकस्त कर आणखी त्या माणसांना गांठूं ये. त्यांतला एकही सुटतां कामा नये. चल. आपल्या जिवाकडे पाहूं नको. माझ्या जिवाकडे पाहूं नको. तिथें जाऊन तिला सोडविल्यानंतर मग काय करायचें तें करूं. चल आतां, हें सर्व एकीकडे ठेव. आतां गोष्ट तेवढी. आतां दुसरी कांहीं नाहीं. "

ही त्याची बडबड मोठ्यानें चालली होती. तेथें ऐकायला—निदान त्याच्या अगदीं जवळ—असें कोणी नव्हतें, यामुळें बरें झालें. नाहीं तर त्याच्या त्या हातवाऱ्यांवरून व त्या भाषणावरून एखाद्याला असें वाटलें असतें, कीं याचें डोकें बिघडलें असावें. आणि तसें वेड लागलें असल्याबद्दल खात्री होण्याला त्याचें पुढलें वर्तन तर फारच चांगल्या प्रकारें कारण झालें असतें. कारण त्यानें घोड्यावर स्वार

होण्याबरोबर घोड्याला असा फटकारा मारिला, कीं घोडा ताड्कन् उडून बेफामा-प्रमाणें निघाला.

खरकसिंगाचा घोडा इतका बेफाम होऊन निघाला, कीं जणूं काय आपल्या पाठीवर सैतान बसला असून, आपण जर जोरानें चाललों नाहीं तर आपल्यालाही तो केव्हांच गिळून टाकील असें त्यास दर पावलागणिक वाटत असावें. वाटेंत कोणी माणूस पुढें आलें, का घोडा आहे, का आड आहे याचें यत्किंचितहि भान त्याला नसावें असें स्पष्टपणें त्याच्या त्या गतीवरून वाटलें. पशूला उपजत अंगस्व-भावामुळेंच काय जें ज्ञान असेल, तेवढ्या ज्ञानामुळेंच त्यानें कोणाला काय आपल्या मार्गांत टाकून वाट काढली असेल तेवढेंच. बाकी त्याच्या बाह्य चक्षूंस दिसून त्यानें मार्ग आक्रमिला असेल हें संभवनीय नाहीं. तो पुष्कारच्या उड्या मारीत म्हणा किंवा कालिदासानें वर्णन केलेल्या हरिणाच्या गतीप्रमाणें बहुतेक आकाशांत आणि क्वचितच पृथ्वीवर आपले खूर टेंकून चालला होता. तोही आकाशांत संथ गतीनें चालला नव्हता तर अत्यंत वेगानें चालला होता असें सहज कोणासही वाटलें असतें.

घोड्याच्या गतीची अशी विलक्षण स्थिति होती,परंतु त्याच्यावर आरूढ होणाऱ्या स्वाराच्या मनाची स्थिति त्याच्यापेक्षां किती तरी विलक्षण होती. घोड्याची इतकी वेगाची गति होती, तरी त्या घोडेस्वारास असेंच वाटत होतें, कीं आज हा असा अगदीं मंद वेगानें—रोजच्याहीपेक्षां मंद वेगानें कसा चालला आहे—अशाही वेळीं हा असा मंदपणा कां धरतो ? म्हणून तो त्याला आपल्या पायांनीं व तोंडानें वेग वाढविण्यासाठीं इषारा करीतच होता !

होतां होतां वाटेंत दोनचार अपघात होऊन घोडा एकदांचा आग्रा शहराच्या वेशीपर्यंत आला. तेथें आल्यानंतर मात्र स्वारीला घोड्याचा वेग कमी करावा लागला. दुसरा इलाजच राहिला नाहीं. आतांपर्यंतचाच वेग येथेंही चालू ठेविला असता, तर सुमारें चारशें कदम जाण्याच्या आंतच कोणी तरी घोड्यास पकडलें असतें किंवा त्याच्या पायावर हाणून पाडलें असतें. शिवाय शहरांत शिरल्यानंतर नुसतें भरधांव पळत सुटणें हें कांहीं हितावह नव्हतें. आतांपर्यंत एक वाट होती. ज्यांस त्याला गांठावयाचें होतें ते भेटले तर त्याच वाटेंत भेटावयाचे, परंतु गांवची वेस वलांडल्यानंतर दहा वाटा—तेव्हां आपण ज्या सावजाच्या पाठीमागें इतक्या वेगानें आलों, तें सावज कोणत्या दिशेनें गेलें हें तपासानें समजून घेणें जरूरच होतें. अर्थातच एके दुकानापुढें घोडा थांबवून त्या दुकानाच्या मालकास त्यानें प्रश्न विचारला, कीं " घोड्यावर असें असें पांढऱ्या कपड्यांत गुंडाळलेलें एक माणूस आडवें घेऊन एक घोडेस्वार आणि त्याच्या मागें आणखी कांहीं घोड्यावर बसलेलेच व काळा पोषाख केलेले इसम कोणत्या बाजुला गेलेले तूं पाहिलेस काय ? "

परंतु त्या दुकानदारानें सांगितलें, कीं आपण कांहीं अशी मंडळी इकडून गेलेली पाहिली नाहीं. तें ऐकतांच आमच्या खरकसिंगाची विलक्षण निराशा झाली. कां कीं, ज्या रस्त्यानें तो आला, त्याच रस्त्यानें ती मंडळी गांवांत आली असली पाहिजे हें तर अगदीं उघड होतें. आणि ज्या तऱ्हेनें तें पांढरें लांबट गाठोडें त्या घोडेस्वाराच्या पुढें धरलेलें होतें, ती तऱ्हाच अशी विलक्षण होती, कीं तीमुळें कोणाचेंही लक्ष्य सहजच तिकडे जावयाचें. परंतु हा तर ह्मणतो, कीं असें कोणी गेलें नाहीं, तेव्हां हा प्रकार तरी काय असावा ?

दुकानदारानें एकवार "नाहीं" असें उत्तर दिलें, पण तेवढ्यानें कांहीं खरकसिंगाचें अर्थातच समाधान झालें नाहीं. त्यानें पुनः पुनः खोदखोदून असें विचारलें, कीं नीट स्मरण करून सांगा. थोड्या वेळापूर्वीं मी सांगतों अशा प्रकारची मंडळी येथून गेली असली पाहिजे; परंतु दुकानदार कांहीं केल्यानें कबूल करीना. तो ह्मणे, मी इथें जितका वेळ आहें, तितक्या वेळांत कांहीं तुह्मी वर्णन करतां तशी मंडळी कोणी गेली नाहीं हें खचित. माझे डोळे एकसारखे रस्त्यावरच असतात."

तें ऐकतांच बिचारा खरकसिंग फार चकित झाला आणि अगदीं खिन्नही झाला. कारण, आतां त्याचा बहुतेक उपाय खुंटल्यासारखा झाला. आतांपर्यंत ठीक होतें, पण याच्यापुढें कोणत्या दिशेनें—कोणत्या वाटेला जावें याचीच, पंचाईत पडली. आपण एक वाट धरली—अगदीं तिच्या टोंकाला जात राहिलों आणि ती मंडळी दुसऱ्याच बाजूनें गेली असली, तर आपला सगळा खटाटोप व्यर्थ जाऊन ती मंडळी सुरक्षित कोठें तरी जाऊन बसावयाची. अशा स्थितींत आपण आपली याच ठिकाणीं ज्यास्त चौकशी करून माहिती काढावी तें चांगलें असा त्यानें विचार केला आणि तो कांहीं वेळ आपल्या घोड्याच्या पाठीवर व मानेवर थापट्या मारीत स्वस्थ विचार करीत उभा राहिला. नंतर पुनः त्या दुकानदाराकडे वळून ह्मणतोः "शेटसाहेब, मी वारंवार वारंवार आपल्याला विचारून तक्लीफ देतों याबद्दल आपण मला माफ करा. पण माझा इलाज नाहीं. मला त्या माणसांची माहिती मिळालीच पाहिजे. मथुरेला माता रणदेवी ह्मणून बिचारी एक अतिशय पवित्र अशी बैरागीण आहे. तिच्या मठांतली तिची एक शिष्यीण त्या गुलामांनीं बळजबरीनें ओढून घोड्यावर घालून आणली आहे. ताबडतोब जर तिची सुटका केली नाहीं, तर त्या बिचारीची काय अवस्था होईल आणखी काय नाहीं याचा नेम नाहीं." परंतु खरकसिंगाचें इतकें लांबलचक बोलणें पुरतेपणें ऐकून न घेतांच तो दुकानदार त्यास ह्मणतोः—काय ह्मणतां ! माताजीच्या मठांतली तिची शिष्यीण कोणी तरी दुष्टांनीं ओढून आणून ते तिला या मार्गानें गांवांत घेऊन गेले ? आपण सांगतां ही गोष्ट अगदीं खरी ?

" हो. अगदीं खरी. माता रणदेवी आपल्या मठांत नसतांना तिच्या पश्चात्

तेथें जाऊन मठांतल्या एका तरुण शिष्यिणीला खोटेंनाटें सांगून बाहेर काढून बळ-जबरीनें घोड्यावर घालून आणलें. मी इकडून जातांना त्या मधल्या बाभुळबनाच्या जवळ त्या मंडळीला इकडे येतांना पाहिलें, पण तेव्हां त्यांत असें कांहीं काळेंबेरें असेल ही कल्पनाच आली नाहीं. मी नेहमीं माता रणदेवीच्या दर्शनाला जातों तसा आज गेलों तों तेथें सगळा हाहाकार उडालेला. ह्मणून चौकशी केली तों असें कळलें, कीं वाराणशी नांवाची शिष्यीण एकाएकीं नाहींशी झाली आहे आणि तिचा शोध चालला आहे. तें ऐकतांच माझ्या मनांत असें आलें, कीं आपल्याला वाटेंत जी मंडळी भेटली, आणखी एका स्वाराच्या पुढें आडवें पांढरें जें गांठोडें दिसलें ती वाराणशीच असावी. रावणानें जसें सीतेला फसवून मठांतून काढलें, त्याचप्रमाणें हा सारा प्रकार असावा. असें मनांत येतांच मी त्याच पावलीं माघारा वळलों. हा नेणारा कोण असावा याचा तर्क मला होतो, परंतु तशी चौकशी करण्यापूर्वी इकडून ती मंडळी कोणत्या दिशेला गेली एवढें शोध करून काढणें अत्यंत जरूर आहे असें वाटून मीं तुह्मांला विचारलें."

परंतु आतां इतक्या या भाषणाकडे त्या दुकानदाराचें लक्ष्यच नव्हतें. तो आप-ल्याशींच कांहीं विचार करीत असावा असें दिसलें. बराच वेळ त्याप्रमाणें विचार झाल्यानंतर तो एकदम खरकसिंगास ह्मणतोः "काय ह्मणतां, माता रणदेवीच्या मठांतून तिच्या एका शिष्यिणीला बळजबरीनें ओढून आणून कोणी लोक इकडे गांवांत गेले ? माताजीच्या मठांतून ? इतका अधमाधम कोणी जगांत असेल ? असेल. नाहीं ह्मणून तरी कशावरून ? पण माता रणदेवीला एक वेळ जो पाहील, त्याच्या मनांत कांहीं तिला दुःख होईल अशी गोष्ट करण्याचें येऊं नये; पण तुह्मी ह्मणतां अशी गोष्ट झाली. मी बहुतकरून तिन्हीसांजापासून येथेंच आहें, पण मला तर कांहीं तुह्मी सांगतां अशा वर्णनाचें कोणी जातांना दिसलें नाहीं. पण थांबा अं. माझा पोऱ्या हलकुवा इतक्यांत मला कोणाचें घोडें धरून जातों म्हणून सांगून गेला, ती तर ती मंडळी नसेलना ? असेल बोआ ! हां. आपण म्हणतां तशीच मंडळी असण्याचाही संभव आहे बोआ. खरें. खरें. पण मी तरी काय मूर्ख ! अहो, इतका वेळ माझ्या मनांत कसें नाहीं कांहीं आलें ? अगदींच मद्दपणाचें काम झालें बोआ. अहो थांबा. तुह्मांला अगदीं बरोबर पत्ता लागेल. तीच. तीच मंडळी असली पाहिजेत. थोडे थांबा; आतां हलकुवा येईल आणखी तो तुह्मांला सर्व कांहीं सांगेल. नव्हे ती मंडळी कोठें गेली हें नेमकें तो दाखवीलसुद्धां. त्याची आतां मला भ्रांतीच नाहीं. आपण क्षण-भर टेंका. अहो, तिन्हीसांजापासून त्या दरवाजाजवळ एक मेणा आणखी कांहीं माणसें चोरून उभीं रहावीं अशीं उभीं राहिलीं होतीं. माझें लक्ष्य कांहीं आधीं गेलें नाहीं. पण माझा हलकुवा मोठा लबाड आहे. त्यानें मला ह्मटलें, कीं बाबा या मेण्याचा हा प्रकार काय आहे हो ! तेव्हां मी आपलें त्याला दाबून टाकलें, कीं तुला

त्यांत का करावयाचें आहे ! कोणाचें कांहीं असेल. पँण त्याची जिज्ञासा कुठें थांबने आहे. त्यानें त्या भोयांपर्यंत जाऊन काय आहे, काय नाहीं, याची चौकशी केलीच शेवटीं................

इतकें बोलून तो बडबड्या दुकानदार थांबला. खरकासिंगाच्या दृष्टीनें तो भलत्याच ठिकाणीं थांबला हें उघड होय. त्याला जी काय माहिती पाहिजे होती ती पुढलीच. तेव्हां तो थांबतांक्षणींच त्याला हा ह्मणतो; " बरें मग त्या चौकशींत त्याला काय कळलें ? "

" कांहीं कळलें नाहीं. आह्मांला इथें आणून एकानें बसवलें आहे, कोणी घोड्यावरून माणसें येतील त्यांच्याबरोबर एक बाई आहे. तिला मेण्यांत बसवून बेगमपुऱ्यांत न्यायचें आहे, एवढें सांगून आह्मांला इथें आणून वाट पहात बसवलें आहे." त्यांच्यापासून त्याला कांहीं आणखी कांहीं कळलें नाहीं, तेव्हां तो माघारी येऊन दुकानांत बसला. थोड्या वेळानें मी रोटी खायला आंत गेलों, आणखी तो बाहेरच बसला होता. कांहीं वेळानें हलकुवा पुनः आंत आला आणखी मला ह्मणाला, ' मेण्यांतून कोण बाई न्यायची ते लोक आले आहेत, आणखी मला ह्मणताहेत, कीं तूं आमचा घोडा धरून मेण्याबरोबर चालशील तर तुला एक अकबरी बक्षीस देऊं.' जाऊं का ? पण मीं त्याला ' तूं कांहीं नको जाऊं, मी हात धुवून येईपर्यंत कुठें जाऊं नको, माझा बाप येईपर्यंत थांबाल तर येईन ह्मणून सांग पाहिजे तर ' असें बजावून सांगितलें. पण त्यांनीं त्या पोराच्या पाठीमागें फार गर्दी लावली असावी; कारण त्यानें ओरडून मला सांगितलें, कीं ती मंडळी ऐकत नाहीं. लवकर चल पाहिजे तर असें ह्मणताहेत. मी जातों, तुह्मी लवकर दुकानांत या, असं बोलून तो निघून गेला. मी त्याला आंतून मोठ्यानें ओरडून दुकान मोकळें टाकून जाऊं नको लेका, ह्मणून सांगणार तों तो पार निघूनही गेला. मी घाईघाईनें आलों तों तो दृष्टीआड सुद्धां झाला होता. तुह्मी ह्मणतां तीच ती बाई असली पाहिजे. अरेरे ! माता रणदेवीची शिष्यीण आणखी अशा प्रकारें तिला कोणी दुष्टानें आणलें असें जर मला कळतें, तर मी त्यांना इथून दोन पावलें सुद्धां हलूं दिलें नसतें. इथें अडकून धरलें असतें. पण तेव्हां असें वाटलें, कीं आपल्याला काय करायचें आहे ! कोणाचें कांहीं का असेना. हलकुव्या गेला तर त्याचा मला मोठा संताप आला. पण तो गेला हेंही एका प्रकारानें बरेंच झालें. तो आतां आल्याबरोबर नेमका जिथें त्या बाईला नेलें असेल तिथें तुह्माला घेऊन जाईल. आतां येईल तो. त्यांच्या तडाख्यांतून सुटायला मात्र पाहिजे. अकबरीच्या आशेनें गेला आहे. आपणही फार दमून आलां आहां. थोडी विश्रांति घ्या, आणखी आपण कोण कुठले याची माहिती सांगा. पट्टी, तंबाखू खा, हुक्का प्या. आपल्याला आणखी आपल्या घोड्याला तरी विश्रांति पाहिजेच कीं नाहीं ! आपण इतकें अंतर फारच विलक्षण वेळांत मारलें असलं पाहिजे. आपली स्थितिच सांगते आहे ! "

परंतु खरकसिंगास त्याचें तें आशा उत्पन्न करणारें भाषणसुद्धां फार कंटाळवाणें वाटलें. परंतु करतो काय ? पोरगा येईपर्यंत वाट पहाण्याखेरीज दुसरी गतिच नव्हती. त्या दुकानदाराची वटवट चाललेलीच होती. तो आतां माता रणदेवीबद्दल फारच भक्तिपूर्ण अशा शब्दांनीं बोलत होता. आपण त्या संतिणीच्या दर्शनासाठीं आठ चार दिवसांनीं मथुरावृंदावनास एकदां जातों. तिची तपश्चर्या फार दांडगी ! तिचें तेज काय, तिची वृत्ति काय आणखी तिच्यासारख्या पवित्र स्त्रीच्या मठांतून तिच्या शिष्यिणीला न्यावयाची दुष्टबुद्धि धरणारा आधीं विरळा—त्यांत आणखी त्या दुष्टबुद्धीप्रमाणें करणारा तर याहूनही विरळा. अशा माणसांना ह्मणावें तरी काय ! ......

अशा प्रकारें त्याची आपली टकळी सुरूच होती. खरकसिंगाचें सारें मन त्या पोराकडे आणखी त्याच्या येण्याच्या वाटेकडे होतें. शेवटीं एकदांचा तो पोरगा दृष्टीस पडण्याबरोबर त्यास खरकसिंग ह्मणतोः " कायरे ! तुला ज्यांनीं वाट दाखविण्याला नेलें, त्यांना कोठें सोडलेंस तेवढें मला दाखव. त्यांनीं तुला एक अकबरी दिली असली, तर मी तुला दोन देतों. पण मला तूं ताबडतोब तेथें घेऊन चल."

त्याबरोबर तो पोरगा एकदम रागावून ओरडून ह्मणतोः " अहो, ते लोक फार लबाड. त्यांनीं दोन दमड्या देखील माझ्या हातावर ठेवल्या नाहींत. मी अकबरी कबूल केलीत ती द्या ह्मणून पाठीस लागलों, तर थोबाडींत मारून त्यांनीं मला घालवून दिलें. जास्त बोलायला लागलों तर दोन तोंडांत लगावण्याचा धाक घालून त्यांनीं मला तेथून हांकून दिलें. आपण जें काय देतों ह्मणून कबूल करतां आहां तें आधीं देत असाल तर मी येईन. "

हें बोलत बोलत तो आपल्या बापाजवळ जाऊन उभा राहिला. बापानें त्याचें तें बोलणें दुरून ऐकलें होतें आणि तो एकदम त्यास म्हणतोः " लेका हलकुण्या, तुला मी चांगलें बजावून सांगत होतों, कीं तूं कांहीं जाऊं नको मी बाहेर येईपर्यंत. माझें तूं ऐकलें नाहींस, त्याचें बरें तुला चांगलें शासन झालें. पण पोरा, हे गृहस्थ तसले नाहींत. ते माता रणदेवीचे शिष्य आहेत. आणखी माता रणदेवीच्या मठांतून एका मुलीला पळवून त्या मघांच्या दुष्टांनीं आणलें आहे, तर तूं हे कांहीं देवोत न देवोत, यांच्या बरोबर जाऊन त्या बाईला त्यांनीं कुठें ठेवलें आहे तेवढें दाखव. "

पोरगा कांकूं करूं लागला. परंतु बापानें फारच निक्षून सांगितलें, तेव्हां त्यानें त्याच्याबरोबर जाण्याचें कबूल केलें. रात्रीची वेळ. परंतु त्या पोराच्या पायाखालच्या वाटेप्रमाणेंच त्याला सर्व वाट होती. तो भराभरा जाऊं लागला. खरकसिंगानें आपला घोडा त्या दुकानदाराच्या स्वाधीन केला होता. आतां घोड्याला आणखी श्रम देणें शक्यच नव्हतें, यामुळें त्याला तसें करणें भागच पडलें. पोरानें त्याला आडव्यातिडव्या वाटेनें बरेंच लांब नेलें. नंतर एकाएकीं तो थांबला

आणि ह्मणाला, " इथून पुढें मला त्यांनीं कुठें नेलें तें सांगतां येणार नाहीं. कारण आंत गल्लींत वेड्यावांकड्या बोळांनीं नेलें." परंतु खरकसिंगानें पुनः त्याच्या विनवण्या केल्या तेव्हां त्यानें पुनः एकदां त्याला दाखविण्याचें कबूल केलें. खरकसिंग आपल्यास कांहीं देईल याबद्दल खरोखरीच त्याला कांहीं भरंवसा वाटेना. शेवटीं खरकसिंगानें तें जाणलें. परंतु कर्मधर्मसंयोगानें त्याच्याजवळ त्या वेळीं कांहींच द्यावयाला नव्हतें. पण तितक्यांत त्यानें त्या पोरास ह्मटलें: " हलकुवा, मी तुल कबूल केल्याप्रमाणें दोन अश्रफ्या देईन मला तूं नेमकें घर दाखविलेंस तर. आतां तुझ्या हातावर ठेवायला इथें माझ्याजवळ नाहींत, परंतु मी आपला घोडा तुझ्या बापाजवळ ठेवून जाईन. तूं मला तें ठिकाण दाखविल्यानंतर घरीं जाईन, तुझ्या अश्रफ्या तुझ्या हातांत देईन आणि मग मी आपला घोडा घेऊन जाईन. घोड्याची किंमत शंभर अश्रफ्या दिली तरीसुद्धां असें जनावर मिळायचें नाहीं. चल. चल. तूं टंगळमंगळ करूं नकोस. विनाकारण वेळ घालविण्यांत काय तात्पर्य आहे ? माता रणदेवीकरितां सुद्धां देखील तूं............"

" काय ह्मणतां ? माता रणदेवीचा यांत काय संबंध ? "

" माता रणदेवीचा संबंध काय ह्मणजे ? माता रणदेवीची शिष्यीण ती बाई. जिला मेण्यांतून नेलें ती माता रणदेवीच्या मठांतून आणली ? "

" काय ह्मणतां ? माता रणदेवीची शिष्यीण—तिच्या मठांतून आणली ? मला नाहीं हें वाटत खरें. बाबादेखील मघाशीं असें ह्मणाले, पण माता रणदेवीच्या मठांत मी बाबांच्याबरोबर पुष्कळदां गेलों आहें. तिच्या मठांतल्या बायांसारखा तिचा पेहराव होता खरा पण आं ? माता रणदेवीचें काम आहे म्हणतां मग आतां तुह्मांला कांहीं मी सबबी सांगत नाहीं. नेमकें त्या घराशीं नेऊन सोडतों. अगदीं नेमकें चला. "

असें ह्मणून त्यानें पांचचार आडवे तिडवे बोळ वलांडले आणि एकदम तो एका घरापाशीं उभा राहून ह्मणाला, " हेंच तें घर. त्या घरांत तिला उचलून नेलें. मला त्यांनीं आंत जाऊं दिलें नाहीं. इथूनच माघारीं लावलें. त्याप्रमाणें मी आपला पळत आलों. तुह्माला घर दाखविलें आतां मी जातों. "

तें त्याचें बोलणें ऐकून खरकसिंग त्याला ह्मणतोः—" हलकुवा, तूं घर दाखवलेंस ही माझ्यावर तुझी मोठी कृपा झाली, पण नुसतें घर दाखवून काय उपयोग ? तूं युक्ति प्रयुक्ति करून आंत शिरून ती बाई कुठें ठेवली आहे एवढें काढून येशील तर मी तुला आणखी किती तरी बक्षीस देईन. शिवाय माता रणदेवीही तुला फार मोठी शाबासकी देईल. तूं जर इथें हांका मारीत राहिलास, तर कोणीना कोणी तरी तुला दार उघडील, आणखी मग तूं त्या दारांतून आंत शीर. "

खरकसिंग त्याला हें सांगत होता, परंतु त्याचें त्यालाच असें वाटत होतें, कीं आतां रात्रींची वेळ या वेळीं आपल्या या करण्याचा कांहीं उपयोग होणार नाहीं.

जोरानें फार वात्रटपणा केला तर त्याला चोप मात्र बसेल; तेव्हां त्याला जास्त कांहीं करावयास न सांगतां आपण परतावें हाच मार्ग उत्तम. असा विचार करून तो त्या पोरास परतण्यास सांगणार, तों त्या पोराच्या काय मनांत आलें, त्यानें त्या घराच्या दाराशीं जाऊन मोठमोठ्यानें शंख करण्यास सुरुवात केली. त्याला नांव कोणाचेंच ठाऊक नव्हतें. तेव्हां अर्थातच कोणाचें नांव घेऊन हांका मारणें शक्य नव्हतें. त्याच्या त्या हांका चालल्या असतां खरकसिंग नुसती घराची टेहळणी करीत होता. त्याला टेहळणी करण्यास आतां नुकताच उगवलेला चंद्र थोडीशी मदत करीत होता. त्याच्या साहाय्यानें पहातांना त्याला एवढें पूर्णपणें कळलें, कीं ज्या बाजूला आपण उभे आहों, ती बाजू एका मोठ्या थोरल्या वाड्याची मागली बाजू आहे. आणखी कांहीं त्याच्या ध्यानांत येईना. इकडे त्या पोरानें रिकाम्या हांका मारण्याचा सपाटा चालविला होता, परंतु एका हांकेलासुद्धां त्याला कोणी दाद देईना. पुष्कळ हांका मारून मारून तो दमला तेव्हां आतां आपण येथून जावें असें दोघांच्याही मनांत आलें. आतां याच्यापुढें जें काय करणें तें प्रातःकाळींच शक्य, असें मनांत येऊन खरकसिंग त्या पोरास घेऊन परतला व दुकानावर आला. तेथें त्यानें त्या पोराच्या बापाला आपला हा घोडा उद्यांपर्यंत तुझ्याजवळ ठेव. तुझ्या मुलाला मीं दोन अश्रफी देण्याचें कबूल केलें आहे, पण माझ्याजवळ आतां कांहीं अश्रफी नाहींत. उद्यां सकाळीं अश्रफी घेऊन येतों, मग आपला घोडा घेऊन जाईन. शिवाय हलकुवराची मला उद्यां सकाळीं मदत मिळाली पाहिजे. कारण पुनः तें घर मला सांपडेल हें कांहीं संभवत नाहीं. रातोरातच त्या पोरीची काय स्थिति होईल याबद्दल त्याला फार फार वाईट वाटलें. परंतु करणार काय ?

---

# प्रकरण ४६ वें.

## बादशहाची थैली !

दुकानदारानें केव्हांच ओळखलें, कीं हा गृहस्थ कोणी सामान्य नव्हे. याचा घोडा ठेवून घेण्यास आपण कबूल होऊं नये. हडप ठेवल्याप्रमाणेंच होणार आहे. यानें जरूरीच्या वेळीं आपल्या पोरास दोन अश्रफी कबूल केल्या आहेत तर हा बुडवून जाणार नाहीं. खास आणून देईल. ह्मणून त्यानें लागलींच खरकसिंगास ह्मटलें:—

“ महाराज, मी पैशाचा अधाशी नाहीं. माणसाचा भुकेला आहें. दोन अश्रफींची गोष्ट काय ? आपण केव्हांही आणून द्या. त्या आपण राजीखुषीनें या मुलाला देण्याचें कबूल केलें आहे, तर आपण आणून द्याल यांत आह्माला मुळींच

संशय वाटत नाहीं. अपरात्र झाली आहे. आपण खुशाल आपल्या घोड्यावर बसून जिकडे जायचें तिकडे जा. जेव्हां आपल्याला फुरसत होईल किंवा इकडे यावयाची जरूर वाटेल तेव्हां इकडे या. पण घोडा वगैरे ठेवून घेण्याइतका मी घाबरा नाहीं. माणूस ओळखणारा मी आहें. आणखी काय सांगूं ! "

दुकानदाराचें तें भाषण ऐकून खरकसिंगास फार आश्चर्य वाटलें. तो क्षणभर स्तब्ध बसला व लगेच ह्मणतो " ठीक आहे, तूं इतका थोर मनाचा आहेस तर तुझें देव आमच्या हातून कांहीं कल्याण करील. माता रणदेवीची शिष्यीण कोणीं आणखी कोठें नेली याबद्दल आपण तपास लावून दिलाच पाहिजे. ती बिचारी काय करणार ! तेव्हां मी उजाडतांच पुनः येथें येईन आणि तुझ्या हलकुवरला घेऊन जाईन. दिवसा त्या घराजवळ तपास केला तर जास्त तपास लागेल. "

असें ह्मणून खरकसिंग आपल्या घोड्यावर बसून महाराजांच्या वाड्यांत गेला. तेथें अर्थातच पहारेकऱ्यांखेरीज सर्व मंडळी स्वस्थ निजली होती. हा गेल्याबरोबर पहारेकऱ्यांनीं याला आपला फार वेळ तल्लास चालला होता असें सांगितलें. यानेंही मी मथुरेला गेलों होतों आणि तेथून येतांना वाटेंत कांहीं अडचण आल्यामुळें आपल्यास उशीर झाला असें सांगितलें. नंतर तो आपल्या नित्याच्या जागीं पथारी टाकून निजला, परंतु त्याला झोंप येईना. त्याला असें वाटे, कीं त्या तरुण गोसावणीला आपण एकवार त्या राक्षसांच्या हातून सोडविलें असतां पुनः त्यांनीं पाळथ राखून तिला अशा कपटानें पळविलें, तेव्हां त्यांचा फार दिवसांचा तिच्यावर डोळा असला पाहिजे. अशी जर स्थिति आहे, तर आपण आतां स्वस्थ न बसतां काय वाटेल तें करून तिचा तपास लावला पाहिजे. तिला सोडविलें पाहिजे. माता रणदेवीच्या शिष्यिणीबद्दल आपल्याला इतका आदर व इतकी चिंता कां वाटते हें त्याचें त्यास समजेना. त्याचा अंतरात्मा तळमळूं लागला; काय करावें तें त्यास सुचेना. त्याच्यापासून थोड्या अंतरावर पलीकडे नानासाहेब व तानाजीराव पडलेले होते, ते त्याच्या चळवळीनें जागे झाले. त्यांनीं यास हांका मारून केव्हां आलां ! इतक्या उशीरापर्यंत कोठें होतां म्हणून विचारलें; अर्थातच हा तें सांगण्यास फार उत्सुक होता. यानें तेव्हांच त्यांस आपण मथुरेला गेलों होतों व तेथें माताजीच्या मठांत याप्रमाणें हाहाकार उडाला आहे ह्मणून सांगितलें. हा हाहाकार कशाबद्दल तें कळतांच ते दोघेही खडबडून उठून बसले आणि खरकसिंगास पुनः पुनः प्रश्न विचारूं लागले. वाराणशीस तानाजीनें बऱ्याच वेळां पाहिलें होतें. कारण महाराजांकडून विचारपूस करण्यासाठीं मथुरेस जाण्याची कामगिरी तानाजीकडे कायमचीच देण्यांत आली होती. बाकी कोणी गेलें तरी माताजी स्वतः मात्र त्याला भेटायची. दुसऱ्या गोसावणी–त्यांतून वाराणशी तर–कधींच कोणाच्या नजरेस पडत नसे. बऱ्हाणपुरानजीक जो प्रसंग झाला, त्या प्रसंगापासून तिच्याबद्दल सर्वांस फार काळजी वाटत असे. न जाणों तिच्यांवर केव्हां काय संकट

येईल आणि काय नाहीं. आणि शेवटीं तिच्यावर संकट आलें असें ऐकतांच तानाजीस फार वाईट वाटलें. खरकसिंगानें आपण आतांपर्यंत तिला सोडविण्यासाठीं काय खटाटोपी केल्या तें सांगितलें तेव्हां तानाजी त्यास ह्मणाला: "ठीक आहे आपण उजाडतांच त्या घराशीं जाऊन तेथें कोण राहतो, काय करतो वगैरे चौकशी करूं; परंतु हें काम एकसारखी पाळथ ठेवून मोठ्या सावधगिरीनें व बंदोबस्तानें झालेलें आहे. आणि माझा तर तर्क असा आहे, कीं हें काम त्या दुष्ट किरातसिंगाचेंच असावें."

किरातसिंगाचें नांव काढल्याबरोबर खरकसिंगाच्या तळपायाची आग मस्तकास जाई. त्याचप्रमाणें आतांही झालें. खरकसिंगाची अतोनात उत्कट इच्छा ही, कीं किरातसिंगाचा व आपला कोठेंना कोठें तरी सामना व्हावा. असा सामना होतांक्षणीं जरासंधाप्रमाणें आपण त्याच्या दोन दुफळ्या होतील असा त्याला चिरूं, परंतु कर्मधर्मसंयोग असा कांहीं विचित्र, कीं तो आणि हा कधींच एकमेकांच्या समोर आले नाहींत. कदाचित् असेंही असेल, कीं तो याच्या समोर येणें टाळीत असे. तो या पोरीला नेणारा असावा असें ऐकतांक्षणींच खरकसिंग नखशिखांत लाल झाला, त्याला असें वाटलें, कीं आतां कोठें वाटेल तेथें जाऊन त्याला गांठून त्याच्या नरडीचा घोट घ्यावा, परंतु या नुसत्या संतापानें काय होणार ? त्याच्या तोंडून शब्द उमटेना असें मात्र झालें. तानाजी व नानासाहेब यांनीं तें पाहिलें आणि त्यामुळेंच ते ज्यास्त कांहीं बोलले नाहींत. किरातसिंगानें तिला जर पळवून नेलें असलें, तर तें अर्थातूच तिला कोणाच्या तरी—मुसलमान सरदाराच्या—जनानखान्यांत नेऊन घालण्याकरितां याबद्दल त्याला शंका नव्हती. याप्रमाणें त्यानें आपल्या त्या सोबत्यांस बोलूनही दाखविलें. परंतु नुसतें संतापून किंवा तसल्या गोष्टी सांगून थोडेंच कांहीं साधणार आहे ! पुढें काय करावयाचें याचा विचार करून त्यांनीं असें ठरविलें, कीं झुंजूमुंजू होतें न होतें तों आपण तिघांनींही तें घर शोधून काढून वाराणशीचा शोध करावयाचा आणि किरातसिंगावर डोळा ठेवून त्याची हालचाल निरखावयाची ह्मणजे खास काय प्रकार झाला हें समजेल.

परंतु प्रत्येक बाबतींत मनुष्याच्या मर्जीप्रमाणेंच सर्व गोष्टी घडून येऊं लागल्या, तर आणखी काय पाहिजे ? कोणाला असंतोषाला आणि मत्सराला मुळींच जागा राहिली नसती किंवा कशाची कोणास चिंताही उरतीना. सगळ्या चिंतेचें, मत्सराचें—अर्थात् सर्व दुःखाचें—मूळ पुष्कळशा गोष्टी आपल्या मनाविरुद्ध होतात यांतच आहे. वर सांगितल्याप्रमाणें वाराणशीला सोडवून आणण्यासाठीं काय खटाटोप करावयाचा तें त्या तिघांनीं ठरविलें आणि ते त्या संबंधानेंच कांहीं बोलत होते. यापुढें झोंपही येईना तेव्हां अशाच गोष्टी बोलत बोलत ते बसले, तों उजाडण्याचा सुमार झाला. अर्थातच उठून आपल्या बेताप्रमाणें तयारीला लागावें

असें त्यांच्या मनांत आलें. तों काय चमत्कार झाला कीं, रामसिंगाकडून एक स्वार दौडत दौडत आला, त्याच्याजवळ एक थैली होती, ती महाराजांच्या समोर नेण्याचें काम बाळाजी आवजीचें, अर्थात् त्यांनीं तें पत्र बाळाजीकडे दिलें. बाळाजीनें तें घेतलें आणि ते महाराजांच्या शेजमहालाकडे गेले. इतक्यांत महाराजांनींही आपल्या नौकरास हांका मारल्या. महाराज रीतीप्रमाणें उठून मुखमार्जनादि विधि करून झाल्यावर आपल्या विश्वासू मंडळीसकट घटकाभर गप्पा गोष्टी सांगत बसत—अर्थात् त्यांच्या गप्पा गोष्टी कांहीं तरी महत्त्वाच्याच असावयाच्या. परंतु ती वेळ येईपर्यंत ती थांबण्याचीही वेळ नव्हती म्हणून बाळाजींनीं हुजऱ्यास बोलावून त्याला सांगितलें कीं, मी अतिशय जरूरीच्या कामाकरितां आलों आहें अशी वर्दी दे. बाळाजींना केव्हांच मनाई नसे तेव्हां त्यांचा निरोप जाण्याचा अवकाश! महाराजांनीं त्यांस आंत बोलावलें.

थैली उघडली तों त्यांत बादशहाचें स्वदस्तुरचें पत्र कीं आज दोन प्रहरीं बडा दरबार करून आपणास वस्त्रें वगैरे देण्याचें योजिलें आहे. तरी आज आपण दरबारीं यावें. आपणास फार दिवस येथें कुचंबत बसावें लागलें, परंतु आपण त्या दिवसांचा उपयोग चांगला केलाच असला पाहिजे. या थैली आणणाऱ्या स्वाराबरोबर रामसिंगाकडूनही एक थैली होती, तींत "सोबतची थैली आतांच आली, ती आपणाकडे पाठविली आहे. तींत काय आहे तें मला ठाऊक आहे. कारण मला थैली आली तींत आपलेकडे पाठविण्याच्या थैलींत काय आहे तें लिहिलें आहे. बादशहा काल रात्रौ खुषींत होते. आज दरबारीं आपला मानमरातब चांगला होईल असें दिसतें. ठीकच होईल. थोडे वेळानें आपले तिकडे येतों. थैली घेऊनच येणार होतों; परंतु इकडे कांहीं निकडीचें काम असल्यामुळें थोडा अवधि लागेल."

महाराजांनीं हीं पत्रें ऐकतांच बाकी सर्वांस बोलावून त्यांस त्यांतील मजकूर सांगितला. तो सर्वांनीं ऐकला. अर्थातच सर्वांस संतोष झाला. परंतु महाराजांची चर्या मात्र संतुष्टतेची दिसली नाहीं. त्यांनीं तसें बाहेरून दाखविलें नाहीं. कांहीं निमित्त काढून त्यांनीं बाकीच्यांस तेथून लावून दिलें. बाळाजी आवजीसही त्यांनीं अर्ध्या घटकेनें येण्यास सांगितलें. निर्मक्षिक केल्यानंतर महाराज आपल्याशींच खिन्न मनानें विचार करूं लागले. आतांपर्यंत बादशहा दरबारीं बोलावीत नाहीं याबद्दल त्यांस खेद वाटत होता. आज त्यानें बोलावलें याबद्दल खेद वाटूं लागला. महाराज दक्षिणेंतून बादशहाच्या मुलाखतीच्या निमित्तानें आग्र्यास आले. त्यांचा दुसरा हेतु काय होता हें वाचकांस माहिती आहेच. त्याही हेतूप्रमाणें त्यांस हर्ष वाटण्याजोगें कांहीं लाभलें नाहीं. आतां आपण इकडे येण्याचा निश्चय केला, त्याप्रमाणें आलों, दरबारांत कधीं आपणास बोलावणार याबद्दल वाट पहात बसलों. शेवटीं तें बोलावणेंही आलें. तेव्हां

आतां मनाला संतोष व्हावयाचा सोडून हा खेद काय ह्मणून मनाला वाटतो. याची मीमांसा कांहीं फार कठिण नाहीं. जी गोष्ट पहिल्यापासून अनिष्ट वाटत होती ती गोष्ट आपण करावयाची असा कांहीं कारणानें जरी निर्धार केला तरी त्या निर्धारानें ती गोष्ट घडून येण्याची वेळ आली, कीं त्याबद्दल खेद हा व्हावयाचाच. आग्र्यास येण्यांत जो दुसरा हेतु होता तोही त्यांस सफल होण्याचीं चिन्हें दिसेनात. कारण जो सरदार त्यांना भेटण्याला येई तो यांची फार तारीफ करी. आपण गोब्राह्मणप्रतिपालन करण्यासाठीं या मोंगलांशीं झुजतां, याचें आह्मांला फार कौतुक वाटतें असें जो तो म्हणे, परंतु आमच्याकडे तसें होणें कांहीं शक्य नसल्यामुळें सगळ्यांच्या नांग्या पार मोडल्या आहेत असेंही आपल्याच तोंडानें सांगे. यावरून महाराजांस पुढें काय अपेक्षा धरावी याचा चांगलाच बोध होई. हें सर्व त्यांच्या मनांत आलें व निराशेनें त्यांच्या अंतःकरणास पूर्णपणें व्याप्त केलें. आतां आपण दरबारांत गेलों ह्मणजे आपल्याला कसा मानमरातब मिळेल, पुढें काय होईल आपल्याला बादशहा काय ह्मणेल आणि आपण त्यास काय उत्तरें देऊं याविषयीं त्यांच्या मनांत विचार सुरू झाले. शेवटीं त्यांनीं आपल्या वागणुकीसंबंधानें कांहीं निश्चय केला. इतक्यांत रामसिंग यांची स्वारी आल्याची वर्दी आली. अर्थात् महाराजांनीं त्यांस एकांतांत बोलावलें. रामसिंगाला एकंदरींत आनंदच झाला होता. इतके दिवस आपण जो खटाटोप केला त्याचें आज चीज झालें असें त्यास वाटत होतें; परंतु त्याच्या अंतःकरणाच्या एका कोंपऱ्यांत असें वाटूं लागलें होतें कीं बादशहा आतां बोलेल काय ? आणि महाराजांना वागवील कसें ! कोणास कळे ! जर त्यानें आतां आदरानें वागविलें नाहीं किंवा त्यांच्याबद्दल संशय दाखविला, तर सगळेंच कांहीं निराळें होऊन बसेल. परंतु त्याच्या हातीं काय होतें ? एक मन ह्मणे, कीं बादशहा वस्ताद आहे तो शिवाजी महाराजांचें मन दुखविणार नाहीं. दुसरें मन असें सांगे, कीं त्याचा कांहीं नेम नाहीं. आतां हा पक्का आपल्या ताब्यांत आला आहे, याला आपण वाटेल तसें वागविलें तरी हरकत नाहीं. आपल्या मनांत याची योग्यता काय वाटते आहे हें स्पष्ट दाखविलें, तर आतां तो येथें काय करणार ? चुरमुरे खात बसण्यापलीकडे त्याला काय करणें शक्य आहे ? असेंही बादशहाच्या मनांत वाटणें संभवनीय आहे. तथापि आतां आपण आपल्याकडून त्याला रागावण्याला निमित्त देऊं नये अशी खबरदारी घ्यावी ह्मणून महाराजांस सूचना करण्याचें त्याच्या मनांत आलें आणि आतां महाराजांकडे गेलों म्हणजे तेवढी सूचना देऊं असें त्यानें योजिलें. महाराजांची व त्याची भेट होतांच त्यानें त्यांस कुशल प्रश्न विचारल्यावर दरबारला जाण्याची व्यवस्था कशी काय करणार ? ह्मणूनही प्रश्न झाले. नंतर बादशहाच्या संबंधानेंही प्रश्न झाले. असें सभोंवतीं सभोंवतीं गिरक्या घालीत घालीत बोलणें होऊन शेवटीं रामसिंग महाराजांस

ह्मणालाः " आपण सुज्ञ व सुविचारी आहां तेव्हां आपल्यास कांहीं सांगावयास पाहिजे असें नाहीं. आपण मोठ्या अदबीनें कुर्निसा वगैरे करून ते दाखवितील त्या आसनावर जाऊन बसलां ह्मणजे कांहीं होणार नाहीं. परंतु त्यांत जर कांहीं चुकी झाली तर.......

शिवाजीमहाराजांना आपलें बोलणें रुचत नाहींसें रामसिंगास दिसलें. तेव्हां त्यानें तें तितकेंच ठेवून ह्मटलें, आपणास दरबारीं जाण्यासाठीं लागणारी सर्व सामग्री येथें येईल आणि मीही आपल्याबरोबर जाण्यास येईन. मी आपल्याबरोबर असावें असा हुकुमच झाला आहे.

महाराज त्याचें बोलणें गप्प बसून ऐकत होते.

---

# प्रकरण ४७ वें.

## दरबारीं गेल्यावर.

नंतर ते रामसिंगास ह्मणालेः—ठीक आहे. मी नेमल्या वेळीं पोषाख वगैरे करून तयार असतों. आपण आतां जाऊन वेळींच या ह्मणजे बरोबर जाऊं. आपल्याबरोबर जाणें मला इष्ट आहे हें सांगावयाला नकोच. कारण मागें वर सांगितलेंच आहे, कीं महाराजांना आतांपर्यंत जरी दरबारांत जाऊन एकदां काय तो सोक्षमोक्ष होऊन जाऊं द्यावा असें वाटत होतें, तरी आज आतां प्रत्यक्ष आमंत्रण आल्यावर त्यांच्या मनाला समाधान झालें नाहीं. बाकी अलीकडे त्यांस असेंही वाटूं लागलें होतें कीं, आपण या शहरांत अधिक दिवस राहण्यांत कांहीं तात्पर्य नाहीं. पहिले दिवशीं लोकांकडून आपल्या स्वागताचा जो समारंभ झाला त्या समारंभामुळें, लोकांत अद्यापि स्वधर्मप्रतिपालनासाठीं प्रयत्न करणाऱ्या माणसाबद्दल आदर आहे. त्यांना स्वराज्य—हिंदुपदबादशाही झाली तर पाहिजे आहे, स्वतंत्रतेची इच्छा आहे, असें दिसून आलें होतें आणि त्यामुळें अशीही आशा त्यांस वाटली कीं, आपण जें दक्षिणेंत करतों तेंच उत्तरेस करण्यासाठीं कोणी तरी पुरुष उभा राहील व त्यायोगानें बादशहाला इकडे जाऊं का तिकडे जाऊं असें होईल व कोठें तरी एकीकडे त्याला दुर्लक्ष्य करावें लागेल. मग ज्याच्याकडे दुर्लक्ष्य होईल त्याचें कार्य चांगलें साधेल. परंतु एकेक मंडळी हळू हळू त्यांच्या भेटीस येऊं लागली, त्यांच्याशीं संभाषणें झालीं त्यांत जें काय निष्पन्न झालें, तें अगदींच निराळें! नुसता असंतोष शब्दांत मात्र राहिलेला दिसला. त्या असंतोषामुळें हातून कांहीं कृति होण्याचा मुळींसुद्धां संभव दिसेना.

अर्थातच महाराजांची बहुतेक निराशाच झाली आणि त्यांस असें वाटूं लागलें कीं, आतां आपण येथें जास्त दिवस राहाण्यांत कांहीं तात्पर्य नाहीं. दरबारचा मुलाखत झाली कीं आपण आपला येथून गाशा गुंडाळावा असा विचारसुद्धां त्यांच्या मनांत येऊं लागला. अर्थातच दरबारला जाऊन त्याच पावलीं जुळलें तर आपण दक्षिणची वाटही धरावी असा त्यांच्या मनांत विचार येऊं लागला होता. हा विचार आणि वर सांगितलेला पहिला विचार या दोनही विचारांमुळें त्यांना जरी दरबारांत लवकर बादशहानें आपणास बोलवावेंसें वाटलें तरी प्रत्यक्ष आमंत्रण येऊन वेळ नक्की होण्याबरोबर त्यांस आतां पुढें काय होतें याबद्दल काळजी वाटूं लागली आणि इतकेंही मनांत येऊं लागलें कीं आपण यापूर्वीच मुकाट्यानें निघून गेलों असतों तर बरें झालें असतें.

मनुष्याचें मन फार चमत्कारिक असतें; त्याच्या विविक्षित स्थितीची मीमांसा करणें फार कठिण. त्याला परस्परविरोधि विचार एकाच वेळीं किती तरी जोरानें गोंधळवून सोडतात. महाराज सामान्यतः मोठे निश्चयी, परंतु या वेळीं त्यांस कांहीं चमत्कारिक होऊन गेलें. तथापि त्यांच्यासारख्या निश्चयी पुरुषाची ही मनःस्थिति किती वेळ टिकणार ? थोड्याच वेळांत त्यांचें मन शांत झालें. ते आपल्या तयारीस लागले. आपल्या सर्व माणसांस व जिवलग मित्रांस त्यांनीं एकांतांत बोलावून नेऊन कांहीं हितगुज केलें. नंतर पोषाख चढविला. संभाजीमहाराजांसही पोशाख घातला. महाराजांनीं आंतून आपलें जिरेंकुडतें घातलें. वरून एक पिंवळ्या साठणीचें कुडतें घातलें त्यावर आपला पायघोळ झगा घातला. श्रीभवानी तलवार पलीकडे ठेवली होती तिला एक नमस्कार केला आणि स्वारी दरबारांत जाण्यास तयार झाली. त्यांच्या दर्ज्याप्रमाणें त्यांस दरबारीं जाण्याचे वेळचा लवाजमा रामसिंगाकडून आला. इतर सर्व मंडळी तयार झाली. तीही आपल्या परीनें आत्मरक्षणार्थ जसा पोषाख करावयाचा तसा करून निघाली. ज्याच्या त्याच्या दर्ज्याप्रमाणें कोणाला मेणा, कोणाला पालखी हीं वाहनें आलीं. महाराजांसाठींही एक पालखी आली. ही पालखी फारच उत्तम शृंगारली होती, परंतु महाराजांनीं त्या पालखीची आपणांस इच्छा नाहीं, आपण आपल्या स्वतःच्या पालखींत येतों असें सांगितलें. असें केल्यानें बादशहाचा अपमान होतो. कोणी त्याच्या कानीं लागून आपलें हें करणें त्याला कळविल्यास त्याला राग येईल असें कांहीं मंडळींनीं—त्यांच्या तैनातीस ह्मणून असलेल्या दिल्लीकर मंडळींनीं—त्यांस सुचविलें. परंतु महाराजांनीं त्या बोलण्याकडे लक्ष्य दिलें नाहीं. संभूस त्या पालखींत बसवा. कारण तो आतां बादशहाचा पांचहजारी मनसबदार होणार आहे असें सांगितलें. या बोलण्यावर कोण काय बोलतो. मुद्लींच आली तशी पालखी परत न लावतां महाराज आपल्या चिरंजिवांना तरी बसण्याची परवानगी देताहेत हेंच सर्वांस विशेष वाटलें.

महाराजांची स्वतःची पालखी तयार झाली, त्यांचे नेहमींचे वाहक भोई

तयार झाले, आणि सर्व मंडळी तथून निघण्यासाठीं अगदां सज्ज झाला. आतां रामसिंग येण्याची काय ती वाट. इतक्यांत रामसिंगही आला. बादशहाकडून आलेल्या पालखींत महाराज न बसतां त्यांनीं आपल्या चिरंजिवास बसविलें हें बरें झालें नाहीं असें रामसिंगास वाटून त्यानें त्याप्रमाणें महाराजांस बोलून दाखविलें; परंतु महाराजांनीं त्यास " जें मी करतों आहें तेंच बरोबर आहे. संभाजीराजांनाच मनसबदारीचीं वस्त्रें मिळणार आहेत तेव्हां त्यांनींच बादशहाचा मान घ्यावा " असें अर्धवट विनोदानें ह्मणून आपल्या पालखींत आरोहण करण्यासाठीं त्यांनीं गोंड्यास हात घातला, तों गोंडा तुटून हातीं आला. त्याबरोबर सर्व मंडळीचे मनांत चर्र झालें. अपशकून झाला असें सर्वांच्या मनांत आलें. परंतु महाराज फार समयसूचक ते एकदम हंसून म्हणतातः " वा ! आई भवानीची तरी काय मौज आहे ! बाबारे, कोणत्याही बाहेरच्या आधाराच्या जोरावर काम करशील तर तुला यश येणार नाहीं. आपला स्वतःचा आधार तोच तुझा आधार असें मला सुचविलें. असें ह्मणून ते चटकन् पालखींत चढून बसले. भोयांनीं तो गोंडा काढून दुसरा बांधला. संभाजीमहाराजांस आधींच त्या दुसऱ्या पालखींत बसविलें होतें. रीतीप्रमाणें दोनही पालख्यांच्या दोनही बाजूंस छत्र धरणारे, चामरें ढाळणारे व वारा घालणारे लोक उभे राहून वारा घालीत होते. शिंगें, तुताऱ्या, नौबती वगैरेंचा ध्वनि सुरू झाला. आणि स्वारी मोठ्या थाटानें आग्र्याच्या किल्ल्याकडे जाऊं लागली.

बादशहा बहुतकरून दिल्लीस रहात असे. परंतु हल्लीं कांहीं दिवस आग्र्यास येऊन राहिला होता. त्यानें शहाजहानास कैद करून याच किल्ल्यांत ठेविलें होतें आणि त्यामुळें त्याला असें वाटे कीं, आपण येथें जवळच असलें पाहिजे नाहीं तर शहाजहानास कोणी सोडवून पुनः त्याची बादशहात सुरू करतील. चमत्कार असा कीं शिवाजीमहाराजांची स्वारी आज बादशहाच्या आमंत्रणावरून दरबाराला जाणार असें सगळ्या शहरभर झालें मात्र, एकदम पुनः त्यांला पहाण्याची उत्कट इच्छा लोकांस होऊन लोकांच्या झुंडीच्या झुंडी त्यांच्या मार्गाकडे वळूं लागल्या, तेव्हां आतां यांना आपल्या मार्गावर सोडून आपण दुसरीकडे ह्मणजे बादशहाकडे काय चाललें आहे तें पहाण्यास जाऊं.

बादशहा आपला दरबारी पोषाख घालण्याच्या विचारांत होता. ऐषआराम हा शब्दही औरंगजेबास माहिती नव्हता. त्याच्या दरबारांतून नाच, तमाशे, गाण्याच्या बैठकी वगैरे पार हाकून दिल्या होत्या. गांवांत कोठें गाणीं झालीं कीं कोतवालानें तेथें जाऊन बैठकी उधळून लावाव्या असा त्याला अधिकार दिलेला होता. त्याचप्रमाणें कोणी उगीच ऐषआरामांत दिवस कंठूं लागला आहे असें बादशहाच्या कानीं आलें, कीं बादशहानें त्यास आपण दरबारांत येण्याची तसदी घेत जाऊं नये असें साफ सांगावें. तेव्हां त्याचा पोषाख तो काय असावयाचा ! परंतु

किती झालें तरी बादशहा तो आणि त्यांतून दक्षिणच्या राजाला दरबारीं आणून त्याचें आज प्रदर्शन करावयाचें होतें. तेव्हां त्यांतल्या त्यांत जो काय आपला खरा दरबारी पोषाख तो घालून जावयाचें असा त्यानें निश्चय केला होता. आणि त्याप्रमाणें तो आपला पोषाख चढवीत होता, इतक्यांत आपली मामी षाहिस्तेखानाची बायको कांहीं जरुरीच्या कारणानें मुलाखतीसाठीं आली आहे असा बादशहास निरोप आला. क्षणमात्र बादशहास विचार पडला कीं, हें काय प्रकरण आहे ! परंतु आतां दरबारला जाण्याच्या वेळीं भेट घेण्याला फुरसद नाहीं असा त्यानें निरोप पाठविला. तो निरोप पोंचून पुनः तिचा निरोप आला कीं, कांहींही असलें तरी दरबारीं जाण्यापूर्वी मला मुलाखत घेतलीच पाहिजे. आपण भेटत नसल्यास मी स्वतः येऊन भेटतें. म्हातारी झालें आहें. गोषाविषाचें कांहीं मनांत आणीत नाहीं. असा विलक्षण निरोप येतांच बादशहास फारच आश्चर्य वाटलें. बादशहाची या मामीच्या ठिकाणीं फार भक्ति होती. तेव्हां इतक्या निक्षून आलेल्या निरोपाला एकीकडे सारणें त्याला शक्य नव्हतें आणि इष्टही वाटलें नाहीं. त्यानें लागलींच मामींस आपल्या दिवाणखान्यांत येऊन बसण्याविषयीं निरोप पाठविला. आणि निरोपाच्या मागोमाग स्वतः बादशहा गेला. मामी केव्हांच तेथें येऊन बसली होती. तिनें बादशहास पहातांच त्याला म्हटलें: "माझ्या मुलास मारणाऱ्या काफिराचें तूं आगतस्वागत करून त्याला मनसबदारी, सुभेदारी देणार कीं काय ? मग आम्ही अबलांनीं सूड उगविण्यासाठीं कोणाच्या तोंडाकडे पहावें. त्याचें स्वागत कोण्या थाटानें झालें, तें ऐकल्या दिवसापासून माझ्या अंगाचा तिळपापड झाला आहे. तो येथें येऊन तुझ्या तडाख्यांत सांपडला असून त्याला मानमरातबांनीं मारणार, कीं झाल्या गोष्टीचा सूड उगवणार. स्वर्गांत तुझा मामा या तुझ्या कृत्याबद्दल तुला काय म्हणत असेल याचा विचार कर. त्याच्या मुलाचा प्राण कोणासाठीं गेला ? त्यानें तुझ्यासाठीं आपला जीव किती धोक्यांत घातला हें कांहीं ध्यानांत घे. मला आजपर्यंत असें वाटत होतें कीं काफर हातांत सांपडला, कीं तूं त्याचा पक्का सूड उगवशील; पण जें पहातें तें भलतेंच. सूड तर लांबच राहिला. उलट त्याची बडेजावच सुरू झाली आहे ! कांहीं तरी शासन त्याला होईल असें मला आश्वासन दिलें, तरच मी आतां येथून हलेन. नाहींपेक्षां येथें आतां मी त्रागा करून प्राण देईन. त्यांनीं तुझ्याकरितां प्राण धोक्यांत घातला, पोरगा बळी दिला, मीही तुझ्याकरितां प्राण देतें ! मग तूं कांहीं केलेंस तरी मी कांहीं पहाण्यास येत नाहीं."

आपली मामी अशा प्रकारें बोलते आहे हें पाहून औरंगजेब अगदीं स्तब्ध झाला. तो मोठा दीर्घदर्शी व निश्चयी. बायकांच्या रडण्याकढण्यानें यत्किंचित्सुद्धां हृदय हलूं देणारा नव्हे. परंतु त्या म्हातारीचे हातवारे आणखी रडणें व उद्वेगानें काढलेले उद्गार ऐकून आणि त्रागा करण्याचा निश्चय पाहून त्याचें हृदयसुद्धां

हललें आणि त्या म्हातारीला काय उत्तर द्यावें तें त्याला मुळींच सुचेना. म्हातारीनें तर एकसारखा तोंडाचा पट्टा सोडला होता. ती आक्रोशानें बोलत होती. शेवटीं तूं अगदीं फिकिर करूं नको, तुझ्या इच्छे-प्रमाणें सारें कांहीं होईल, असें उत्तर त्यानें तिला दिलें. म्हातारीही त्याचा स्वभाव पूर्णपणें जाणून होती. आपण आतां केलें इतकेंच पुरे असा मनांत विचार करून ती जातां जातां त्यास एवढेंच म्हणालीः "आतां मला काळजी नाहीं. तूं बोलल्याप्रमाणें करशीलच. मी रंडकी झालें. माझीं पोरें राहिलीं नाहींत. मग उठल्यासुटल्या तुझ्याकडे येऊं नको तर दुसरीकडे कुठें जाऊं ? आतां माझें समाधान झालें. आतां अगदींसुद्धां मी कांहीं बोलत नाहीं." असें म्हणून ती तेथून निघून गेली.

बादशहानेंही आपला पोषाख चढविला. परंतु त्या बाईचे येण्यानें त्याचें चित्त अत्यंत उद्विग्न झालें. त्याच्या मनांत नानाप्रकारच्या गोष्टी येतच होत्या. त्या स्थितींतच तो दरबारास जाण्यास निघाला.

इकडे रामसिंग, संभाजी व महाराज आपआपल्या पालख्यांतून बसून थाटानें चालले होते. सर्व शहर शिवाजीमहाराजांस पहाण्यास त्यांच्या मार्गावर लोटलें होतें. करतां करतां शिवाजीमहाराज किल्ल्यावर येऊन पोंचले व दरबार भरण्याचा जो आमखास् नांवाचा मोठा भव्य दिवाणखाना, तेथें आले. रामसिंगानें व त्याच्या मित्र सरदारदरकदारांनीं महाराजांस आपल्यांतली उच्च मानाची जागा दिली. पुष्कळांनीं त्यांस आपआपल्या रीतीप्रमाणें आदरानें हात उचलून माना हलवून आदर दाखविला. महाराजांनींही मोठ्या मरातबानें सर्वांकडे पाहून हंसून त्यांस जाब दिला. इतक्यांत नौबतखान्यांत नौबती वाजूं लागल्या. शिंगें, तुतान्यांचे ध्वनि निघूं लागले. ही बादशहा येण्याची निशाणी भालदार चोपदारांची निगा रखो अशी ललकारी झाली. सर्वांनीं खडी ताजीम दिली. शिवाजीमहाराजांनीं उभें रहाण्यापूर्वीं क्षणमात्र अनमान केला. रामसिंगाच्या हें ध्यानांत येऊन त्यांस 'असें कांहीं करूं नका उठा' म्हणून त्यानें सुचविलें. महाराज उठले; परंतु हा प्रकार एकट्या रामसिंगाच्याच लक्ष्यांत आला असें नाहीं आणखीही एका व्यक्तीच्या नजरेस तो प्रकार आला.

बादशहा आपल्या तख्तावर बसला. औरंगजेबाचें नेहमींचें दरबारचें ठिकाण दिल्ली होय. आग्रा ही राजधानी अकबराची. परंतु औरंगजेबास सध्यां आग्र्यास रहाणेंच जरूर असल्यामुळें त्यानें शिवाजीस तेथेंच आणवून आपला दरबार करविला, हें वर सांगितलेंच आहे. अर्थातच दरबाराकरितां सर्व व्यवस्था आग्र्यास निराळी करावी लागली. शिवाजीमहाराजांच्या मनावर आपल्या वैभवाचा खूप परिणाम व्हावा, त्याला आपली स्वतःची दुर्बळता किती विलक्षण आहे हें विरोधानें चांगलें समजावें म्हणून दरबारचा थाट विशेष भपक्याचा व्हावा अशी तजवीज त्यानें केली होती. त्या दिवाणखान्याचा शृंगार अतिशय भपकेदार व्हावा

ह्मणून त्यानें त्याच निरनिराळे भाग पाडून त्या त्या भाग.ताल खांब व भिंती शृंगारण्याचें काम निरनिराळ्या सरदारदरकदार.कडे दिलें होतें. अर्थात् एकमेकांच्या चढाओढीनें ज्यांनीं त्यांनीं आपआपले भाग शृंगारल्याकारणानें सर्व थाट फारच अप्रतिम झाला होता! ज्याप्रमाणें त्या दिवाणखान्याचे खांब, भिंती व कमानी त्याचप्रमाणें त्यांत बसलेले अमीरउमराव, सरदारदरकदार, राजेरजवाडे, हेही नखशिखांत शृंगार करून बसले होते. इतर प्रसंगीं बादशहाच्या हुकुमानेंच तसें यावें लागे, परंतु आज सर्वजण आपल्या मनाच्या हौसेनें तसे शृंगार करून आले होते. हे सर्व अमीरउमराव, सरदारदरकदार व राजेरजवाडे बादशहाच्या तख्ताच्या दोनही बाजूंस रुपेरी कठडा लावलेल्या अधिष्ठानावर आपापल्या दर्जाप्रमाणें बसले होते. या अधिष्ठानावर सुंदर छत्राकार वितान होतें. त्यापासून सुरेख सोनेरी झिलामिळ्या लोंबत होत्या. मध्यभागीं बादशहा येऊन बसला. तेव्हां भालदार, चोपदार यांच्या ललकाऱ्या उठल्या आणि शिंगें, तुताऱ्या, कर्णे व नौबती यांचा मिश्रध्वनि एकसारखा सुरू झाला. बादशहा मध्यभागीं येऊन बसल्यावर सर्व कांहीं शांत झालें.

बादशहा नेहमीं अगदीं साधा असा पोषाख करी, परंतु आज त्यानेंसुद्धां आपला साधेपणा बऱ्याच अंशांनीं टाकला. त्याच्या अंगांत पांढऱ्या परंतु नाजूक फुलांनीं शोभिवंत केलेल्या अशा सुंदर साटिणीचा झगा होता. शिवाय त्या साटिणीवर रेशमी व भरजरी कशिदा फार नामी काढला होता. त्याच्या डोक्यास एक कांहीं पागोट्यासारखें कांहीं टोपीसारखें असें एक शिरोभूषण होतें, त्यावर सुंदर हिऱ्यांनीं खचित व मध्यभागीं मोठें माणिक बसविलेली पट्टी होती. त्याच्या गळ्यांत चांगला बोराएवढाल्या मोत्यांचा एक हार घातलेला असून तो त्याच्या छातीवरून पोटाच्या खालपर्यंत रुळत होता! याप्रमाणें त्याचा पोषाख पांढरा परंतु अतोनात मूल्यवान् असा होता.

असा तो बादशहा येऊन बसल्यानंतर त्यानें सर्वांकडे एकवार पाहून मान हलवून गंभीरपणें स्मित केलें. नंतर रामसिंगाकडे पाहिलें. अर्थात् रामसिंग समजला. त्यानें शिवाजीमहाराजांस खूण केली व तख्ताच्या जवळ जाऊन कुर्निसा करून या असें सुचविलें. महाराजांच्या कपाळाला थोड्या आंठ्या पडल्या. त्यांच्या मनास खेद झाला. परंतु रामसिंगानें तितक्यांत पुनः खूण केली आणि आतां भलतेंसलतें कांहीं केलेंत तर भलताच परिणाम होईल, उठा असा इषारा दिला. महाराज बादशहाच्या जवळ गेले. रामसिंग त्यांच्याजवळ होताच. भालदारचोपदारांनीं ललकाऱ्या फोडल्या. महाराजांनीं मोठ्या कष्टानें कुर्निसा केला. बादशहानें तो घेतला न घेतलासें दाखविलें. आणि " कशी काय तब्यत ? " असें विचारून हातानें " जा, तिकडे उजवे बाजूला पलीकडे बसा. " अशी खूण केली. ती खूण करतांना बादशहाचा चेहरा इतका कांहीं तिरस्कारपूर्ण दिसला कीं महा-

राजांस त्यामुळें फार खेद व संताप झाला. परंतु आपला खेद व संताप दाखविल्यानें येथें संकटाखेरीज आपणांस कांहींच लाभ होणार नाहीं. आपण आपलें मन आंवरून धरलेंच पाहिजे असें त्यांचें त्यांस वाटलें. आणि त्याच पावलीं ते मार्गे झाले. रामसिंगानें त्यांस बादशहानें खूण केल्या जागीं जाऊन उभें राहण्यास सुचविलें. महाराजांच्या अंगाचा तिळपापड उडाला. आपणांस बादशहा फार मोठ्या मरातबानें वागवील अशी महाराजांस उमेद होती, परंतु आतां प्रत्यक्ष पाहतां त्यानें त्यांस तिसऱ्या चवथ्या प्रतीच्या सरदारांत उभें रहाण्याविषयीं खूण केली. हा अपमान त्यांस कसा सहन व्हावा ? त्यांनीं रामसिंगाच्या म्हणण्यास्तव त्या बाजूकडे जाण्याची हूल दाखविली, परंतु तितक्यांत आपल्या मंडळीस खूण करून बादशहाकडे पाठ करून, त्याचा मुळींच निरोप न घेतां बाहेर जाण्याची वाट धरली. रामसिंग त्यांचें हें करणें पाहून फार चकित व भयभीत झाला. महाराज आपल्यावर विनाकारण बादशहाचा राग ओढून घेत आहेत. असा राग झाला तर कोणता प्रसंग आपल्यावर गुदरेल याची त्यांस कल्पना कशी येत नाहीं ? असें बिचाऱ्याच्या मनास वाटूं लागलें. म्हणून त्यानें त्यांस आपण असें करूं नका, हा वेडेपणा होणार आहे, प्रसंग भलताच आहे असें सुचविलें. परंतु त्यांचें डोकें कोठें ठिकाणावर होतें ? त्यांनीं त्याच्याकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं आणि ते एकदम आपल्या सर्व मंडळीला घेऊन भर दरबारांतून उठून आपल्या जागीं परत गेले !

---

# प्रकरण ४८ वें.

## ठिकाणीं परत आल्यावर.

महाराज नखशिखांत लाल झाले. एक क्षणाचाही विलंब न करितां आपण आग्रा सोडावयाचा असा त्यांचा निश्चय झाला होता. महाराजांच्या पाठोपाठ त्यांची मंडळी निघून आली. सर्व दरबारांत आपापसांत सरदार लोक कुजबुजूं लागले. या कुजबुजींत “ शाबास ! ” “ खरा धीराचा ! ” “ वीर म्हणतात तो हा ! ” “ पुढें काय होईल याची पर्वा नाहीं. परंतु आतां अपमान सहन झाला नाहीं ! ”

असले उद्गार ऐकूं येत होते. परंतु कोणाच्याही ओठाबाहेर दोनचार वितींवरही ते ऐकूं आले नाहींत. रामसिंगास आतां काय करावें हें क्षणमात्र सुचलें नाहीं. तो चकित झाला. इतका कीं, आपण पाठोपाठ जाऊन महाराजांस परत आणावें कीं बादशहाकडे जाऊन महाराजांच्या त्या वर्तनाबद्दल कांहीं तरी सबब त्यास सांगावी हें कांहींच त्यास सुचेना. शेवटीं तो बादशहाकडे वळला, व फार नम्रपणानें त्यास म्हणाला, " गरीब परवर, शिवाजी महाराजांनीं मला आपल्यास विनंति करण्याला सांगितलें आहे कीं, ' मी दक्षिणेंतला गरीब इनामदार, मला दरबारची रीतभात कांहीं एक माहिती नाहीं. आपल्या दरबारचा थाट पाहून आणखी आपला इतमाम, इभ्रत व एकंदर बडेजाव पाहून आपली अक्कल गुंग झाली. आणि इतक्या समाजांत आजच पहिल्यानें आल्यामुळें इथें अगदीं चक्कर येऊं लागली. आतां पडणार असें वाटूं लागलें. परंतु दरबारांत असें पडून आपली स्थिति लोकांना दिसण्यापेक्षां आपल्या जागीं जाऊन बसावें असें मनांत योजून हुकूम न घेतां गेलों याबद्दल गरीब बंद्यावर राग नसावा. माझी प्रकृति फार बिघडली. संभाजी राजांना जे कांहीं पोषाख आणखी ज्या सनदा द्यावयाच्या ते पोषाख आणखी त्या सनदा आमच्या मकाणावर पाठवून द्याव्या.' खरोखर तिकडे दक्षिणेंत डोंगरी मुलखांत वागलेले ते. त्यांना दरबारी थाट आणखी तो बादशहाचा—असें कांहीं झालें तर नवल नाहीं. मला खरोखरीच असें वाटलें कीं हे आतां इथेंच झीट येऊन पडताहेत. तेव्हां खाविंदांनीं त्यांच्या घरीं जाण्याबद्दल रागावूं नये. गैरमाहितीनें सगळा प्रकार झाला आहे, एवढें कानावर घातलें आहे. बादशहा सर्वांहून श्रेष्ठ व ज्ञानी आहेतच. आणखी जसे ज्ञानी व श्रेष्ठ तसे दयाळूही आहेत. "

बादशहाच्या कपाळावर आंठ्या पडल्या. तो क्षणमात्र विचार करीत होता असें दिसलें. नंतर असें दिसलें कीं, कांहीं हुकूम सोडावा असा त्याचा निश्चय झाला असावा. अशाच बुद्धीनें त्यानें हात वर केला, पुनः कांहीं तरी निराळाच विचार मनांत येऊन त्यानें आपला हात खालीं केला. तोंड चंबूसारखें करून कांहीं बोलावयाचें होतें तें दाबून टाकीत होता असें स्पष्ट दिसलें. रामसिंगाचें बोलणें स्वस्थपणें ऐकून घेतलें. नंतर त्यास त्यानें म्हटलें, " ठीक आहे, ते येथें दरबारांत आले हेच आमच्यावर उपकार झाले आहेत; आणि तुम्हींही त्यांना येथें आणून बसविलें याबद्दल तुमची तारीफ करावी तेवढी थोडी आहे. झाल्या प्रकाराबद्दल मी कांहीं बोलत नाहीं. परंतु......',

बादशहाच्या मनांत पुढें काय बोलावयाचें होतें तें त्याचें त्यालाच ठाऊक. वरील

वाक्य जेथें तोडलेलें आहे तेथेंच तें त्यानें तोडलें. नंतर एकदम दिवाणाकडे वळून, " दरबाराला सांगा कीं, दक्षिणच्या राजाला हा इथला दरबारचा थाट पाहून भीड आल्याप्रमाणें झाल्यावरून आम्हीं त्यास आपल्या मकाणी जाण्यास आज्ञा दिली आहे, आणि त्याप्रमाणें ते गेले आहेत. त्यांच्या स्वतःला आपण कांहीं तरी देणार होतों, परंतु आतां त्यांच्या मुलालाच मनसबदारी—पांच हजारी—देण्याचा विचार कायम करून आपल्या सर्वांसमक्ष वस्त्रें संभाजीकडे पाठवीत आहें. "

बादशहाचें तें भाषण दिवाणानें दरबारास कळविलें तें ऐकून प्रत्येक माणूस फार चकित झाला. बादशहा संतापानें कांहीं तरी जबर शिक्षा या वेळीं शिवाजीस करणार, परंतु ती एके बाजूस राहून त्याच्या उलट त्याच्या पाठोपाठ त्याच्या मुलासाठीं मनसबदारीचीं वस्त्रें पाठविण्यांत येत आहेत, हें पाहून जिकडेतिकडे अगदीं चकितपणाचे उद्गार निघाले. बादशहाला इतका गरीबपणा आला कोठून असें जो तो म्हणूं लागला. परंतु तें सारें आपसांत. हें उघड आहे कीं, बादशहाच्या तोंडावर त्यास कोणी तुम्ही हें काय करितां असा प्रश्न विचारणारा नव्हता. मुसलमान सरदारांना फार त्वेष आला. बादशहा या फकिराची इतकी बडेजाव कां ठेवतो ? हेंच त्यांना समजेना. बादशहाला सध्यां दक्षिणेंत दुसऱ्या कोठें कोणाशीं वैर नको एवढेंच त्यांतलें इंगित असेल असें त्यांस वाटलें. कित्येकांनीं मनांत असा निश्चय केला कीं, आपण बादशहाची एकवार गांठ घेऊन त्यास आपण करितां आहां त्यामुळें आपली फार नाचक्की होत आहे असें स्पष्ट सांगावयाचें. परंतु त्यांच्यापैकीं कितीकांच्या हातून तो निश्चय पार पडला असता हें संशयात्मकच होतें.

जे रजपूत होते, त्यांना असें वाटलें कीं, राजा जयसिंगानें शिवाजीला मोठ्या शिकस्तीनें आपल्याकडे पाठविलें आहे, तेव्हां त्याच्या मर्जीकरितां तरी आपण शिवाजीला कांहीं कठोरपणानें वागवितां कामा नये. तसें वागविलें तर विनाकारण आपल्याच माणसाला आपण फसविल्यासारखें होईल. म्हणून शिवाजीनें कांहीं केलें तरी बादशहा त्याच्याकडे दुर्लक्ष्य करितो आहे. दुसऱ्या कित्येकांस असें वाटलें कीं, " शिवाजी महाराजांना जर आपण वाईट तऱ्हेनें वागविलें तर दक्षिणेंत फार मोठा धुमाकूळ उडेल. तो सध्यां इष्ट नाहीं. " असा विचार करून बादशहा एवढी सबुरी दाखवीत आहे.

ज्याला जें कांहीं सुचेल तें त्यानें मनांत आणून बोलून दाखविलें. त्यांत कांहीं —नव्हे बरेच असेही होते, कीं शिवाजीनें इतकें धाडस केलें. सिंहाच्या गुहेंत तो

आपल्या थाटामाटांत दरबारीं बसला असतां एकदम जाऊन त्याच्या आयाळीला हिसके देणें जसें सर्वथैव धोक्याचें तसेंच शिवाजीनें या वेळीं वर्तन केलें, याबद्दल जर बादशहानें चांगलेंच शासन करावयाचें मनांत आणलें, तर काय होईल ! असे आपले लोकांचे नाना तर्क चालले होते. बादशहानें मात्र रामसिंगास पुनः आपले-कडे बोलावून कांहीं सांगितलें. काय सांगितलें तें त्याचें त्यांसच ठाऊक. दुसऱ्या कोणास कळण्यास मार्ग नव्हता. रामसिंगांनीं नंतर आज्ञा घेऊन तेही निघून गेले. कांहीं वेळानें दरबार बरखास्त झाला. महाराजांच्या धिटाईबद्दल कोणी त्यांस प्रशंसूं लागले. कोणी निंदूं लागले. निंदा करणाऱ्यांना असें वाटूं लागलें कीं, हा असला धीटपणा स्वतःचा घात करणारा धीटपणा होय. असो. याप्रमाणें धीटपणाची स्तुति किंवा निंदा करीत व इतर अनेक गोष्टींबद्दल बोलत लोक आपआपल्या घरीं निघून गेले.

इकडे महाराज अत्यंत संतप्त होऊन आतां काय करावें यासंबंधानें विचार करूं लागले. त्यांना साधारणतः कोणत्याही गोष्टीचा पक्का विचार करण्याला फारसा वेळ लागत नसे, त्यांनीं आपल्या सगळ्या मंडळींना बोलावून झालेली हकीकत सांगि-तली; आणि आतां प्रसंग ठीक नाहीं. करितां सगळ्यांनीं येथें राहण्याचें कारण नाहीं, मी सांगतों त्या मंडळींनीं दोन घटकांच्या आंत येथून चालतें व्हावें, असें म्हणून भराभर माणसांचीं नांवें त्यांनीं घेतलीं व त्यांचे हाताखालचे शिलेदार वगैरे कोणीं जावें तें त्यांनीं सांगितलें. महाराजांच्या आज्ञेविरुद्ध कांहीं करण्याची गोष्ट तर लांबच राहूं द्या. परंतु नुसतें त्या आज्ञेविरुद्ध कांहीं बोलून दाखविण्यास सुद्धां कोणाची छाती नसे. त्यांनीं होऊन एखादे बाबतींत ज्याला सल्ला विचारला असेल त्यानें तो खुशाल मन मोकळें करून सांगावा; परंतु जो हुकूम किंवा आज्ञा म्हणून दिली असेल ती मोडावयाची किंवा त्याच्याविरुद्ध कांहीं बोलायची मुळींच कोणाची छाती नसे, यामुळें पुष्कळ मंडळींना जरी असें वाटलें कीं,आपण महाराजांस अशा परक्या देशांत सोडून जाऊं नये, तरी आम्ही जात नाहीं किंवा आपण आम्हांला असें सोडून जाण्याची आज्ञा करूं नका असें म्हणण्याचें कोणास धैर्य होईना.

कित्येक गोष्टी अशा असतात कीं, त्या तोंडीं जरी बोलून दाखविल्या नाहींत, तरी त्या बोलून दाखविण्याची आतुरता माणसाच्या चेहऱ्यावरून तेव्हांच अजमा-वतां येते. आपल्यास एकट्यास आग्र्यास सोडून जाणें या माणसांच्या जीवावर

आलें आहे हें महाराजांनीं तेव्हांच ताडलें आणि ते त्यांचेकडे वळून म्हणाले: " मला एकट्याला किंवा आपल्यापैकीं दहा पांच जणांनाच अशा खाईंत सोडून जाणें आपल्या जीवावर येतें आहे. आम्हांला संकटांत सोडून आपण आपला बचाव केला असें होतें असें तुम्हांला वाटत असेल हें उघड आहे; परंतु त्याला काय करावें ? तुम्ही इथें राहिलांत तर मी जास्त संकटांत पडेन. एवढ्याकरितां मी सांगतों तसेंच करा, आपले वाट सांपडेल तसतसे निघून जा. गोदावरी उतरून गेलांत, किंबहुना नर्मदा उतरलांत कीं सुखरूप गेलांत म्हणून समजा. तोंपर्यंत वाट चाला. सिंहाच्या गुहेंत जाऊन त्याची आयाळ धरून त्याला गदगदां हलविलें आहे, तेव्हां आतां तो सूड उगवायची धडपड केल्याखेरीज रहाणार नाहीं. परंतु मी, आणखी काय दहा पांच लोक ठेवून घेईन ते, असे हरप्रकारच्या युक्त्या करून निघून येऊं; परंतु तुम्ही आतां येथून निरनिराळ्या वाटानीं निघून जा. अगदीं सुद्धां अनमान करूं नका; एकाच वाटेनें सारेजण जाऊं नका; पांच पांच चारचारांची एकेक टोळी करून जा. म्हणजे कोणी तुमच्या पाळथीवर आले तरी फारसा दगा होणार नाहीं. मीं केलेल्या हुकमांची बजावणी करण्याला अगदीं विलंब लावूं नका. माझ्या जीवाला कांहीं सुद्धां धक्का लागणार नाहीं. तुम्हांला काळजी नको. माता भवानीनें पूर्ण आश्वासन दिलें आहे हें लक्षांत ठेवून दृढ भावनेनें जा. अगदीं सुद्धां माझी काळजी करूं नका. "

इतकें महाराजांनीं निक्षून सांगितल्यावर मग कोण काय बोलणार ! त्यांच्या आज्ञेप्रमाणें छावणींतील मंडळी पांच पांच सात सातांच्या टोळ्या करून चालती झाली. दरबार संपून मंडळी येतात तों, शिवाजी महाराजांचीं अगदीं खाशा तैनातीचीं तेवढींच काय तीं माणसें राहिलेलीं, रामसिंगास हें कळतांच त्यास असें वाटलें कीं, महाराज हे एकंदर करतात तरी काय ! परंतु बोलण्याची सोयच नव्हती !

त्यानें सायंकाळीं महाराजांची भेट घेतली तेव्हां महाराजांनींच त्यास म्हटलें, "आमचीं माणसें आम्हीं लावून दिलीं. आतां आम्ही सर्वस्वीं तुमच्या ताब्यांत आहों. बादशहास कळवावें कीं, आमचेंही मन येथें लागत नाहीं. तरी आम्हांस निरोप द्यावा."

रामसिंग बराच वेळ कांहीं बोलला नाहीं. नंतर म्हणतो: " आपण सुरू केला हा क्रम बरा नव्हे. बादशहाला विनाकारण चिडविणें आहे. यापासून बरें काय होणार ! तरी आपण कांहीं दिवस असावें, तेढीनें वागण्यांत फायदा काय ! बादशहाचा दिल फार नाखूष झाला."

तें ऐकून महाराज म्हणाले, " आमचा तरी कोठें खूष आहे ! त्यानें आमच्यावर किंवा आम्ही त्यांच्यावर खूष होण्यासाठीं आमचा जन्मच नव्हे. आम्ही आतां येथून निसटून गेलों तर स्वराज्यीं जाऊन पुनः आपल्या उद्योगास लागूं; नाहीं गेलों तर जीं माणसें गेलीं आहेत तीं लागतील. एवंच, आम्हीं आरंभिलेला उद्योग कांहीं थांबून पडणार नाहीं. तरी आपण त्याबद्दल दिलगिरी करण्यांत अर्थ काय ? बाद्-शहाच्या मनांत काय आहे तें आज दरबारीं दिसलें. त्याचे मनींचा मनसुबा असा कीं, आम्ही एकाद्या शिलेदाराप्रमाणें किंवा बारगिराप्रमाणें त्याचे दरबारीं रहावें, त्याखेरीज आम्हांला त्यानें उजवे बाजूस शेवटीं बसण्याची खूण केली ? त्याला काय म्हणावें ? आह्मी आतां चार आठ दिवस चारचौघांच्या भेटी घेऊन वेळ काढतों. आपण एकदां पडल्या फळाची आज्ञा आणून द्या कीं, आम्ही त्या घटकेस आग्रा सोडतों. आपण आमच्या उपयोगीं पडावयाचें तर एवढेंच करावें कीं, आम्ही दिल्लीस आल्यासारखें एथल्या गरीब गुरीबांना, फकीर साईंना, उदासी कबीरपंथी लोकांना, गोसाव्या बैराग्यांना आमचें स्मरण रहावें म्हणून निरनिराळ्या धर्मशाळां-तून, मशिदींतून वगैरे मेवामिठाई वांटूं द्या. आम्ही हलवायांना सांगूं तेथून ते तयार करून आमचेकडे घेऊन येतील. मग आमच्यापैकीं निरनिराळ्या लोकांना वांटून देत जातील. बादशहा आम्हांला जाण्याला अनुमति देईपर्यंत हा क्रम ठेवूं. गरीबगुरीबांचा आशीर्वाद तरी घेऊं. "

---